मानस गूढार्थ चंद्रिका

# अयोध्याकाण्ड

## खंड - 3

लेखक
श्री.प.प.ब्र.स्वामी प्रज्ञानानंद सरस्वती





।। श्री सद्‌गुरवे नमः ।।

।। श्री राम समर्थ ।।



# ✲ विनम्र आवाहन ✲

श्रीरामकृपेने महाराष्ट्रीय संतांच्या मंदियाळीतील आधुनिक 20व्या शतकातील संत परमपूज्य प्रज्ञानानंद सरस्वती स्वामी यांचे स्मारकरूपाने श्रीराम - मंदिर ''श्रीराम विश्रामधाम'' या नांवाने परांडा येथे विद्यमान आहे. या मंदिरातील श्रीराम - सीता सिंहासनाधिष्ठित, चरण स्पर्शित हनुमान, व लक्ष्मण या मूर्तींची प्रतिष्ठापना राष्ट्रसंत पू. मुरारी बापूंचे शुभहस्ते 2003 मध्ये झाली आहे तर भरत, शत्रुघ्न व नंदिसह शिवलिंगाची प्राणप्रतिष्ठा पू. आचार्य किशोरजी व्यास (प. पू. गोविंद देवगिरी स्वामी) यांचे शुभ हस्ते झाली आहे. तसेच या मंदिरात गणेश, दास-मारूती, माखनचोर याही मूर्ती असून या संगमरवरी मंदिरात श्रीरामचरितमानसातील मंगलाचरणे, दोहे चौपायाही कोरलेल्या आहेत. कारण श्रीरामचरितमानसावरच प. पू. प्रज्ञानानंद सरस्वती स्वामींनी आपले समग्र जीवन समर्पित केलेले होते. हे अति सुंदर मंदिर आपण एकदा तरी आवर्जून पहावेच पहावे असे आहे कारण 'संपूर्ण राम दरबार' फारच क्वचित आढळतो तो पाहिल्याने खऱ्या अर्थी मनास ''विश्राम'' मिळतो.

ह्या मंदिरात भोजनशाळा व भक्तनिवासाचे बांधकाम लवकरच सुरू करीत आहोत. तरी यासाठी आपणासारख्या उदार दात्यांकडून सढळ हाताने आर्थिक देणग्यांची अपेक्षा आहे. देणग्यांसाठी 80G आयकर सवलत उपलब्ध आहे. तरी आपण आपले चेक, डी. डी. वा मनी ऑर्डर्स ''श्रीरामचरितमानस प्रेमी मंडळ'' या नावाने खालील पत्यांवर पाठवाव्यात ही विनंतीवजा कळकळीची प्रार्थना.

(१) **सौ. रेखा नी. पटवर्धन,**
अक्षय रेस्टॉरंट समोर, 'पटवर्धन' बंगला, मिरज. जि. सांगली - 416410.
फोन : (0233) 2221083

(२) **सौ. राजश्री भा. दिवाकर,**
'मल्हार' बंगला समर्थ नगर, मु. पो. उस्मानाबाद (धाराशिव)- 413501
फोन : (02472) 224989

## विशेष सूचना -

सदर श्रीराम मंदिर व प. पू. प्रज्ञानानंद सरस्वती स्वामींची समाधी (त्याच वास्तूत प. पू. हंसराज स्वामी व प. पू अनंतदास रामदासी यांच्या समाधी) ''हंसराज मठ'' या एकाच वास्तूत आहेत. ही दोन्ही स्थाने पंढरपूर जवळील कुर्डुवाडी पासून 20-22 कि. मी. वरील परांडा बस स्थानकापासून चालत केवळ 5 मिनीटांचे अंतरावर आहेत प. पू. तेजोमयानंद स्वामीजी प. पू. शंकराचार्य इ. संत येथे आवर्जून येतात.

आपल्या विनम्र
**डॉ. कमल वैद्य,**
**सौ. रेखा नी. पटवर्धन**

*येन केन विधि देतां दान करी कल्याण ।।*
*तें धन धन्य जयां प्रथम गति (दान)।। (श्रीरामचरितमानस उत्तरकांड)*

# श्रीरामचरित मानस गूढार्थचंद्रिका

## द्वितीय सोपान अयोध्याकाण्ड

### खण्ड ३ रा

'रामचरित मानस' यावरील मराठी बृहत् टीकेचा अंश
(दोहा १४७/३ ते २४२ पर्यंत)

लेखक : प. पू. स्वामी प्रज्ञानानन्द सरस्वती

प्रकाशक
रामचरितमानस प्रेमी मंडळ,
डोंबिवली.

**प्रथम आवृत्ती :** जानेवारी २००४



**प्रकाशक :**
श्रीरामचरितमानसप्रेमी मंडळ
४, श्रीगणेश, अनंतराज को.ऑ.ही.सोसायटी,
जलाराम मंदिराजवळ, जि. ठाणे, डोंबिवली पूर्व, ४२१०२१.

**मुद्रक :**
प्रतिमा ऑफसेट,
देवगिरी इस्टेट, कोथरूड, पुणे २९.
दूरभाष : (०२०) ५४६ ०२१६

**किंमत :** २५० रु. फक्त

# प्रस्तावना

रसिक भावुक हो, आपण सारे या करुण रसाच्या सरितेत हळूहळू खोल जात आहोत.

आपल्या इच्छेविरुद्ध नाईलाजास्तव सुमंत्र, मर्यादा पुरुषोत्तम श्रीराम, सीता व लक्ष्मण यांचा निरोप घेऊन रिकामा रथ घेऊन अयोध्येत प्रवेशतात. त्या वेळी अयोध्येत प्रवेश करण्यास जी वेळ निवडतात त्यावरूनच त्यांचे सुमंत्र-सचिवत्व कसे सिद्ध होते ते टीकेतून पहावे. सुमंतांसह संपूर्ण अयोध्येचे भयावह चित्र समोर साक्षात उभे राहते. 'सचिवागमन' कळताच दशरथ, कौसल्या, सुमित्रा राण्या असलेल्या राणीवास नेहमी सुखद, मंगलमय असलेला 'जणू की प्रेत निवास' कसा व का बनला हे केवळ राम-वियोगाने बनलेले भीषण रूप अनेक उदाहरणांनी स्वामी टीकेतून स्पष्ट करतात.

सचिवाने राजाज्ञेनुसार राम-सीता-लक्ष्मणांची समग्र वनवार्ता अतिशय विकल, विव्हल व प्रेमार्ततेने जी सांगितली ती ऐकताना प्रत्येक रामभक्ताचे हृदय शतशः विदीर्ण होते. रामांचा निरोप सांगताना लक्ष्मणांची कठोर वचने वर्णू नको असे सांगण्यात श्रीरामांचे आदर्श पुत्रत्व सिद्ध करण्यात टीकेत प. पू. स्वामींची सिद्धहस्तता ध्यानी येते, तर सीतेच्या निरोपाचे कोमलत्व स्वामी त्या वन-वृत्तांतात जसे जपतात तसे केवटाची भक्ती, प्रभूंची जटामुकुट बनविण्यातली कर्तव्य कठोरता, रामाची मातृपितृ भक्ती व भरत-अनुजास हितोपदेश या साऱ्या गोष्टी भक्तीरस पूर्ण अशा वर्णन करतात 'आणि जिवंत रामसंदेशा' या चौपायीतून आपली भक्तीतील अयशस्विता सुमंत शेवटी स्पष्ट कबूल करतात. तीही कर्तव्य पालनाच्या अंगाने ! तर 'धैर्याचाही धीर पळाला' यातून राजमहालातला करुण-विलाप वाचकांच्या जणू कानी निनादत राहतो. शेवटी राम-विरहाने दशरथांचे प्राणकंठ होऊन रविकुल रवी अस्तंगत होताना दुसरीकडे तोच रवी कसा उदयास येतो हे सहजपणे स्वामी टीकेत सांगून दशरथांचे 'नित्यमुक्तत्व' वाचकांवर ठसवितात. त्या करुण प्रसंगातली कौसल्येची धैर्यशील महाराणीची भूमिका 'राममाता' ची समर्थता सिद्ध करते. मृत्युसमयी 'अंध तापसी शाप कथा' कौसल्येला सांगून दशरथांचे सुरधाम गमन रामनामोच्चारांत का व कसे होते ते स्वामी, वाल्मीकी रामायणाशी वगैरे कथेची सांगोपांग चर्चा करून सर्व तपशील

स्पष्ट करतात.

जन्म व मृत्यु दोन्हीचेही सुंदर फळ दशरथांनी कसे प्राप्त केले ते सांगून नृपमरण प्रकरण इथे संपते अन् अयोध्याकांडाचा नायक जो भरत त्याचे आगमन व (राम) प्रेम प्रकरण इथून सुरू होते.

अयोध्येतले 'अनर्थ' भरत आजोळी इतक्या दूरही कसे अनुभवतो व त्यावर कोणते उपाय करतो हे सांगून वसिष्ठांच्या निरोपानुसार भरत सत्वर शत्रुघ्नासह अयोध्येत येतात देखील अन् अशा दुःखद प्रसंगीही 'आरती सजुनि मुदित ये धावत' या मागची तिची मनोभूमिका टीकेतूनच वाचावी म्हणजे आज सर्वत्र जे सत्तामदांधतेचे थैमान सुरू आहे त्याचे कोडे आपोआप उलगडेल.

'भरता विसरे पितृमरण श्रवत राम-वनवास' यातूनच भरताचे परमावधीचे रामप्रेम प्रगट होते. त्याचा विलाप, शोक, अवस्था हे सारे पाहून अन् रामप्रेमापोटी जननीस दिलेली दूषणे हे पाहून त्याची विकलता स्वामी पारदर्शित्वाने स्पष्ट करतात. वाचेने मौन पण कृतीने या प्रसंगी शत्रुघ्नाने प्रगट केलेले रामप्रेम प्रथम दृष्टीस पडते अन् याही प्रसंगी भरत हे रामानुगामी दयानिधी कसे आहेत ते स्वामी टीकेतून शास्त्राधारे स्पष्ट करतात.

त्यानंतरचा भरत-कौसल्या संवाद म्हणजे तर करुण रस-सरितेचा सर्वात खोल खोल जाणारा डोह होय ! भरताने स्वतःकडे वळविलेल्या अनेक पापांची यादी, याही शोकात कौसल्येची धर्मनिष्ठा, स्वतःची राम वनगमनाप्रसंगीची अगतिकता अन् भरताबद्दलचे अतीव प्रेम व विश्वास हे सारे वाचताना तुलसीदासांनी उभे केलेले प्रत्येक पात्रातले आदर्शत्व हृदयाला स्पर्शून गेल्याशिवाय रहात नाही अन् त्या आदर्शत्वामागची सखोल वेदानुगामी भूमिका वा कंगोरे स्वामी टीकेतून सुस्पष्ट करीत राहतात.

त्यानंतर दशरथांची दाह क्रिया, तिलांजली हे सारे सांगताना सामान्य वाचकाच्या मनात दडलेले किंबहुना दडपलेले अनेक प्रश्न उपस्थित करून स्वामींनी त्यांची सांगोपांग चर्चा केली आहे.

कुलगुरु वसिष्ठ नीती-धर्ममय असा सुंदर उपदेश भरताला करतात व 'जीवन मरण विधिहाती' असे सांगून दशरथ-प्रेम मग्न होतात व त्यानंतर 'शोच्य कोण' याची भली मोठी यादी देतात व शेवटी दशरथ कसे 'बहुभागी' आहेत हे सांगून भरतास राज्य स्वीकारणे विषयी सांगतात व कौसल्या माताही 'गुर्वाज्ञेचा'

आदरपूर्वक पथ्य समजून कसे पालन करावे ते सांगते.

परंतु भरतांचे रामप्रेम-रामदर्शन-रामाज्ञानुसार जीवन मापनाबद्दलचा ठाम व ठोस निर्णय गुर्वाज्ञा व मातृउपदेश यांनाही फिका ठरवून गेला. सर्वांच्या हितोपदेशाचे पारडे रामप्रेमापुढे अगदीच हलके ठरले अन् या त्यांच्या निर्णयाने एका क्षणात महानाट्य घडले - 'होति भरत सकलां प्राणप्रिय' !

'असे सकल रघुपति संपत्ती' या विचाराने प्रेरित होऊन चतुरंग सेना, खजिना (कोष) गुरु, ब्राह्मण, माता व सर्व रामप्रेमी अयोध्यावासी रामभेटीच्या तयारीत निमग्न झाल्याचे फिरत्या रंगमंचावरचे हे बदललेले चित्र एक रामप्रेमाचा आगळाच रंग धारण करते.

त्या अपरिमित रामप्रेमाच्या बळावर किती सहजपणे भरतासह समस्त अयोध्याजन किती व कसे व्रतस्थ राहूनही गतीशीलतेने प्रथम मुक्काम तमसा नदीतीरावर, दुसरा गोमतीकाठी व तिसरा सईनदी किनारी शृंगवेरपुराजवळ म्हणजे निषाद राजाच्या राज्य सीमेलगत येऊनही पोचले हे सारे वाचताना रामप्रेमाने रामभक्त कसा विव्हळ होतो याचे हुबेहूब शब्दचित्र पहावयास मिळते.

निषाद रामप्रेमी-रामभक्त असल्याने भरत चतुरंग सेनेसह आल्याने त्याची प्रतिक्रिया कोणती झाली, त्यानुसार त्याने काय काय प्रबंध वा व्यवस्था केली यावरून त्याचे 'सहज रामस्नेह' कसे सिद्ध होते तो सारा भाग फारच मननीय असा आहे. अन् अचानक वीररसयुक्त झालेल्या तयारीचे रामप्रेम-रस किंवा भक्तीरसामध्ये कसे परिवर्तन होते तेही चिंतनीय आहे.

'निषाद-भरत भेट' प्रसंग तर अत्यंत हृद्य झाला आहे. इथे रामदास रामाहूनि मोठे सारखे सिद्धांत, परम पावन कोण, राम-नाम-महती अशा अनेक सुंदर विषयांची चर्चा करताना स्वामीमधला 'रामानुराग' 'तुलसी-सुतत्त्व' हे विशेष सखोल सूक्ष्म वाचताना एक आगळाच अध्यात्मिक आनंद मिळतो अन् त्या आनंदात भरताचे अनन्य रामप्रेम, रामस्नेह वाढत्या श्रेणीने भर घालीत राहते - ती भरताची हृदयाची आत्यंतिक सुकुमार-कोमलता त्या तरलतेने वाचल्यास अनुभवून अंगप्रत्यंग परम पुनीत करते जणू !

भरताचा सेवक भाव पाहून आपण तथाकथित रामभक्त-रामदास म्हणविणारे किती हीन-दीन पातळीवर आहोत याची प्रकर्षाने जाणीव होते.

अशा या अति कातर-तरल-व्याकुळ रामप्रेमात न्हाऊन निघणारे भरत जेव्हा

प्रयागात प्रवेशतात व त्या तीर्थराजाकडे जे मागणे मागतात त्याला तर तोडच नाही ! त्यावेळी आपली भगवंताकडची मागणीची न संपणारी यादी (पुत्रं धनं धान्यं) आठवून स्वतःबद्दल घृणा निर्माण होते व आपल्या दांभिक नाटकी मृषा रामप्रेमाची लाज वाटू लागते.

'रामस्नेह चि जणूं देहधर' हे वचन भरद्वाज मुनींची खरी मननशीलता यथार्थतेने जाणवून देते व त्यांनी भरताची सर्व चतुरंग सेनेसह जी विश्रामाची व्यवस्था केली ती पाहून व भरतांशी बोलताना त्यांचे धन्यत्व वा कृतार्थता त्रिभुवन विजयी कशी आहे हे जे सांगितले त्यामुळे भक्तीचे खरे 'गूढ' आपल्याला कळते.

परंतु भरद्वाजांनी ऋद्धि-सिद्धींच्या मदतीने भरतासह सर्वांची जी बडदास्त ठेवली त्यात त्या संपन्नतेच्या मोहात भरत अजिबात अडकला नाही कारण त्याचे प्राणपक्षी रामप्रेमरूपी पिंजऱ्यात कायमचे जायबंदी झालेले आहेत.

भरद्वाज मुनींचा निरोप घेऊन तीर्थराज प्रयागहून भरत म्हणजे 'अनुराग देहधर' मनात चित्रकूटावरील प्रभुंची अनेक भावानुभावांची चित्रे रेखीत, पायाने पुढे मार्गक्रमणा करीत निघाले त्याचे अत्यंत रम्य वर्णन गोस्वामींनी केले आहे ते टीकेतून स्वामींनी भक्तीरसाच्या गहिरेपणाने अधिक सुस्पष्ट करून आणखी रमणीयता त्यात भरली आहे. भरतांच्या अत्यंत ऋजु, सहज रामस्नेहाने 'द्रवती पविपाषाणही' असे शब्दचित्र तुलसीदासांना रेखाटावे लागले इतकेच नव्हे तर 'पथ न होइ रामा तसा जैसा भरता जात' असे भरतांच्या प्रेम-भाव समुद्रात कवी व टीकाकारही वाहू लागले. अशा या रामप्रेमाची जादू कोणाकोणाला परम-पदाचे अधिकारी बनवते ते टीकेतून सखोल वाचावे.

अशा या अलौकिक रामप्रेमी भरताने इंद्रासही कसे चिंतीत केले व ब्रह्मदेवांनी त्या कोड्यातून सुरपतीची कशी सुटका केली ते वाचून सुरांच्या स्वार्थावर कसा प्रकाश टाकते ते टीकेतून सविस्तर उलगडते.

मंदाकिनी-तीरावरील रामाश्रमाजवळ भरत येताच चतुर नाट्य महाकाव्यकार चतुर कवी चाणाक्षपणे उत्सुकता ताणण्यासाठी अचानक अनपेक्षितपणे रंगमंचावर दृश्यात बदल कसा घडवून आणतात ते फारच प्रेक्षणीय आहे.

सीतेला कोणते स्वप्न पडते, त्या स्वप्नाने श्रीराम चिंतीत का होतात व त्यावर काय उपाय करतात ते सारे सूक्ष्म रीतीने अवलोकनीय असे आहे.

त्यानंतर लक्ष्मणांच्या रामप्रेमाने काय किमया केली अन् रामांनी त्यावर आपले मत प्रदर्शित करताना 'भरत हंस रविवंश तडागा' असे अतीव प्रेमाने म्हटले त्यातून 'जग जपि राम राम जपि ज्याही' हा सुरेख सिद्धान्त कसा अप्रतिम रित्या चपखल ठरतो ते टीकेतून वाचताना राम-भरत प्रेमाचे अद्‌भुत रहस्य ध्यानी येते.

विबुध नीचधी (स्वार्थी) असूनही भरतांबद्दल त्यांना 'सकल धर्मधुर' म्हणावे लागले व त्याचे समग्र स्पष्टीकरण स्वामींनी टीकेतून किती प्रकारांनी केले आहे ते अभ्यासनीय आहे.

रामस्पर्शाने पुनीत - अति-परम पुनीत झालेल्या संपूर्ण मार्गावरून आलेला भरत रामांच्या रामाश्रमा निवासस्थानाजवळ येताच भरत प्रेम परिप्लुत परितुष्ट, दुःखमुक्त का व कसे झाले याचे सविस्तर रूपकात्मक वर्णन टीकेतून सविस्तर वाचून रामप्रेमानंद पुरेपुर लुटावा.

लक्ष्मण व सीतेने लावलेल्या तुलसी-बनाने वेढलेल्या अती सुंदर पर्णकुटीच्या समोरील वटवृक्षाच्या वेदीवर राम-सीता ऋषी-मुनींच्या मंडलामध्ये कसे शोभून दिसत आहेत ते वर्णन तुलसीदासांच्या शब्दात अन् स्वामींनी सखोल अभ्यासू मननशीलतेने सजविलेल्या गूढार्थ सौंदर्याने विशेष सजलेले वाचण्यातच खरी मजा आहे !

अशा त्या ज्ञान-भक्ती-वैराग्याने वेढलेल्या त्या ऋषी-मुनींच्या ज्ञानसभेला भरतांच्या-रामस्नेहाने तर जणू अलौकिक भक्तीरसाला आलेला पूर ओसंडून सर्व चित्रकूटावर त्या अलौकिक सुगंधाने पसरून गेला.

रामांना प्रत्यक्ष सच्चिदानंदास देहभान हरपायला लावणाऱ्या त्या भरताच्या प्रेमभेटीने 'सकल भुलति तनुभान' असे झाले त्यात नवल ते काय ? कारण भरत रुपी अमृताचा अमूल्य ठेवा आपणासारख्या सामान्य जनांनादेखील लाभावून देणाऱ्या त्या दयाधन तुलसीदासांच्या ऋणातून व अति करुणा सागर सद्‌गुरु स्वामी - ते अमृत सोपे करून आमच्या मुखात घालणारे - त्यांच्या ऋणातून अगणित जन्मातही उतराई होणे शक्य नाही ! त्रिवार अशक्य ! सीतेचे आशीर्वाद मिळाल्यानंतर भरत खऱ्या अर्थाने शांत, समाधानी, तृप्त झाले. त्यानंतर केवटांनी आपला पाळलेला सेवक-धर्म पाहून मन आणखीनच सेवकभावाने भरून येते. त्या सेवक सूचनेनुसार राम गुरु वसिष्ठ दर्शनासाठी कसे तत्परतेने प्रेमादरपूर्वक

जातात अन् त्यानंतर सर्व अयोध्यावासींचे दु:च एका क्षणात 'चमत्कार' करून कसे दूर करतात ते अगदी पहात रहावेसे वर्णन आहे. त्यातून रामांचे आपल्या प्रजेवर असलेले प्रेम-गूढ अतीव प्रेम प्रगट होते. नंतर सर्व मातांना भेटताना रामांचा क्रम काय होता हे वाचताना तर रामांची करुणा सागरता, उदारता इ. गुणांचे सहज दर्शन घडते.

सीतेचे सासवांवरील व सर्व अयोध्यावासीयांवरील प्रेम कसे वाखाणण्याजोगे आहे ते 'तैं पृथ्वीवर पसरे करुणा' या शब्दांतून प्रतीत होते.

दशरथ-मृत्युवार्ता राम-सीता लक्ष्मणांना प्रथम कळल्याने 'भूप मरण जणूं आजच घडले' असे सारे वातावरण दु:खी, शोकव्याप्त होते. वसिष्ठांच्या आज्ञेनुसार, वेदानुसार श्रीरामांनी श्रद्धापूर्वक पित्याची क्रियाकर्मे केली व त्यानंतर अशौचातून शुद्ध झाले. प्रत्यक्ष परमात्मा असूनही नरनाट्यासाठी, मर्यादा पुरुषोत्तमाचे ब्रीद राखण्यासाठी श्रीराम या सगुण लीला करीत आहेत. अशा तऱ्हेने परमात्मा धर्मसेतूही कसे आहेत याचे सुंदर प्रत्यंतर येते.

संपूर्ण अयोध्याकांड हे 'धर्म पुरुषार्थाचे' अत्युत्तम शब्द चित्र गोस्वामींनी रेखाटलेले, स्वामी प्रत्येक लहान सहान बारकाव्यासह स्पष्ट करीत सहृदय वाचक, शिष्य, साधक व भक्ताला प्रेमपूर्वक पटवून देत आहेत.

श्रीसीतारामचंद्रार्पणमस्तु ।

**प्रज्ञाशिष्या रामदासी**

# अयोध्याकांड - खंड ३

## अनुक्रमणिका

## नगरिं नृप-मरण प्रकरण (१४७।३ - १५७।४)

*हिं.* *। पैठत नगर सचिव सकुचाई । जनु मारेसि गुरु बाँभन गाई ॥३॥*
*। बैठि बिटप तर दिवसु गवाँवा । साँझ समय तब अवसरु पावा ॥४॥*
*। अवधु प्रबेसु कीन्ह अँधिआरें । पैठ भवन रथु राखि दुआरें ॥५॥*
*। जिन्ह जिन्ह समाचार सुनि पाए । भूप द्वार रथु देखन आए ॥६॥*
*। रथु पहिचानि बिकल लखि घोरे । गरहिं गात जिमि आतप ओरे ॥७॥*
*। नगर नारि नर ब्याकुल कैसें । निघटत नीर मीनगन जैसें ॥८॥*

*म.* *। सचिव संकुचित शिरण्या नगरिं । जणुं गुरु - गो - ब्राह्मणांस मारी ॥३॥*
*। बसुनि विटपतळिं दिवसा गाळी । संधि सापडे संध्याकाळी ॥४॥*
*। शिरे अयोध्येमधिं अंधारीं । घुसे सदनिं, रथ ठेउनि दारीं ॥५॥*
*। जयां जयां हें वृत्त मिळालें । नृपद्वारिं रथ बघण्या आले ॥६॥*
*। रथ ओळखति, बिकल हय दिसती । गात्र गरमिं गारांसम गळती ॥७॥*
*। नगर नारिनर विव्हळ तैसे । निघटत नीर मीनगण जैसे ॥८॥*

**अर्थ** - अयोध्या नगरात शिरण्यास सचिवाला असा संकोच वाटत आहे की जणू काय गुरु. गाय व ब्राह्मण यांची हत्याच त्याच्या कडून घडली असावी.॥३॥ (म्हणून) झाडाखाली बसून (राहिलेला) दिवस कसातरी घालवला; व मग संध्याकाळी (योग्य) संधी मिळाली.॥४॥ सुमंत्र रात्री अयोध्येत शिरला व राजद्वाराजवळ रथ ठेऊन, (चटकन) राजवाड्यांत (सदनीं) घुसला.॥५॥ (रथ आला) ही बातमी ज्यांना ज्यांना कळली ते ते रथ पाहण्यासाठी राजद्वाराजवळ आले.॥६॥ त्यांनी रथ ओळखला; पण घोडे असे व्याकुळ दिसले की जणू गरमीच्या दिवसांत गारांप्रमाणे त्यांची गात्रे गळत (विरघळत) आहेत.॥७॥ (जलाशयांतील) पाणी फारच घटत आले की - माशांचे थवे जसे व्याकुळ होतात त्याप्रमाणे नगरांतील स्त्रिया व पुरुष व्याकुळ होऊ लागले.॥८॥

**टीका. - चौ. १-३ (१) सचिव संकुचित शिरण्या नगरीं** - राजाचा अत्यंत प्रिय सचिव व यथानाम तथागुणः सु-मंत्र असून त्याला अयोध्येच्या सीमेत प्रवेश करण्यास संकोच-लज्जा वाटत आहे ! मोठ्यांकडून न कळत, प्रेमवश होऊन, सद्भावनेने, सहज घडलेली चूक किती लज्जास्पद होते पहा ! पण हे जे खरोखरच अंतःकरणाचे मोठे असतात त्यांसच ! बाकीचे जे हृदयाचे खोटे व दिखाऊ मोठे

'उच्च निवास नीच कर्तूती' (१२।६) असतील. ते जाणून बुजून हिमालयासारखी चूक करतात तरी त्यांना जरा ही संकोच वाटत नाही. **(क)** जणुं गुरु - गो - ब्राह्मणांस मारी ॥ गुरु हत्त्या, ब्रह्महत्त्या आणि गोहत्त्या ज्याच्या हातून घडली असेल त्यांस नगरांत शिरताना जशी लाज वाटेल तशी सुमंत्रास वाटत आहे. लक्ष्मणांनी गुहास केलेला उपदेश सुमंत्राने ऐकला होता हे टीकेत प्रथमच अनेक वेळा दाखविले आहे. लक्ष्मण परमार्थ गुरू, सीता गाय व राम ब्राह्मण; 'ब्रह्मविद् ब्राह्मणो ब्रह्मी-' (वि.सह.) भगवान असे ब्राह्मण आहेतच. या तिघांना वनात सोडून येणे हे त्यांची हत्त्या करण्यासारखे आपल्याकडून घडले असे सुमंत्रास वाटत आहे. सीता भूकन्या, पृथ्वीची कन्या आहे; पृथ्वी गौः (गो) = गाय स्त्रीची कन्या जशी स्त्री, तशी गाईची कन्या गाय नसते का ?

**चौ. ४-५ (१) संधि सापडे संध्याकाळीं** - तमसा नदी अयोध्येच्या दक्षिणेस ६-७ कोसांवर आहे व उत्तरेस शरयू अगदीच जवळ आहे. संध्याकाळ म्हणजे सूर्यास्तानंतरची व रात्र होण्यापूर्वीची वेळ. या संधिकाळांत स्नानसंध्यादि नित्यकर्म करतात. अयोध्येतील लोक सगळे धर्मशील असल्याने सूर्यास्तानंतर तिन्ही सांजांच्या वेळी कोणी फारसे घराबाहेर असणार नाहीत; व संध्येकरता जाणारे शरयूतीरी जाऊन रात्र होण्याच्या आत घरी जातील व तमसेच्या बाजूस शेतीच्या कामासाठी आलेले सूर्यास्ताच्या पूर्वी अयोध्येत पोचतील; म्हणजे तमसेपासून अयोध्येत जाईपर्यंत कोणी मनुष्य बहुधा दिसणार नाही, असा विचार त्याने केला व रात्र झाल्यावर नगरात शिरता येईल अशा बेताने निघाला. गुरुगोब्रह्महत्या करणारा माणूस अशीच संधी पाहून जाईल की आपण कोणाच्या दृष्टीस पडणार नाहीं.

**(२) शिरे अयोध्येमधिं अंधारीं** - सुमंत्राला माहीत आहे की रामबिरही अयोध्येत आता रात्री रस्त्यांत दिवे - दीपप्रकाश नसणार; म्हणून अंधार पडण्याच्या वेळी म्हणजे रात्री सुमंत्र अयोध्येत शिरला. वैशाख शुद्ध एकादशीची रात्र असल्याने चंद्रप्रकाश असला तरी पांढरे स्वच्छ वर्णाचे घोडे व भरधाव वेगाने जाणारा रथ सहसा कोणाला ओळखता येणार नाही हे जाणून अंधारी म्हणजे रात्री अयोध्येत शिरला. पुढे वर्णन आहेच की उभा असलेला रथ जवळ येऊन पाहिला तेव्हा लोकांना ओळखता आला. रथाचा खडखडाट ऐकून जे कोणी घराच्या बाहेर पडले असतील ते रथाच्या वेगाने रात्री धावणे शक्य नाही; शिवाय राम गेले अयोध्येतून त्या दिवशीच लोक अगदी कृश झाले होते. 'विभावरी तमस्वियौ

रजनी यामिनी तमी' (अमरे) **तमी, तमस्विनी** (= अंधारी) = **रात्र.** **(क) घुसे सदनिं ठेउनि दारीं – सदनिं** = राजवाड्यात, हा अर्थ पुढील चौपाईतील नृपद्वार (भूपद्वार) शब्दाने सुचविला आहे व **दारीं** = नृपद्वारीं हा अर्थही त्यावरूनच सिद्ध होतो. **घुसे** = कोणी पाहणार नाही अशा प्रकारे रथांतून उतरून चटकन आत शिरला. अशा प्रकारे नगर नारीनरांच्या प्रश्नास तोंड देण्याचा प्रसंग सुमंत्राने युक्तीने टाळला.

**चौ. ६-८ (१) जयां जयां हे वृत्त मिळालें** - रथाचा खडखडाट लोकांच्या कानी गेलाच व या वेळी इतर कोणाचा रथ अयोध्येत येण्याची शक्यता नव्हती. रथ राजवाड्याकडे भरधाव गेला व तेथे थांबला इतकी बातमी सहज पसरली; व खात्री करून घेण्यासाठी लोक राजद्वारापाशी जमू लागले. **(क) 'रथ ओळखति विकल हय दिसती** - जवळ आल्यावर रथ ओळखण्यास वेळ लागला नाही. घोडे अगदी व्याकुळ झालेले दिसले व त्यांच्या सर्व शरीरांतून घाम निथळत होता. शंभर मैलांच्यावर प्रवास, भर उन्हाळ्याच्या कडक उन्हांत आणि रामविरहानलाच्या ज्वाळा आंत पेटलेल्या ! गरमिं = गरमीत - उन्हाळ्यात गारा वितळून त्यांचे जसे पाणी होते तसे प्रत्येक अंग थबथबत होते; घामाच्या धारा गळत होत्या. या चिन्हांवरून लोकांची खात्री झाली की रामसीता व लक्ष्मण यांपैकी कोणीच परत न येता एकटे सुमंत्र आले व ते अन्तःपुरात गेले असावेत.

(२) रात्रीच्या वेळी **'नगरनारी'** सुद्धा धावत राजरस्त्याने राजद्वारापाशी जमल्या ! यावरून ठरले की सर्वांनी आपली आशा सुमंत्राच्या येण्यावर ठेवली होती व सर्व स्त्रीपुरुष चातकाप्रमाणे त्याच्या येण्याची वाट बघत बसले होते. शेवटी सर्वांची पूर्ण निराशा झाली, व जमलेले सर्व लोक फार व्याकुळ झाले. **(क) निघटत नीर मीनगण जैसे** = घटणें = कमी होणे; निघटणे फार, अत्यंत कमी होणे. पाणी फारच कमी झाले की मासे जसे मरणप्राय व्याकुळ होतात तसे सर्व लोक व्याकुळ झाले; शोकाने तडफडू लागले. इतक्या लोकांच्या गराड्यात सुमंत्र सापडला असता तर त्याचे किती हाल झाले असते व त्याला उत्तरे देता देता किती दुःख झाले असते याचा विचार करावा ! त्याचा नमुना वा.रा. पहावा.

***हिं.दो. । सचिव आगमन सुनत सबु बिकल भयउ रनिवासु ॥***

***॥ भवनु भयंकरु लाग तेहि मानहुँ प्रेत निवासु ॥१४७॥***

***हिं. । अति आरति सब पूँछहिं रानी । उतरु न आव बिकल भइ बानी ॥१॥***

*। सुनइ न श्रवन नयन नहिं सूझा । कहहु कहाँ नृपु तेहि तेहि बूझा ॥२॥*
*। दासिन्ह दीख सचिव बिकलाई । कौसल्या गृहँ गईं लवाई ॥३॥*

म.दो. *। ऐकुनि सचिवागमन सब व्याकुळ राणीवास ॥*
*॥ भवन भयद वाटे तया जणुं कीं प्रेतनिवास ॥१४७॥*

म. *। राण्या सब अति आर्त विचारति । उत्तर ये न विकल वाचा अति ॥१॥*
*। कान न ऐकति नयनिं न दिसतहि । वदा कुठें नृप ज्या त्या पुसत हि ॥२॥*
*। दासी बघुनि बिकल सचिवासी । कौसल्यागृहिं नेती त्यासी ॥३॥*

**अर्थ** - सचिव आल्याचे समजताच अंतःपुरातील सर्व राण्या (सगळा राणीवसा) व्याकुळ झाल्या; व सचिवाला तो राजवाडा जणू प्रेताच्या निवासस्थानासारखा भयानक वाटला.॥दो.१४७॥ अति आर्त झालेल्या सर्व राण्या विचारू लागल्या; पण सुमंत्राची वाचा (वाणी) च व्याकुळ झाल्याने उत्तर (तोंडातून) निघेना.॥१॥ त्याच्या कानांना ऐकू येईना की डोळ्यांना दिसेना; तो ज्याला त्याला विचारीत सुटला की नृप (महाराज) कुठे आहेत सांगा.॥२॥ सचिव व्याकुळ झाला आहे असे पाहून दासी त्याला कौसल्येच्या घरी (वाड्यात) घेऊन गेल्या.॥३॥

**टीका. दोहा (१) जणुं कीं प्रेतनिवास** - ही जणूं भावी घटनेची पूर्वसूचनाच सचिवास मिळाली. निकट आलेल्या दशरथांच्या मृत्यूची छाया त्या सगळ्या अंतःपुरात पसरून राहिली आहे. ही केवळ कविकल्पना नसून शुद्धहृदयी प्रेमी माणसांस असे प्रत्यक्ष अनुभवास येते. तुलना करून पहा – '**राजभवनिं मग सुमंत्र शिरले । दिसत भयाण जात घाबरले ॥ बघवेना जणुं गिळुं ये धावत । विपदविषादवास जणुं भासत** ॥ (३८।३-४) असे जे भासले ते थोड्या घटकांनीच खरे ठरले. तसेच येथे रात्री जे भासले ते आज रात्रीच खरे ठरणार आहे.

**चौ. १-२ (१) उत्तर ये न बिकल वाचा अति** - राम सीतालक्ष्मणांसह गंगेच्या पलीकडे वनात गेले हे उत्तर तोंडातून बाहेर पडेना. ते सांगण्याचा विचार मनात येताच वाचाच विव्हळ झाली. या सर्व मातांच्या प्रश्नांस काय उत्तर द्यावे ही चिंता सचिवाला लागली होती (१४६।१) तिच्यातून वाग्देवीने असहकार पुकारून जणू सचिवाला सोडविले. सचिवाच्या व्याकुळ व भ्रमिष्टासारख्या स्थितीवरून राण्यांना प्रश्नाचे उत्तर मिळालेच ! (**क**) ती मृत्यूची छाया अनुभवास येताच धीर, पंडित, ज्ञानी सचिव इतका घाबरून गेला की '**कान न ऐकति नयनिं न दिसत हि**' अशी त्याची ज्ञानेंद्रिये निष्क्रिय झाली. ९९।४ व १४५।३ पहा. अशी

दशा पूर्वी दोन वेळा झाली आहे. 'होइ विकल जणुं फणि मणिहानीं' (९९।३) अशीच दशा सचिवाची झाली. दशरथ राजा रूपी मणि मृत्यूने हिरावून नेला असे त्यांस वाटू लागले. म्हणून **(ख) वदा कुठें नृप ज्या त्या पुसत हि** - गरगरा फिरत डोळे मिटून हा एकच प्रश्न विचारीत सुटला. सुमंत्र राजाज्ञेने गेला तेव्हा दशरथ कैकयीच्या कोपभवनात मूर्छित पडले हे त्यास माहीत असता हा प्रश्न विचारीत आहे; यांत कैकयीचे तोंड पाहण्याची पाळी न यावी ही एक इच्छा आहे, पण गौण आहे. पांच रात्री निघून गेल्या असल्याने दशरथ त्या विपत्तिनिवासांतच असतील असे मानणेही चुकीचेच. पण **मुख्य हेतु राजा जिवंत आहेत की नाहीत हे समजावे हा आहे.** येथेही दैवाने सुमंत्रास हात दिला; सुमित्रा, कौसल्या व भरत-जननी यांच्या प्रश्नांस उत्तरे देण्याची वेळच येत नाही.

**चौ. ३ - (१) दासी कौसल्यागृहिं नेती** - यावरून ठरले की सुमंत्र निघून गेल्यावर दशरथ जेव्हा शुद्धीवर आले तेव्हा ते कौसल्येच्या वाड्यात आले किंवा त्यांच्या आज्ञेवरून आणले गेले. वा.रा. याविषयी स्पष्ट उल्लेख आहे. **'जा येथुनि, बस लपवुनि वदना'** (३६।६) अशा सौम्य शब्दांत दशरथांनी कैकयीचा त्याग मानसांतही केला आहे. **'कौसल्याया गृहं शीघ्रं राममातुर्नयन्तु माम्। न ह्यन्यत्र ममाश्वासो हृदयस्य भविष्यति'** (वा.रा. २।४२।२७) या प्रमाणे कौसल्येच्या घरी नेण्याविषयी आज्ञा राजाने दिली तेव्हा द्वारदर्शी लोकांनी त्यांस कौसल्येच्या घरात नेले आहेत. (वा.रा. २।४०।२८ पासून २।४२।२८ हा भाग पहावा. बाकीची कथा भिन्न आहे.)

*हिं.* *। जाइ सुमंत्र दीख कस राजा। अमिअ रहित जनु चंदु बिराजा ॥४॥*
*। आसन सयन बिभूषन हीना। परेउ भूमितल निपट मलीना ॥५॥*
*। लेइ उसासु सोच एहि भाँती। सुरपुर तें जनु खँसेउ जजाती ॥६॥*
*। लेत सोच भरि छिनु छिनु छाती। जनु जरि पंख परेउ संपाती ॥७॥*
*। राम राम कह राम सनेही। पुनि कह राम लखन बैदेहीं ॥८॥*

*म.* *। जात सुमंत्रा दिसले राजे। अमृत-रहित जणुं इंदु विराजे ॥४॥*
*। भूषण आसन शयन न काहीं। पतित मलिन अति भूमितळा हि ॥५॥*
*। घेत उसासे असे शोचती। स्वर्गातुनि जणूं पतित ययाती ॥६॥*
*। घडि घडि शोकें भरती छाती। पतित जळुनि छद जणुं संपाती ॥७॥*
*। राम राम हे रामा! स्नेही -। वदति राम लक्ष्मण वैदेही ॥८॥*

**अर्थ** - अमृतरहित झालेला चंद्र जसा विराजतो तसे दशरथ राजे सुमंत्र

(समोर) गेल्यावर त्यास दिसले.॥४॥ भूषण, आसन, शय्या, इत्यादी काही नसून अत्यंत मलीन स्थितीत (नुसत्या) जमिनीवर पडले आहेत.॥५॥ दीर्घ श्वास घेत अशी चिंता-शोक करीत पडले आहेत की जणू स्वर्गातून पतन पावलेला ययाती राजाच.॥६॥ घडोघडी (क्षणोक्षणी) शोकाने छाती अशी भरीत आहेत की जणू पंख (= छद) जळून पतन पावलेला संपाती (पक्षी) च ॥७॥ राजा राम राम ! हे स्नेही राम ! म्हणून पुन्हा राम ! लक्ष्मण ! वैदेही ! असे म्हणत आहेत.॥८॥

**टीका. चौ. ४ - (१) अमृतरहित जणुं इंदु विराजे** - अमृतरहित झालेला इंदु = चंद्र तेजोहीन व सौंदर्यहीन झालेला असतो व कोणाला प्रसन्नता, शीतलता इ. देऊ शकत नाही. असेच दशरथ दिसले. असा चंद्र शोभायमान दिसणार नाही. दिसत नाही, पण ही दशा रामविरहाकाने झाली असल्यामुळे प्रशंसनीय आहे; म्हणून विराजे हे क्रियापद वापरले. विराज धातूचा अर्थ प्रसिद्धिस येणे असा आहे.

**चौ. ५ - (१) भूषण आसन शयन न काहीं** - दशरथ कौसल्येच्या महालात असून ज्या अर्थी अशा स्थितीत आहेत त्या अर्थी त्यांनी हेतुपूर्वक या सर्व गोष्टींचा त्याग केला आहे असे ठरते. राम भूषणांचा त्याग करून गेले म्हणून राजाने आपल्या अंगावरील सर्व भूषणे काढून टाकली. बसताना राजाला योग्य असे आसन न वापरता उघड्या जमिनीवरच बसू लागले; कारण रामाला वनात कुठले आसन ! जमिनीवरच बसत असतील. राम झोपतील तेव्हा जमिनीवरच झोपणार म्हणून राजाने गाद्या वगैरेंचा त्याग केला. अन्यथा कौसल्येने त्यांस ५।६ दिवस अशा स्थितीत राहू दिले नसते. प्राणप्रिय पुत्राला विनापराध आपण जे सुख मना केले त्याचा स्वतः उपभोग घेणे म्हणजे निष्ठुरतेची परमावधीच असे राजाला वाटले असावे. अगदी साधे शब्द पण किती प्रगाढ भावनापूर्ण आहेत ! **(क) पतित मलिन अति भूमि तला हीं** - आजचा सहावा दिवस, ही सहावी रात्र ! जमिनीवर लोळत पडले आहेत; स्नान सुद्धा केले नाही. अंगावरील वस्त्रेसुद्धा बदलली नाहीत. त्यामुळे मलीन दिसत आहेत. आधीच म्लान झालेले व त्यात ही मलीनता त्यामुळे अति मलीन दिसत आहेत.

**चौ. ६ - (१) घेत उसासे - पतित ययाती.** ययातीची कथा खाली दिली आहे.

## ययाति राजा

हा नहुषाच्या ६ पुत्रांपैकी दुसरा. नहुषाने याला राज्य दिले होते. शर्मिष्ठा व देवयानी या दोन याच्या स्त्रिया. शुक्राचार्यांच्या शापाने याचे यौवन नष्ट होऊन

वार्धक्य आले तरी कामवासना तृप्त होईना. शुक्राचार्यांनी अनुग्रह केला होता की कोणी दिल्यास तुम्ही दुसऱ्याचे यौवन घेऊ शकाल. देवयानीचे यदु व तुर्वसु असे दोन पुत्र होते व शर्मिष्ठेचे द्रुह्यु, अनु व पुरु असे तिघे मुलगे होते व हे सगळेच यौवनसंपन्न होते. मोठ्या पुत्रापासून क्रमाने ययातीने एक हजार वर्षांच्या मुदतीने यौवन मागितले; पण चौघांनी दिले नाही; परंतु सर्वांत धाकटा जो पुरु त्याने आनंदाने दिले. नंतर एक हजार वर्षे विषय भोगूनसुद्धा तृप्ति झाली नाही, असे पाहून ययातीला वैराग्य उत्पन्न झाले व आपले राज्य पुरुला दिले. नंतर एक हजार वर्षे वानप्रस्थाश्रमात तपश्चर्या करून ययाती स्वर्गास गेला.

ययातीला स्वर्गभ्रष्ट करण्यासाठी इन्द्राने जी युक्ति योजली ती ययातीच्या लक्षात न आल्याने इन्द्राच्या गोडगोड भाषणावर भुलून मिळालेला स्वर्ग गमावला. ययातीने अभिमानाने जे उत्तर दिले त्यामुळे बरोबरीच्या व त्याच्यापेक्षा श्रेष्ठ तपस्व्यांचा राजाकडून अपमान घडला व त्यामुळे सर्व पुण्य नष्ट झाले तेव्हा त्यास स्वर्गातून ढकलून दिला. तो अष्टक राजर्षीच्या यज्ञभूमीत पतन पावला. त्याला आपल्या मूर्खपणाबद्दल फार पश्चात्ताप झाला. त्याने अष्टक राजास सांगितले की तप, दान, शांती, इंद्रियदमन, लोकलज्जा, सरलता व दया **ही सात स्वर्गाची द्वारे आहेत.** पण यांच्या बद्दलचा अहंकार या सर्वांचा विनाश करणारा आहे. आपण केलेल्या चांगल्या गोष्टींची आपल्या मुखाने प्रशंसा करणे, त्यांचे वर्णन करणे त्या पुण्याचा क्षय करण्यास कारण होते. अष्टक राजा ययातीचा नातूच त्याच्या पुण्याच्या प्रभावाने ययातीला पुन्हा स्वर्गप्राप्ती झाली.

(२) ययातीने आपल्या भोळेपणाबद्दल, मूर्खपणाबद्दल व अहंकाराबद्दल जसा पश्चात्ताप व शोक केला तसेच दशरथ दीर्घ श्वास घेत म्हणत असतील की मी स्त्रीलंपट कसा बनलो? त्या पापिणीच्या गोडगोड शब्दांना व हावभावांना कसा भुललो? हा केवढा मूर्खपणा केला ! कारण नसता स्वाभिमानाच्या भरीस भर पडून रामशपथ घेतली; काय हा अविवेक इ. इ. प्रकारे पश्चात्ताप व शोक केला. **या उत्प्रेक्षेने हे दाखविले की स्त्रीवर विश्वास ठेवल्याचा पश्चात्ताप करीत असलेला लज्जित, ऐश्वर्यहीन दीन दिसला.**

**चौ.** ७ (१) **पतित जुळुनि छद जणुं संपाती** - छद = पंख. संपातीने स्वतःची कथा ४।२८।१-८ मध्ये सांगितली आहे. त्यांत तो सांगतो 'मी अभिमानी भानु गाठला । दग्ध पंख' (४।२८।३-४) दशरथाने **'रघुकुलरीतिस कदा खंड ना ॥ जावो**

**प्राण हि वचन भंग ना'** इत्यादि कुलाभिमानाच्या भरीस पडून सत्याची प्रशंसा करून प्रतिज्ञा केली. या कुलाभिमानाच्या इरेस पडल्याचा पश्चात्ताप होत आहे. **या उत्प्रेक्षेने असहायता, पराधीनता, शरीरक्लेश, मनस्ताप, दारुणदाह इ. गोष्टी सुचविल्या.**

**चौ. ८ - (१) 'राम, राम – वदति – 'धन्यास्ते कृतिनः पिबन्ति सततं श्रीरामनामामृतम्'** (कि.मं.२) प्रथम अमृतरहित चंद्र होते; पण आता रामनामामृत घेतल्याबरोबर थोडी शक्ती आली आहे. त्यामुळे सुमंत्राचे शब्द ऐकताच उठून बसतील व त्याच्याशी स्पष्ट बोलतील. **ल.ठे. वा.रा.मधील** या सचिव दशरथ भेटीच्या वर्णनाशी तुलना **'मूळाहुनी सरस मानस अति'** प्र.प्र. ५।१२ पृ. २१३ पहा.

*हिं.दो.* *। देखि सचिवँ जय जीव कहि कीन्हेउ दंड प्रनामु ॥*
*॥ सुनत उठेउ ब्याकुल नृपति कहु सुमंत्र कहँ रामु ॥१४८॥*
*हिं.* *। भूप सुमंत्र लीन्ह उर लाई । बूडत कछु अधार जनु पाई ॥१॥*
*। सहित सनेह निकट बैठारी । पूँछत राउ नयन भरि बारी ॥२॥*
*। राम कुसल कहु सखा सनेही । कहँ रघुनाथ लखनु बैदेही ॥३॥*
*। आने फेरि कि बनहि सिधाए । सुनत सचिव-लोचन जल छाए ॥४॥*
*म.दो.* *। बघुनि, सचिव जय जिव वदुनि करि दंडवत् प्रणाम ॥*
*॥ परिसुनि उठले विकल नृप बद सुमंत्र कुठं राम ॥१४८॥*
*म.* *। भूप सुमंत्रा हृदयीं धरती । बुडत कांहिं जणुं अधार लभती ॥१॥*
*। स्नेहें संनिध घेति बसवुनी । पुसती नृपति येइ जल नयनीं ॥२॥*
*। राम कुशल वद मित्रा स्नेही । कुठं रघुपति लक्ष्मण वैदेही ॥३॥*
*। परत आणले की गेले वनिं । ऐकुनि वारी सचिव-विलोचनिं ॥४॥*

**अर्थ** - राजाला पाहून सचिवाने 'जय जीव' म्हणून दण्डवत प्रणाम केला. ते शब्द ऐकताच नृपति व्याकुळ होऊन उठले (व म्हणाले.) सुमंत्र ! राम कुठे आहेत सांग.॥दो.१४८॥ बुडत असता काहीतरी आधार सापडावा त्याप्रमाणेच जणू राजाने सुमंत्राला हृदयाशीं धरले.॥१॥ स्नेहाने त्याला जवळ बसवून घेतला व विचारू लागतात (तोच) नृपतीच्या डोळ्यांत पाणी आले.॥२॥ स्नेही मित्रा ! रामाचे कुशल सांग; रघुपति (रघुनाथ) लक्ष्मण व वैदेही कुठे आहेत सांग.॥३॥ त्यांना परत आणलेत का गेले वनांत? हे ऐकताच सचिवाच्या डोळ्यांत पाणी आले.॥४॥

**टीका. दो. -** (१) नृपाच्या प्रश्नावरून व व्याकुळतेवरून स्पष्ट दिसते की राम किंवा सीता परत आली नाही हे त्यांनी जाणले. पण आशा वेडी व आंधळी

असते. आशेने एक किरण दाखविला की मातेला नमस्कार करण्यास गेले नसतील कशावरून? म्हणून विचारले की राम कुठे आहेत. **(क) ल.ठे.** - रथ घेऊन जाण्याची आज्ञा दिली तेव्हा दशरथांनी सचिवास बहुवचनाने संबोधिले आहे. 'सांगा कर जोडुन', 'आणा वासरिं चार !' 'सांगा निरोप' इ. (दो. ८१ पासून पुढे पहा.) तेथे (८१।८) सखे = सखा म्हटले आहे; पण येथे 'सखा सनेही' स्नेही सखा (मित्र) असे म्हटले आहे. जीवश्च कंठश्च स्नेह्याप्रमाणे वाटल्याने बरोबरीच्या नात्याने भेटणे, जवळ बसविणे व एकवचनाने त्याच्या विषयी बोलणे या गोष्टी घडल्या. पूर्वी सखा होता तो आता स्नेही सखा कशाने झाला? त्या वेळी रामाला घेऊन जाणार होता व आता कदाचित रामाला घेऊन आला असेल; निदान प्राणप्रिय पुत्रांचे कुशल, संदेश तरी सांगेल, असे असल्याने भावनेत फरक पडला. **तुलसी भावनिदर्शनकला अशी आहे !**

**चौ. १ - ४ - (१) बुडत काहिं जणुं अधार लभतो** - उत्प्रेक्षाकरून सुचविले की या **आधाराने बुडणे चुकविता येणार नाही.** मानसात आणखी चार ठिकाणी बुडत्याला आधार मिळाल्याचे वर्णन आहे; पण त्यात कुठेही उत्प्रेक्षा केलेली नाही; कारण त्या आधाराने त्या चारही व्यक्तींचे बुडणे टळले आहे. येथे जो आधार मिळाला असे वाटत आहे त्याने बुडून मरणे टळणे शक्य नाही. पहा (२।१८४; २।२८६।७; ५।१४।२ आणि ७।५ छंद २). **(क) पुसती नृपति येइ जल नयनीं - प्रथम** जो प्रश्न केला, 'वद सुमंत्र कुठं राम' त्याचे काहीच उत्तर सुमंत्राने दिले नाही, राम कोठे आहे ते सांगितले नाही. म्हणून दूसरा प्रश्न विचारावा असे मनात येताच नेत्र सजल झाले आणि सुमंत्राच्या मौनामुळे एक चिंताही उत्पन्न झाली. म्हणून विचारले, 'राम कुशल वद' **(ख) 'कुठं रघुपति लक्ष्मण वैदेही' -** भाव हा की राम रघुपति = रघुवंशाचे पति (स्वामी) आहेत आणि तेच वनांत गेले अर्थात आता रघुवंशाला कुणी पालक राहिला नाही. रघुवंश अनाथ झाला. **(ग) 'परत आणले... सचिव विलोचनीं'** - राम कोठे आहेत ? त्यांना परत आणले आहे का ? वनात गेले की काय? हे तीन प्रश्न राजाने विचारले. यातील एकाचेही उत्तर स्नेही मित्राने दिले नाही; पण उत्तर दिल्याशिवाय राहिला नाही. डोळ्यात जे पाणी आले त्याने सांगितले की कोणीही आले नाहीत; वनात गेले. कुठल्या तोंडाने राजाला उत्तर द्यावे अशी चिंता सुमंत्राला होती; नेहमीच्या तोंडाने राजाला उत्तर द्यावे लागले नाही. नेत्ररूपी तोंडाने शब्द न उच्चारता उत्तर दिले व ते

राजाला कळले. हे पुढील दशेवरून व वचनावरून ठरते.

हिं. *। सोक बिकल पुनि पूँछ नरेसू । कहु सिय राम लखन संदेसू ॥५॥*
*। रामरूप गुन सील सुभाऊ । सुमिरि सुमिरि उर सोचत राऊ ॥६॥*
*। राउ सुनाइ दीन्ह बनबासू । सुनि मन भयउ न हरषु हराँसू ॥७॥*
*। सो सुत बिछुरत गए न प्राना । को पापी बड मोहि समाना॥८॥*

दो. *। सखा रामु सिय लखन जहँ तहाँ मोहि पहुँचाउ॥*
*॥ नाहिं त चाहत चलन अब प्रान कहउँ सतिभाउ ॥१४९॥*

म. *। शोकाकुल 'वद' म्हणति नरेश । सिता-राम-लक्ष्मण संदेश ॥५॥*
*। रामरूप गुण-शिला स्वभावा । स्मरुनी स्मरुनि शोक हृदिं रावा ॥६॥*
*। राज्य देउं सांगुनि दिधलें वन । ऐकुनि हर्ष-विषाद-रहित मन ॥७॥*
*। त्या-सुत-विरहें गेले प्राण न । महा पापि मज समान आन न ॥८॥*

दो. *। राम सिता लक्ष्मण जिथें पोचवि मज तेथें च ॥*
*॥ सखे! प्राण जाऊं बघति ना तर, सांगुं खरें च ॥१४९॥*

**अर्थ** - शोकाकुल होऊन नरेश (पुन्हा) म्हणाले कीं सीता राम व लक्ष्मण यांचे संदेश सांग. ॥५॥ रामचंद्रांचे रूप, गुण, शील व स्वभाव यांचे वारंवार स्मरण करीत राजा मनांत शोक करीत आहेत. ॥६॥ राज्य देतो असे सांगून वन (वनवास) दिले तरी ज्याच्या मनाला हर्ष विषाद वाटला नाही ॥७॥ त्या पुत्राच्या वियोगाने प्राण गेले नाहीत; त्या अर्थी माझ्यासारखा महा पापी दुसरा कोणी नसेल नाही (कोण असेल हिं.)॥८॥ मित्रा जिथे राम सीता व लक्ष्मण असतील तिथे मला पोचवच; नाहीतर खरेच सांगतो की माझे प्राण (आता) जाऊ पहात आहेत. ॥दो. १४९॥

**टीका. चौ-६– (१) रामरूप गुणशिला स्वभावा** - हा चरण २।१।८ मधील पहिल्या चरणाची पुनरुक्ति आहे. तेथे दुसरा चरण 'बघुनि परिसुनी प्रमोद रावा' असा आहे. २।१।८ पूर्वार्धाची टीका पहावी. या पुनरुक्तीने येथे सुचविले की त्यांच्या रूपगुणादिकांच्या श्रवणाने व दर्शनाने ज्यांना ज्यांना प्रमोद झाला त्या सर्वांचीच आता दशरथांसारखी दशा होणार आणि सर्वच याप्रमाणे शोक करणार व सर्वांनाच वाटणार की निदान आम्हाला काही संदेश - निरोप - रघुनाथांनी धाडला आहे की नाही? **(क) दुसरा भाव हा की रूपगुणादिकांना पाहून ऐकून ज्यांना प्रमोद होतो त्यांना त्या व्यक्तीच्या वियोगाने त्या रूप गुणादिकांना**

**आठवीत शोक करावा लागतो.**

**चौ. ७.८. (१) राज्य देउं सांगुनि दिधलें वन - 'राज्य देउं वदुनी दिलें वन, मज न दुःख लव लेश ॥ तुजविण भरता नृपा प्रजे दुःसह होती क्लेश'** (२।५५) असे कौसल्या आधीच म्हणाली आहे. येथे हिंदीत 'वन' च्या ऐवजी 'वनवास' शब्द आहे; अर्थ एकच आहे. राजाला जसे दुःसह क्लेश होत आहेत तसे 'प्रजेलाही दुःसह होतील क्लेश' राजा जर रामसंगतीत जाऊन राहिले तर मग प्रजेनेही तसेच का करू नये? व सर्व प्रजा अयोध्या सोडून रामसमीप जाऊन राहिली तर 'भरताला राज्य' हा वर दिला आहे त्याची वाट काय? पुढे येणाऱ्या शंकेचे या पुनरुक्तीने निरसन करून ठेवले आहे. **(क) हर्षविषादरहित मन** - 'हर्ष विषाद न जरा हृदिं नेसति वल्कल चीर' (१६५) असे कौसल्या म्हणणार आहे भरताजवळ. मग तिनेसुद्धा दशरथ पुढे दोह्यात म्हणतात तसे का म्हणू नये? ज्याला हर्षविषाद झाला नाही असा पुत्र वनात गेल्यावर **'ना गेल्यें, पाठविले प्राण न'** (१६६।५) असे कौसल्यासुद्धा म्हणतेच.

**दो.** - (१) दशरथांच्या विनंतीप्रमाणे सुमंत्राने राजाला चित्रकुटास का पोचविला नाही अशी बलवत्तर समजली जाणारी **शंका पिशाचिनी पुढे उभी केली जाते;** पण तिची वासलात लावण्यासाठी कवीनी आधीच भरपूर आधार वचने सुचवून ठेविली आहेत व त्यांचा उपयोग करून **त्या पिशाचिनीला या टीकेने आधीच गाडून टाकली आहे.**

*हिं.* ***। पुनि पुनि पूँछत मंत्रिहि राऊ । प्रियतम सुअन सँदेस सुनाऊ ॥१॥***
***। करहि सखा सोइ बेगि उपाऊ । रामु लखनु सिय नयन देखाऊ ॥२॥***
***। सचिव धीर धरी कह मृदु बानी । महाराज तुम्ह पंडित ग्यानी ॥३॥***
***। बीर सुधीर धुरंधर देवा। साधु समाजु सदा तुम्ह सेवा ॥४॥***
***। जनम मरन सब दुख सुख भोगा । हानि लाभु प्रिय मिलन बियोगा ॥५॥***
***। काल करम बस होहिं गोसाईं । बरबस राति दिवस की नाईं ॥६॥***
***। सुख हरषहिं जड दुख बिलखाहीं । दोउ सम धीर धरहिं मन माहीं ॥७॥***
***। धीरज धरहु बिबेकु बिचारी । छाडिअ सोच सकल हितकारी ॥८॥***

*म.* ***।घडि घडि राव वदति सचिवा गा! । प्रियतम-सुत-संदेशां सांगा ॥१॥***
***। सखे युक्ति ती करि तरि बरवी । सीता लक्ष्मण राम दाखवी ॥२॥***
***। सचिव स-धीर वदे मृदु वाणीं । महाराज! पंडित नी ज्ञानी ॥३॥***

*। वीर सुधीर धुरंधर देवा! । साधुसमाज सदा तुम्हिं सेवा ॥४॥*
*। जन्ममरण सुखदुःखें भोगहि । विरह लाभहानी प्रिय-योगहि ॥५॥*
*। स्वामी! कालकर्मवश घडती । बलपूर्वक जशिं रात्रदिवस तीं ॥६॥*
*। सुखिं हर्षति जड दुःखीं रडती । धीर मनीं उभयां सम गणती ॥७॥*
*। धीरा धरा विवेक-विचारीं । त्यजा शोक सकलां हितकारी! ॥८॥*

**अर्थ** - राजा सचिवाला वारंवार म्हणाले कीं बाबा! प्रियतम पुत्रांचा संदेश (तरि) सांग. ॥१॥ मित्रा काहीं तरि चांगला उपाय (युक्ती) कर व रामलक्ष्मणसीता मला दाखव. ॥२॥ धीर धरून (स-धीर) सचिव मृदु वाणीने म्हणाला की महाराजा! आपण पंडित नी ज्ञानी आहात ॥३॥ आपण वीर, अति धीर (सु-धीर) व धर्मधुरंधर आहात; आपण सदा देव आणि साधुसमाजाची सेवा करीत आला आहांत ॥४॥ जन्म, मरण, सुख, दुःख इ. भोग (प्रिय) विरह, प्रिय योग, आणि लाभ, हानि इ. ॥५॥ सर्व गोष्टी स्वामी! काळाच्या व कर्माच्या प्रभावाने (इच्छा नसली तरी) रात्रंदिवसाप्रमाणे बलपूर्वक घडत असतात. ॥६॥ अडाणी-अज्ञानी (जड) लोक सुखाने हर्ष पावतात व दुःखाने रडतात, (व्याकुळ होतात), पण (आपल्यासारखे) जे धीर असतात ते मनात दोन्हीना समान मानतात ॥७॥ म्हणून आपण विवेकाने विचारपूर्वक धीर धरावा. आणि शोक सोडावा (कारण) आपण सगळ्यांचे हितकर्ते आहात. (शोक सोडाल तरच सकल हितकारी ठराल) ॥८॥

**टीका** - **चौ**. १-२ (१) येथे **पूँछत** = म्हणतात. असा अर्थ आहे; कारण की प्रश्न विचारला नसून संदेश सांग असे म्हटले आहे. जे काही संदेश ज्याला ज्याला सांगितले असतील ते सर्व एकदा ऐकू दे तरी. **(क) प्रियतम सुत** = रामलक्ष्मण. **'माझे प्राण नाथ ! सुत दोनी'** (१।२०८।१०) असे विश्वामित्रांस दशरथच म्हणाले आहेत. आणि **'प्रिय न तनू प्राणाहुनि काही'** (१।२०८।४) असे त्याच वेळी दशरथच म्हणाले आहेत. प्राण प्रियतम हे ठरले, आणि रामलक्ष्मण = प्राण = प्रियतम. रामलक्ष्मण जनकपुरीत दशरथास भेटले तेव्हा **'जणु मृत देहा प्राण भेटले'** असे म्हटले आहे. (ख) पूर्वी म्हणाले की **'वद सीता लक्ष्मण संदेश'** (१४९।५) तरी सुमंत्राने कोणाचाच संदेश सांगितला नाही; म्हणून आता पुनःपुन्हा आग्रहाने सांगतात की निदान प्रियतम पुत्रांचे संदेश तरी सांग; तथापि संदेश न सांगता सचिव राजाची समजुत घालून धीरच देऊ लागला आहे. राजाचे चित्त शोकाने अधीर झालेले असताच संदेश सांगितले तर आताच राजाचे प्राण

निघून जातील असे सु-मंत्रास वाटले म्हणून संदेश सांगितले नाहीत. (ग) **सखे युक्ती ती बरवी** - भाव हा की वाटेल तो उपाय कर; जो उपाय योजशील तो चांगलाच असे समज. भाव हा की वाटेल ते कर पण मला रामलक्ष्मणांच्या जवळ घेऊन जा. एक गोष्ट करता येण्यासारखी होती ती ही - भरतास आणण्यास उत्तम वेगवान रथ पाठवून, भरत येईपर्यंत दशरथास चित्रकुटात नेले असते व भरताला तेथेच बोलावला असता तरी चालले असते. राजाचे प्राण वाचविण्यासाठी असे केले असते तर कौसल्या व प्रजा यांना सुखच झाले असते; पण **'राम करू इच्छिति ते घडते'** **'हरि-इच्छा भावी बलवान अति'** हेच खरे. येथे दोष कोणाचाच नाही.

**चौ. ३. (१) सचिव स-धीर** - रामवियोग शोक दुःखाने सचिव अत्यंत व्याकुळ झाला होताच. (१४४।३-१४६ पहा) अंतःपुरात शिरल्यावर सचिव भ्रमिष्टासारखा झाला होता; पण दशरथांस धीर देणे त्याचे कर्तव्य असल्याने, बोलण्यास प्रारंभ करण्यापूर्वी धीर धरून मन घट्ट करावे लागले व असे करणे कर्तव्यच होते. स्वतः शोकाने व्याकुळ झाला होता तरि तोच आता राजाला सांगणार आहे की शोक सोडा. ही मनुष्याच्या स्वभावाची व व्यवहाराची रीत आहे. गुहाचे असेच झाले; कौसल्या व भरत यांचे आळीपाळीने असेच होणार आहे. (क) पंडित, ज्ञानी, वीर, सुधीर, धर्मज्ञ, साधुसमाजसेवी इ. सर्व लक्षणे सुमंत्रात असल्याचे पूर्वीच सांगितले गेले आहे. सुमंत्र बुध आहे जड नाही तथापि **'ही सियरामस्नेहमहत्ता (२७७।२) आहे. यात 'परोपदेशे पांडित्य'** हा दोष नाही. **'रामस्नेह रसाल-मनाचा। साधुसभे अति आदर त्याचा'** (२७७।४) विदेही जनका सारख्यांची सुद्धा समजूत घालावी लागली.! (२७६) हा शोक, ही व्याकुळता दूषण नसून परमभूषण आहे; पण व्यवहारात आवश्यकतेप्रमाणे एकाने दुसऱ्याची समजूत घालून धीर देणे जरूर असतेच. (ख) **महाराज !** - साध्या राजाने सुद्धा असे अधीर होणे हितकारक नसते; आपण तर साम्राज्याचे अधिपति; आपणच जर असे अधीर झालंत तर सर्व माता व प्रजा यानी कोणाच्या आधारावर धीर धरावा?

**चौ. ५-६ (१) जन्ममरण - जगी रात्रदिवस ती** - या दोन चौपायांत लक्ष्मण गीतेतील **'निजकृत कर्मभोग ते । योगवियोग भोग शुभ मंदहि ।.. जन्ममरण.. मोहमूल परमार्थे नाहीं'** (९२।४.८) या उपदेशाचे सारच आवश्यक तेवढा फरक करून सांगितले आहे. ते तुलनेने सहज कळण्यासारखे आहे. सुमंत्राने लक्ष्मण

गीतेचे श्रवण केले याचा हा आणखी एक सबळ पुरावा आहे.

**चौ. ७ (१) सुखिं हर्षति जड दुःखी रडती - गणती** - ही सुभाषितरूप चौपाई सीता राम स्नेह - विरहदुःख इत्यादीस सोडून अन्यत्र सत्य आहे. सुमंत्र किंवा दशरथ जड नसून विवेकी, बुध आहेत; पण सीतारामविरह शोकाने दशरथ देहत्याग करतील या भीतीने समजूत घालताना सुमंत्र म्हणत आहे की आपण सुधीर वीर धर्मधुरंधर आहांत, आपण जड मूर्ख नसून ज्ञानी पंडित आहात. आपण अधीर झालात तर लोक काय म्हणतील? अकीर्ती होईल, याचा विचार करून धीर धरावा.

**चौ. - ८ - (१) धीरा धरा विवेक - विचारी** - आपल्या शोकाचा परिणाम काय होईल किती अनर्थ होतील, याचा विचार करावा. आत्मानात्म विवेक, नित्यानित्यविवेक केला तर शोकाचा आवेग कमी करण्यास लागणारे धैर्य येईल. **'धीर धरा तर पावू पारा। ना तर बुडू सहित परिवारा।। तारू अयोध्या नाविक आपण। पांथिक बसले सगळे प्रिय जन।।'** (१५४।७-६) असे जे कौसल्या पुढे म्हणते त्याचे सारच जणू **'त्यजा शोक सकलां हितकारी** ! या चरणाने येथे सांगितले आहे. रामसंदेश सांगण्याची प्रस्तावना आता करतात -

*हिं. दो. । प्रथम बास तमसा भयउ दुसर सुरसदि तीर।।*
*।। न्हाइ रहे जलपानु करि सिय समेत दोउ बीर ।।१५०।।*

*हिं. । केवट कीन्हि बहुत सेवकाई । सो जामिनि सिंगरौर गवाँई ।।१।।*
*। होत प्रात बट छीरु मगावा । जटामुकुट निज सीस बनावा ।।२।।*
*। राम सखाँ तब नाव मगाई । प्रिया चढाइ चढे रघुराई ।।३।।*
*। लखन बान धनु धरे बनाई । आपु चढे प्रभु आयसु पाई ।।४।।*

*म.दो. । प्रथम वास तमसातटी गंगातीरि दुजाहि।।*
*।। स्नान करुनि जलपान, दो वीर वसति सीताहि ।।१५०।।*

*म. । सेवा बहुत निषादें केली । शृंगवेरिं ती रजनी गेली ।।१।।*
*। मग सकाळिं वटपय मागवती । जटामुकुट निज शिरीं बनवती ।।२।।*
*। रामसत्वा मग नाव मागवति । प्रिये चढवुनी चढले रघुपति ।।३।।*
*। लक्ष्मण कार्मुकिं बाण लावुनी । चढले प्रभु आज्ञेस पावुनी ।।४।।*

**अर्थ** - पहिली वस्ती तमसातीरावर झाली; व (तेथे) स्नान व जलपान करूनच सीता व दोघे वीर राहिले; दुसरी वस्ती गंगातीरी झाली ।।१५०।। तेथे निषादराज गुहाने पुष्कळ सेवा केली व ती रात्र शृंगवेर पुरासच गेली. ।।१।।

मग सकाळी (रघुपतीनी) वडाचे दूध (चीक) मागवून आपल्या मस्तकावर जटामुकुट तयार केला. ॥२॥ मग रामसख्याने नाव मागविली तेव्हा आपल्या प्रिय पत्नीला नावेत चढवून नंतर रघुपती (रघुराज) स्वतः चढले. ॥३॥ लक्ष्मणानी धनुष्यावर बाण लावला व आपल्या प्रभूची आज्ञा मिळताच ते नावेत चढले ॥४॥

**टीका - दो. - (१) प्रथम बास - दुजाहि** - याने सांगितले की माझ्या डोळ्यांदेखत दोन मुक्काम झाले. पूर्वार्धाने हे सांगून उत्तरार्धापासून त्या मुक्कामातील वैशिष्ट्य सांगताना पहिली रात्र कशी घालवली या विषयी तेथे (दो. ८४) **'करिति बास तमसातटीं प्रथम दिवसिं रघुनाथ'** इतकेच सांगितले होते. तेथील अर्थाची पूर्तता येथे **'स्नान करूनि जलपान'** याने केली. दुसऱ्या मुक्कामाचे सविस्तर वर्णन ८८।१ पासून ९०।४ पर्यंत पूर्वी केले असल्याने येथे पुढील चौपाईत अगदी संक्षेपाने वर्णन केले आहे. विस्तार न करता जेथे जे आवश्यक तेवढेच सांगण्याची ही गोस्वामींची काव्यकला या टीकेत अनेक वेळी स्पष्ट करून दाखविली आहे.

**चौ. २ (१) जटामुकुट निज शिरीं बनवती - 'अनुजा सहित जटा शिरिं वळल्या'** (९४।४) असे प्रत्यक्ष घडले आहे; पण सचिवाने येथे लक्ष्मणाचा उल्लेख केला नाही. याचे कारण इतकेच दिसते की रघुवीराने जटा तयार केल्या हे पाहताच **'सचिव नेत्रिं जलधारा गळल्या ॥ हृदयिं दाह अति उदास वदनें'** (९४।४-५) अशी सचिवाची दशा झाल्यामुळे लक्ष्मणाच्या जटा तयार केलेल्या सचिवाला दिसल्याच नाहीत. जटामुकुट तयार केल्याचा उल्लेख तेथे (९४।४) केला नव्हता तो येथे केला. कारण येथे मुकुट शब्दाची आवश्यकता जास्त आहे. मुकुट शब्द ऐकून जटा शब्दाकडे राजाचे विशेष लक्ष जाऊ नये व व्याकुळ होऊ नये म्हणून येथे त्याची अत्यंत आवश्यकता होती. अर्थ एकच असला तरी अधीर, शोकाकुल, विकारवश झालेल्या मनावर विशिष्ट शब्दांचाच जास्त परिणाम होतो! असा मानवी मनाचा स्वभाव आहे. याची उदाहरणे मानसात अनेक ठिकाणी आहेत. **'देति तात मज कानन राज्य'** (५३।६) असे जे प्रभूंनी म्हटले ते मानसशास्त्रानुसार परिणामाकडे लक्ष देऊनच म्हटले आहे. **'श्रुणु दशमुख खद्योत उजेडें'** (५।९।७) यावरील टीका पहावी, परिणाम उलटा झाला आहे.

**चौ. ३. (१) रामसखा मग नाव मागवति** - हे विधान वस्तुस्थितीला सोडून असले तरी सुमंत्राने खोटे सांगितले असे नाही. राम नदीकिनाऱ्याला गेले व **'मागति नाव न नाविक आणित'** (१००।३) असे प्रत्यक्ष घडले आहे. सचिवाने

बऱ्याच अंतरावरून उंच ठिकाणाकडून रथांतून पाहिले तेव्हा त्यास जे दिसले ते तो सांगत आहे. नाव किनाऱ्याजवळ येताना दिसली, तेव्हा असे वाटणे साहजिक आहे की ज्याने सर्व सेवा केली व जो नावाड्यांचा राजा आहे त्यानेच मागविली असेल. सचिवाने जे अनुभवले व त्यावरून अनुमानाने जे मत झाले ते त्याने सांगितले; म्हणून तो असत्य बोलला असे ठरत नाही (क) **येथे हा उपदेश मिळतो की** एखाद्याचे भाषण वस्तुस्थितीशी विसंगत दिसले असले तरी तेवढ्यावरूनच तो खोटे बोलला असे ठरत नाही. त्याने ती माहिती कोणत्या परिस्थितीत व मानसिक स्थितीत मिळविली याचा विचार करणे अत्यंत आवश्यक असते. असे न केल्यास निष्कारण गैरसमज पसरून, संशयकल्लोळानी भावना दुखावतात व निर्दोष व्यक्तीवर वृथा दोषारोप केल्याचे पाप मात्र पदरात पडते.

(२) **प्रिये चढवुनी चढले आपण** - हे व पुढील चौपाईतील वर्णन त्या प्रकरणात केले नव्हते ते सचिवाच्या मुखाने येथे केले. येथे हे सांगणे आवश्यकच होते. यात हे दाखविले की राम सीतेची अत्यंत काळजी घेतात, तिला फार जपतात; म्हणून सीतेविषयी चिंता करण्याचे कारण नाही.

**चौ. ४** - (१) **लक्ष्मण कार्मुकिं बाण लावुनी** - याने हे आश्वासन दिले की लक्ष्मणासारखा, भृगुपतीला सुद्धा न भिणारा व त्यास धमकावणारा तेजस्वी महाधनुर्धर सीतारामांचे रक्षण करण्यास धनुष्यावर बाण लाऊन सदा सावध आहे. (क) **आज्ञेस पावुनी** - सुचविले की लक्ष्मण आज्ञाधारक सेवकासारखे वागतात. लक्ष्मणांसारखा सेवक व शरीरसंरक्षक असल्यावर रामसीता यांच्याविषयी चिंता करण्याचे मुळीच कारण नाही. आता वाचकांनी विचार करावा की ही हकीगत येथे सांगणे अधिक उपयुक्त का तेथे सांगण्याने कार्यभाग झाला असता?

*हिं.* *। विकल बिलोकि, मोहि रघुबीरा । बोले मधुर बचन धरी धीरा ॥५॥*
*। तात प्रनामु तात सन कहेहू । बार बार पद पंकज गहेहू ॥६॥*
*। करबि पायँ परि बिनय बहोरी । तात करिअ जनि चिंता मोरी ॥७॥*
*। बन मग मंगल कुसल हमारें । कृपा अनुग्रह पुन्य तुम्हारें ॥८॥*

*म.* *। मजला विकल बघुनि रघुवीर । वदले मधुर वचन धृतधीर ॥५॥*
*। तात नमन तातास वदावें । घडि घडि पदपंकजा धरावे ॥६॥*
*। पाय धरुनि मग विनति वदावी । मम चिंता नच तात करावी ॥७॥*
*। पथिं वनिं मंगल कुशल आमचें । कृपा-अनुग्रह-पुण्ये तुमचें ॥८॥*

**अर्थ** - मला व्याकुळ झालेला पाहून रघुवीर धीर धरून मधुर वचन बोलले की ॥५॥ तात! (माझ्या तर्फे) वारंवार चरण कमल धरून माझे नमस्कार वडिलांना सांगावे ॥६॥ (पुन्हा) पाय धरून माझी विनंती सांगावी की बाबा! आपण माझी चिंता मुळींच करू नये ॥७॥ आपल्या कृपेने, प्रसन्नतेने व आपल्या पुण्याईने प्रवासात व वनात आमचे सर्व मंगल व कुशल आहे. (व सदा असणारच.) ॥८॥

**टीका - चौ. ५ (१) शंका - 'सचिवा राम जबरिने धाडति । आपण मग गंगातटिं पावति॥ मागति नाव, न नाविक आणित ॥'** (१००।२-३) असे प्रत्यक्ष घडले आहे; व दशरथांस जो संदेश दिला तो त्या पूर्वी दो. ९५ मध्ये गंगातटी जाण्याच्या पूर्वीच दिला आहे. असे असता सुमंत्र येथे सांगतात की सीतारामलक्ष्मण (या क्रमाने) नावेत बसल्यावर संदेश सांगितले गेले; व सीतेने सासूसासऱ्यांना सांगण्यासाठी स्पष्ट शब्दात **'श्वशुर सासुपद धरुनि मम अशी विनति सांगावि'** इ. (दो. ९८, ९९।१-२) असा संदेश सांगितला असता येथे म्हणतात की सीता काही सांगू लागणार तोच व्याकुळ झालेली पाहून **'तो रघुवरकल पाहुनि होडी। पार जावया नाविक सोडी'** (१५२; १५३, १) **सचिवाने हे वस्तुस्थितीविरुद्ध कसे सांगितले? (२) समाधान - येथे दोन पक्ष संभवू शकतात असे म्हणता येईल. १)** या गोष्टी घडल्याला चार दिवस होत आले. हा काळ सुमंत्राला चार युगांसारखा वाटला असेल; व हे दिवससुद्धा सुमंत्राने बेशुद्ध व नंतर दशरथांसारख्याच अत्यंत व्याकुळ दशेत, मन, बुद्धी, कान, डोळे, वाणी, हात पाय इत्यादि सूक्ष्म स्थूल, इंद्रियांची शक्ती अत्यंत क्षीण झालेल्या अवस्थेत, चिंतेत व पश्चात्ताप करण्यात कंठले आहेत. अंतःपुरात आल्यावरसुद्धा त्यास मतिभ्रम झाला होता. या मानसिक दुर्बलतेने व व्याकुळतेने चार दिवसांपूर्वी घडलेल्या घटनांचा क्रम इत्यादी त्याच्या लक्षांत राहिले नाही; सीतेच्या संदेशाचा तर विसरच पडला व त्या जागी निराळीच कल्पना मनात घुसली, आणि पुढले मागे मागले पुढे, स्वतःची व्याकुळता सीतेच्या ठिकाणी इत्यादी अनेक घोटाळे ती कथा, निरोप इत्यादी सांगताना झाले यात अस्वाभाविक काही नाही. हनुमंतासारखा रामदूत बुद्धिबलधाम, शोकविव्हल झालेला नसता, पण प्रेमविव्हल झालेला असता, त्याने जे सांगितले त्यातसुद्धा क्रमभंग झालाच आहे. **'लंघुनि सिंधु कनकपुर होळी। निशिचरगणवध वनखांडोळी'** (५।३३।८) असा त्या घटनांचा उल्लेख केला. घडल्या गोष्टी, सिंधुलंघन। वनखांडोळी,

निशिचरगणवध व कनकपूर होळी या क्रमाने; पण स्मरणात न राहिल्याने जशा आठवल्या तश्या सांगितल्या. बा. कांडांत शिवधन्हाडाला पाहून **भयार्त** झालेल्या बालकांनी जे वर्णन केले त्यात प्रत्यक्ष न दिसलेल्या गोष्टींचासुद्धा समावेश केला गेला. या बाल व सुंदर कांडातील दोन्ही उदाहरणांतील मनस्थितीच्या परिणामांचे मिश्रण येथे सुमंत्राच्या मनस्थितीत झाले आहे; सुमंत्र **शोकार्त** आहेच. **हा पक्षच या लेखकास मान्य आहे.**

२) **दुसरा पक्ष** - रामचंद्रांनी परत पाठविल्यावरसुद्धा रामाज्ञेविरुद्ध सुमंत्र गंगातीराला आला व तेथे काही संवाद झाला. त्या संवादांतील व पूर्वीच्या संवादांतील गोष्टींचे एकीकरण करून, मिश्रण करून सचिवाने सांगितले असावे. हा पक्ष मानल्यास सुमंत्र गंगातटी केव्हा आला हे पुन्हा कल्पावे लागेल. अन्यथा **'रामसखा मग नाव मागवति'** हे वचन असत्य भाषण ठरेल पितृतुल्य मानलेला सुमंत्र जवळ असता राम नावाड्याकडून पाय धुववून घेतील हे शक्य नाही आणि तिसरी सर्वांत महत्त्वाची गोष्ट म्हणजे सुमंत्र एकनिष्ठ सेवक, भक्त असून रामाच्या इच्छेविरुद्ध आज्ञेविरुद्ध वागला असे मानावे लागेल व हा तर अबाधित सिद्धांत आहे की **'राम करू इच्छिती ते घडते । कोणि नसे जो करी उलट तें ।' 'रामाज्ञा कुणि टाळूं शके ना'** (९९।७) **हे वचन सुमंत्र रामाज्ञेने परत फिरला त्या विषयींच आहे.** हा दुसरा पक्ष बुद्धिगम्य असल्याने याचा उल्लेख व विस्तार करावा लागला. ज्यांना योग्य वाटेल त्यांनी **वरील आक्षेपांचा पूर्ण विचार करून हा मान्य करावा.** यात लेखकाचा दुराग्रह नाही.

**चौ. ६-७ (१) तात नमन... चिंता नच तात करावी** - यांत सांगितलेला निरोप **'पितृपदधरुनी कोटि नति सांगा जोडुनि हात ॥ चिंता कसलीही जरा करूं नका मम तात'** (९५।) या निरोपाचा थोडा विस्तार करूनच सचिवाने येथे निरोप सांगितला आहे; व जे काही येथे किंवा पुढे जास्त सांगितलेले दिसते ते रामाज्ञेनेच सांगितले आहे. प्रभूंनी वरील निरोप (दो.९५) सांगितल्यानंतर लगेच सांगितले की **'तें कर्तव्य सर्वपरिं तुमचें । पित्या होइ शुच दुःख न अमचें'** (९६।२). पित्याला शोक व दुःख होऊ नये म्हणून योग्य वाटेल ते बोलण्याची व करण्याची सत्ता, पूर्ण मुभा, प्रभूंनी सचिवाला दिलेली आहे. (९६।२ टी.प.) **ज्याच्यावर काही असामान्य जबाबदारी टाकावयाची त्याला काही असामान्य अधिकारही द्यावे लागतात.** सुमंत्राला रथासह जाण्यास सांगताना दशरथांनी असेच काही विशेष

अधिकार दिले होते व त्यांचा त्याने उपयोग केल्याचे शृंगवेरपुर-कथा टीकेत दाखविलेही आहे. अंगदास दूत म्हणून पाठविताना रघुनाथांनी असेच भाषण स्वातंत्र्य व कार्य स्वातंत्र्य ध्येयाला आवश्यक तेवढे दिले आहे हे पुढे दिसेल.

**चौ. ८ - (१) पथिं वनिं मंगल... पुण्यें तुमचे'** राम वनात गेले त्या वेळी दशरथ जर शुद्धीवर असते तर रघुनाथाने त्यांस असेच म्हटले असते. **'माते दे आज्ञा मुदिता मनिं । मग मुद मंगल जातां काननिं'... अंब ! देई (देईल) आनंद कृपा तव'** (५३।७-८) असे राम मातेला म्हणालेच आहेत. **'कृपा-अनुग्रह-पुण्यें तुमचें'** यांतील भाव वरील अवतरणात आहेतच. **सच्छील, धर्मनिष्ठ, निरहंकारी व विनम्र पुत्र वा शिष्य** मातापितरांचा वा गुरूचा निरोप घेऊन महत्त्वाच्या कार्यास निघतो तेव्हा त्याची अशीच भावना असते की वडिलांच्या पुण्याईने, कृपेने व त्यांच्या प्रेमळ आशीर्वादाने - आपणांस अंगीकृत कार्यात निर्विघ्नपणे सुयश मिळेलच कल्याण होईल.

***हिं.छं.*** *। तुम्हरें अनुग्रह तात कानन जात सब सुखु पाइहौं ।*
*॥ प्रतिपालि आयसु कुसल देखन पाय पुनि फिरि आइहौं ।*
*। जननीं सकल परितोषि परि परि पायँ करि बिनती घनी ।*
*॥ तुलसीं करेहु सोइ जतनु जेहिं कुसली रहहिं कोसल धनी ॥१॥*

***म.छं.*** *। तुमचे कृपेनें तात काननिं जात सुख पावेन मी ।*
*॥ पाळूनि आज्ञा कुशल, बघण्या पाय, येइन फिरून मी ॥*
*। जननी सकल सांत्वूनि बहु पदिं नमुनि करुनी विनवणी ।*
*॥ तुलसी करा तो यत्न जेणें कुशल राहति पुरधनी ॥१॥*

**अर्थ** - बाबा ! तुमच्या कृपेने, वनात जात असता व गेल्यावर मी सुख पावेन; आपली आज्ञा पालन करून मी पायांच्या दर्शनासाठी कुशल परत येईन. सर्व मातांच्या पुष्कळ (पुनः पुन्हा) पाया पडून व त्यांचे पुष्कळ सांत्वन करून (त्यांना) हीच विनवणी आहे की, तुलसीदास म्हणतात, जेणे करून अयोध्याधीश (पुरधनी, कोसलधनी) कुशल राहतील तो यत्न करा.॥छं.१॥

**टीका. - (१) बघण्या पाय येइन मी** - येऊन पाय पाहीन असे म्हटले नाहीच. 'जन्मसुफलता आज्ञापालन - करुनी, येइन द्या अनुशासन' (४६।३) असे राम दशरथांस म्हणाले आहेत. पण 'वर्ष चार दश वसुनि वनिं पाळुनि पितृवचनास ॥ **येउन पाहिन पाय मी** म्लान करी न मनास' (५३) असे कौसल्येला म्हणाले आहेत.

(टी.पहावी.) येथे सुमंत्राचा हेतु हा आहे की राम चौदा वर्षांनी नक्की परत येणार या एका आशेवर इतर सर्वांप्रमाणे दशरथ जगले तर जगतील म्हणून त्याने 'बघण्या पाय येइन' हे शब्द वापरले खरे पण यातसुद्धा रामाच्या इच्छेचा भंग झालेला नाही; कारण की बघण्यास येईन याचा अर्थ असा नाही होत की मी येईपर्यंत ते पाय राहतील व मला दिसतील. कौसल्येला सांगितलेल्या वचनांत येऊन पाहीन असे स्पष्ट आहे. राम परत येईपर्यंत आपण जगणार आहोत असा अर्थ दशरथांकडून घेतला जाईल असे सुमंत्रास वाटले असेल. (क) सर्व मातांना विशेष निरोप सांगितला की तुम्ही सर्वजणी मिळून राजाची अशी काळजी घ्या की ते कुशल राहतील; त्यांचे अकुशल होऊ न देण्याचा प्रयत्न करा.

*हिं.दो.* *। गुर सन कहब सँदेसु बार बार पदुम गहि ॥*
*॥ करब सोइ उपदेसु जेहिं न सोच मोहि अवधपति ॥१५१॥*

*म.सो.* *। वदा गुरुस संदेश धरुनि पद्मपद वार बहु ॥*
*॥ करा असा उपदेश मज न शोचति किं अवधपति ॥१५१॥*

**अर्थ** - वारंवार गुरुजींचे चरण कमल धरून त्यांना संदेश सांगा की जेणेकरून अयोध्यापति माझा शोक करणार नाहीत असा उपदेश (त्यांस) करावा.॥दो.१५१॥

टीका. - महामुनि विश्वामित्र मला मागत असता जेव्हा अयोध्यापतीने देण्याचे नाकारले तेव्हा आपण उपदेश करून त्यांच्या शंका व भीती यांचा जसा विनाश केलात तसाच, तेच मर्म एकांतांत सांगून या वेळी त्यांचा शोक दूर करावा.

*हिं.* *। पुरजन परिजन सकल निहोरी । तात सुनाएहु बिनती मोरी ॥१॥*
*। सोइ सब भाँति मोर हितकारी । जातें रह नरनाहु सुखारी ॥२॥*
*। कहब सँदेसु भरत के आएँ । नीति न तजिअ राजपदु पाएँ ॥३॥*
*। पालेहु प्रजहि करम मन बानी । सेएहु मातु सकल सम जानी ॥४॥*
*। ओर निबाहेहु भायप भाई । करि पितु मातु सुजन सेवकाई ॥५॥*
*। तात भाँति तेहि राखब राऊ । सोच मोर जेहिं करै न काऊ ॥६॥*

*म.* *। पुरजन परिजन सकलां प्रार्थुनि । सांगा मम बिनती समजाउनि ॥१॥*
*। सर्वपरीं ते मम हितकारी । जे भूपा देती सुख भारी ॥२॥*
*। येतां सांगा निरोप भरता । नीति न सोडा राज्य पावतां ॥३॥*
*। पाळा प्रजा कर्म-मन-वाणीं । सेवा जाणुनि सम सब जननी ॥४॥*

*। रक्ष अंतवरि बंधु ! बंधुपण । सेवुनि माता तात नि सज्जन ॥५॥*
*। असे सर्वदा जपा नृपानां । कीं कधि करिति न मम चिंता ना ॥६॥*

**अर्थ** - नगरलोक व परिजन या सर्वांना प्रार्थना करून माझी विनंती समजाऊन सांगावी की जे राजांना फार सुख देतील तेच माझे सर्व प्रकारे हितकर्ते होत.॥१-२॥ भरत आल्यावर त्यांना निरोप सांगा की राज्य मिळाल्यावर नीती सोडू नका. (किंवा ही नीती आहे की राज्य मिळाल्यावर सोडू नये.)॥३॥ कर्माने मनाने व वाणीने प्रजेचे पालन करा व सर्व मातांना समान जाणून त्यांची सेवा करा.॥४॥ बंधु! माता, पिता व सज्जन यांची सेवा करून अंतापर्यंत (१४ वर्षांची मुदत संपेपर्यंत) बंधुपणाचे रक्षण करा. (निभवा) ॥५॥ व राजांना असे जपा की ते माझी चिंता कधीही करणार नाहीत ॥६॥

**टीका. चौ. १-२** - (१) या दोन चौपायांत दशरथराजांस सुखी ठेवण्याबद्दल विनंती पूर्वक निरोप पुरजन व परिजन यांना आहे; पण मातांना सुखी ठेवण्याबद्दल त्यांना येथे निरोप नाही. तथापि तो निरोप दुसऱ्या चौपायीच्या येथील पुनरुक्तीने ध्वनित करून ठेवला आहे. **दुसरी चौपाई अगदी अक्षरशः पूर्वी आलेली आहे. 'सर्वपरी ते मम हितकारी । जे भूपा देती सुख भारी।** (८०।८) **'मम विरहें माता सकल होती न दुःखी दीन ॥ तोचि उपाय करा सकल पुरजन महा प्रवीण'** (**दो.**८०) असे वसिष्ठ द्वाराजवळ सर्वांना प्रभुंनी स्वतःच सांगितले आहे; म्हणून या दोह्यातील विनंती येथे गृहित धरणे जरूर आहे. (**क**) पिता, माता व गुरु यांना निरोप सांगितल्यावर येथे पुरजन व परिजन यांना सांगितला. आता भरताकरता धाडलेला निरोप सांगतात. भरतावर जबाबदारी मोठी म्हणून त्यांना निरोपही मोठा आहे.

**चौ. ३**.(१) नीति न सोडा राज्य पावता- याचे दोन अर्थ होऊ शकतात. मुख्य अर्थ आधी देऊन कंसात गौण अर्थ दिला आहे; पण **या अल्पबुद्धीला तो योग्य वाटत नाही.** परंतु मुळांतील शब्दांतून तो निघू शकतो म्हणून तो देणेसुद्धा कर्तव्य होते. भरताला असा निरोप धाडण्याची आवश्यकता नव्हती **असे कोणी म्हणतात;** कारण की भरत नीति सोडणार नाही अशी रामचंद्रांची खात्री आहे. रघुनाथास इतकीच खात्री आहे की भरताला राज्यमद होणार नाही. (२३१ पहा.) पण स्नेहाला वश होऊन भरत नीति (शील) सोडील कदाचित असे प्रभूंना वाटत आहे हे १४१।४ मध्ये ध्वनित केले आहे (टी. पहा)व भरताने

कैकईचा जो अधिक्षेप केला त्याने नीतीचा व शीलाचा त्याग रामस्नेहासाठी केलाच आहे. (क) भरतास असा निरोप धाडणे जर अयोग्य तर गुरुंना जो निरोप पाठविला तो फारच अयोग्य असे म्हणावे लागेल. विश्वामित्र - दशरथ - संवादाच्या वेळी रामाच्या निरोपावाचून ज्यांनी राजास उपदेश केला व जे सर्वज्ञ सर्वदर्शी आहेत त्यांस निरोप पाहिजे कशाला? **येथे मनुष्य स्वभावाची** अशा वियोग प्रसंगी असणारी **प्रेमजनित अपेक्षा पूर्ण केली जात आहे.** प्रत्येकाला असेच वाटणार की राम सहज विरागी असल्यामुळे वनात गेल्यावर त्यांना आमची आठवण होते की नाही कोणास ठाऊक! आम्हाला काही निरोप आज्ञा वगैरे पाठविले की नाही? ही लालसा पूर्ण करण्यासाठी सर्वांना संदेश आहेत व या निमित्ताने ज्याच्या त्याच्या कर्तव्याचा उपदेश कवि नीतिशिक्षण म्हणून देऊन ठेवत आहेत. अन्यथा दशरथ जगणार नाहीत, भरत राज्य स्वीकारणार नाहीत व भरतजननीला भरपूर पश्चात्ताप होऊन ती असून नसल्यासारखीच होईल इ. गोष्टी काय प्रभू जाणत नाहीत? पण 'राजनीति राखिति सुरपाते.' (ख) हे निरोप रघुनाथाने प्रत्यक्ष सांगितल्याचा उल्लेख शृंगवेरपुरकथेत नसून सुमंत्र कसे सांगतात याचे उत्तर १५१।६-७ च्या टींत व ९६।९-२ च्या टीकेत दिले आहे ते लक्षांत नसल्यास पुन्हा पाहावे. (ग) **वा.रा.** सर्ग ६२ मध्ये रामचंद्रांनी सुमंत्राला त्याच्या कर्तव्याची जाणीव करून देऊन दशरथकैकयीसुद्धा सर्व माता व भरत यास संदेश वगैरे सुमंत्राजवळ सांगितले आहेत. (श्लो. २२-३६ पहा)

**चौ. ४ - (१) सेवा जाणुनि सम सब जननी** - कैकयी पूर्वीपासूनच कौसल्येचा फार छळ करीत असे असे मानसात स्पष्ट सांगितलेले नाही तरी वा. रा. स्पष्ट सांगितलेले भाव कुठे कुठे मानसात ध्वनित केले आहेत व त्यांतील काही या टीकेत जागोजागी पूर्वी स्पष्ट केले आहेत. तेथील या वचनात ध्वनि आहे की तुम्ही आपल्या मातेच्या सांगण्याने कौसल्या व सुमित्रा वगैरे मातांचा छळ करण्याची किंवा तुमची माता त्यांचे हालहाल करील तिकडे कानाडोळा करण्याची शक्यता आहे. वा.रा. ५२।३४-३६ मध्ये भरतास उपदेश आहे की तू जसा महाराजांशी वागतोस तसा सर्व मातांबरोबर वाग. तुझी माता जशी कैकयी तशीच विशेषेकरून माझी माता कौसल्या आणि सुमित्रा समज. वा.रा. सर्ग ५३ **'रामसंक्षोभः' मुद्दाम वाचून पहावा.**

**चौ. ५-६ (१) रक्ष अंतवरि बंधु! बंधुपण . सज्जन** - आम्ही दोघे नगरीत

असता माता पिता व सज्जन यांची जशी सेवा केली जात होती तशी आम्ही परत येईपर्यंत करा. आमच्या गैरहजेरीने या सर्वांच्या सुखात जरासुद्धा कमीपणा येऊ दिला नाहीत तरच आपल्या परस्पर बंधुप्रेमाची सार्थकता होईल, व तुमचे कल्याण होऊन तुम्हाला वाईटपणा येणार नाही व उलट सर्व तुमच्यावर प्रेम करून तुम्हाला धन्य म्हणतील. (क) पुढे चित्रकूटास भरत भेट झाल्यावर प्रभूंनी दोन वेळा भरतास जे सांगितले आहे त्याचे सार येथे **'पाळा प्रजा कर्म मनवाणी'** आणि **'रक्षअंतवरि - सज्जन'** या तीन चरणांनी सांगितले आहे. **'सहित समाजा तुमचा आमचा । गृहिं वनिं पाता प्रसाद गुरुचा'** (३०६।१) पासून **'संकटिं करिति सुबंधु सहाया । करचि वारतो अशनी-घाया'** (३०६।८) पर्यंत पहा. तसेच **'मम तुमचा हि परम पुरुषार्थ । स्वार्थ सुधर्म सुयश परमार्थ** ।।३।। **दोघांनी पित्राज्ञा पालन। भलें वेदिं जनिं नृपां भलेपण ॥ .... तुम्ही मुनि - मातृ - सचिव - वच पाळा । मही प्रजा नगरी सांभाळा'** (३१५)१-८) पर्यंत पहा. **(ख) असे सर्वदा जपा नृपांना.... चिंता ना.'** माझी आठवणसुद्धा राजांना येणार नाही अशा रीतीने त्यांच्या अगदी तंत्राने वागा. मला वनवासांत पाठविला म्हणून त्यांच्याविषयी मनांत अढी बाळगू नका व त्यांना मनातसुद्धा दोष देऊ नका.

*हिं. । लखन कहे कछु बचन कठोरा । बरजि राम पुनि मोहि निहोरा ॥७॥*
*। बार बार निज सपथ देवाई । कहबि न तात लखन लरिकाई ॥८॥*
*दो. । कहि प्रनामु कछु कहन लिय सिय भइ सिथिल सनेह ॥*
*॥ थकित बचन लोचन सजल पुलक पल्लवित देह ॥१५२॥*
*म. । वदले काहीं कठोर लक्ष्मण । राम मला विनविति त्यां वर्जुन ॥७॥*
*। वारंवार शपथ निज घालुनि । बंधु-बाल-वचं वदा न जाउनि ॥८॥*
*दो. । नमुनि काहिं वदुं लागतां स्नेह-शिथिल वैदेहि ॥*
*। स्थगित वचन लोचन सजल फुलले पुलकहि देहिं ॥२५२॥*

**अर्थ** - लक्ष्मण काही कठोर बोलले तेव्हा त्यांना दाबून (वर्जून) रामचंद्रांनी वारंवार आपली स्वतःची शपथ घालून मला विनंती केली की लक्ष्मणाचे बाळ बोल जाऊन सांगू नका. ।।७-८।। मग वैदेही वंदन करून काही बोलू लागणार तोच स्नेहाने इतकी शिथिल झाली की वाणी रुद्ध झाली, डोळे अश्रूंनी भरले व देह रोमांचानी फुलून गेला. ।।दो. १५२।।

**टीका. - चौ.** ७-८-(१) या चौपायात असा भास होतो की सचिवाने रामाज्ञा

मोडली. पण असे वाटणे हा मोठा भ्रम आहे. रामाज्ञा आहे की **'अनुज-निरोप न वदणे जाउनि'** (९६।५) लक्ष्मणाचा संदेश-निरोप सुमंत्राने सांगितला काय? **'वदले काहीं कठोर लक्ष्मण'** हे म्हणणे म्हणजे संदेश सांगणे नव्हे. म्हणून सुमंत्राने रामाज्ञा मोडली असे म्हणणे म्हणजे शब्दांचा अर्थ म्हणणाराला कळला नाही असे कबुल करणे होय. **(क)** लक्ष्मण काही कठोर वदले हे सांगण्याची तरी काय आवश्यकता? रामाज्ञा आहे की संदेश सांगू नका. दशरथांनी एकदा सांगितले की 'सिता-राम-लक्ष्मण संदेश। वद.' (१४९।५) तरी सुमंत्राने काही सांगितले नाही; पण जेव्हा 'घडी घडी भूप म्हणति सचिवा गा!। प्रियतम सुतसंदेशां सांगा' (१५०।१ टी.प.) तेव्हा दोन परस्पर विरोधी आज्ञांचे पालन करण्याची पाळी सचिवावर आली. रामाज्ञेचे उल्लंघन न करता राजाज्ञेप्रमाणे लक्ष्मण संदेश सांगणे अगदी अशक्य. का सांगत नाही याचे कारण सांगणे भाग होते; म्हणून सांगावे लागले की 'बंधु बालवच वदा न जाउनि' अशी आज्ञा रामचंद्रानी स्वतःची शपथ घालून दिली असल्याने कसा सांगू लक्ष्मण संदेश? पुन्हा राजा विचारणारच की अशी आज्ञा का दिली? त्याचे उत्तर आधीच देणे जरूर होते की 'लक्ष्मण काही कठोर वदले.' लक्ष्मण कोणाला बोलले याचा उलगडा या वाक्यात नाही; त्यामुळे परिस्थित्यनुरुप असेच वाटणार राजाला की कैकयीला बोलला असेल काही. **हे उत्तर देण्यात खरोखर सचिवाने आपल्या 'सु-मंत्र' नावाची सार्थकता केली.** **(ख)** राजाने विचारल्याशिवाय का सांगितले? तो शहाणा एकनिष्ठ सचिव आहे म्हणून. अशा अत्यंत शोकाकुल राजाने पुनःपुन्हा प्रश्न विचारण्याची आवश्यकता ठेवणे सचिवाचे, वाक्पटू मंत्र्याचे शील नव्हे. **ज्या वचनावर आक्षेप घेण्यास जागा राहणार नाही असे बोलणे हे कुशल वक्त्याचे लक्षण व कर्तव्य आहे.** रामाज्ञा न मोडता, राजाज्ञेचा भंग न करता, लक्ष्मणाने पितृनिंदा केली असे वाटू न देता, दशरथाने प्रश्न विचारण्यास फट न ठेवता, शक्य तितके मोजके बोलून दिलेले हे उत्तर म्हणजे सुमंत्राच्या 'वचनरचना अति नागर'चे प्रशंसनीय उदाहरण आहे. सुमंत्र व्याकुळ झालेला असतां, बुद्धि पूर्वीसारखी कार्यक्षम नसता त्याने हे उत्तर दिले असल्याने **याचे कौतुक करावे तितके थोडे!**

**दो.** (१) येथे एक मोठा प्रश्न उत्पन्न होतो की सीतेने संदेश सांगितला असता सुमंत्राने तो का सांगितला नाही? **'श्वशुर सासुपद धरुनि मम अशी विनति सांगावी ॥ चिंता मम न करावि मुळिं मी वनिं सुखी स्वभावि ॥९८॥ प्राणनाथ संगें**

**प्रिय देवर । वीर धुरीण तूण कार्मुक धर ॥ दुःख न मजला भ्रम न पथश्रम। चिंता चुकुन न करा जरा मम ॥** (९९।१-२) हा निरोप व त्यापूर्वीचे सीतेचे सविस्तर भाषण ऐकून सचिव **'होइ बिकल जनु फनि मनिहानीं ॥ कान न ऐकति नेत्रिं दिसेना । व्याकुळ अति वाणिस वदवेना'** (९९।३-४)निरोप सांगतांना किंवा त्यापूर्वीचे भाषण करताना सीता मुळीच स्नेहशिथिल झाली नव्हती; व सीतेने सांगितलेल्या निरोपात असे काही नाही की तो ऐकून दशरथ अधिक व्याकुळ होतील व त्यांचा प्राण जाईल. उलट सुमंत्राने सीतेची जी स्नेहशिथिलता वर्णन केली ती ऐकूनच राजाला जास्त दुःख होणे शक्य आहे. सुमंत्राने खोटे सांगितले असेही म्हणता येत नाही; म्हणून सार हे की सीतेचे भाषण ऐकता ऐकता तिचे पति-प्रेम पाहून सुमंत्राची जी व्याकुळ दशा झाली तीच भ्रमाने सीतेवर लादली गेली आणि सीतेने निरोप सांगितलं हेही स्मरणात राहिले नाही. चित्ताच्या अतिव्याकुळ अवस्थेत असे घडणे स्वाभाविक असते. (१५१।५ च्या टीकेत शंकेच्या समाधानात पहा) या व्याकुळ दशेनंतर लगेच रामचंद्रांच्या आज्ञेने त्यास परत फिरावे लागले व तो दूर जाऊन रथांतच बेशुद्ध झाला हे पूर्वी दाखविलेच आहे.

हिं. *। तेहि अवसर रघुबर रुख पाई । केवट पार हि नाव चलाई ॥१॥*
*। रघुकुलीतिलक चले एहि भाँती । देखउँ ठाढ कुलिस धरि छाती ॥२॥*
*। मैं आपन किमि कहौं कलेसू । जिअत फिरेउ लै राम सँदेसू ॥३॥*
*। अस कहि सचिव बचन रहि गयऊ । हानिं गलानि सोच बस भयऊ ॥४॥*

म. *। तों रघुवर-कल जाणुनि, होडी- । पार जावया नाविक सोडी ॥१॥*
*। रघुकुलतिलक अशापरिं जाती । बघत उभा पवि करुनी छाती ॥२॥*
*। कसे सांगु मी असले क्लेशां । आणिं जिवंत रामसंदेशा ॥३॥*
*। पुढें सचिव-वाचा ना चाले । हानी-ग्लानि-शोकवश झाले ॥४॥*

**अर्थ** - इतक्यात रघुवरांची इच्छा जाणून नावाड्याने पलीकडे जाण्यासाठी होडी सोडली. चालू केली ॥१॥ याप्रमाणे रघुकुलतिलक निघून गेले व मी आपल्या छातीचे वज्र करून बघत उभा राहिलो. ॥२॥ मी स्वतःचे क्लेश कसे सांगू! (मात्र) मी रामसंदेश घेऊन जिवंत आलो. ॥३॥ इतके म्हटल्यानंतर सचिवाची वाचा खुंटली (चाले ना.) व तो हानीच्या ग्लानीने व शोकाने व्याकुळ झाला ॥४॥

**टीका - चौ. २ (१) बघत उभा पवि करुनी छाती** - भाव हा की माझे

हृदय वज्राचेच झाले असले पाहिजे; म्हणून तर ते दृश्य बघत असतां माझी छाती फुटून प्राण गेले नाहीत.

**चौ. ३-४- (१) आणि जिवंत राम संदेशा** - भाव हा की रघुकुलतिलक वनात गेल्यामुळे मला जर खरे खरे क्लेश झाले असते तर रामसंदेश घेऊन येथे येईपर्यंत मी जिवंतच राहिलो नसतो. सचिवाला वाटत आहे की रामावर आपले प्रेम नाही. हे पाहूनच जणू काय - **(क) सचिव-वाचा ना चाले** - वाचा लाजली व मूर्छित झाली. ती पुन्हा राम अयोध्येत येईपर्यंत उघडलेली दिसत नाही. रामाला परत घेऊन आलो असे सांगण्यास माझा उपयोग करावयाचा सोडून या सचिवाने स्वतः जिवंत राहून रामसंदेश सांगण्यास माझा उपयोग केला! असे वाटून **वाचा बंद झाली. ती पुन्हा राम अयोध्येत येईपर्यंत उघडलेली दिसत नाही.** राजाचे मरण झाले, भरत आले, सभा भरली, चित्रकूटयात्रा झाली, जनक महाराज आले व गेले; इत्यादी सगळ्या गोष्टी झाल्या पण सुमंत्राचे कुठे केव्हाही नाव सुद्धा ऐकू आले नाही. आपले हे असले तोंड कोणास दाखवू नये म्हणून **मानसांतील सुमंत्राने अज्ञातवास स्वीकारल्यासारखा दिसतो. वा. रामायणात असे झालेले दिसत नाही.** उत्तरकाण्ड दो. १० मध्ये पुन्हा सुमंत्राचे नाव व सुमंत्र दिसतात. **(ख) 'हानी ग्लानी चित्ता व्यापी। यमपुरिचा जणुं पांथिक पापी'.** (१४५।६) अशी दशा रथांतून येताना झाली होती येथे **'हानीग्लानि-शोक-वश झाले.'** याने सुमंत्राच्या शोकाकुलतावर्णनाचा उपसंहार केला. आता दशरथमरण प्रकरणास प्रत्यक्ष प्रारंभ होतो.

*हिं । सूत वचन सुनतहि नरनाहू । परेउ धरनि उर दारुन दाहू ॥५॥*
*। तलफत बिषम मोह मन मापा । माजा मनहुँ मीन कहुँ ब्यापा ॥६॥*
*। करि बिलाप सब रोवहिं रानी । महा बिपति किमि जाइ बखानी ॥७॥*
*। सुनि बिलाप दुखहु दुखु लागा । धीरजहू कर धीरज भागा ॥८॥*

*हिं. दो. । भयउ कोलाहलु अवध अति सुनि नृप राउर सोरु ॥*
*॥ बिपुल बिहग बन परेउ निसि मानहुँ कुलिस कठोरु ॥१५३॥*

*म. । सूत वचन परिसत नरनाहो । महिं पडले उरिं दारुण दाहो ॥५॥*
*। तळमळ दारुण मोह मनाला । बाधी गढुळी जणुं मीनाला ॥६॥*
*। करत विलापा राण्या रडती । कशि वदवे विपदा अति जड ती ॥७॥*
*। श्रवुनि विलाप दुःख दुःखाला । धैर्याचाही धीर पळाला ॥८॥*

म.दो. *। राउळिं आक्रोशा श्रवुनि पुरिं कोलाहल घोर ॥*
*॥ विपुल - विहगवनि पतित जणुं रात्रीं कुलिश कठोर ॥१५३॥*

**अर्थ** - सूताचे वचन ऐकताच नरनाथ जमिनीवर पडले व हृदयात दारुण दाह झाला. ॥५॥ माशाला गढुळी (नव्या पाण्याचा फेस) बाधली म्हणजे त्याचे दारुण मोहाने व्याप्त होऊन तो जसा तळमळत असतो तशीच जणू राजाची दशा झाली ॥६॥ सर्व राण्या विलाप करीत रडू लागल्या; ती अति जड (भारी, मोठी) विपत्ती कशी वर्णन करता येणार? ॥७॥ तो विलाप (आक्रोश) ऐकून दुःखाला (सुद्धा) दुःख झाले आणि धैर्याचाही धीर (त्याला सोडून) पळाला. ॥८॥ राउळांतील (राजवाड्यांतील) आक्रोश ऐकून नगरात असा मोठा कोलाहल झाला की जणू विपुल विहंगांच्या वनात रात्रीच्या वेळी वज्रच पडले असावे.

**टीका - चौ. ५- (१) सूतबचन परिसत** - या प्रकरणात आतापर्यंत सचिव, सुमंत्र सखा, स्नेही सखा इत्यादी शब्द वापरले; पण येथे सूत म्हटले. भाव हा की सूत =सारथी जे कार्य करतो त्यापेक्षा याने जास्त प्रताप तो काय गाजवला? घेऊन जा सांगितले घेऊन गेला; येत नाही म्हणाले आला रिकामा रथ घेऊन! हे कोणीही सूत करू शकला असता. याला उत्तम हुशार, यशस्वी सचिव सुमंत्र नावाचा म्हणून पाठवला पण शेवटी सूतच ठरला. भरवशाच्या म्हशीला टोणगा! सुमंत्र 'सूत' जातीचा होता. **सगळ्या राण्यांना व राजाला सुमंत्राविषयी काय वाटले ते या हीनजाति-वाचक 'सूत' नावाने ध्वनित केले** 'सूतस्तु सारथौ तक्ष्णि क्षत्रियाद् ब्राह्मणी-सुते' (मेदिनी). क्षत्रिय पुरुष व ब्राह्मणस्त्री यांचा जो पुत्र तो सूत; ही एक विलोम जात आहे. सूत=तक्षा=सुतार; सुतार शब्दाची उत्पत्ती सूत पासून झाली काय?

**चौ. ६- (१) बाधी गढुळी जणुं मीनाला - गढुळी** = पहिल्या पावसाच्या पाण्यावर येणारा फेस व ते गढूळ पाणी याचा माशांवर कसा भयंकर परिणाम होतो त्याचे सविस्तर वर्णन २।५४।४ च्या टीकेत केलेले आहे.

**चौ. ७-८- (१) करत विलापा राण्या रडती** - एक तर दशरथ मूर्छित पडले व राम वनवासास गेले ही बातमी कळली, त्यामुळे सगळ्या राण्या (फक्त एक सोडून) मोठ्याने रडत बडबडत शोक करू लागल्या. **(क) श्रवुनि विलाप दुःख दुःखाला** - दुःख सर्वांना दुःख देते पण त्याला दुःख देणारा कोणी भेटला नव्हता तो जणू आज सूत भेटला. त्याने ही कठोर बातमी आणली नसती तर राजा

मूर्छित झाले नसते व राण्यांना असे दुःख झाले नसते. पण हे विषय दुःख नसून राम विरह दुःख आहे म्हणून प्रत्यक्ष साकार झालेल्या दुःखालाही दुःख झाले. भाव हा की कौसल्यादि राण्या जणू आधींच देहधारी दुःखच बनल्या होत्या आणि त्यात हे दुःख झाले. धैर्याचेंही तसेंच झाले. धैर्याची साक्षात मूर्ति बनून जे दशरथ संदेश ऐकत होते त्यांचा व सर्व राण्यांचा धीर साफ सुटला; आणि धैर्य देहधारी बनून जो **सुमंत्र संदेश सांगत होता तो तेथून हळूच निसटला,** त्याला ते दुःख पाहवेना. राम व सीता अयोध्येस जाणार असे कळताच धैर्याची अशी पळापळ झाली होती. आता तर सीतारामांना १४ वर्षे दारुण वनवास म्हणून दुःख आणि त्यांच्या विरहाचे दुःख! मग धीर कुठे राहणार! **धीर** गेला असेल वासिष्ठांच्या आश्रयाला; पण एवढ्या लांब, नगराच्या बाहेर जाण्यास त्याला तरी शक्ती कोठली? तो **गेला** अगदी जवळ **कैकयीच्या आश्रयाला**. येथे **चेतनोक्ती अलंकार आहे.**

**दो. - (१) राउळ** = राजवाडा. अयोध्या हे मोठे वन आहे हे येथे पुन्हा सांगितले. **'नगर सफल बन गहबर भारी। खगमृग बिपुल सकल नर नारी'** (८४।२ टी. प.) येथे मृग नाही. सगळेच विहग आहेत. राजवाड्यांतील आक्रोश हे जणू घोर वज्र आहे. रात्री वज्र पडल्यामुळे, विहंगांना हालचाल करता येत नाही, कुठे जाता येत नाही, जागेवरून हालता येत नाही; कारण ते आकाशात भराऱ्या मारणारे असले तरी रात्री त्यांना दिसत नाही. अशीच सर्व लोकांची दुर्दशा झाली व मोठा हलकल्लोळ उडाला. सूताचे वचन हे वज्र प्रथम राजवाड्यात पडले. **(क) विहग** शब्द साभिप्राय आहे. विहंगाप्रमाणे सर्व लोकांचे मन मनोरथरूपी आकाशांत भराऱ्या मारीत होते की आता सुमंत्र रामाला घेऊन येईल व जिकडे तिकडे आनंदी आनंद होईल. ते तर नाहीच झाले पण राजवाड्यातील आक्रोशावरून त्या आवाजावरून, वाटू लागले की बहुधा महाराज मरण पावले. **'कौसल्या करि काय बिघाडा। ज्यास्तव तुम्ही वज्र पुरिं पाडा'** (४९।८) असे कैकेयीला तिच्या प्रिय मैत्रिणी म्हणाल्या ते आज खरे झाले.

*हिं.* ***। प्रान कंठगत भयउ भुआलू। मनि बिहीन जनु ब्याकुल ब्यालू ॥१॥***
***। इंद्रीं सकल बिकल भईं भारी। जनु सर सरसिज बनु बिनु बारी ॥२॥***
***। कौसल्या नृपु दीख मलाना। रबिकुल रबि अँथयउ जियँ जाना ॥३॥***
***। उर धरि धीर राम महतारी। बोली बचन समय अनुसारी ॥४॥***

म. *। प्राण कंठगत झाले राउळ । व्याळ बिना मणि जाणों व्याकुळ ॥१।*
*। विकल इंद्रियें सगळीं भारी । जणुं सरिं सरसिजवन विण वारी ॥२॥*
*। क्षीण नृपति कौसल्ये भासत । जाणे रविकुल-रवी मावळत ॥३॥*
*। राम जननि उरिं धरि धीराला । बोले समयोचित वचनाला ॥४॥*

**अर्थ** - राजाचे प्राण कंठांत आले. (कंठगत झाले; व असे वाटूं लागले की) जणूं (जाणों) मणिविहीन झालेला नाग (व्याळ) व्याकुळ झाला आहे.॥१॥ सर्व इंद्रियें अशी भारी विकल (लुळी) झाली की जणू पाण्यावाचून सरोवरांतील कमळांचा ताटवाच.॥२॥ कौसल्येला दिसले राजा क्षीण झाले आहेत व वाटले की सूर्य कुळाचा सूर्य आता मावळत आहे.॥३॥ तेव्हा ह्रदयात धीर धरून रामजननी त्या प्रसंगाला (समयाला) उचित असे म्हणाली की - ॥४॥

**टीका. चौ. १.२-(१) प्राण कंठगत झाले राऊळ** - सर्व शरीरांतील गात्र व इतर मुख्य चार प्राण व पाच उपप्राण हे एकवटून राजाच्या कंठांत आले; म्हणजेच प्राणोत्क्रमणाच्या वेळची घरघर लागली. **राऊळ** = राजा व राजवाडा असे दोन अर्थ असले तरी येथे प्राणकंठगत या शब्दाच्या सहचर्यामुळे राजा असा अर्थ आहे. **(क) विकल इंद्रिये सगळी** - येथे इंद्रियांना कमलवनाची व देहाला सरोवराची उपमा दिली आहे; पण पाणी कोणते नाहिसे झाले हे स्पष्ट सांगितले नाही. सरोवरांतील पाणी सुकून गेले की सर्व कमळे निर्जीव, म्लान, लुळी व शुष्क होतात तशी सर्व इंद्रिये (अवयव) निर्जीव, शुष्क, लुळी पडलेली, अचेतनासारखी दिसू लागली. दोन हात, दोन पाय, दोन डोळे व मुख ही इंद्रिये म्हणजेच कमलवन. इंद्रियांना चेतनता प्राणांमुळे असते; म्हणून येथे प्राण म्हणजेच देहरूपी सरोवरांतील पाणी; ते आटून गेले.

**चौ. ३-४** - (१) अशी स्थिती झाली की चतुर माणसाला सहज समजते की प्राण जाण्याची वेळ आता जवळ आली आहे; तसेच कौसल्येला वाटले की - **'रविकुळ रवी मावळत'** - रविकुळाला प्रकाशित करणारा रवि अस्तास जात आहे. दशरथ मरणार असाच याचा अर्थ आहे; पण **गूढार्थ हा आहे की** दशरथ या देहाला येथे सोडून स्वर्गात जाणार. सूर्य एके ठिकाणी मावळला तरी दुसरीकडे उगवताना दिसतोच; तसेच दशरथांचे होणार. याने हेही सुचविले की दशरथ नित्यमुक्त जीवांपैकी एक आहेत. **(क) रामजननि धरि धीराला** - रामाचीच आई कौसल्या ! तिने अशावेळी धीर नाही धरायचा तर इतर कोण धरू शकेल? भाव

हा की **रामाला शोभेल अशीच रामजननी आहे.** राम वनात गेले म्हणून गाईप्रमाणे हंबरडा फोडीत असता, पतीचे प्राणोत्क्रमण होत आहे, प्राण जाणार असे दिसू लागताच जरासुद्धा विलंब न लागता दुःख शोक व्याकुळता एकदम आवरणे ही गोष्ट राममातेनेच करावी! इतर कोणास साधणे अशक्य म्हटले तरी चालेल. किती मनःसंयम, किती इंद्रियनिग्रह व किती प्रसंगावधान! 'वशे हि यस्येंद्रियाणि तस्य प्रज्ञा प्रतिष्ठिता' (भ.गी.) कौसल्या काय म्हणते ते ऐकू या -

***हिं.*** *। नाथ समुझि मन करिअ बिचारू । राम बियोग पयोधि अपारू ॥५॥*
*। करनधार तुम्ह अवध जहाजू । चढेउ सकल प्रिय पथिक समाजू ॥६॥*
*। धीरजु धरिअ त पाइअ पारू । नाहिं त बुडिहि सबु परिबारू ॥७॥*
*। जौं जियँ धरिअ बिनय पिय मोरी । रामु लखनु सिय मिलहिं बहोरी ॥८॥*

***दो.*** *। प्रिया बचन मृदु सुनत नृपु चितयउ आँखि उघारि ॥*
*॥ तलफत मीन मलीन जनु सींचत सीतल बारि ॥१५४॥*

***म.*** *। नाथ! समजुनी करा विचार किं । राम-वियोग पयोधि अपार किं ॥५॥*
*। तारु अयोध्या नाविक आपण । पांथिक बसले सगळे प्रिय जन ॥६॥*
*। धीर धरा तर पावूं पारा । ना तर बुडूं सहित परिवारा ॥७॥*
*। मनीं धरा प्रिय! जर मम विनती । राम नि लक्ष्मण सिता भेटती ॥८॥*

***म.दो.*** *। प्रिया वचे मृदु बघति नृप उघडुनि विलोचनास ॥*
*॥ म्लान मीन तडफडत जणुं शिंपत शीत जलास ॥१५४॥*

**अर्थ** - नाथ ! मनांत समजून विचार करावा की रामवियोग हा अपार सागर आहे.॥५॥ अयोध्या तारू (जहाज) असून आपण नाविक - कर्णधार - आहांत व सर्व प्रिय मंडळी त्या जहाजांत बसलेले प्रवासी आहेत.॥६॥ आपण धीर धरलात तर या सागराच्या पार जाता येईल; नाही तर सर्व परिवार बुडून जाईल.॥७॥ प्रिय स्वामी! आपण माझी विनंती जर मनावर घेतलीत तर राम लक्ष्मण नी सीता (पुन्हा) भेटतील. ॥८॥ प्रियेचे हे मृदु वचन (बोलणे, भाषण) ऐकून राजाने डोळे उघडून पाहिले. तेव्हा असे वाटले की जणू मासा पाण्यावाचून म्लान होऊन तडफडत असता शीतल जल (च) शिंपले गेले. ॥दो.१५४॥

**टीका. चौ. ५-८ (१) नाथ ! समजुनी करा विचारा** - यांतील आरंभीचा नाथ ! शब्द कौसल्येने जसा उच्चारला असेल तसा इतर कोणास तरी उच्चारता येईल काय? या शब्दांत व 'राम लक्ष्मण सीता भेटतील' यांतच पुढे वर्णिलेले

शीतल जल भरले होते यात शंका नाही. (क) तारु अयोध्या नाविक आपण - अजून सुद्धा असा नियम आहे की आगगाडीचा ड्रायव्हर, विमान चालविणारा, बोटीचा कप्तान इत्यादींनी कोणता कसाही अपघात अकस्मात झाला तरी आपले वाहन सोडून जाता उपयोगी नाही. त्या वाहनांतील सर्व प्रवाशांना वाचविण्याची व्यवस्था होऊन ते त्या वाहनांतून खाली उतरले नाहीत तोपर्यंत त्या वाहन चालविणाऱ्याने आपले वाहन सोडता उपयोगी नाही. कौसल्या दशरथांस हेच सांगत आहे की आपण कप्तान आहात; हे अयोध्यारूपी जहाज रामवियोग सागराच्या परतीराला नेऊन लावल्याशिवाय दुःख, कष्ट सोसवत नाहीत म्हणून आपण आधी निघून जाणे योग्य नाही. सागर अपार असला तरी आपण सुकाणू धरून बसल्यावर सर्व प्रवाशांना धीर येईल; व हे जहाज हळुहळु का होईना, एका शुभ दिवशी रामवियोग सागराच्या परतीराला सुखरूप जाऊन पोचेल. याचाच अर्थ हा की रामादिकांच्या वियोगाचा अंत होईल; रामलक्ष्मण व सीता येऊन भेटतील. हे शब्द कानी पडताच प्राणांचा तडफडाट पुष्कळ कमी झाला.

**दो. - (१) प्रियावचन** - आता दशरथांस कौसल्या खरी प्रिय वाटू लागली आहे. **शुद्ध सात्त्विक प्रेमात दिखाऊपणा व अहमहमिका नसल्यामुळे त्याची परीक्षा संकटकाळाशिवाय होत नाही. 'धैर्य धर्म सन्मित्र सुनारी । आपत्कालिं परीक्षित चारी'** (३।५।७) रजतमोयुक्त भपकेबाज प्रेमावर मनुष्य भुलतो व त्या प्रेमाची कसोटीसुद्धा संकटकाळीच लागते. पण दशरथांसारखी चूक जेथे होते, तेथे स्वतःच्या मूर्खपणाच्या पश्चात्तापाचीही भर पडते. जिच्या पुत्राला विना अपराध राज्यच्युत करून वनवासात पाठविला व जिला कधी सुखाचा शब्दसुद्धा दिला नव्हता ती अंतःकाळी सुखवीत आहे व जिच्या दिखाऊ प्रेमावर भुलून, जिच्या पुत्राला रामाचे राज्य दिले, ती अंतःकाळी राजाकडे ढुंकून सुद्धा बघत नाही; व दशरथांचे प्रेत घरात असता नटून-सजून पुत्राला ओवाळण्यासाठी जाते? यालाच म्हणतात राज्यतृष्णा व दैव दुर्विपाक ! (क) **मीन तडफडत - शीत जलास** माशाला पाण्यांत नेऊन न सोडता शीतल जळ शिंपले तरी तो जगू शकत नाही. फक्त त्याचे आयुष्य कांही क्षणांनी वाढते; म्हणून येथे सुचविले की कौसल्येच्या या विनंतीचा तिच्या इच्छेप्रमाणे उपयोग होणे शक्य नाही व हे कर्णधार अयोध्यारूपी तारवाला सोडून जाणार.

हिं । धरि धीरज उठि बैठ भुआलू । कहु सुमंत्र कहँ राम कृपालू ॥१॥
। कहाँ लखन कहँ रामु सनेही । कहँ प्रिय पुत्रबधु बैदेही ॥२॥
। बिलपत राउ बिकल बहु भाँती । भइ जुग सरिस सिराति न राती ॥३॥
। तापस अंध साप, सुधि आई । कौसल्यहि सब कथा सुनाई ॥४॥
। भयउ बिकल बरनत इतिहासा । राम रहित धिग जीवन आसा ॥५॥
। तो तनु राखि करब मैं काहा । जेहिं न प्रेम पनुं मोर निबाहा ॥६॥
। हा रघुनन्दन प्रान पिरीते । तुम्ह बिनु जिअत बहुत दिन बीते ॥७॥
। हा जानकी लखन हा रघुबर । हा पितु हित चित चातक जलधर ॥८॥

म. । उठुनि बसति धृतधीर भूपवर । वद सुमंत्र कुठं राम कृपाकर ॥१॥
। लक्ष्मण कुठें, राम सुस्नेही । प्रिय सुतवधू कुठें वैदेही ॥२॥
। भूप विकल बहुविधा विलपती । युगसम होइ, न सरत रात्र ती ॥३॥
। अंध-तापसी-शाप आठवत । कथा सकल कौसल्ये सांगत ॥४॥
। होती विकल वर्णित इतिहासा । रामरहित धिग् जीवन-आशा ॥५॥
। ठेउनि काय काय तो करणें । जेणें प्रेमपण न मम पुरणें ॥६॥
। रघुनन्दन हा! प्राणवासरा । तुजविण जगलो फार वासरां ॥७॥
। हा जानकि! लक्ष्मण! हा रघुवर! । तातचित्त चातक घन हितकर ॥८॥

**अर्थ** - धीर धरून भूपश्रेष्ठ उठून बसले व म्हणाले किं सुमंत्र! कृपाकर (कृपालु) राम कुठे आहेत सांग ॥१॥ लक्ष्मण कुठे आहे? सुस्नेही राम कुठें आहेत व प्रिय पुत्रवधू (सून) वैदेही कुठे आहे? ॥२॥ व्याकुळ झालेले भूपति याप्रमाणे नाना प्रकारे विलाप करू लागले; व ती रात्र युगासारखी होऊन संपेच ना ॥३॥ (इतक्यात राजाला) अंधतापसाच्या शापाची आठवण झाली व राजाने ती सर्व कथा कौसल्येला सांगितली. ॥४॥ तो इतिहास वर्णित असतां राजा (पुन्हा) व्याकुळ झाले (व म्हणाले) रामाशिवाय जीवनाच्या जगण्याच्या आशेचा धिक्कार असो. ॥५॥ ज्याने माझा प्रेमपण पुरा केला नाही तो देह (काय) ठेऊन काय करावयाचे ॥६॥ हा! रघुकुलाला आनंद देणाऱ्या प्राणवासरा! तुझ्यावाचून मी पुष्कळ दिवस (वासर) जगलो!॥७॥ हा जानकी! हा लक्ष्मण! हा रघुवर! हा! पित्याच्या चित्तरूपी चातकाचे हित करणाऱ्या मेघा!॥८॥

**टीका- चौ-१-२.** (१) राम होडीत बसून सीता लक्ष्मणासह वनात गेले हे सुमंत्राने सांगितले असता मूर्च्छेतून जागे होताच प्रथम त्यांस सुमंत्राची आठवण

झाली व ती सुद्धा रामाच्या आठवणीमुळेच. राजाला आता राम लक्ष्मण जानकी यांच्याशिवाय दुसरे काही सुचत नाही व इतर कोणी, काहीही नको आहे. राजाने येथे सुमंत्राला विचारले खरे; पण राजा मूर्च्छित पडले व मरणार असे दिसू लागले तेव्हा सुमंत्र केव्हा व कुठे बेपत्ता झाला याचा मागमूस कोठेच नाही. **(क) कृपाकर (कृपालु)** - राजाला बेशुद्ध दशेत सोडून राम गेले तरी राजा त्यास कृपालूच म्हणत आहेत ! भाव हा की राम मला सोडून गेले ते निर्दयपणे गेले नाहीत; माझी व रघुवंशाची कीर्ती वाढविण्यासाठी गेले. दुसरा भाव हा की हा देह आता लवकर सुटेल अशी कृपा करा, म्हणजे जिच्यामुळे हा अनर्थ घडला तिचे तोंड दृष्टीस पडणार नाही.

**चौ. ३ - (१) युगसम होइ, न सरत रात्र ती** - रात्र युगासारखी वाटू लागणे ठीक आहे; पण ती सरण्याची घाई का? येथे **गूढ ध्वनि आहे की** रात्र सरली म्हणजे जिकडे राम असतील तिकडे मी जाईन; अशी कल्पना राजाच्या मनात उठली आहे. हा भाव नसता व मरण्याचीच इच्छा असती तर रात्र संपण्याचा उल्लेख येथे नको होता. राम कुठे आहेत हा प्रश्न विचारण्यातसुद्धा हाच हेतू दिसतो की सकाळ होताच सुमंत्राला घेऊन रामाचा शोध करीत जावे म्हणजे झाले. दशरथ स्वतःच जाण्यास निघाल्यावर त्यांना मनाई कोण करणार? गुहाची भेट होऊन पत्ता मिळून सरळ चित्रकुटला गेले असते; आणि भरतादिकांची समजूत घालून त्यांस जसे परत पाठवितां आले तसे करणे अशक्य झाले असते. म्हणून ही कल्पना मनांत येताच अंतस्थ ईश्वराने किल्ली फिरविली; अन्यथा शाप खरा होण्यास पुन्हा संधी मिळणे शक्य नव्हते.

**चौ. ४-५ - (१) अंध-तापसी-शाप आठवत** - भाव हा की एका साध्या पुत्राचा वियोग झाला तर तो तापसी, आंधळा, पुत्रवियोग शोकाने मेला व रामासारख्या अनुपम अलौकिक पुत्राचा वियोग होऊनसुद्धा मी अद्याप जिवंत आहे ! झाले ! शोकपावक एकदम भडकला व आता रात्र संपण्याच्या आधीच सर्व खेळ उरकणार !

## (२) अंधतापस-शाप कथा

ही कथा वा.रा.सर्ग ६३।६४ मध्ये दशरथाने **राम वनवासास गेल्याच्या सहाव्या रात्री कौसल्येलाच सांगितली आहे.** या टीकेत आतापर्यंत मानसांतील आधारांवरून हेच दाखविले आहे की वनवासाच्या सहाव्या रात्री राम चित्रकुटावर पर्णकुटीत

झोपले व त्याच सहाव्या रात्री सुमंत्र अयोध्येत परत येऊन रात्रीच दशरथ मरण पावले. वा. रा. आधार यापूर्वी पाहिला नव्हता. तापस कथा टीकेत देण्यासाठी शोध घेताना आज (८।१०।५४) आत्ता दिसला !

कौसल्येच्या विवाहापूर्वी, दशरथ युवराज असता एक दिवस सूर्यास्तानंतर रथांत बसून व्यायाम करण्यासाठी शरयू किनाऱ्यास गेले होते. रात्री पाणी पिण्यास येणाऱ्या पशूंची अंधारात शब्दवेधी बाणांनी शिकार करावी हा हेतू होता. काळोखात नदीकाठी हत्तीच्या गर्जनेसारखा आवाज आल्यावर त्या शब्दानुसार शब्दवेधी बाण सोडला. ज्या ठिकाणाकरता बाण सोडला तेथूनच हे शब्द कानी पडले - **'कथमद्रिये शस्त्रे निपतेत्तु तपस्विनि'** इ. (श्लो. २४.३३) हे तपस्व्याचे शब्द कानी पडताच दशरथास फार वाईट वाटले. त्याच्या हातातील धनुष्यबाण गळून पडले. तो दीन होऊन त्या तपस्व्याजवळ गेला व आपल्याकडून चूक कशी घडली, आपण कोण इ. सर्व प्रांजलपणे सांगितले त्यामुळे त्या मरणाऱ्या तपस्व्याने शाप दिला नाही; पण सांगितले की राजा माझ्या शरीरांतील बाण काढ मी मरेन व तुला ब्रह्महत्या लागेल अशी तुला भीती वाटत असलेली दिसते; पण मी ब्राह्मण नाही; वैश्यपिता व शूद्र स्त्री यांचा पुत्र मी तपस्वी आहे. (शूद्राविशोरतु करणः; **या जातीला करण नाव आहे**) मी तपस्वी आहे. माझे वृद्ध व अंध मातापिता आश्रमात राहतात. ते तृषेने व्याकुळ झाल्याने त्यांना पाणी नेऊन देण्यासाठी मी नदीवर आलो होतो. राजा ! त्या समोरच्या पाऊल वाटेने पाणी घेऊन जा व त्यांना दे व सर्व हकीगत सांग. त्याप्रमाणे दशरथ पाणी घेऊन गेला. चाहूल लागताच त्या अंधांनी विचारले की बाळा! तू बोलत का नाहीस इ. नंतर दशरथाने भीत भीत त्यांच्या पुत्राच्या मरणाची इत्थंभूत सर्व हकीगत सांगितली व त्यांचा पुत्र स्वर्गाला गेल्याचे व आपण कोण वगैरे सर्व सांगितले व म्हणाले, की **'शेषमेवंगते यत्स्यात् तत्प्रसीदतु मे मुनिः'** (६४।२०) तरी आता मी काय करावे या बद्दल मुनीने प्रसन्न होऊन आज्ञा द्यावी. तेव्हा तो मुनि म्हणाला की राजा तू जर स्वतः सर्व सांगितले नसतेस तर तुझ्या मस्तकाचे राईराई एवढाले तुकडे उडाले असते; व जर तू ही गोष्ट जाणून बुजून केली असतीस तर संपूर्ण इक्ष्वाकु कुळाचा विध्वंस झाला असता. आता आम्हाला दोघांना तेथे घेऊन जा व एकदा पुत्राच्या देहाला आम्हाला स्पर्श करू दे. दशरथाने त्यास नेल्यावर त्या पुत्रदेहाला स्पर्श करविताच दोघांनी त्याला

मिठी मारली. नंतर स्वर्गात गेलेल्या त्या पुत्राने सांगितले की मातृपितृसेवेने मला स्वर्ग प्राप्त झाला आहे व तुम्हीसुद्धा लवकरच माझ्याजवळ याल. शेवटी त्या अंध तपस्व्याने शाप दिला की **'पुत्रव्यसनजं दुःखं यदेतन्यम सांप्रतम् । एवं त्वं पुत्रशोकेन राजन् कालं गमिण्यसि'** (६४।५४) जसा मी वृद्ध झालो असता मला पुत्रविपत्तीने दुःख होत आहे; तसाच राजा! तुझा अंतकाळ पुत्रशोकानेच होईल. नंतर ते वृद्ध दांपत्य पुत्राच्या चितेत देह जाळून स्वर्गात गेले आहे.

(३) **रामरहित धिग् जीवन - आशा** - हे कौसल्येने केलेल्या विनंतीचे उत्तर आहे. १४ वर्षे रामदर्शनरहित जगणे तर निंद्यच आहे; पण जगण्याची आशा करणे सुद्धा निंद्यच आहे. स्वर्गात गेल्यावर त्या दिव्य देहाने स्वर्गातून का घडेना रामदर्शन घेता येईल.

**चौ. ६. ८ (१) ठेवुनि काय काय तो करणे - काय** = देह 'कायो देहः क्लीब पुंसोः' (अमरे) 'काय काय' **हा यमकानुप्रास अलंकार आहे**; अर्थ भिन्न पण शब्द तेच. ज्या देहाने प्रेमाची परिपूर्ती होत नाही तो त्याज्य, निंद्यच ठरतो; त्याला ठेऊन काय उपयोग? **(क) तुजविण - जगलो फार वासरा - वासर** = दिवस. राम गेले त्या दिवशी दर्शन झालेच; म्हणजे फक्त पांच दिवसच रामदर्शन नाही; तर दशरथांस वाटत आहे की कितीतरी दिवस झाले! **(ख) तातचित्त चातक - घन हितकर** - भाव हा की तुमच्याशिवाय जगात माझे हित करणारा कोणी नाही. इतर कोणाचा भरवसा मला नाही.

*हिं.दो. । राम राम कहि राम कहि राम राम कहि राम॥*
*॥ तनु परिहरि रघुवर बिरह राउ गए सुरधाम॥१५५॥*

*म.दो. । राम राम राम! हि वदुनि राम राम हें राम॥*
*॥ रघुवर विरहें त्यजुनि तनु नृप गाठति सुरधाम॥१५५॥*

**अर्थ** - राम राम राम व राम राम राम! असे (हे) उच्चारून, रघुवर विरहाने देह त्याग करून राजाने सुरलोक (इंद्राचा स्वर्ग, अमरावती) गाठला (स्वर्गास गेले) ॥१५५॥

**टीका. - (१) सुरधाम** = इंद्राचा स्वर्ग; अमरपुरी, अमरावती. येथे अशी शंका येणे साहजिक आहे की रामनामाचा घोष करीत मरण आले असता दशरथ मुक्त का झाले नाहीत. किंवा रामधामास का गेले नाहीत? **'नृप अमरावती येथे आपण'** (२४८।७) असे राम स्वतःच वासिष्ठास म्हणाले असल्याने 'सुरधाम'चा

दुसरा कोणताही अर्थ करण्यास जागा नाही. (क) मनुशतरुपाख्यानात पाहिले आहे की त्यांना प्रत्यक्ष रामदर्शन व वरप्राप्ती झाल्यानंतर प्रभूंनीच सांगितले आहे की **'आतां मम आज्ञा तुम्ही मानुनि। रहा अमरपति-नगरीं जाउनि'** (१।१५१।८) दशरथ राजा मनुचाच अवतार. मनुला कमीत कमी पाच मन्वंतरे व २४ महायुगे इतका काळ स्वर्गात रहावे लागले; तेव्हा नंतर सातव्या मन्वंतराच्या २४ व्या त्रेतायुगात त्यांनी दशरथरूपाने अवतार घेतला. दशरथ जन्मले ते बद्धजीव म्हणून जन्मले नाहीत. ते नित्यमुक्त असून रामावतार नाटकांतील एक अत्यंत प्रमुख पात्र म्हणून अवतरले होते. दशरथच कृष्णावतारासाठी वासुदेव झाले व पुढे कली अवताराचे पिता तेच होणार असल्याचे पद्म. पु. उतारे बा.कां. परिशिष्टांत टीकेत दिले आहेत.

(२) दशरथांनी मरतांना सहा वेळा रामनामाचा उच्चार का केला अशी शंका काढून टीकाकारांनी नाना कल्पनातरंग उठविले आहेत; पण ते सर्व हस्यास्पद व उपेक्षणीय आहेत. वि. पत्रिका पद १३० चा आधार न देता पण तोच आधार देऊन एका टीकाकारानी त्याप्रमाणे अर्थ केला आहे; पण ते पद सहावेळा केलेल्या रामनामोच्चाराचे फळ सांगणारे नसून रामनामाचे महात्म्य सांगणारे आहे. विनय पत्रिकेत अनेक पदात रामनाम महिमा वर्णिला आहे. पद ४६ मध्ये एकाच चरणास पाचवेळा, १२९ मध्ये तीनवेळा, ६८ मध्ये तीनवेळा, २४७ मध्ये एकदांच याप्रमाणे अनेकपदांत एका चरणांत 'राम' शब्द कमी अधिक वेळा घालून पुढे त्या पदात रामनामाचा महिमाच वर्णिला आहे. मरताना कितीवेळा रामनामोच्चार केला तर त्याचे कोणते भिन्न भिन्न फळ मिळते हे कोठेच सांगितलेले नाही. (क) **सार हे आहे** की प्राण निघून जातानां एका निःश्वासात जेवढ्या वेळा 'राम' उच्चार करता आला तेवढा केला व दोहयात वृत्ताच्या सोईने जितक्या अधिक संख्येने 'राम' शब्द घालता आला तितका कवीनी घातला. यापेक्षा त्यांत भावार्थ किंवा गूढार्थ काही नाही. (ख) रामविरहाने देहत्याग केला म्हणून कवीनी **दशरथांच्या प्रेमाला सत्यप्रेम म्हटले आहे**. 'वंदु' अयोध्यापाल प्रेम सत्य ज्या रामपदिं । विरहित. 'दीनदयाल प्रिय तनु तृणसम परिहरिलि' आता राजाच्या मृत्युचा परिणाम सांगतात (१।१६).

***श्रीमानस - गूढार्थ चंद्रिका अयोध्या काण्ड अध्याय १५ वा समाप्त.***

●●●

## अध्याय १६ वा

हिं. *। जिअन मरण फलु दसरथ पावा । अंड अनेक अमल जसु छावा ॥१॥*
*। जिअत राम बिधु बदनु निहारा । राम बिरह करि मरनु सँवारा ॥२॥*
*। सोक बिकल सब रोवहिं रानी । रूपु सीलु बलु तेजु बखानी ॥३॥*
*। करहिं बिलाप अनेक प्रकारा । परहिं भूमितल बारहिं बारा ॥४॥*
*। बिलपहिं बिकल दास अरु दासी । घर घर रुदनु करहि पुरबासी ॥५॥*
*। अँथयउ आजु भानुकुल भानु । धरम अवधि गुन रूप निधानू ॥६॥*
*। गारीं सकल कैकइहि देहीं । नयन बिहीन कीन्ह जग जेहीं ॥७॥*
*। एहि बिधि बिलपत रैनि बिहानी । आए सकल महामुनि ग्यानी ॥८॥*

म. *। पावति दशरथ जिवन-मरण-फल । ब्रह्मांडें बहु भरि यश निर्मल ॥१॥*
*। जगत राम-बिधु-वदन विलोकित । राम-वियोगें मरण सुशोभित ॥२॥*
*। शोकाकुल सब राण्या रडती । रूप शील बल तेज वानती ॥३॥*
*। विविधपरीं बहु विलाप करती । वारंवार धरतिवर पडती ॥४॥*
*। विलपति विकल दास नी दासी । घरोघरीं रडती पुरवासी ॥५॥*
*। आज अस्तला रविकुल भानु । धर्म-अवधि गुण-रूप-निधानु ॥६॥*
*। देती सकल शिव्या कैकइला । नेत्रहीन जी करी धरणिला ॥७॥*
*। विलपत यापरिं रात्र सरे ती । ज्ञानी सकल महामुनि येती ॥८॥*

**अर्थ** - जीवनाचे व मरणाचे फळ दशरथास मिळाले अशा निर्मल यशाने अनेक ब्रह्मांडे भरली ॥१॥ जिवंतपणी रामचंद्रांचा मुखचंद्र अवलोकन केला; व रामविरहाने मरण सुशोभित केले ॥२॥ सर्व राण्या (एकी शिवाय) शोकाने व्याकुळ होऊन आक्रोश करीत (रडत-रडत) दशरथांच्या रूप, शील, बल, तेज इ. गुणांचे वर्णन करू लागल्या ॥३॥ त्या सर्व नाना प्रकारानी विलाप करीत आहेत व जमिनीवर (धरतीवर) लोळत आहेत ॥४॥ सर्व दास व दासी विलाप करीत आहेत व घरोघरी नगरवासी (नरनारी) रडत आहेत. (रडू लागले) ॥५॥ आज सूर्यकुळाला प्रकाशित करणारा, धर्माची सीमा आणि गुण व रूप यांचे निधान असा भानु अस्तास गेला (मावळला) ॥६॥ सर्व लोक कैकईला शिव्या देऊ लागले; कारण तिने जग नेत्रहीन केले॥७॥ याप्रमाणे (अंतःपुरात व नगरात) सर्वलोक विलाप करीत असताच ती (रामवनवासाची सहावी) रात्र संपली; (व सकाळी) सगळे ज्ञानी मुनी (अंतःपुरात) आले ॥८॥

**टीका. - चौ. १-२ - (१) 'अनायासेन मरणं विना दैन्येन जीवनम्'** ही साधी गोष्ट सुद्धा फारच थोड्यांच्या नशिबात असते. जन्मास येऊन सगुण साक्षात्कार २।४ क्षण होणारा सुद्धा अनेक कोटी लोकांत एखाद्यास क्वचित केव्हातरी होतो; व रामविरहाने मरण पावणारा दशरथाशिवाय कोणी झाल्याचे ऐकिवात नाही. दशरथांनी तर १६।१७ वर्षे सगुण ब्रह्माला मांडीवर खेळविले व अंतकाळ रामविरहाने रामरामोच्चार करीत झाला. असे निर्मल यश कोणाच्याच वाटणीस आले नाही; म्हणून अनंत ब्रह्मांडात दशरथ-सुयशाचे गान केले जाऊ लागले यांत काही नवल नाही. **(क) रूप-शील - बल तेज वानती - रूप** इतके सुंदर की कैकयीसारख्या अलौकिक सुंदरीचे मन त्यांच्यावर बसले; **शील** इतके महान की प्रतिज्ञा व सत्य पालनासाठी रामासारख्या, निरपराधी, प्रियतम पुत्राचा त्याग केला. बल इतके की इंद्रानेसुद्धा त्यांस असुरांविरुद्ध लढण्यास मदतीला बोलवावे; **तेज** असे की देवेंद्राने सामोरे येऊन घेऊन जाऊन आपले अर्धे सिंहासन बसण्यास द्यावे. **(ख) विविध परीं विलाप** - वा. रा. स. ६५।२२-२९ व ६६।१-३ पहा व लंका १०४ मध्ये मंदोदरीविलापाचे वर्णन आहे. त्यातील काही भाग येथे घेण्यासारखा आहे.

**चौ. ७-८- (१) नेत्रहीन जी करी धरणीला** - नेत्र, नयन, या शब्दांचा धात्वर्थ नेता, नेणारा असा आहे. दशरथ सर्व पृथ्वीचे सम्राट होते. काय करावे कुठे जावे इ. कोणास सुचत नाहीसे झाले. **(क) ज्ञानी सकल महामुनि येती** - 'व्यतीतायां तु-शर्वर्यामादित्त्यस्योदये ततः।। समेत्य राजकर्तारः सभामीयुर्द्विजातयः।। मार्कण्डेयोऽथ मौद्गल्यो वामदेवश्च काश्यपः।। कात्यायनो गौतमश्च जाबालिश्च महायशाः' (वा.रा. २।६७।२-३) मार्कंडेय, मौद्गल्य, वामदेव, काश्यप, कात्यायन, गौतम, जाबालि हे मुनि व वसिष्ठ आले इतकाच भाग वा.रा. मधून येथे ग्राह्य आहे. येथे दरबारात वगैरे सभा भरलेली नाही.

*हिं. दो. । तव वसिष्ठ मुनि समय सम कहि अनेक इतिहास ॥*
*॥ सोक नेवारेउ सबहि कर निज बिग्यान प्रकास ॥१५६॥*

*हिं. । तेल नावँ भरि नृपतनु राखा । दूत बोलाइ बहुरि अस भाषा ॥१॥*
*। धावहु बेगि भरत पहिं जाहू । नृप सुधि कतहुँ कहहु जनि काहू ॥२॥*
*। एतनेइ कहेहु भरत सन जाई । गुर बोलाइ पठयउ दोउ भाई ॥३॥*
*। सुनि मुनि आयसु धावन धाए । चले बेग बर बाजि लजाए ॥४॥*

*म.दो. । मग वसिष्ठ समयोचितां सांगुनि इतिहासांस ॥*
*॥ निजज्ञानतेजें हरति सकलांच्या शोकास ॥१५६॥*

म. । तेल तरीमधिं नृपतनु ठेउनि । सांगितले दूतां बोलवुनि ॥१॥
। भरतापाशिं पळत तुम्हिं जाही । सांगुं नका नृपवृत्त कुणाही ॥२॥
। जा इतकेच वदा भरताप्रति । युग बंधुंस गुरू नेण्या धाडति ॥३॥
। दूत धावले आज्ञा ऐकत । वरवाजिंस वरवेगिं लाजवित ॥४॥

**अर्थ** - मग वसिष्ठमुनींनी प्रसंगानुकूल असे अनेक इतिहास सांगितले (ऐतिहासिक कथा) व आपल्या ज्ञानाच्या तेजाने (प्रकाशाने) सर्वांचा शोक (रूपी अंधार) नाहींसा केला. ॥दो. १५६॥ मग तेलाने भरलेल्या नावेत (तरी = नाव, होडी) राजाचा देह ठेविला आणि दूतांना बोलावून घेऊन त्यांस सांगितले की ॥१॥ तुम्ही धावत पळत (अतित्वरेने) भरताकडे जा; (मात्र) राजाची हकीगत कोणालाही सांगू नका.॥२॥ भरतापाशी जाऊन(सुद्धा) इतकेच सांगा की दोघांभावांना नेण्यासाठी गुरुजींनी आम्हाला धाडले आहेत. ॥३॥ ही आज्ञा ऐकताच दूत धावत निघाले व त्यांनी आपल्या उत्तम वेगाने उत्तम वाजींना (सुद्धा) लाजविले.

**टीका. दो. (१) वा.रा.** अंतपुरांतील मंडळीस वसिष्ठांनी उपदेश केल्याचा उल्लेख नाही; पण हे करणे आवश्यक होते. शिबि, दधीची, हरिश्चंद्र, रंतिदेव, बली वगैरेंच्या कथा सांगून, सांगितले असेल की दशरथांबद्दल शोक करणे योग्य नाही; त्यांनी धर्माचे आचरण निष्कलंकपणे केले आहे; व ते स्वर्गास गेले आहेत. तुमचे दुःख पाहून त्यांना दुःख होईल. तसेच, आत्मा नित्य आहे बाकी सर्व अनित्य आहे. देह अनित्य असल्याने त्याचा नाश प्रारब्धानुसार व्हायचाच; जगाची गति अशीच मायाजनित आहे; इत्यादि सांगून शोक निवारण केला.

**चौ. १-३ (१) तेलतरीमधिं नृपतनु ठेउनि** - तरी = होडी, नाव; राजाचे अंत्यकर्म, दाह संस्कार, करण्यास चार पुत्रांपैकी कोणीही जवळ नाही; म्हणून नावेत तेल भरून राजाचा देह त्यांत ठेवला. अशाने तो कुजणार नाही व पुत्र भरत येईपर्यंत सुस्थितीत राहील. (क) **सांगितले - दूतां बोलवुनि** - वसिष्ठांनी स्वतः दूतांस आज्ञा दिली. '**एहि सिद्धार्थ विजय जयन्ताशोक नन्दन ॥ श्रूयतामितिकर्तव्यम् सर्वानेव ब्रवीमि वः ॥५॥ पुरं राजगृहं गत्वा शीघ्रं शीघ्रजवैर्हयैः ॥ त्यक्तशोकेरिदं वाच्यः शासनाद्भरतो मम ॥६॥ त्वरमाणश्च निर्याहि कृत्यमात्यन्तिकं त्वया ॥ मा चास्मै प्रोषितं रामं मा चास्मै पितरं मृतम् ॥ भवन्तः शंसिषुर्गत्वा राघवाणामिमं क्षयम् ॥**' (वा.रा. ६८।४-८). **सिद्ध विजय जयन्त, अशोक व नन्दन** या पाच दूतानां हाक मारुन वसिष्ठांनी आज्ञा दिली की तुम्ही राजगृह नगरास

वेगवान घोड्यावर त्वरेने जा; व शोक बाजूस ठेऊन माझ्या आज्ञेने भरतास सांगा की त्वरा करून निघून ये, विलंब सहन होण्यासारखा नाही. तुझ्याशी अत्यंत महत्वाचे काम आहे. रामवनवास, राजाचे मरण व राघवांची झालेली हानि इ. काहींच सांगू नका. येथे मानसांतील दूत घोड्यावरून गेलेले नाहीत हे चौथ्या चौपाईवरून अगदी स्पष्ट आहे; बाकी विशेष भेद नाही.

**शंका - इतकी गुप्तता का** व रामजवळ असून लांब असलेल्या भरतास का बोलावला? **समाधान** (१) राजविहीन देश आहे असे समजल्यास नाना संकटे येतात. (वा.रा. ६८।८-३६ पहा) नाना भानगडी उत्पन्न होतात; इतर राजे आक्रमण करतात. म्हणून राजनीति पालन करणे भाग होते. (क) रामवनवास, दशरथ मरण व भरतास राज्य देणे इत्यादी हकीगत पत्रांत गुप्त म्हणून भरतास कळविली असती तर भरताचा शोक अनावर होऊन काहीच गुप्त राहिले नसते व भरत कदाचित आलाही नसता.

(२) **भरतांसच बोलावण्याची कारणे** - (१) दशरथांच्या वचनाप्रमाणे भरतास राज्य देणे जरूर होते; म्हणून शक्य तितक्या लवकर बोलावणे भागच होते. (२) रामचंद्रांनी नगरग्राम प्रवेश करावयाचा नाही अशी केलेली प्रतिज्ञा मोडल्याशिवाय त्यांस येतां येणे शक्य नव्हते व गुरूने शिष्यास प्रतिज्ञा मोडावयास लावणे हा अधर्म ठरला असता. (३) कैकयीला संशय आला असता की राम व वसिष्ठ यांनी संगनमत करून भरतास बोलावला नाही व भरताचा राज्याधिकार गुंडाळून ठेवला व ती प्राण देण्यास तयार झाली असती. याप्रमाणे रामचंद्रांस प्रतिज्ञा भंग करण्यास लावून बोलावण्यात फायद्यापेक्षा तोटेच जास्त होते व राम फारतर ५-६ दिवस अधिक लवकर आले असते.

**चौ. ४-(१) बरबाजिस बरबेगिं लाजविति** - मानसांतील दूत पायीच धावत गेले; पण त्यांची गती उत्तम वाजींपेक्षासुद्धा अधिक आहे. रामवाजी दमलेले व व्याकुळ झालेले होते तरी सुमारे २ - २।। प्रहरांत ९० मैल आले हे लक्षांत असेलच. म्हणजे वा.रा. दूताना घोड्यावरून जाण्यास जितका वेळ लागला तितक्याच दिवसांत तरी हे जाणारच.

***"सचिवागमन नगरिं नृप मरण" प्रकरण येथे समाप्त.***

***अयोध्या काण्ड पूर्वार्ध समाप्त.***

***आतां पुढे उत्तरार्धात मुख्यतः भरतचरित्र आहे.***

●●●

## श्री रामचरितमानस - गूढार्थ चंद्रिका
## अयोध्यकाण्ड उत्तरार्ध, प्रारंभ
## भरतागमन प्रेम प्रकरण (१५७।५ - १६९।६)

हिं. *। अनरथु अवध अरंभेउ जब तें । कुसगुन होहिं भरत कहुँ तब तें ॥५॥*
*। देखहिं राति भयानक सपना । जानि करहिं कटु कोटि कलपना ॥६॥*
*। बिप्र जेवाँइ देहिं दिन दाना । सिव अभिषेक करहिं बिधि नाना ॥७॥*
*। मागहिं हृदयँ महेस मनाई । कुसल मातु पितु परिजन भाई ॥८॥*

म. *। अयोध्येंत जैं अनर्थ झाले । तैंहुनि कुशकुन भरता झाले ॥५॥*
*। रात्रिं भयानक पाहे स्वप्नां । जागत करि कटु कोटि कल्पना ॥६॥*
*। ब्राह्मण भोजन बहु, दिनिं दानां । करि अभिषेक शिवा विध नाना ॥७॥*
*। प्रार्थुनि मनिं मागतात शंभुसि । कुशल मातृ-पितृ-परिजन-बंधुंसि ॥८॥*

**अर्थ** - ज्यावेळी अयोध्येत अनर्थ चालू झाला तेव्हापासून भरताला कुशकुन (अपशकून) होऊ लागले ॥५॥ रात्री भयानक स्वप्ने पडू लागली व जागा झाल्यावर भरत अनंत प्रकारच्या कल्पना करू लागले॥६॥ (दुःस्वप्न व अपशकुन दोष शांतीसाठीं) रोज पुष्कळ ब्राह्मणांस भोजन घालू लागले, पुष्कळ दाने रोज देऊ लागले व शंकरांस नाना प्रकारांनी अभिषेक करू लागले. ॥७॥ शंभूला (महादेवाला) मनांत प्रार्थना (नवस) करून मनांतच माता पिता परिजन व भाऊ (बंधू) यांचे कुशल मागू लागले.

**टीका. चौ. ५-६ (१) अयोध्येत जैं अनर्थ चाले** - अयोध्येत अनर्थाला प्रारंभ कैकयी-कुबडी संवादापासून झाला. म्हणजेच दशरथ निधनाच्या पूर्वीच्या सातव्या दिवशी झाला. निघालेल्या दूतांना सात दिवस जाण्यास लागणार आहेत व भरतास रथाने येण्यास सात दिवस लागणार आहेत; म्हणजे दशरथ मरणाच्या १४-१५ व्या दिवशी व रामवनवासाच्या २०-२१ व्या दिवशी भरत अयोध्येस येतील. अपशकुनांचा वगैरे त्रास मामाच्या घरी भरतास १३ दिवस झाला; व तितकेच दिवस अरिष्ट शान्त्यर्थ शास्त्रोक्त नानाविध उपाय भरताने केले. अनर्थारंभापासून घडलेल्या सर्व गोष्टी ईशप्रेरित असल्याने त्या उपायांचा काही उपयोग झाला नाही. अशा उपायांचा पुष्कळवेळा चांगला उपयोग होतो; म्हणून ते करणे कर्तव्य आहे **हे या चार चौपायात उपदेशरूपाने सुचविले आहे.** चित्रकूटास सीतेला दुःस्वप्न पडलेले

ऐकून राम **'स्नान बंधुसह करूनी पूजिति । त्रिपुरारिस, साधुंस सन्मानिती** (२२६।८)

(२) **रात्रिं भयानक पाहे स्वप्नां - या स्वप्नांचा उल्लेख** भरताने आपल्या मित्रांजवळ केल्याचे वर्णन **वा.रा. ६९।८-१६** मध्ये आहे; त्यांतील थोडा नमुनाः- दशरथांचे केस मोकळे झाले आहेत; म्लान झालेले दशरथ पर्वतावर शेणाने भरलेल्या तलावात पडले असून ते पोहत व तेल पीत हसत आहेत. मान लवलेली असून तेलांत बुडविले आहेत. समुद्र सुकून गेला. चंद्र भूमीवर गळून पडला. दशरथ काळे कपडे घालून लोखंडाच्या पाटावर बसले आहेत व काळ्या पिंगट वर्णाच्या स्त्रिया त्यांना मारीत आहेत. दशरथ लाल फुलांच्या माळा घालून, रक्तचंदन लाऊन, गाढवांच्या रथांत बसून दक्षिण दिशेकडे चालले आहेत. **रक्तासारखी लालभडक वस्त्रे नेसलेली एक भयानक राक्षसीण हसतहसत राजाला ओढीत आहे.** मात्र ही स्वप्ने भरतास दूत ज्या दिवशी भेटतात त्याच्या पूर्वीच्या रात्री पडली आहेत; १२-१३ दिवस पडली नाहीत. भरत घाबरून बेचैन झाला आहे व मित्रास म्हणाला आहे की 'नरो यानेन यः स्वप्ने खरयुक्तेन याति हि।। अचिरात्तस्य धूमाग्रं चितायां परि दृश्यते (श्लोक १८) जो मनुष्य गाढवाच्या वाहनांत बसून गेलेला स्वप्नांत दिसतो तो चितेत जळत असताना त्याचा धूर स्वप्न पाहणारास थोड्याच काळाने दिसतो. त्रिजटेने रावणास असाच स्वप्नात पाहिला (५।११।४.५ पहा) 'अहं रामोऽथवा राजा लक्ष्मणो वा मरिष्यति' (१७) मी, राम, राजा (दशरथ) अथवा लक्ष्मण यांपैकी कोणी तरी मरणार असे भरत मित्रास म्हणाला. **हा कटु कल्पनांचा नमुना आहे.**

**चौ. ७-८-** (१) शंकरांस नाना प्रकारे अभिषेक करून **'प्रार्थुनि मनिं मागतात शंभुसि** शंकराला नवस व प्रार्थना करून ऐहिक गोष्टींची याचना केली आहे. यावरून ठरते की भरत शिवोपासक होते. **उपासना रहस्य जाणणारा मनुष्य ऐहिक गोष्टींची याचना आपल्या उपास्य देवाजवळच करतो; इतरांजवळ उपास्यदेवतेच्या भक्तिप्रेमाशिवाय काही मागत नाही.** (क) माता पिता परिजन व भाऊ यांचे कुशल मागितले, व तेही मनांत व आर्त होऊन. यावरून निःसंदेहपणे ठरते की रामचंद्रांच्या अकल्याणाची कल्पना भरताच्या मनास शिवली नाही. म्हणजेच कैकयीने जे केले त्याच्याशी भरताच्या विचारांचा काही संबंध नाही **'कुशल** = कल्याण; **'कल्याण** मंगलं शुभम्।..... कुशलं क्षेम' (अमरे) (ख) वा.रा. भरत दूतांना कुशल विचारीत असतां राजा, राम, लक्ष्मण कौसल्या, सुमित्रा व कैकयी

या क्रमाने विचारले आहे. कौसल्येला आर्याच धर्मनिरता धर्मज्ञा धर्मदर्शिनी', सुमित्रेला 'धर्मज्ञा' व स्वतःच्या जननीला **कैकयीला 'आत्मकामा सदा चण्डी क्रोधना प्राज्ञमानिनी'** (वा.रा. ७०।१०) असे भरताने म्हटले आहे. किती निर्मळ, सरळ, निःस्वार्थ व निष्कपट अंतःकरण!

*हिं. दो.* *। एहि बिधि सोचत भरत मन धावन पहुँचे आइ ॥*
*॥ गुर अनुसासन श्रवन सुनि चले गनेसु मनाइ ॥१५७॥*

*म.दो.* *। भरत सचिंत असे मनिं तोच दूत येतात ॥*
*॥गुर्वाज्ञा ऐकत नमुनि गणेशास निघतात ॥१५७॥*

**अर्थ** - भरत असे चिंतामग्न झाले आहेत तोच दूत येऊन पोचले व गुरुजींची आज्ञा कानी पडताच (ऐकतांच) (काही विचारपूस न करतांच) भरत गणेशाला नमून निघाले ।।दो. १५७।।

**टीका** (१) येथे दूतांनी नमन करणे, भरताने आजोबांची मामाची वगैरे आज्ञा (निरोप) घेणे इत्यादी कशाचेही वर्णन नसले तरी या सर्व गोष्टी घडल्याच; पण या गाळण्याने कवींनी त्वरा निदर्शन केले आहे. दूतांनी अत्यंत त्वरा केली व भरत अत्यंत त्वरेने सर्व औपचारिक गोष्टी कशातरी उरकून निघले. **'त्वरा वा गति निदर्शन कला १ प्र.पू. ३१५ पहा. (क) वा.रा. सर्ग ७० मध्ये** दूत पोचल्यापासून भरत तेथून निघेपर्यंतच्या विविध गोष्टींचे वर्णन ३० श्लोकांत केलेले आहे. १. भरताच्या मामाला वस्त्रेभूषणे व ३० कोटी धन भेट म्हणून दूतांनी बरोबर आणले होते ते भरताकडून देवविले. मानसांतील दूत धावतपळत पायी आले असल्याने त्यांनी असले काहीच आणणे शक्य नाही व पाठविलेही नाहीच. भरताला १० कोटी धन आणले होते. २. **भरताने राजा, राम, लक्ष्मण, कौसल्या सुमित्रा व कैकयी यांचे कुशल विचारले आहे**. ३. ज्यांचे कुशल विचारतां ती सर्व कुशल आहेत व लक्ष्मी तुम्हाला वरीत आहे तरी रथ लवकर सज्ज करावा असे दूतांनी सांगितले आहे; म्हणजेच **कुशल सांगण्यात दूत खोटे बोलले आहेत**. ४. भरताने आजोबांचा निरोप घेतला आहे व त्यांनी **कैकयी, राजा, पुरोहित वसिष्ठ व रामलक्ष्मण यांना कुशल सांग असे म्हटले आहे**. भरताने कुशल विचारले तो क्रम व आजोबांनी कुशल कळविले तो क्रम यांतील महदंतर ध्यानात धरण्यासारखे आहे. **कौसल्या व सुमित्रा यांचे नाव नाही !** ५. आजोबांनी पुष्कळ हत्ती, घोडे, वस्त्रे अलंकार व पुष्कळ धन भेट दिली. मामानेही पुष्कळ भेट

दिली आहे. ते सर्व जिन्नस निरनिराळ्या वाहनांतून पाठविले आहेत. ६. शेवटी भरत अंतःपुरात जाऊन तेथील मंडळींचा निरोप घेऊन निघाला आहे.

(२) ज्या वर्णनात वाल्मीकींनी साठ ओळी खर्ची घातल्या ते वर्णन मानसकारांनी फक्त दोह्याच्या दोन ओळीत केले. **मानसांतील वर्णन मानवस्वभाव व लोकव्यवहार यांना धरून आदर्श आहे;** तर वा.रा. वर्णन राजनीतिदृष्टीने पूर्ण आदर्श आहे. भरताला व तेथील मामा वगैरना शंका येण्यास तिळमात्र फट राहू नये म्हणून ते केले आहे. पण दशरथ राजा मेलेले असता भेटीच्या वस्तू पाठविणे व खोटेच कुशल सांगणे या गोष्टी मनुष्यस्वभावास सोडून आहेत. कोणत्याही देशांतील वा धर्मातील लोक असेच म्हणतील.

(३) **भरताने कुशल का विचारलं नाही ?** दशरथमरणसूचक स्वप्ने आधीच पडलेली, राजाचे पत्र आशीर्वाद, निरोप नाही, रामाचा निरोप नाही; वसिष्ठ गुरुंचा तातडीचा अगदी सुटसुटीत त्रोटक निरोप (आज्ञा). भेट, नजराणा कोणास काही नाही; प्रेमळ कौसल्या मातेचा निरोप. खाऊ इत्यादी काही नाही स्वार्थी, चण्डीजननीचा निरोप, खाऊ वगैरे नाही व दूत खिन्न. अशा सगळ्या गोष्टींचा समुच्चय झाल्यावर, साधारण पुत्रास सुद्धा कुशल विचारण्याचा धीर होणार नाही; मग भरतासारख्या प्रेमळ, सरळ, राजनीतिकुशल, व्यवहारचतुर, स्वभावज्ञ पुरुषाची खात्रीच होणार की महाराजांचेच काहीतरी बरे वाईट अकस्मात झाले असले पाहिजे. अशा मनस्थितीत कुशल विचारण्याचे धैर्य कोणास होईल ? शिष्याचा बाप मेलेला असता कोणता गुरू अगदी जीवनमुक्त असला तरी, आपल्या शिष्यास वस्त्रे भूषणे व विपुल धन पाठविल ? व सर्वमाता विधवा झालेल्या असतां कोणत्या दूतांच्या तोंडून माता कुशल असल्याचे पुत्राला सांगवेल ? राजनीति दृष्टीने या गोष्टी करणे आवश्यक असले व क्षम्य असले तरी मनुष्य स्वभावाला हे करणे अशक्यवत आहे. इतकी तुलनात्मक चर्चा पुष्कळ झाली.

*हिं । चले समीर बेग रथ हाँके । नाघत सरित सैल बन बाँके ॥१॥*
*। हृदयँ सोचु बड कछु न सोहाई । अस जानहिं जियँ जाउँ उडाई ॥२॥*
*। एक निमेष बरष सम जाई । एहि बिधि भरत नगर निअराई ॥३॥*

*म. । हय समीर वेगाने हाकित । विकट नद्या गिरि वन ओलांडित ॥१॥*
*। चिंता अति मनिं काहिं रुचेना। उडुनि च जावे मनीं भावना॥२॥*
*। एक निमेष जाइ सम वत्सर। असे निकट पुरि आले सत्वर॥३॥*

**अर्थ** - जोराच्या वाऱ्याच्या वेगाने घोडे हाकलीत बिकट नद्या पर्वत वने ओलांडित भरत चालले ॥१॥ मन चिंतातुर असल्याने काहीच गोड वाटत नाही व मनांत अशी भावना आहे की उडूनच जावे.॥२॥ (पण ते अशक्य! त्यामुळे) एकेक निमिष एकेक वर्षासारखे जात आहे; अशारीतीने भरत त्वरेने अयोध्यापुरीजवळ आले॥३॥

**टीका** - (१) वा.रा.स. ७१।१-१७ मध्ये भरताच्या मार्गावरील नद्या, पर्वत व वने यांचे क्रमशः वर्णन आहे. भरत रथ हाकीत नव्हता; उत्तम सारथी रथ हाकीत होता. वाटेने वारंवार अपशकुन झाले व त्या त्या वेळी भरताने सूताला पुष्कळ विचारले; पण त्याने विषयांतर करून वेळ मारून नेली. "अयोध्या मनुना राज्ञा निर्मितां संददर्शह॥ तां पुरीं पुरुषव्याघ्रः सप्तरात्रोषितः पथि' सात रात्री वाटेत मुक्काम केल्यानंतर आठव्या दिवशी भरतास अयोध्येचे दर्शन झाले. वायुवेगाने रथ हाकलून चालवून सुद्धा इतके दिवस लागले; तेव्हा दूतांना जाण्यासमुद्धा पूर्ण सात दिवस लागणारच व ते आठव्या दिवशी पोचले. याप्रमाणे दूत निघाल्यापासून १५ व्या दिवशी भरत अयोध्येजवळ आले हे सप्रमाण सिद्ध झाले. (क) **शत्रूघ्न बरोबर निघाल्याचा किंवा आल्याचा उल्लेख येथे नाही**; तरी पुढे दिसेल की ते आले आहेत.

**चौ. २-३ (१) चिंता असि मनिं काहिं रुचेना** - दूत येण्यापूर्वी भरत सचिंत होते; पण दूतांच्या येण्यानंतर चिंता वाढणे अगदी स्वाभाविक असल्यामुळे 'चिंता अति' असे म्हटले. काही रुचेना- खाणे, पिणे झोप वगैरेत मुळीच लक्ष नाही व मार्गाने दिसणाऱ्या खगमृगांकडे, सृष्टिसौंदर्याकडे वगैरे लक्षच जात नाही. एकाच चिंतेची हुरहुर लागली की वडिलांची काय दशा झाली आहे कोणास ठाऊक! नगरांत गेल्यावर काय काय पहावे व ऐकावे लागणार! इ. इ. या चिंतेने मन अधीर झाले आहे व उडून जाता आले असते तर किती बरे झाले असते असे मनात वाटत आहे.

***हिं*** *। असगुन होहिं नगर पैठारा । रटहिं कुभाँति कुखेत करारा ॥४॥*
*। खर सिआर बोलहि प्रतिकूला । सुनि सुनि होइ भरत मन सूला ॥५॥*
*। श्रीहत सर सरिता बन बागा । नगरु बिसेषि भयावनु लागा ॥६॥*
*। खग मृग हय गय जाहिं न जोए । राम बियोग कुरोग बिगोए ॥७॥*
*। नगर नारि नर निपट दुखारी । मनहुँ सबन्हि सब संपति हारी ॥८॥*

*म. । नगरिं शिरत किति कुशकुन घडती । काक कुठायीं कटु ओरडती ॥४॥*
*। खर कोल्हे प्रतिकूल ओरडति । श्रवुनि भरत मनिं शूल तदा अति ॥५॥*
*। श्रीहत वन बागा सर सरिता । नगरी भारि भयाण निरखितां ॥६॥*
*। खग मृग हय गज नाहीं बघवत । रामवियोग-कुरोगें मृतवत ॥७॥*
*। नगरनारिनर विषण्ण भारी । जणुं सब हरले संपत् सारी ॥८॥*

**अर्थ** - नगरांत शिरताना पुष्कळ अपशकुन होऊ लागले; डोमकावळे प्रतिकूल ठिकाणी कर्णकटु (कर्कश) ओरडू लागले. ॥४॥ गाढव व कोल्हे प्रतिकूल रडू लागले; तेव्हा ते ऐकून भरताच्या हृदयास फार पीडा होऊ लागली.॥५॥ वने बागा, तलाव व नद्या निष्प्रभ अशुभ दिसल्या व नगरीकडे पाहिले तो तीही भयाण दिसली.॥६॥ पशुपक्षी हत्ती घोडे यांच्याकडे तर बघवत नाही; कारण की रामवियोगरूपी दुष्ट रोगाने (कुरोग) ते मेल्यासारखे झाले आहेत ॥७॥ नगरांतील स्त्रिया व पुरुष तर असे भारी खिन्न-दुःखी दिसले की जणू सर्वांची सर्व संपत्तीच नष्ट झाली असावी.॥८॥

**टीका. चौ. ४-५ - (१) काक कुठायीं कटु ओरडती** - 'उजवा काक सुशेतीं दिसला' (१।३०३।३) हा शुभ शकुन आहे, सबब डाव्या बाजूला ओसाड जागेत नुसता दिसणेसुद्धा अपशकुनच. मग कटु कर्कश ओरडणे तर फारच वाईट. **(क) खर** = गाढव. प्रतिकूल ओरडणे म्हणजे रडणे; कुत्री, कोल्हीं, गाढवे यांचे रडणे हा प्रतिकूल, अपशकुन अजूनही मानला जातो व वाईट परिणाम अनुभवास येतात. रावण वधापूर्वीचे वर्णन ६।१०२।७ मध्ये पहावे.

**चौ. ६-४- (१) 'श्रीहत वन बागा...' वा.रा.** ७१।२५-२७ मध्ये असेच पण सविस्तर वर्णन आहे. वनांतील झाडांची पाने गळून पडलेली; वृक्ष पुष्पफलहीन झालेले; बागा सुकून गेलेल्या, व जिकडे तिकडे शुकशुकाट, उदासीनता, भयाणपणा. तलावांचे व नद्यांचे पाणी गढूळ झालेले. ओसाड गावच्या नद्या तलावासारखी दुःस्थिती! ज्या बागा, तीर्थे, कुंडे, नद्या इ. नेहमी माणसांनी गजबजलेली असावयाची तेथे अगदी शुकशुकाट! हे लक्षत ठेवले पाहिजे की **घरांत, गांवात किंवा नगरांत राहणाऱ्या लोकांच्या भावनांचे परिणाम आजूबाजूच्या सर्व वातावरणावर, जीवांवर व वृक्षलतादिकांवर सुद्धा होतात. (क) नगरी भारि भयाण** - ज्या नगरीत सुवासिक धूप, फुले, अत्तरे, यांचा सुगंध दरवळलेला असावयाचा, गायन वादनादिकांचा मधुर ध्वनि कुठे ना कुठे कानांवर यावयाचा,

ध्वजपताका तोरणे उभारून मंगलवाद्यांनी ज्या राजपुत्राचे स्वागत व्हावयाचे व लोक सामोरे यावयाचे, ज्या नगरीत दिवसा नेहमी गलबला असावयाचा, आत शिरणाऱ्या व बाहेर जाणाऱ्या व्यापार धंदा करणारांची रीघ लागलेली असावयाची, तेथे यांतील एकही गोष्ट नसून मृत्यूची छाया सर्वत्र पसरलेली असली म्हणजे नगरी भारी भयाण दिसावयाचीच.

**चौ. ८. (१) नगरनारिनर विषण्ण भारी** - कुठे तुरळक माणसे दुरून दिसली ती सर्वच अगदी खिन्न, उदासीन, निस्तेज दिसली. **(क) जणु सब हरले संपत् सारी** - कोणी बलात्काराने सर्वस्वाचे हरण केले म्हणजे ती माणसे जशी दिसावी तशी दृष्टीस पडणारी प्रत्येक व्यक्ति दिसली. 'मुनिधन, **जन सर्वस्व**, शंभु असु' (१।१९८।२) असे जे राम ते या नरनारींचें **सर्वस्व - सर्वसंपत्ती** आहे; त्यांनाच बलात्काराने यांच्यापासून हिरावून वनांत पाठविले; त्याचा हा परिणाम आहे.

***हिं. दो.*** *। पुरजन मिलहिं न कहहिं कछु गवँहि जोहारहिं जाहिं ॥*
*॥ भरत कुसल पूँछि न सकहिं भय विषाद मन माहिं ॥१५८॥*

***म.दा.*** *। पुरजन भेटति वदति ना हळुच नमुनि जातात ॥*
*॥ भरत कुशल पुसुं शकति ना भय विषाद चित्तांत ॥१५८॥*

**अर्थ** - पुरवासी लोक (तुरळक) भेटतात पण कोणी काहीच न बोलतां हळूच (चोरासारखे) नमन- जोहार- करून (चटकन) निघून जातात. भरत लोकांना व लोक भरताला कुशल विचारू शकत नाहीत; कारण दोघांनाही चित्तांत भय व विषाद वाटत आहे.।।दो.१५८।।

**टीका - (१) हळूच** - भरताकडे न पाहतां, त्याची दृष्टी चुकविण्याचा प्रयत्न करीत कसा तरी नमस्कार, जोहार करून चोरासारखे चटकन निसटतात. **(क) भय विषाद चित्तांत** अयोध्येवर असे कोणते संकट ओढवले की स्थावर जंगम, पशुपक्षी, नरनारी व नगरी या सर्वांचीच अशी दुर्दशा झाली आहे, ही भीति; व वडिलांचे काय झाले आहे याची चिंता शोक, खेद भरतास वाटत आहे; म्हणून भेटणाऱ्या कोणाही व्यक्तीला कुशल विचारण्याचे धाडस भरत करू शकत नाही. लोक रामविरह व दशरथमरण या दुहेरी शोकाने व्याकुळ आहेत. भरताच्या मनांत राज्याचा स्वीकार करावयाचा असला व राम वनात गेले बरे झाले, असे त्यांस वाटले, तर आपण त्यांच्या आनंदाच्या वेळी दुःखाची बातमी सांगणे म्हणजे 'सुखसमयी दुःख' दिल्यासारखे ठरणार, या भीतीने लोक काही बोलत नाहीत

व कुशल विचारण्यासही धीर होत नाही. भरताला पाहताच **'कैकयी करी कुटिल जी करणी'** तिची आठवण ताजीतवानी होऊन लोक, शोक विव्हल होणे स्वाभाविक आहे. काहीही बोलले असते तरी अमंगल बातमी सांगावी लागली असती; अशी भयंकर, दुःखद बातमी कोण मुद्दाम सांगणार! ही बातमी सांगण्याचा प्रसंग आपल्यावर येऊ नये या हेतूने जो तो भरतास टाळण्याचा प्रयत्न करीत आहे, तो योग्यच आहे.

***हिं.*** ***। हाट बाट नहिं जाइ निहारी । जनु पुर दहँ दिसि लागि दवारी ॥१॥***
***। आवत सुत सुनि कैकय नंदिनि । हरषी रबिकुल-जलरुह चंदिनि ॥२॥***
***। सजि आरती मुदित उठि धाई । द्वारेहिं भेंटि भवन लेइ आई ॥३॥***

***म.*** ***। हाटा वाटां बघवत नाहीं । व्यापि पुरिस जणुं दव दिशिं दाही ॥१॥***
***। श्रवुनि 'येत सुत' कैकय नंदिनि । हर्षे रविकुल-जलरुह-चांदिणि ॥२॥***
***। आरति सजुनि मुदित ये धावत । द्वारिं च भेटुनि ने भवनाप्रत ॥३॥***

**अर्थ** - बाजार व रस्ते (वाटा) यांच्याकडे तर भरतास बघवे ना; असे वाटले की नगराला दाही दिशांस वणवा (दावाग्नि) लागला आहे की काय? ॥१॥ आपला मुलगा येत आहे हे ऐकतांच कैकय राजाला आनंद देणारी व सूर्यवंशरूपी जलरुहानां (पक्षांना)चांदण्या रात्रीसारखी झालेली (कैकयी) हर्षित झाली. ॥२॥ आरती सजवून ती आनंदाने (राजद्वाराशीच) धावत आली व (आरती ओवाळून) राजद्वाराशीच पुत्राला भेटून आपल्या वाड्यात घेऊन आली ॥३॥

**टीका. चौ. १ - (१) व्यापि पुरिस जणुं दव दिसीं दाही** - पूर्वी राम वनांत गेले तेव्हा नगराची अशी दशा झाली होती - **'नगर सफल बन गव्हर भारी । खग मृग विपुल सकल नरनारी ॥ विधि करिं किरातिनी कैकइला । दव दुःसह दश दिशीं लाविला ॥ सहुं न शकति रघुवर विरहानळ । लोक सकल पळुं लागति विव्हळ ॥'** (८४।२-४) **'दिसे अयोध्या भयाण भारी'** (८३।५) पासून (८४।५) पर्यंत पहा. भरताला पाहताच लोक वरच्या सारखे विव्हळ होऊन सैरावैरा पळू लागले त्यामुळे भरतास वाटले की नगरीला वणवा लागला की काय? येथील या चौपाईने दाखविले की गेले वीस दिवस अयोध्येची दशा पहिल्या दिवसासारखीच आहे; सर्व दुकाने बंद आहेत. रस्त्यांत केर साचला आहे. लोकांचा शोकानल दाह किंचितही कमी झाला नसून भरताला पाहतांच उलट वाढला आहे. कौसल्यादि राण्यांचे असेच होणार आहे.

**चौ.२ - (१) कैकयनंदिनि** - कैकय राजाला आनंद देण्यास कारण होणार, कारण आपल्या नातवाला असे समृद्ध राज्य मिळाल्यावर वृद्ध आजोबांस आनंद होणारच **'कैकयनन्दिनि मंदधी'** (दो. ९१) व त्यावरील टीका पहावी. **(क)** हर्षे रविकुलजलरुह चांदिणि' रविकुल कमलवन जल राम आहेत. **'विपुल वियोगें प्रजा विव्हळत । जणुं जलचरगण पाणी आटत'** (५१।६ टी.प.) **'नगरनारि नर विव्हळ तैसे । निघटत नीर मीनगण जैसे'** (१४७।८) **'मीन जगविण्या नीर उसपले** (१६१।८) असे पुढे भरत म्हणणार आहेत. रविकुल जल रामाला तर वनांत धाडलेच. रामविरह भानूने कमळे आधींच 'शुष्क झालेली असतां- **'भानु कमल कुल पोषण कर्ता। होइ जलविण त्यां संहर्ता'** (१७।७) कैकयीचा हा हर्ष म्हणजे आधीच सुकलेल्या त्या सूर्यविकासी कमळांना जणू हेमंत ऋतूतील चांदणी रात्रच. भाव हा की आधीच मृतप्राय झालेल्या रघुवंशाला यामुळे अधिकच दुःख होणार व लज्जेने माना खाली घालाव्या लागणार ! आमच्या कुळातील जगत्प्रसिद्ध परमधर्मशील महापुरुष मरून पडलेला असता त्याच्याच प्राणप्रिय राणीला असा हर्ष व्हावा ना ! यामुळे रविकुल पूर्वजांना झालेला संतापच जणू भरताच्या मुखाने या आसुरहृदयी रविकुल जलरुह चांदिणीचा अधिक्षेप करणार आहे. या हर्षाचें वर्णन पुढे (चौ. ५) आणखी आहेच.

**चौ. - ३. (१) आरति सजुनि मुदित ये धावत - 'काय न करि अबला प्रबल'** (४७) याची परमावधि येथे दाखविली. ज्या कैकयीवर दशरथराजा प्राणांहून अधिक प्रेम करीत होते; त्यांचा मृतदेह घरांत पडलेला असता पशुपक्षीसुद्धा शोकाकूल झालेले असता, पुत्राला आरती ओवाळण्यास कैकयी नटून थटून आनंदाने धावत राजद्वारापर्यंत जात आहे! **'विश्वासो नैव कर्तव्यः स्त्रीषु** राजकुलेषुच' एवढ्याचसाठी. **'प्रतिबिंबहि निज करीं घेववे । परि नारीगति कधिं न जाणवे ॥** (४७।८) **'साहस माया अनृत चपलता। भय अशौच अविवेक अदयता॥'** या आठ स्त्री स्वभाव दोषांपैकी अनृत व भय सोडून बाकीचे सहा दोष येथे कैकयीच्या चरित्रांत दिसले. त्यांत साहस, अविवेक व निर्दयता हे तीन अत्यंत प्रबल झाले असून कुलस्त्रीस्वभाव सुलभ जी लज्जा ती कैकयीला लाजून पळून गेलेली दिसते. जे करण्यास अत्यंत कठोर पुरुषास सुद्धा लाज वाटली असती ते हिने अगदी आनंदाने केले. **(क) द्वारिंच भेटुनि ने भवनाप्रत - द्वारिं** = राजवाड्याच्या मुख्य प्रवेशद्वाराशी; जेथे रथ थांबणार व भरत रथांतून उतरणार तेथे आधीच जाऊन

हजर ! अयोध्येतील व राजवाड्यांतील इतर कोणास भरताशी भाषण करण्यास संधीच मिळू नये, व राजाच्या मरणाची बातमी त्यास कोणी सांगू नये व रामवनवासाची हकीगत सांगून त्याचे कान कोणी फुंकू नयेत. म्हणून ही राजनैतिक सावधानता धावपळ करीत राखली ! राजपुत्र परगांवाहून आला म्हणजे माता आरती ओवाळण्यास जातात; पण ही वेळ आनंदाने आरती ओवाळण्याची ! मनलज्जा नसली तरी जनलज्जा ? पण तिला वाटत आहे की जे कोणी आज हसतील त्यांची हड्डी हड्डी भरत राजा झाला आज की उद्याच नरम करीन. सत्तामदांध झाली आहे. **'आत्मकामा सदा चंडी क्रोधना प्राज्ञमानिनी'** (वा.रा. ७०।१०) असे भरताने आधींच मामाच्या घरी असता कैकयीबद्दल दूतांजवळ म्हटले आहे.

*हिं. । भरत दुखित परिवारु निहारा । मानहुँ तुहिन बनज बनु मारा ॥४॥*
*। कैकेई हरषित एहि भाँती । मनहुँ मुदित दव लाइ किराती ॥५॥*
*। सुतहि ससोच देखि मनु मारे । पूँछति नैहर कुसल हमारें ॥६॥*
*। सकल कुसल कहि भरत सुनाई ॥ पूँछी निज कुल कुसल भलाई ॥७॥*
*। कहु कहँ तात कहाँ सब माता । कहँ सिय राम लखन प्रिय भ्राता ॥८॥*

*म. । भरता परिजन दुःखी दिसले । जणूं वनजवन तुहिने सुकलें ॥४॥*
*। कैकेयी हर्षित वचतनमनिं । जणुं दव लावुनि मुदित किरातिनि ॥५॥*
*। बघुनि सचिंत उदास सुतासी । पुसे 'कुशल अमचे पितुवासीं' ॥६॥*
*। भरतें सकल कुशल सांगितलें । क्षेम कुशल निज कुलास पुसलें ॥७॥*
*। कुठें तात वद माता सकलहि । सिता कुठें, प्रिय राम-लक्ष्मण हि ॥८॥*

**अर्थ** - हिमपाताने (तुहिन = हिम) जसे कमलांचे ताटवे (वनज= कमल) झोडपून काढावे - सुकुन जावे तसाच जणू सर्व परिसर भरतास दुःखी दिसला. ॥४॥ (पण) कैकयी मात्र वाणीने शरीराने (कृतीने) व मनाने अशी हर्षित दिसली की जणूं (एखाद्या सुंदर वनास) वणवा लाऊन एखादी भिल्लीण आनंदित झालेली असावी.॥५॥ आपल्या सुतास सचिंत व उदास असलेला पाहून ती विचारते की आमच्या बाबांच्या (वडिलांच्या) घरचे कुशल आहे ना? ॥६॥ भरताने सर्व कुशल सांगितले व आपल्या कुळातले क्षेम व कुशल विचारले. ॥७॥ बाबा कुठे आहेत ते सांग, सगळ्या माता कुठे आहेत ते पण सांग व सीता कुठे आहे? प्रिय (बंधू) राम व लक्ष्मण कुठे आहेत ते सांग. ॥८॥

**टीका - चौ. ४ - (१) जणूं वनजवन तुहिनें सुकलें** - हेमंत ऋतुंतील चांदण्यारात्री हिम पडून कमलांचे ताटवे त्याच्यामुळे अगदी शुष्क-मेल्यासारखे होतात. **'रविकुलजलरुह चांदिणी'** असे कैकयीला नुकतेच म्हटले सरस्वतीने पूर्वीच म्हटले आहे की **'अब्ज - विपिनिं हिमनिशि मी व्हावें?'** (१२।१) पण सरस्वती हिमरात्र झाली हे लोकांना माहीत नसून लोक कैकयीलाच सर्वस्वी नाशाचे कारण समजतात व शिव्याही देतात. म्हणून कैकयीने वर मागणे व रामाला वनवासास पाठविणे हाच हिमपात. एकीकडे सर्व दासदासी व इतर मंडळी अगदी सुकून गेलेली अति दुःखी दिसली तर याच्या अगदी उलट कैकयी दिसली.

**चौ. ५ - (१) कैकेयी हर्षित वचतनमनिं** - मूळात वच तनमनिं या अर्थाचे शब्द नाहीत; पण हृदयात हर्षित झाली असे म्हटलेले आहे; म्हणून मूळातील अर्थ येथे स्पष्ट केला. सुत आल्याचे ऐकताच हर्ष झाला तो मनाने; आनंदाने धावत गेली. आरती घेऊन वगैरे तो शरीराने, कृतीने हर्ष दिसला व बापाच्या घरचे कुशल विचारले व पुढे भरताला राज्य स्वीकारण्यास वगैरे सांगते तो वाणीने हर्ष प्रगट होत आहे. येथे हर्ष= उत्साह व आनंद हे दोन्ही अर्थ आहेत. **(क) जणुं दव लावुनि मुदित किराततिनि- 'रामवियोगबिकल सब तिष्ठति॥ विधिकरि किराततिनी कैकइला॥ दव दुःसह दशदिशीं लाविला॥ नगर सफल वन गव्हर भारि॥ खगमृग विपुल सकल नर नारी॥ सहुं न शकति रघुवर बिरहानल'** (८४)१-४ टी.प.) भाव हा सगळ्या परिवाराच्या व नगरलोकांच्या दुःखाचे कारण ही एकटीच दिसते व सर्वांच्या दुःखाने हिला फार हर्ष झालेला आहे हे भरताने ओळखले व त्यामुळे तर भरत अधिक सचिंत व उदास झाला.

**चौ. ६ - (१) बघुनि सचिंत उदास सुतासी - सुत** "श्रवुनि येत **सुत**" (१५९।२)'सुत वच ऐकुनि' (१६०।७). 'पाहुनि विकल **सुता**' (१६१।१) व येथेही **सुत** शब्द वापरला आहे. पुत्र, तनय, हिंदीत सुअन (सूनु) इ. एकदाही वापरला नाही. सुत = प्रसवणारा, षु प्रसवे, सूयते स्म = सुत. कैकईला दृढ आशा आहे की भरत माझ्या गुणांना व स्वभावाला जन्म देईल; मला ज्यात आनंद वाटतो त्यांत त्याला आनंद व मला ज्यांत व जें दुःख त्यांत व ते त्याला दुःख वाटत असलेच पाहिजे, कारण तो माझा सुत आहे. पण मी इतकी हर्षित व आनंदित असता हा माझा सुत असा सचिंत व उदास का दिसतो? इतर सर्वांना दुःखी पाहून याला दुःख होणे शक्य नाही; उलट हर्षच झाला असता;

मग हा माझा सुत असून असा सचिंत व उदास का? असे वाटले व तिच्या पोटात जरा धस्स झाले व वाटले की वडिलांच्या घरी काही तरी चिंता करण्यासारखे आहे की काय? म्हणून **(क) पुसे 'कुशल अमचे पितृवासी?'** नैहर = पित्याचे घर व मायका, मइका, मैका = मातृगृह, माहेर, (दो. १६) हिंदी पहा) कैकयीने कुबडीशी बोलतानासुद्धा 'नैहर' शब्दच वापरला आहे. (२१।१ पहा) याचे कारण, कैकयीला माहेर नाही. कैकईच्या मातेचा स्वभाव हिच्यासारखाच होता; म्हणून अश्वपति राजाने कैकयीच्या मातेचा त्याग करून तिला घरातून हाकलून लावली. 'मातरं ते निरस्याशु विजहार कुबेरवत्' (वा.रा. २।३५।२५) सुमंत्राने तिच्या त्यागाची सर्व कथा सांगून कैकयीस सांगितले आहे की तू पण आपल्या मातेसारखीच आहेस. **(ख) अमचे पितृवासी** = आमच्या पित्याच्या घरी असे कैकयी आपल्या आवडत्या सुताला, जो आजोळाहून नुकताच पुष्कळ वर्षांनी आला, त्याला सांगत आहे. तिला वाटत आहे की मी कोणी तरी फार मोठी आहे. मी मोठा पुरुषार्थ गाजवला व या रंकाला साम्राज्याचा अधिपति करून टाकला आहे. भाव हा की **कैकयीला पराकाष्ठेचा सत्तामद झाला आहे.** व भरताने वा.रा. (७०।१०) म्हटल्याप्रमाणे ती **'प्राज्ञमानिनी' स्वतःस फार शहाणी समजणारी आहे. हे येथे दाखविले.**

**चौ. ७. (१) क्षेम कुशल निजकुलास पुसले** - प्राप्तस्य रक्षणं क्षेम. जे मिळालेले असेल त्याचे संरक्षण म्हणजे क्षेम. मानमरातब, कीर्ति, प्रताप, ऐश्वर्य, धन इत्यादि जें पूर्वी होते ते तसेच आहे ना कैकयीने नुसते कुशल विचारले; पण भरताला संशय आला आहे की काहीतरी फार मोठी हानी आपल्या कुळाची झाली असावी; म्हणून त्याने नुसते कुशल (खुशाली) न विचारता क्षेम ही विचारले.

**चौ. ८- (१) कुठे तात वद, माता.... लक्ष्मणहिं** - दशरथ पूर्वपद्धतीप्रमाणे कैकयीच्या महालात भेटतील या आशेनेच भरत तिच्या बरोबर येथे आले. त्यांच्याविषयीच मुख्य चिंता भरतास लागली आहे; पण येथील परिस्थिती अशी विचित्र! भरत आल्याचे ऐकून कौसल्यादि माता धावत यावयाच्या व रामलक्ष्मणही यावयाचेच पण कोणी एकजण सुद्धा नाही! त्यामुळे संशय बळावला व अधीर होऊन ही प्रश्नमालिका विचारली -

***हिं. दो.***   ***। सुनि सुत बचन सनेहमय कपट नीर भरि नैन ॥***
***॥ भरत श्रवन मन सूल सम पापिनि बोली बैन ॥१५९॥***

*हिं. । तात बात मैं सकल सँवारी । भै मंथरा सहाय बिचारी ॥२॥*
*। कछुक काज बिधि बीच बिगारेउ । भूपति सुरपति पुर पग धारेउ ॥२॥*
*म.दो. । श्रवुनी प्रेमळ सुतवचन नेत्रिं कपट- जल आणि ॥*
*॥ भरत-कर्ण-मन-शूल सम वदे पापिणी वाणि ॥१५९॥*
*म. । तात! गोष्ट मी सकल जुळवली। साह्य मंथरा बिचारि बनली ॥१॥*
*। कार्य बिघडवी मधें विधि जरा । गेले भूपति सुरपति नगरा ॥२॥*

**अर्थ** - सुताचे प्रेमळ वचन ऐकून तिने नेत्रांत कपटजल (नक्राश्रू) आणले व ती पापीण भरताच्या कानांना व मनाला शूलाप्रमाणे वाटणारी वाणी बोलली ॥१५९॥ तात! मी सगळीऽऽ गोष्ट जमवून आणली व बिचारी मंथरा मला साह्य झाली. ॥१॥ पण दैवाने मधें जरासा बिघाड केला (इतकेच) (तो हा कीं) भूपती इंद्राच्या नगरीला गेले.॥२॥

**टीका - दो.- (१) श्रवुनी प्रेमळ सुतवचन** - ज्या व्यक्तींबद्दल स्वतःप्रमाणे सुताने अगदी निर्दय असणे जरूर आहे त्यांच्या बद्दल त्याचे अत्यंत प्रेम पाहून तिला थोडासा चरका तर बसलाच व त्याने तिचा मद थोडा उतरला आहे हे पुढील चौपाईत ती स्वतःबद्दल एकवचन वापरते त्यावरून ठरते; पण आपला दुष्टपणा सुताला कळू नये म्हणून क्षेम कुशल सांगण्यापूर्वी, मनांत जरासुद्धां दुःखशोक नसतां, आळेबळें-कपटाने अश्रू आणले. वृद्ध राजा मेला म्हणून काय बिघडले! उलट एक शत्रू, एक कपटी, कमी झाला असे तिला वाटत आहे. **'राम साधु तुम्हीं साधु शहाणे । रामजननि साध्वी मी जाणे'** (३३।७ टी.प.) असे ती दशरथांस म्हणाली आहे. दशरथादि सर्व मंडळी तिला शत्रुवत् वाटत आहेत. भरताला राज्य मिळवून देण्यात मदत करणारी प्रत्येक गोष्ट तिची छाती शीतल करणारी आहे. पण खायचे दात इतक्यात दाखविता येत नाहीत म्हणून नक्राश्रू आणले. (२२।५-६ पहा) **(क) भरत कर्णमनशूल सम वाणि वदे** - भरताला कुशल सांगण्यासाठी जे बोलणार आहे त्याने भरताच्या कानांत व छातीत शूल = त्रिशूळ मारल्यासारखे घाव होणार आहेत; पण ती पापीण असल्यामुळे तिला अजून असे वाटत नाही की आपण जे बोलणार ते भरताला असे दुःखद वाटेल.

**चौ. १-२ (१) तात गोष्ट मी सकल जुळवली-** भाव हा की तुझे सर्व प्रकारे कुशल व्हावे, तुला बंदिवासात कुजत पडण्यास लागू नये, दासी बनण्याची पाळी माझ्यावर येऊ नये, तुझे सर्व प्रकारचे सुख, ऐश्वर्य, आराम, मान, प्रतिष्ठा इ.

वाढावे व तुझ्या सुखाच्या आड कोणी येण्याची शक्यता राहू नये म्हणून मी स्वतः एकटीने सर्व जुळवाजुळव केली. प्राज्ञमानिनी (वा.रा.) विशेषण किती अन्वर्थक आहे ! (क) **साह्य मंथरा बिचारी बनली-** बिचारी म्हणण्यात भाव हा की जिचा तुम्ही सर्वजण तिरस्कार करीत होतात, जी वाईट, लबाड म्हणून ठरविली गेली होती त्या माझ्या वडिलांच्या घरच्या, दासीने फक्त साह्य केले. बाकी सगळ्यांनी तुझा व माझा काटा काढण्याचा घाट घातला होता. भाव हा की मी व मंथरा या शिवाय तुझे कल्याण करणारे कोणी नव्हते व नाही; असे असून तू सगळ्यांचे क्षेमकुशल विचारतोस ! (ख) **ल. ठे.** जी गोष्ट सांगण्यासाठी डोळ्यात नक्राश्रू आणले व शोकाचे नाटक केले ती गोष्ट बाजूसच राहिली व जे मनात दृढ झाले होते तेच प्रथम बाहेर पडले. "अंतरीचे धावे स्वभावे बाहेरी" असेच घडले.

(२) **कार्य बिघडवी मधे विधि जरा-** 'चांगले केले ते मी व बिघडले, वाईट झालेले दैवाने' ही सर्वसामान्य माणसांची भावना येथे स्पष्ट दिसते. यांतील **मधें** आणि **जरा** या शब्दांनी त्या नक्राश्रूंना पुसून टाकले आहेत. (क) **मधें बिघडवी** - कार्य पूर्ण सफल होण्यापूर्वी बिघाड केला इतकेच वाईट झाले. भाव हा की हीच गोष्ट कार्यपूर्ण सफल झाल्यावर घडली असती तर काही बिघडले नसते. भरताला राज्याभिषेक झाल्यानंतर नवरा मेला असता तर मुळीच बिघडले नसते. तसे काही फार बिघडले नाही; दिरंगाईने साधणार ! (ख) **जरा बिघडवी** - फार बिघाड नाही झाला; उगाच थोडेसे बिघडले. नवरा मेला, भरत पितृहीन झाला ही हानी कैकयीला अगदी क्षूद्र वाटत आहे. मनांत ही हानी वाटतच नाही; पण शब्दानीसुद्धा अगदी क्षुद्र वाटते; याचे कारण राज्यलोभ व सवति मत्सर ! मत्सर हा वैष्णव ज्वर आला आहे; लोभरूपी अपार कफ झाला आहे. व सूडाची कामना हा वात त्या ज्वरात झाला आहे. **'दोन्ही ज्वर मत्सर अविवेक'** (७।१२१।३७) हे वैष्णव व शैवज्वर हिला झालेच आहेत. **'काम वात, कफ लोभ अमित तो'** (७।१२१।३०) आता थोड्याच वेळांत भरतासारखा राजवैद्य मस्तकावर व कानशिलावर तप्त झालेल्या डागण्यांनी जेव्हा चर्‌चर्‌ डाग देईल **तेव्हा हा वात, कफ व दोन्ही ज्वर एकदम उतरवील** ! (३) **गेले भूपति सुरपति नगरा** - दुर्गतीला नाही गेले काही. येथें भूपति होते व अयोध्या नगरांतले भोग भोगीत होते; आता तर अर्धे स्वर्गपति झाले; इंद्राच्या अर्ध्या सिंहासनावर बसणार व स्वर्गभोग भोगणार ! राजाचं काय वाईट झालं. पिकलं पान झालं होतं.

अगदी कष्ट न पडता गळून पडलं. बरं भूपति पूर्वी सुद्धा सुरपतिनगरास जात असतच. त्यावेळी मनुष्य देहाने जात असत, तर आतां दिव्य देहाने गेले. त्यांचं काहीच बिघडलं, वाईट झालं नाही; फक्त मी जुळवलेले कार्य थोडं बिघडलं इतकेच ! तिला अजून वाटत आहे की आपला सुत आपल्या सारखाच आहे.

**हिं.** ***। सुनत भरतु भए बिबस बिषादा । जनु सहमेउ करि केहरि नादा ॥३॥***
***। तात तात हा तात पुकारी । परे भूमितल ब्याकुल भारी ॥४॥***
***। चलत न देखन पायउँ तोही । तात न रामहि सौंपेहु मोही ॥५॥***
***। बहुरि धीर धरि उठे सँभारी । कहु पितु मरन हेतु महतारी ॥६॥***
***। सुनि सुत बचन कहति कैकेई । मरमु पाँछि जनु माहुर देई ॥७॥***
***। आदिहु तें सब आपनि करनी । कुटिल कठोर मुदित मन बरनी ॥८॥***

**म.** ***। भरत ऐकतां विवश विषादा । सभय करी जणुं केसरि-नादा ॥३॥***
***। तात तात हा! तात पुकारी । पतित भूतळीं व्याकुळ भारी ॥४॥***
***। जातां पाहु न शकलो तुजला । सोंपविला रामासि न मजला ॥५॥***
***। धीर धरुनि सावरुनी उठले । पितृमृतिहेतु माई! वद वदले ॥६॥***
***। सुत वच ऐकुनि कैकयि कथिते । चिरुनि मर्म जणु विष घालिते ॥७॥***
***। अथ पासुनि इति अपली करणी । कुटिल कठोर-मुदित-मन वर्णी ॥८॥***

अर्थ- (भूपति सुरपति नगरा गेले) हे ऐकतांच भरत विषादाला इतके विवश झाले की, जणू सिंहाची गर्जना ऐकून हत्तीच घाबरून गेला.॥३॥ तात ! तात ! हा तात ! असे पुकारले व भरत फारच व्याकुळ होऊन जमिनीवर पडले.॥४। बाबा ! तूं (स्वर्गास) जाताना मी तुला पाहू शकलो नाही; की मला रामचंद्रांच्या हाती सोपविला नाही ॥५॥ (मग) धीर धरून सावरून उठले व म्हणाले की माई ! बाबांच्या मरणाचं कारण (तरी) सांग ॥६॥ सुताचे म्हणणे ऐकून कैकयी सांगते म्हणजे जणू क्षत चिरून त्यात विषच भरत आहे.॥७॥ कुटिल कठोर कैकयीने अथपासून इति पर्यंत आपली कुटिल कठोर करणी मुदितमनाने (आनंदित होऊन) सांगितली.॥८॥

**टीका. चौ. ३-४-(१) भरत विवश विषादा-** विषादाला आधींच वश झाले होते पण पित्याच्या मरणाची बातमी कानी पडतांच विशेषच शोकाकूल, दुःखी झाले. **(क) सभय करी जणु केसरी नादा, ऐकतां-** दो ३९ मध्ये कैकयीला सिंहिणीची उपमा दिली असून दशरथ राजांस वृद्ध गजराज म्हटले आहे; व तिला बघताच

घाबरून जमिनीवर पडले असल्यासारखे रघुवंशमणीस दिसले. येथे कैकयीच्या शब्दांना सिंहाची गर्जना म्हटले. दशरथ तिचे उग्ररूप बघून घाबरले; येथे कैकयी उग्र दिसत नसून तिच्या शब्दांनी भरतरूपी करी = हत्ती घाबरून धाडकन जमिनीवर पडला!

**चौ. ५-६ (१) जाता पाहुं न शकलो तुजला-** भाव हा की तुझ्या गमनापूर्वी मी येथे येऊ शकलो नाही, व तूही मला बोलावू शकला नाहीस. सार हे की मरण एकाएकी अनपेक्षित कारणाने आले असले पाहिजे असे मला वाटते; नाहीतर तू मला बोलावल्याशिवाय राहिला नसतास. **(क) सोपविला रामासि न मजला-** 'पिताहि भवति ज्येष्ठो धर्ममार्यस्य जानतः' पितृधर्म जाणणाऱ्यास वडील भाऊ पित्यासमान असतो. मला तुझ्या मागे रामाशिवाय कोणाचा आधार नाही. मला रामाच्या पदरात घालून गेला असतास तर मी पितृहीन झालो नसतो. (वा.रा. ७२।३२-३३ पहा) अशी रामाची आठवण व रामनामामृत ग्रहण होताच धीर आला. **(ख) पितुमृतिहेतु माई ! वद-मृति** = मरण. काही तरी अकस्मात व असामान्य कारण घडले असावे अशी शंका आलीच आहे; आणि वडील मेल्यानंतर भरत आले असता राम त्यांचे सात्वन करण्यास आले नाहीत यावरून व कैकयीच्या मोघम बोलण्यामुळे भरताने जाणले की कुठे तरी पाणी खोल मुरत आहे म्हणून मरणाचे कारण विचारले. **(ग)** हिंदीतील **महतारी** हें संबोधन तिरस्कार, हीनता दर्शक आहे असे वाटेल पण तसे नाही. रामचंद्रानी स्वतः महतारी शब्दाने आपल्या मातेचा उल्लेख केला आहे (२९०।४) व कैकयीला महतारी ! म्हणून संबोधिले आहे; व (४२।६) व सुनयना राणीने 'राममहतारी' असे म्हटले आहे. (२६५।२)।

**चौ. ७-८-(१) सुतवच ऐकुनि --- विष घालिते.** येथेंही सुत शब्दच आहे. पितृनिधन वार्तेने आधींच भरताच्या हृदयाला मोठी जखम झाली असता आनंदाने रामवनवासाची हकीगत सांगणे म्हणजे जखमेवर फासण्या मारून (चिरून) त्यांत विष भरण्यासारखे आहे. हे मात्र भरताला असह्य झाले. हे करण्यात कैकयीचा हा हेतू आहे की राज्य मिळण्याचे निश्चित झाले आहे हे कळले म्हणजे भरत सर्व शोक विषाद विसरून माझ्या सारखाच प्रसन्न होईल. जखमेवर, गळवावर वगैरे, फासण्या मारल्या म्हणजे नासके रक्त निघून जाते व विषारी वाटणाऱ्या औषधाने जखमेतील जीव जंतू मरून जातात व जखम लवकर बरी होते त्याप्रमाणेच पितृनिधनवार्तेने झालेली जखम भरून काढण्यासाठी तिने सर्व हकीगत

सांगितली. या उपायाने जखम भरून न येतां ती अशी चिघळली की या वैदू-वैद्यिणीचे तोंड पुन्हा पाहू नये असे भरताने ठरविले. या भरलेल्या विषाने येणाऱ्या तिडका मस्तकापर्यंत गेल्या; व त्या संतापाच्या भरांत या वैदू वैद्यिणीला अशी दक्षणा (फी) देणार आहेत की पुन्हा सगळ्या जन्मात मान वर करून कोणाच्या तोंडाकडे बघण्याची आवश्यकताच उरणार नाही!

(२) **अथपासुनि...बर्णी** - रामराज्याभिषेकाची तयारी कशी गुप्त ठेवली गेली; त्यांत हेतु काय होता, भरताला कां बोलावला नाही, कुबडीने कशी सावध केली; कोप भवनांत कशी गेली; वर कसे मागितले, राम वनवास, १४ वर्षे, व मुनिव्रत वेष, आहार या गोष्टी का मागितल्या वगैरे जें जे केले ते सर्व अगदी निर्लज्जपणे, निर्भयपणे, निर्दयपणाने व अभिमानाने सांगितले. त्यांत लपवालपव, कुटीलपणा, इतकाच केला की आपला दुष्टपणा, कपट, कुटीलपण वगैरे प्रगट करणाऱ्या गोष्टी तेवढ्या सफाईने गाळल्या व शेवटी सांगितले की तुझ्यावर व माझ्यावर येणारी, आमरण टिकणारी, दारुण विपत्ती मी कुबडीच्या साह्याने अर्ध्यारात्रीत दूर केली; व निष्कंटक केलेले राज्य तुला मिळवून दिले आहे; तेव्हा यांत शोक करण्यासारखे काय आहे ? उलट जन्माचे कल्याण झाले - केले आहे तुझे. असेच तुलाही आता वाटेल.

***हिं. दो.*** ***। भरतहि बिसरेउ पितु मरन सुनत रामबन गौनु॥***
***॥ हेतु अपनपउ जानि जियँ थकित रहे धरि मौनु॥१६०॥***

***म.दो.*** ***। भरता विसरे पितुमरण श्रवत राम-वनवास॥***
***॥ जाणुनि आपण हेतु हृदिं स्तब्ध धरुनि मौनास॥१६०॥***

**अर्थ** - रामचंद्रांच्या वनवासाची वार्ता ऐकतांच (श्रवत) पित्याचे मरण भरतास विसरले. आपणच कारण आहोत हे जाणून भरत मौन धरून स्तब्ध राहिले. ॥दो. १६०॥

**टीका.** (१) भरत पितृमरण विसरला असे न म्हणता, **पितृमरण भरतास विसरले** असे म्हणण्यात भाव हा की रामवनवासवार्ता हृदयांत शिरतांच तिने पितृमरण स्मृतीला तेथून हद्दपार करून टाकली. तिचा मागमूसही उरला नाही. पितृमरणाचा शोक किंवा आठवण पुन्हा होणार नाही अशी स्थिती झाली. **(क) जाणुनि आपण हेतु** - माझ्या निमित्ताने, मी या जननीचा पुत्र झालो म्हणूनच रामास वनात जावे लागले. या विचाराने तर फारच दुःख झाले. पितृमरण

श्रवणाने फार व्याकुळ झाले होते तरी बोलण्याची शक्ती होती. आता तीसुद्धा नष्ट झाली; व शरीर स्तंभित झाले. म्हणजेच बेशुद्ध होऊन पडले. एवढे झाले तरी ती प्रयत्न सोडील असे कसे घडेल? ती काय करते पहा

*हिं.* *। बिकल बिलोकि सुतहि समुझावति । मनहुँ जरे पर लोन लगावति ॥१॥*
*। तात राउ नहिं सोचै जोगू । बिढइ सुकृतं जसु कीन्हेउ भोगू ॥२॥*
*। जीवत सकल जनम फल पाए । अंत अमरपति सदन सिधाए ॥३॥*
*। अस अनुमानि सोच परिहरहू । सहित समाज राजपुर करहू ॥४॥*

*म.* *। पाहुनि विकल सुता समजावी । क्षतावरी क्षारा जणुं लावी ॥१॥*
*। शोचनीय नहिं नृपति तात हे! । भुक्त भोग, यश-सुकृत-संग्रहें ॥२॥*
*। जगतां सकल जन्म-फल पावति । अंति अमरपति सदना गाठति ॥३॥*
*। अशा विचारें शोक सोडणे । सह समाज पुर-राज्य भोगणें ॥४॥*

**अर्थ** - सुत व्याकुळ झाला आहे असे पाहून कैकयी त्याची समजूत घालीत आहे. म्हणजे जणूं क्षतात क्षार (मीठ)च घालीत आहे. (दु:खावर डागण्या देत आहे) ॥१॥ तात! राजांच्या बद्दल शोक करणे योग्य नाही; कारण की राजांनी सुकृताचा व यशाचा संग्रह केला आणि भोगही भोगले ॥२॥ जिवंत असता जन्माचे सर्व फळ त्यास मिळाले व शेवटी सुरपतीच्या आमरपतीच्या सदनास गेले॥३॥ असा विचार कर व हा शोक सोड.. व सर्व राजसमाजासह (मंत्री, कोष, सेना, राजधानी इ.) अयोध्येच्या राज्याचा उपभोग घे.॥४॥

**टीका - वि.ल. ठे.** भरत राजद्वाराशी आल्यापासून कैकयीच्या व्यवहारात चार वर्षानंतर पुत्र भेटला असताही 'तात'! या संबोधनाशिवाय **पुत्रवात्सल्याचा ओलावा लेश मात्र तरि कुठे आहे का याचा विचार करावा!** व भरताच्या वागणुकीत कुठे मातृप्रेम दिसले असल्यास दाखवावे. दशरथमरण सांगतांना तुझे वडील, ते इ. काही न म्हणता 'भूपति' म्हणाली; येथे सुद्धा 'राउ', 'नृपति' म्हणाली. यावरून स्पष्ट दिसते की **दशरथ आपला पती ही भावना व पुत्रवात्सल्य यांचा मागमूसही तिच्या ह्रदयात राहिलेला नाही.** याच्या अगदी उलट स्थिति कौसल्या-भरत भेटीत दिसेल. कैकईच्या ह्रदयांत राज्य, सत्ता व सवतीमत्सर यांशिवाय कोणत्याही कोमल भावनांना थारा नाही. दशरथ कैकयी संवादांत दशरथांनी वर देण्याची प्रतिज्ञा केल्यानंतर कैकयीच्या ह्रदयाची, कृतीची व उक्तीची जी तऱ्हा होती तीच अद्याप कायम आहे. एखादा निर्दय, ह्रदयशून्य, सत्तालोलुप

**भूपतिकार** (kingmaker) स्वयंप्रशासक आपल्या हातांतले बाहुले राजसिंहासनावर बसविण्यासाठी, सत्तारूढ करण्यासाठी, जसा वागेल, बोलेल, विचार करील, तशीच किंवा त्याहून कठोर कैकयीची वृत्ती आहे.

**चौ. २. (१) शोचनीय नहिं नृपति तात हे !** - जणूं एखादा जीवन्मुक्त अन्तर्बाह्य विरागी महर्षीच शिष्याला उपदेश देत आहे! पण ते सुद्धा नुसते 'नृपति' न म्हणतां 'तुझा पिता' म्हणाले असते. **'शोचनीय नहिं कोसलराव हि। भुवनिं चतुर्दश प्रगट प्रभावहि। झाला ना, होणे ना, नाही। भूप, भरत! सम तव जनकाही'** (१७३।५-६) असे वसिष्ठ महर्षि म्हणाले. त्यांनासुद्धा 'तवजनक' हे शब्द वापरल्याशिवाय राहवले नाही; व त्यांनी सुद्धा जे सांगितले ते दशरथांची क्रिया उरकल्यानंतर काही दिवसांनी, व भरतास आपल्या अगदी जवळप्रेमाने बसवून! (क) येथील कैकयीची वचने **'कुमुखिं दिसति शुभ वचनें कैसीं। मगधिं गयादिक तीर्थे जैसीं'** (४३।७) या वचनाची सत्यता पुन्हा दाखवीत आहेत. **(ख)** हे समजाऊन सांगताना कैकयी मानीत आहे (निदान दाखवीत आहे) की भरताला पुन्हा जे दुःख झाले आहे ते राजाच्या मरणामुळे आहे. रामवनवासाने कैकयीच्या सुतास दुःख शोक करण्याचे मुळीच कारण नाही आणि म्हणूनच जखमेत मीठ घालण्यासारखे हे बोलणे भरताला असह्य होत आहे.

**चौ. ४ - (१) सह समाज पुर-राज्य भोगणे** - भाव हा आहे की एवढे थोरले सर्वैश्वर्यसंपन्न राज्य मी तुला आयते मिळवून दिले. राज्याच्या सर्व अंगोपांगांनी परिपूर्ण असे राज्य विनाश्रम पदरांत पडलेले असता तू असा वेड्यासारखा शोक काय करीत बसलास? ही शोकाची वेळ आहे की परम हर्षाची? ऊठ लवकर आणि स्वतःस राज्याभिषेक करून घे कारण की दिरंगाई केल्यास अकल्पित विघ्ने येण्याची भीती असते हे तू जाणतोसच, 'कैकेयी पुनरप्याह वत्स शोकेन किं तव' (अ.रा. २।७।७८). "राज्ये महति संप्राप्ते दुःखस्यवसरः कुतः ।। त्वत्कृते हि मया सर्वम् इदमेषं विधं कृताम्।। मा शोकं मा च संतापं धैर्यमाश्रय पुत्रक ।। त्वदधीना हि नगरी राज्यं चैतदनामयम्' (वा.रा. ७२) यांचे सार वर आलेच आहे. रामलक्ष्मण सीता यांच्या नावांचा उच्चार सुद्धा तिने केला नाही. वरील सर्व गोष्टी भरताच्या पूर्णपणे लक्षात आल्या आहेत हे पुढील भाषणावरून स्पष्ट दिसते.

***हिं.*** *। सुनि सुठि सहमेउ राजकुमारू । पाकें छत जनु लाग अँगारू ॥५॥*
*। धीरज धरि भरि लेहिं उसासा । पापिनि सबहि भाँति कुल नासा ॥६॥*

*। जौं पै कुरुचि रही अति तोही । जनमत काहे न मारे मोही ॥७॥*
*। पेड काटि तैं पालउ सींचा । मीन जिअन निति बारि उलीचा ॥८॥*
म. *। राजकुमार सभय अति ऐकत । पिकलेल्या क्षतिं इंगळ लागत ॥५॥*
*। सोडि उसासे हृदयिं धीर धरि । पापिणि कृत कुलनाश सर्वपरिं ॥६॥*
*। होति दुष्ट अशि तुज इच्छा जर । का मज जन्मता न वधला तर ॥७॥*
*। तरु तोडुनि शाखेस शिंपिलें । मीन जगविण्या नीर उसपलें ॥८॥*

**अर्थ** - (कैकयीचे भाषण) ऐकतांच राजकुमार असा अतिशय घाबरा झाला की जणू पिकलेल्या जखमेवर निखारेच ठेवले गेले ॥५॥ उसासे टाकीत धीर धरुन म्हणाला की पापिणी! तू सर्वतोपरीं कुळाचा विध्वंस केलास॥६॥ तुला जर अशी दुष्ट वासना होती तर मी जन्मतांच मला ठार का नाही मारलास ? ॥७॥ तू वृक्ष तोडून शाखेला पाणी शिंपलेस (घातलेस) व माशाला जगविण्यासाठी पाणी उसपून टाकलेस ॥८॥

**टीका- चौ. ५ (१) राजकुमार सभय अति - राजकुमार** या एकाशब्दाने किती तरी भाव सुचविले आहेत. 'राजपुत्र'सुद्धा म्हटले नाही. भरतास वाटत आहे की (१) ज्या पुत्राच्या निमित्ताने राजाला मरण आले तो मी राजपुत्र म्हणवून घेण्यास लायक नाही. (२) मी राजकुमार झालो नसतो व राजकुळांतच इतर कोणाचा पुत्र झालो असतो तर राजांचे मरण, रामवनवास व प्रजेला दुःख इ. सर्व अनर्थ टळले असते. (३) राजकुमार झाल्यामुळे राज्याचा स्वीकार करावा तर ते स्वतःस अशक्य; व स्वीकार न करावा तर राजाज्ञा, पित्याची आज्ञा यांचा भंग, हा दोष घडतो. अशा धर्म संकटांत पडलो आहे. राज्य स्वीकारले तर कलंक व न स्वीकारले तर पाप! राजकुमार नसतो तर हे असे पेच का पडले असते? काय करावे हे ठरविणे अशक्य! अशा अनेक विचारांनी अति सभय झाले. केसरिनाद कानी पडल्यावर सभय झाले होते. (१६०।३) आतां अत्यंत भयभीत झाले. वा.रा. २।७४ मध्ये अशाच विचारांनी किंकर्तव्यमूढ बनल्याने भयभीत झाल्याचे वर्णन आहे. यशाला कलंक लागणार व रामद्रोही ठरणार हीच फार मोठी भीती पडली.

**चौ. ६.(१) पापिणि! कृत कुलनाश सर्वपरिं- सर्वप्रकारे**, सर्व बाजूंनी पतिनाश, कुळाच्या विमल कीर्तीचा नाश, पूर्वजांच्या सुख-समाधानाचा नाश, राज्याधिकारी निर्दोष ज्येष्ठ पुत्राला राज्य न दिल्याने कुलपरंपरा नाश, सर्व राण्यांच्या सौभाग्याचा

नाश, पुत्रांप्रमाणे प्रिय असलेल्या प्रजेच्या सुखाचा व शान्तीचा नाश, कुळांतील पतिव्रताच्या कीर्तीचा नाश आणि पितृसेवक, पितृसुखकारी कुलपुत्रांच्या कीर्तीचा नाश केलास.

**चौ. ७ - (१) होति दुष्ट अशि तुज इच्छा जर- वधला तर** - माझा मुलगा राजा व्हावा सवतीनी माझे दास्य करावे अशी तुझी इच्छा, वासना होती म्हणून तू मला वाढवून मोठा केलास. म्हणजेच तू केवळ राक्षसी महत्त्वाकांक्षेने माझे पालनपोषण केलेस. वात्सल्याने केले नाहीस. तुझ्यात जर वात्सल्य असते तर माझ्या नावाला निष्कारण काळिमा लावणारा कपटी डाव मला न विचारता तू टाकला नसतास. जन्मतांच मी रामाच्यासारखा आहे असे दिसल्यावर मला ठार मारून टाकला असतास व तुझ्या सारखाच मुलगा सुत व्हावा अशी देवाला प्रार्थना व व्रतादिक केले असतेस तर माझ्या नावाला कलंक न लागतां तुझी राक्षसी महत्त्वाकांक्षा पुरी झाली असती. माझ्यासारख्या रामानुकूल मुलाकडून तुझी ही दुष्ट इच्छा पूर्ण होणे अगदी अशक्य आणि मग मी सुद्धा तुला शत्रू वाटून तुझ्या डोळ्यांत सलणार. शत्रूला तो लहान असताच नामशेष करून टाकणे राजनैतिक कर्तव्यच होते.

**चौ. ८ - (१) तरु तोडुनि शाखेस शिंपिले** - दशरथ राजा हे तरु = वृक्ष व भरतराज्य ही शाखा होय. मुलाला राज्य मिळावे म्हणून स्वतःच्या पतीला व सम्राटाला ठार मारलास व मला पितृहीन केलास वगैरे सर्वनाश केलास. **(क) दुसरा भाव** हा की वृक्ष तोडल्यावर शाखेला पाणी घातले तरी ती जगणे व तिला फुले फळे येणे शक्य नाही. माझ्याकडून तुझ्या या दुष्ट आकांक्षा पुऱ्या होणे शक्य नाही हे तुला तू जननी असून, कसे कळले नाही? **येथें अविवेक दाखविला व हेतु निष्फळ होणार हे सुचविले. पुरवासी लोकांनी पूर्वी असेच म्हटले आहे. 'शाखे बसुनी बुंधा छाटी। सुखीं शोकथाटा बहु थाटी'** (४७।५) ४७ । २-८ यांवरील सविस्तर साधार विवेचन पहावे. दशरथ वृक्ष, भरतराज्य शाखा, रामविरहरूपी तीक्ष्ण कुऱ्हाड, रामवनवास वर हा दांडा, भिल्लीण कैकयी; असे तेथे वर्णन केले आहे. येथे दशरथ राजा तरु, भरतराज्य शाखा, रामवनवास जल, रामविरह झारी, भिल्लीण कैकयी. कितीही पाणी शिंपले घातले तरी तरू तोडल्यावर शाखा जगत नाही तशीच भरत राज्यरूपी शाखा सुकून मरणार. **'राम वियोगे मार न मजला'** (३४।७) असे दशरथांनी विनविले होते. **(ख) मीन**

**जगविण्या नीर उसपले** - येथे भरत मीन मासा, व राम नीर, पाणी. भरताचे राज्य निष्कंटक व्हावे म्हणून रामाला वनवास! पण हा माशाला जगविण्याचा उपाय नसून त्याला मरणापेक्षा मरण असे पंकात, चिखलात जीवन कंठावे लागते व पाणी साफ आटले की मोठा मासाही मरतोच. भाव हा की मला सुख देण्यासाठी तू योजलेला उपाय मला मृत्युपंथाला लावण्याचा उपाय आहे. याने एकदम मरण न येता दुःखी, दीन दुर्दशेत तडफडत मरण येईल. किंवा मरणप्राय मलीन जीवन कंठावे लागेल. म्हणूनच म्हटले की असे हाल हाल करून मारण्यापेक्षा जन्मल्याबरोबर नरडीला नख लावले असतेस तर तुझ्यावर व माझ्यावर हा प्रसंग ओढवला नसता. ५१।६ व १४७।८ यांत सुद्धा राम नीर (जल) अशीच कल्पना आहे. पाणी उसपून टाकल्याने दीन झालेला पीन पाठीन मीन तडफडत जसे आपले मोठे पुच्छ आपटतो व चिखल उडतो तशीच ही व पुढील भरताची वचने आहेत.

*हिं.दो. । हंसबंस दसरथ जनकु राम लखन से भाइ ॥*
*॥ जननी तूँ जननी भई बिधि सन कछु न बसाइ ॥१६१॥*

*म. दो. । हंसवंश दशरथ जनक भाऊ लक्ष्मण राम ॥*
*॥ झालिस जननी जननि तूं स्ववश न जैं विधि वाम ॥१६१॥*

**अर्थ** - सूर्यवंशांत (हंस = सूर्य) माझा जन्म, दशरथ राजा जनक लाभले, राम लक्ष्मणांसारखे भाऊ मिळाले; पण जिच्या उदरांतून जन्म झाला ती जन्मदात्री (जननी) तूं झालीस ! (पण) दैव प्रतिकूल झाले म्हणजे स्वतःच्या अधीन (स्ववश) काही नसते.।।दो. १६१।।

**टीका. - (१) हंस-वंश** - सूर्यवंशासारख्या विश्वविख्यात, तेजस्वी, धर्मशील, धर्मधुरंधर, परोपकारी, प्रतापी वंशांत जन्मास आलो. **हंस** = निर्लोभनृप **'निर्लोभनृप, विष्वर्क परमात्मनि मत्सरे'** (अ. व्या. सु.) भाव हा की निर्लोभ राजांच्या वंशात जन्म. पिता दशरथही अत्यंत निर्लोभ राजे होते; पण तूं त्यांची प्रियतम पत्नी असून तुला राज्यलोभ उत्पन्न झाला हे माझे दुर्दैव व सूर्यवंशाला, हंसवंशाला कलंक ! कुळ, पिता व बंधु या तीन गोष्टी अगदी उत्कृष्ट अनुपम मिळाल्या; पण जन्म देणारी जननी तूं अति नीच ठरलीस; हे माझे दुर्भाग्य ! कोणाच्या पोटी जन्म घ्यायचा ही काही जीवाच्या हातातील गोष्ट नाही. प्रारब्ध पूर्ण अनुकूल असेल तरच सर्व गोष्टी मनासारख्या मिळतात. भाव हा की तुला

माता म्हणण्यास मला लाज वाटते. पशूंच्या जननी जशा जन्म देतात तसाच तू मला जन्म दिलास ! मागून जर मिळणार असेल तर हे मागेन – **रामभक्त माता पिता** वंश बंधु हरि-दास गुरुभक्ति हि सत्संगति तिथे घाल जन्मांस ॥१॥ नको विभव राज्यादि सुख सत्ता विपत्ति मूळ ॥ नामसुधारस नित्य दे निर्दालक भवशूळ ॥ या रामविरोधी कृष्णमुख दावूं नको स्वर्गात ॥ रामभक्ति सत्संगति देउनि ने नर्कात ॥३॥

*हिं.* ***। जब तैं कुमति कुमत जियँ ठयऊ । खंड खंड होइ हृदय न गयऊ ॥१॥***
***। बर मागत मन भइ नहिं पीरा । गरि न जीह मुहँ परेउ न कीरा ॥२॥***
***। भूप प्रतीति तोरि किमि कीन्ही । मरन काल बिधि मति हरि लीन्ही ॥३॥***
***। बिधिहुँ न नारि हृदय गति जानी । सकल कपट अघ अवगुन खानी ॥४॥***
***। सरल सुसील धरम रत राऊ । सो किमि जानै तीय सुभाऊ ॥५॥***

*म.* ***। कुमति ! कुमत हृदिं यदा ठरवलें । खंड खंड कां हृदय न फुटलें ॥१॥***
***। वर मागत मनिं शूळ न उठले । जीभ झडुनि मुखिं किडे न पडले ॥२॥***
***। नृपें प्रतीति तुझी कशि धरिली । मरणकाळिं विधिनें मति हरिली ॥३॥***
***। नारि - हृदय - गति नुमजे विधिही । सकल कपट-अघ-अवगुण-खनि ही ॥४॥***
***। सरल सुशील धर्मरत भूपति । ते केवीं स्त्रीस्वभाव जाणति ॥५॥***

**अर्थ** - गे ! दुर्बुद्धी ! जेव्हा ते दुष्ट मत तू हृदया ठरविलेस तेव्हाच तुझ्या हृदयाचे फुटून तुकडे तुकडे का नाही झाले ? ॥१॥ वर मागताना तुझ्या हृदयात शूळ का उठले नाहीत? व जीभ झडून तोंडात किडे कसे नाही पडले?॥२॥ राजांनी तुझ्यावर विश्वास तरी कसा ठेवला? मरणकाळ आल्याने (विधिने) प्रारब्धाने बुद्धी हरून नेली (हेच खरे) ॥३॥ स्त्री हृदयाची गति (अंत, ठाव) ब्रह्मदेवाला सुद्धा लागत नाही; व ही तर सर्व कपट, पाप व अवगुण (दोष) यांची खाणच ! ॥४॥ आणि भूपति (तर) सरळ हृदयाचे, सुशील व धर्मरत; ते (या) स्त्रीचा स्वभाव कसा जाणू शकणार ! ॥५॥

**टीका** - (१) कैकईने कपटनाटक करून राजाचा विश्वासघात केला व रामवैर साधले इ. सर्व गोष्टी आता भरताच्या चांगल्या ध्यानी आल्या असल्याने व कैकयीच्या कृतीमुळे प्रियतम रामास वनवासाचा त्रास भोगावा लागला व लागणार ही गोष्ट भरताच्या रामप्रेमी हृदयास प्रामुख्याने बोचत आहे. त्याच्या हृदयाची लाहीलाही होत आहे व मन संतप्त झाले आहे. यामुळे त्याच्या मुखांतून

मातेच्या मुखावर तिची अवज्ञा होत आहे. (क) **भरताच्या मुखाने येथे कैकयीची जी निर्भत्सना कटु कठोर शब्दांत केली जात आहे तिच्या पाठीशी लाखो प्रेमळ शुद्ध सात्विक हृदयांच्या तळतळाटांची केंद्रीभूत संकल्पशक्ती आहे.** कैकयीच्या तोंडावर बोलण्यास कोणाला धीर होत नाही; पण **'शिव्या देती सर्वहि कैकइला'** हे वारंवार घडले आहे. लाखो लोकांच्या तळमळणाऱ्या हृदयाच्या प्रबळ संकल्पांची शक्ती या वेळी भरताच्या हृदयात शिरून कैकयीच्या डोळ्यात चांगले झणझणीत अंजन घालीत आहे. सत्तेच्या मदाने निष्पापहृदयी लोकांच्या भावनांस बिनदिक्कत पायांखाली तुडवून दिग्विजयी वीराप्रमाणे बेफाम झालेल्या सत्ताधीशांचा मद उरविण्यास कोणीतरी अशी व्यक्ती निमित्त होते की जिच्याकडून ते कार्य घडेल अशी कोणास कल्पनासुद्धा नसते.

(२) रामावर प्राणापेक्षा अधिक प्रेम असून लोक रामद्रोही म्हणतील व आपली निंदा करतील हे भय भरतास नाही असे नाही; पण ते अगदीच गौण आहे, हे भरताच्या मुखानेच पुढे ऐकू येते. **'या जगिं विना राम सीता ही । कोणी म्हणेना मम मत नाही ॥ सुखे सहिन ऐकेन ही कानी ॥ अंति पंक की जेथे पाणी ॥ भय न मज कि जग म्हणेल खोटा । परलोकाचा नसे दुखोटा ॥ एकच दुःसह दाह मनाला । दुख मजमुळे सितारामांला'** (१८२।३-६) असे उद्‌गार भरताने अनेकवेळा काढले आहेत. भरताची तिळमात्र इच्छा नसतांही, भरतास राज्य मिळावे व निष्कंटक व्हावे या हेतूनेच रामास वनवासास धाडले व त्यांना वनवासाचे कष्ट भोगावे लागत आहेत. म्हणून भरतास वाटत आहे की माझ्या निमित्ताने सीतारामांस वनवास मिळाला. या एका गोष्टीनेच भरताच्या हृदयात वणवा पेटला; त्याला लाखो लोकाच्या संकल्पशक्तीचा समीर साह्य झाला व त्या वणव्याच्या ज्वाळांच्या वाफा भरताच्या मुखांतून शब्दरूपाने बाहेर पडून कैकयीला झालेला सत्तामद व राज्यलोभ यांची राखरांगोळी करून टाकीत आहेत.

**चौ. १-२ - (१) कुमति कुमत हृदिं यदा ठरवले** - एखादे कार्य करण्याच्या आधी ते कसे साधेल याचा निश्चय बुद्धीने प्रथम करावा लागतो; म्हणून प्रथम कैकयीला **कुमति दुर्बुद्धि**-दुष्टबुद्धी म्हटले. ही पदवी तिला पूर्वी अनेकांनी दिली आहे. (कवींनीसुद्धा) बुद्धीने ठरविल्यानंतर ती प्रथम अहंकाराला प्रेरणा देते व अहंकार मनाला प्रेरणा देतो; पण हे अहंकाराचे कार्य अतिसूक्ष्म असल्याने सहसा कळत नाही, म्हणून त्याचा येथे उल्लेख नाही. (क) **मनिं शूळ न उठले** - मनाकडे

हुकूम आला की ते आवश्यकतेनुसार इंद्रियांना प्रेरणा देते, म्हणून येथे बुद्धीनंतर मनाची वर्णी लागली. वर मागण्यांत वाणीचे काम मुख्य आहे व वैखरीचा उपयोग करावयाचा असल्याने जीभ व मुख यांचाही संबंध येतो म्हणून **जीभ** व **मुख** यांचा उल्लेख केला.

**चौ. ३-४ - (१) नृपे प्रतीति तुझी कशी धरिली-** पण वाटले की हिने आपले वाग्जाल कपटाने पुष्कळ पसरले तरी राजानी जर हिच्यावर विश्वास ठेवला नसता तर रामवनवास टळला असता; म्हणून प्रश्न उठला की अनुभवी वृद्ध, राजनीतिनिपुण असून राजाने विश्वास का व कसा ठेवला? उत्तर मिळाले की - **(क) विधिने मति हरिली** - दैवाने बुद्धिभ्रम उत्पन्न केला. **'काळ न दंडे कुणास वधतो। धर्म नि बल मति विचार हरतो'** (६।३७।७) पण दशरथ राजा धर्मभ्रष्ट झाले नसता त्यांची बुद्धी काळाला, कर्माला किंवा विधात्याला कशी भ्रष्ट करता आली? अशी शंका उठून विधात्यास दोष देणे योग्य वाटेना म्हणून म्हटले - **(ख) नारिहृदयगति नुमजे विधिही-** स्त्रीहृदयात चाललेल्या विचारांचे ज्ञान ब्रह्मदेवालासुद्धा होत नाही. **'स्त्रियश्चरित्रं पुरुषस्य भाग्यं देवो न जानाति कुतो मनुष्यः'** खाणीत काय काय आहे हे साधारणपणे भूगर्भशास्त्रज्ञांस समजत असले तरी त्याचीही अनुमाने पुष्कळ वेळा चुकतात, मग जिथे अनेक वस्तूंच्या मिश्रणाची मोठी खाण असेल तेथे वरचाथर हिऱ्यांचा किंवा सोन्याचा लागला तरी एखाद्या कोपऱ्यात सोमलाचे-विषाचे ढीग किंवा काळा कुट्ट कोळसा नाही हे कळणे अशक्य! म्हणून **विधीने राजाची बुद्धी भ्रमविली असे म्हणवत नाही.** मग विश्वास का ठेवला हा प्रश्न उरतोच. **'नखीनांच नदीनांच शृंगिणां शस्त्रधारिणाम्। विश्वासो नैव कर्तव्यः स्त्रीषु राजकुलेषु च'** असा एक पाठ आहे व **'स्त्रीणां प्रेष्यजनस्य च'** असा दुसरा पाठ आहे. एकूण स्त्रियांवर विश्वास ठेवू नये आणि विशेषतः राजकुळांतील स्त्रियांवर तर मुळीच ठेऊ नये हे महाराजांस माहीत असून विश्वास कसा ठेवला? **अविश्वसनीय माणसावर विश्वास टाकला असता जितका घात होतो त्यापेक्षा विश्वासार्ह वाटणाऱ्या माणसावर फाजील विश्वास टाकला असता फार भयंकर कल्पनातीत घात होतो. 'विश्वासाद्भयमुत्पन्नं मूलदपि निकृन्तति'** हे सर्व महाराजांस माहीत असता **'हत नारी विश्वासि'** (२९) असे म्हणण्याची पाळी त्यांच्यावर का आली ?

**चौ. ५ - (१) सरल सुशील - ते केवीं स्त्रीस्वभाव जाणति** - राजाला स्त्रीस्वभावाचे ज्ञान झाले नाही म्हणून त्यांनी विश्वास ठेवला. पण जे ज्ञान

ब्रह्मदेवालासुद्धा होणे दुर्घट ते राजाला झाले नाही यात दोष राजाचा नाही. याप्रमाणे राजाला पण निर्दोषी ठरविला. तेव्हा आता दोषाचे स्वामित्व कैकयीकडेच हे ठरले. तिने कपट करून सरळ, सुशील धर्मनिष्ठ राजाचा हेतुपूर्वक विश्वासघात केला हा निर्णय ठरला. सरळ सुशील व धर्मरत माणसे कितीही चतुर व व्यवहारपटू असली तरी ती कपटी, कुटील, कठोर, कारस्थानी, महत्त्वाकांक्षी विश्वासांतील माणसाकडून केव्हा कशी नेस्तनाबूद केली जातील याचा नेम नाही हे येथे उघड करून दाखविले. दशरथ धर्मरत नसते तर प्रतिज्ञाभंग केला असता व अनर्थ टळला असता. पण हजारो वर्षांच्या जीवनांत मिळविलेले सर्व पुण्य व कीर्ती यांचा विनाश झाला असता.

हिं. *। अस को जीव जंतु जग माहीं । जेहि रघुनाथ प्राणप्रिय नाहीं ॥६॥*
*। भे अति अहित रामु तेउ तोही । को तू अहसि सत्य कहु मोही ॥७॥*
*। जो हसि सो हसि मुहँ मसि लाई । आँखि ओट उठि बैठहि जाई ॥८॥*

दो. *। राम विरोधी हृदय ते प्रगट कीन्ह बिधि मोहि ॥*
*॥ मो समान को पातकी बादि कहउँ कछु तोहि ॥१६२॥*

म. *। जीव जंतु जगिं कोण असा ही । प्राणप्रिय रघुनाथ न ज्याही ॥६॥*
*। तुज ते राम शत्रु अति गमले । कोण सत्य तूं वद मज काळे! ॥७॥*
*। असशिल ती अस मुखिं मसि लाउनि । डोळ्यां आड उठुनि बस जाउनि ॥८॥*

दो. *। राम-विरोधिनि-पोटचा विधि उपजवि मजला हि ॥*
*॥ कोण पातकी मज सम वदु वृथा तुज कांहि ॥१६२॥*

**अर्थ** - जगांत असा जीव जंतु कोण आहे की ज्याला रघुनाथ प्राणप्रिय नाहीत ॥६॥ ते च राम तुला अति शत्रु वाटले (गमले); तेव्हा, काळे! तू आहेस तरी कोण ते मला सत्य सांग. ॥७॥ व जी कोणी असशील ती अस; (मला काय करायचे तुझ्याशी; तुझा माझा संबंध संपला) मात्र आता तोंडाला काजळ (प्रसि) फासून, उठून दृष्टी आड जाऊन बस. (मला तोंड दाखवू नकोस; तुझे काळे तोंड पाहण्याची माझी इच्छा नाही.)॥८॥ विधात्याने रामविरोधिनीच्या पोटी मलाच (एकट्याला) उत्पन्न केला; तेव्हा माझ्यासारखा पातकी कोण असेल!; पण तुला काही बोलणे व्यर्थ आहे. (शेवटी सर्व दोष आपल्यावर घेतला) ॥दो. १६२॥

**टीका. चौ. ६ (१) जीव जंतु** - '**जीवः** स्यात् त्रिदशाचार्ये द्रुमभेदे **शरीरिणि**' (हैमः) जीवः = शरीर असलेला, '**प्राणी** तु चेतनो जन्मी **जन्तु** जन्यु शरीरिणः'

हे सहा शब्द समानार्थक आहेत. पण शरीरी= जीव हा अर्थ वर आला आहे; म्हणून जन्तु = प्राणी, जन्मास आलेला. सार हे की मोठे प्राणी ते जीव व क्षुद्र, प्राणी ते जंतु. **'जीवजंतु जे गगनीं उडती'** असे सुं. कां. (३।१) म्हटलेच आहे; **जीवजंतु म्हणजे प्राणिमात्र. 'हे प्रिय सर्वा जितके प्राणी'** (१।२१६।७) असे विश्वामित्रांनी रामलक्ष्मणांबद्दलच म्हटले आहे. म्हणून बद्ध, मुमुक्षु, साधक म्हणजे जीव व पशुपक्ष्यादि म्हणजे जंतु असा भेद करणे तत्त्वाविरोधी आहे. पशुपक्षी जीवच आहेत व बद्ध आहेत. प्राणिमात्राला रघुनाथ कसे प्रिय आहेत हे चित्रकूट वर्णनांत प्रत्यक्ष दिसले आहे. (१३८।१-२ टी.प.) प्राणिमात्राला रघुनाथ प्राणप्रिय आहेत. असा एकही लहान मोठा प्राणी (जन्तु जीव) नाही की ज्याला रघुनाथ प्राणप्रिय नाहीत. परंतु कैकईला रघुनाथ प्राणप्रिय नाहीतच पण -

**चौ. ७ - (१) तुज ते राम शत्रु अति गमले** - म्हणून ठरले की तू जीवही नाहीस व जंतुही नाहीस. पण पाताळापासून ब्रह्मलोकापर्यंत असणारे सर्व जीवजंतू या सदरात मोडतात. म्हणून तू कोणीतरी असामान्य अज्ञात असे काही तरी असली पाहिजेस ! **अशी खरोखर एकच गोष्ट आहे व ती म्हणजे माया.** मायेला जीवजंतु, प्राणी वगैरे काहीच म्हणतां येत नाही; ती अनिर्वचनीय आहे. मायेचे दैवी, आसुरी, राक्षसी इत्यादी अनेक भेद आहेत. म्हणून विचारले की **(क) कोण सत्य तूं वद** - तूं भरताची माता नाहीस, दशरथांची पत्नी नाहीस, ज्ञात वस्तूंपैकी तू कोणी नाहीस. जे दिसत आहे ते तुझे खरे रूप नाही; म्हणून तू कोण आहेस, ते खरे सांग !

**वि. ल. ठे.** - कैकयीने या क्षणापर्यंत जे काही केले असे वाटते ते खरोखर तिने केलेले नसून सुरमायेने केले आहे. तर्क करतां करतां, न कळत भरत मुख्य रहस्यापर्यंत सहज येऊन पोचले. **'सतां हि संदेह पदेषु वस्तुषु प्रमाणमन्तःकरणप्रवृत्तयः'** हे येथे खरे ठरले. वेष बदलून चोरी करण्यास आलेल्याला 'तू कोण आहेस बोल' असे दरडावताच ती व्यक्ती पळून जाते. त्याप्रमाणे भरताच्या या प्रश्नाने, कैकयीतली सुरमाया पळून गेली. **'सुरमायावश वैरिणिसि सुहृद् प्रतीती मानि' (१६) यावेळी सुरमायेने कैकयीत प्रवेश केला होता. भरतासारख्या संताने प्रश्नरूपी एका मंत्राचा फटकारा मारतांच सुरमाया कैकयीला सोडून पळाली व केवळ कैकयी राहिली.**

**चौ. ८- (१) असशिल ती अस, मुखिं मसि लावूनि .. जाउनि** - हे म्हणण्याच्या

आधींच सुरमायेने पळ काढल्यामुळे तिला आपल्या तोंडास मसि = काजळ फासावे लागले नाही, पण ती कैकयीच्या तोंडास कालिमा लाऊन गेली. येथे **भरताने कैकयीचा त्याग केला हे स्पष्ट दिसते.** (मसि, मसी, मषी हे तिन्ही एकाच अर्थाचे संस्कृत शब्द आहेत.) दशरथांनीही असेच म्हणून कैकयीचा त्याग केला होता.

**दो.** - (१) भरताने पुन्हा विचार केला की ही पापीण व मी महापुण्यवान असा माझ्या म्हणण्याचा अर्थ होतो. परंतु मी जर तसा असतो तर रामविरोधिनी स्त्रीच्या पोटी मला जन्मास घातला नसता; म्हणून **'कोण पातकी मज सम?** माझ्या सारखा कोणी पातकी कैकयीचा पुत्र बनविण्यास सापडला नाही म्हणूनच मला तिच्या पोटी जन्मास घातला. तेव्हा सर्व दोष माझाच आहे. हीच भावना भरताने पुढे स्पष्ट बोलून दाखविली आहे. (२६१) ३-६ सटीक पहा 'मीच कि सकल अनर्थ-मुळाशी' (२६२।३). **भरताने विधि राजा व कैकयी यांच्यावर क्रमशः दोषाचा अध्यारोप करीत क्रमशः त्यांचा अपवाद केला व शेवटी सर्व दोष आपल्यावरच घेतले. 'कोणी कुणा सुख दुःख न दाता। निजकृत कर्म भोग ते भ्राता'** हा लक्ष्मण गीतेतील सिद्धांत चरितार्थ करून दाखविला. आता कुबडीला सुरमायायुक्त करतात तो प्रकार निराळा आहे.

***हिं.*** ***। सुनि सत्रुघुन मातु कुटिलाई। जरहि गात रिस कछु न बसाई॥१॥***
***। तेहि अवसर कुबरी तहँ आई। बसन बिभूषन बिबिध बनाई॥२॥***
***। लखि रिस भरेउ लखन लघु भाई। बरत अनल घृत आहुति पाई॥३॥***
***। हुमगि लात तकि, कूबर मारा। परि मुह भर महि करत पुकारा॥४॥***

***म.*** ***। श्रवुनि शत्रुहा मातृकुटिलता। क्रोधें जळे परी परवशता॥१॥***
***। कुबडी तिथें त्या समयिं ठाकली । विविध विभूषणिं वसनी नटली॥२॥***
***। रुष्ट लक्ष्मणानुज तिज पाहुनि । जळत अनल घृत-आहुति पावुनि ॥३॥***
***। तडकनू कुबडा लाथ लावली। करत पुकार तोंडघशिं पडली॥४॥***

**अर्थ** - (भरताच्या) मातेचा कुटिलपणा ऐकून शत्रुघ्नाचा क्रोधाने जळफळाट झाला आहे. पण पराधीनतेमुळे काही करू शकत नाही.॥१॥ त्याच समयी विशेष प्रकारच्या विविध भूषणांनी व वस्त्रांनी नटलेली कुबडी तेथे आली॥२॥ तिला पाहतांच पेटलेल्या अग्नीत तुपाच्या आहुती पडाव्या त्याप्रमाणे लक्ष्मणाच्या धाकट्या भावास रोष चढला (तो रुष्ट झाला) ॥३॥ (व) त्याने तिच्या कुबडावर ताड्कन लाथ लगावली; त्या बरोबर मोठ्याने ओरडत (पुकार करीत) ती

(जमिनीवर) तोंडघशी पडली ॥४॥

**टीका - चौ १ - (१) श्रवुनि शत्रुहा मातृकुटिलता** - कैकईने आपल्या कुटिल करणीची सांगितलेली हकीगत ऐकून भरतास जसा संताप आला तसाच किंवा त्याहून अधिक क्रोध शत्रुघ्नास (शत्रुहा) आला हे त्याच्या नावाला (शत्रु-घ्न) साजेसेच झाले. भरताने तोंडसुख घेऊन आपला संताप जिरवला तसा आपला जिरवून शत्रूघ्न नावाची चुणुक दाखवावी असे शत्रुघ्नास स्वाभाविकपणे वाटले; **परी परवशता** - आपल्या स्वामीची माता असल्याने काही करता येईना; त्यामुळे क्रोधाची वाफ इंजिनांत कोंडून ठेवावी लागली; ती उसळ्या मारीत आहे तोचः-

**चौ. २ - (१) कुबडी तिथे आली - वा.रा.** कुबडीचे आगमन दशरथांची सर्व क्रिया उरकल्यानंतर म्हणजे भरत आल्यानंतर १४ वे दिवशी झाले आहे. मानसात ती पहिल्याच दिवशी आली. पहिल्याच दिवशी तिने येणे हे अधिक स्वाभाविक व मानसातील तिच्या स्वामिनीच्या कृतीला साजेल असेच झाले. वा. रा. कैकयी आरती घेऊन राजद्वारापर्यंत धावत गेलेली नाही. भरत तेथे गेला तेव्हा मात्र सुवर्णसिंहासनावरून आनंदाने उठली आहे. (क) कुबडी ज्या अर्थी आताच आली त्या अर्थी तिने भरताचे भाषण ऐकले नाही हे ठरले. भरत शत्रुघ्न आल्याचे व प्राणप्रिय राणी आरती घेऊन धावत गेल्याचे कळताच कुबडी नट्टापट्टा करू लागली. **कुरूप माणसाला मोठेपणा मिळाला म्हणजे आपले सौंदर्य खुलवून दाखविण्यासाठी फार सायास करावे लागतात,** 'जातीच्या सुंदरांना काहीही शोभते.' वेणीफणी, ओष्ठ; नख-रंजन, काजळ, कुंकू, सुरमा, फुलांची वेणी, उत्तम राजशाही वस्त्रे, मोठ्या अधिकारी लोकांच्या स्त्रियांनी वापरावयाचे सोळा स्थानातले विशेष शृंगार-दागिने, तांबूल चर्वण इत्यादी सर्व उरकून ती आली. **'जर विधि वांच्छा पुरवि सकाळी। नेत्रपुतळि तुज करीन आली'** (२३।३) असे कैकईने तिला कबूल केलेच होते. त्याप्रमाणे सकाळी राम वनवासास गेल्याने कैकईची वांच्छा पूर्ण झाल्यामुळे लगेच तिला **'नेत्रपुतळी'** बनविली असणारच. त्यामुळे तिला विविध विभूषणे वसने भरपूर मिळालेलीच होती. भरताला राज्य मिळवून दिले. म्हणून त्याच्याकडून बक्षिस मिळविण्याच्या आशेने आलेली आहे. आपल्या मालकिणीची झालेली पाद्यपूजा प्रतिमालकीण बनलेल्या कुबडीने ऐकली असती तर तिने तोंड दाखविलेच नसते; पण **'भूषा रचुनि जर सांगु आपणा। विधि करील आम्हा कि शासना'** (१९।५) या तिच्या म्हणण्याप्रमाणे जन्मभर

आठवण राहील असे शासन केले जाण्याची वेळच आली. (ख) कुबडीच्या या नटूनथटून येण्याने हेही सुचविले की कैकयीसुद्धा अशीच नटलेली आहे; तसे नसते तर या दासीची याप्रमाणे येण्याची छाती नव्हती.

**चौ. ३.४. (१) रुष्ट लक्ष्मणानुज तिज पाहुनि.** प्रथम हे ल.ठे. भरत मामा कडून निघाले व आले त्या सर्व वर्णनात शत्रुघ्नाचा उल्लेख मुळीच नाही हे तेथे टीकेत दाखविले आहे. तेथे शत्रुघ्नाचा उल्लेख आहे. यावरून शत्रुघ्न भरताबरोबरच आले हे ठरले. ही वर्णनाची कला नीट लक्षात ठेवावी म्हणजे पुढे गैरसमज होणार नाहीत. **भरताबरोबर शत्रुघ्न असावयाचेच इतके पक्के ध्यानात ठेवावे.** **(क)** तिला पाहताच **'सास्य मंथरा बिचारी बनली'** या कैकयीच्या भाषणातील वाक्याची आठवण होऊन शत्रुघ्नाने जाणले की मूळ आगलावी सर्व अनर्थाची मुळी ही आहे. त्यामुळे त्याचा क्रोधाग्नी भडकला; परवशतारूपी निरोधन त्या वाफेने उडविले व आता ती वाफ इंजिनाच्या चाकास एकदम गती देणार **(ख) लक्ष्मणानुज** (लखन लघु भाई) लक्ष्मणाचा **(च)** धाकटा भाऊ म्हणण्यात दोन हेतू आहेत. १) शत्रुघ्न हा लक्ष्मणाचा धाकटा भाऊ आहे हे स्पष्ट सांगून भ्रमाला जागा न ठेवणे हा एक हेतू आहे; कारण जन्माच्या वेळचे वर्णन असे अगदी स्पष्ट नाही व 'भरतानुज' शब्दाने संशयास फट निर्माण केली होती; ती येथे बुजवून टाकली व **शत्रुघ्न सुमित्रापुत्र हे जाहीर केले.** २) दुसरा हेतु हा की लक्ष्मणाचाच धाकटा भाऊ ! तसाच तापट ! आपले स्वामी (भरत) रामवनवास दुःखाने अत्यंत व्याकुळ झालेले असता, भानुकुल भानु मावळलेला असता, एका नीच दासीने राणीसारखा वेष वगैरे करून समोर येणे म्हणजे आपल्या स्वामीच्या दुःखावर डागण्या देण्यासारखे, स्वामीचा तिरस्कार, उपहास करण्यासारखे आहे असे वाटले. हे एकनिष्ठ भागवतदासास कसे खपणार ? त्यातही स्वभाव पडला लक्ष्मणासारखा ! लक्ष्मणाच्या धाकट्या भावास शोभेल असेच करणार आता.

**(२) तडकन् कुबडा लाथ लावली- हुमगी =** तडकन, उडी मारून. कुबडावर एक लाथ सहज लगावली. पाठीला कुबड असल्याने मान तोंड नेहमी जमिनीकडेच! त्यामुळे पडली उपडी, तोंडावर; दैवाने घातली धूळ तोंडात. बोंबलत बोंबलत पडली व त्यामुळे दातांच्या कवळ्यांची झाकणे लावलेली नाहीत दशन उघडे; याचा जो परिणाम सहज व्हायचा तोच झाला-

*हिं. । कुबर टूटेउ फूट कपारू। दलित दसन मुख रुधिर प्रचारू ॥५॥*
*। आह दइअ मैं काह नसावा। करत नीक फल अनइस पावा ॥६॥*
*। सुनि रिपुहन लखि नखसिख खोटी । लगे घसीटन धरि धरि झोटी ॥७॥*
*। भरत दयानिधि दीन्हि छडाई। कौसल्या पहिं गे दोउ भाई ॥८॥*
*म. । कुबड भंगले कपाळ फुटले । दशन पडुनि मुख रुधिरा स्रवले ॥५॥*
*। हाय! दैव! मी काय बुडवले । इष्ट करत फळ अनिष्ट मिळले ॥६॥*
*। बघे रिपुघ्न किं खोटि नखशिखां । फरपटवी धर धरुनि तच्छिखा॥७॥*
*। भरत दयानिधि तिला सोडवति । उभय बंधु गत कौसल्येप्रति ॥८॥*

**अर्थ** - तिचे कुबड भंगले, कपाळ फुटले, दशन (दन्त) पडले व तोंडातून रक्त वाहू लागले. ॥५॥ (तेव्हा ती म्हणाली) हाय दैवा! मी याचं काय बुडवलं? याचं चांगलं करायला गेले (केले) त्याचे हे वाईट फळ मिळालं आं! ॥६॥ शत्रुघ्नाने जाणले की ही नखशिखांत खोटी आहे; म्हणून तिच्या शिखा केसांचा झुपका पुनः-पुन्हा धरून वारंवार तिला फरपटत ओढू लागले.॥७॥ दयानिधी भरताने तिला सोडवली व दोघे भाऊ कौसल्येकडे गेले. ॥८॥

**टीका - चौ. ५-६ (१) कपाळ फुटले - 'फोडाया शिर योग्य अभागे'** (१६।२) असे हीच स्वतः विषयी कपटाने म्हणाली होती. तिच्या शब्दांप्रमाणे घडले. **'आता दुजी करुनी वदुं जिभली?'** (१६।१) जिभली दुसरी नाही करावी लागणार पण ज्या दशनांत जीभ दाबून तिने कपटनाटक केले **'कुबडी रसने दशनीं चापत'** (२०।२) आणि जे दशन ती रामाच्या नावाने चावीत होती ते पडल्यामुळे नवे बसवल्याशिवाय नीट बोलता येणार नाही. दशन = चावणारे. रामराज्याभिषेकाची बातमी ऐकतांच द्वेषाने व वैराने जे रक्त उसळले होते व ज्या तोंडाने सर्व कुभांड रचले त्या तोंडातून तेच रक्त आता वाहू लागले. कुबड व कपाळ यांतून पण रक्त निघालेच. **(क)** तिला होती बक्षिसाची, इनाम मिळण्याची मोठी आशा. पण मिळाले हे असले बक्षीस ! त्याबरोबर तिची जीभ पुन्हा लांब झालीच व बडबडली.

**चौ. ७-८- (१) खोटी नखशिखां** - नखशिखांत दुष्ट, लबाड आहे. **'कुबडे काणे पांगळे कुटिल कुचाल चि खास ॥ स्त्री त्यांतहि दासी...'** (१४।-) नुसते कुबड हेच तिच्या दुष्टपणाचे चिन्ह नसून तिच्या नसानसांत दुष्टपणा भरला आहे, म्हणूनच ही अजून काळ्या सापिणीसारखे फुत्कार टाकीत आहे हे शत्रुघ्नांने ओळखले. **'श्वास सोडि काळी जणु सापिण'** (१३।८) तीच ही सापीण जिवंत

असताच जमिनीवरून फर फर ओढली जात आहे. **तच्छिखा** - तिच्या शिखा, केसांच्या बटा, त्या थोड्याशा धराव्या ओढावी फर फरा; तिने डोक्याला हिसडा दिल्याने सुटली की पुन्हा धरावी व ओढावी किंवा थोडी ओढावी व सोडावी तो तिने फुत्कार सोडावा की पुन्हा धरावी व ओढावी असे चालू झाले. (क) **भरत दयानिधी** - भरत रामाचीच दुसरी प्रतिमा; दयेचा सागरच; त्याला आली दया आणि तिचे हाल संपले. **'अत्युग्रपुण्यपापानां इहैव- फलमश्नुते'** अति विशाल पुण्य किंवा अति उग्र पाप याचे फळ येथे याच जन्मात मिळते असे शास्त्र म्हणते त्याचे हे उदाहरण आहे.

बापाच्या मृत्यूनंतर परगावाहून येणारा पुत्र व घरी असलेली माता यांच्या भेटीचा नमुना भरतकैकयी भेटीत मुळीच दिसला नाही. जे जन्मदात्या मातेजवळ लेशमात्र दिसले नाही ते पुत्रवात्सल्य, ते प्रेम, तो शोक व पुत्राचे मातृप्रेम इ. भरतकौसल्या भेटीत सापत्न संबंध असून दिसणार आहे. पुढल्या दोह्यातच अगदी निराळे दृश्य दिसते-

*हिं. दो.* *। मलिन बसन बिबरन बिकल कृस सरीर दुख भार॥*
*॥ कनक कलप बर बेलि बन मानहुँ हनी तुसार ॥१६३॥*
*हिं.* *। भरतहि देखि मातु उठि धाई । मुरुछित अवनि परी झईं आई ॥१॥*
*। देखत भरतु बिकल भए भारी । परे चरन तन दसा बिसारी ॥२॥*
*म.दो.* *। म्लान मलिनवसना बिकल कृश तनु दुःखभारिं॥*
*॥ कनक-कल्पवरलता वनिं जणो शुष्क तुषारिं ॥१६३॥*
*म.* *। माता भरता बघत धावली । घेरि येइ मूर्छित महिं पडली ॥१॥*
*। बघत भरत अतिशय विव्हळला । पडे पायिं तनुभान विसरला ॥२॥*

**अर्थ** - (कौसल्या अशी दिसली-) अगदी म्लान झालेली (निस्तेज, पांढरी फटफटीत), वस्त्रे मलीन झालेली व दुःखाच्या अत्यंत भाराने शरीर कृश झालेली, अशी कौसल्या अशी दिसली की जणू वनात सोन्याची सुंदर कल्पलता तुषाराने (हिमपाताने) सुकून गेली आहे. ॥ दो. १६३॥ (अशी) माता भरताला पाहताच (भेटण्यासाठी) उठून धावली व घेरी येऊन जमिनीवर मूर्छित पडली ॥१॥ तिला पाहताच भरत अत्यंत व्याकुळ झाला, तिच्या पायां पडला व (तोही) देहभान विसरला. ॥२॥

**टीका** - (१) या दोह्याची व चौपायांची **'श्रुनि, येत सुत, कैकयनन्दिनि'**

इत्यादींबरोबर तुलना केल्यास दिसेल की दोन अत्यंत विरोधी शब्दचित्रे उभी केली आहेत. असे वाटते की यमराजाच्या दरबारातून आपण शुद्ध प्रेमाच्या साम्राज्यात एकदम प्रवेश करीत आहोत ! दोघी माताच; पहिली सख्खी आणि ही दुसरी सावत्र. दोघीही उठून धावल्या; एक ऐकून राजद्वारापर्यंत धावली व एक पाहून (आपल्या वाड्यातच) धावली. दोघी धावल्या पण हृदयांतील भाव दक्षिणोत्तर ध्रुवांसारखे ! कैकयीने पुत्राला पाहिल्यावर आरती ओवाळली तर सावत्र पुत्राला पाहून धावताना कौसल्या मूर्छित पडली. कैकयीला, स्वतःच्या जननीला, साधा नमस्कार सुद्धा करण्याची बुद्धी भरतास झाली नाही; पण सावत्र आईला पाहतांच देहभान विसरून तिच्या पायांवर पडला. कैकयी थाटमाट केलेली, प्रफुल्ल, हर्षित मुख, धट्टीकट्टी, अलंकारादिकांनी लादलेली; तर कौसल्या शुष्कमुख, मलीन जाडीभरडी वस्त्रे, शरीर अगदी कृश झालेले व दुःखाच्या डोंगराखाली चिरडलेली ! ही दोन्ही दृश्ये सशब्द चलच्चित्रपटांत कोणी दाखविल्यास अन्तःकरणे पिळवटून निघून उद्‌गार निघतील की धन्य कौसल्या ! जयतु माता कौसल्या ! **धिक् कैकयी अमंगलमूला। धिग् अकिण पुत्रा प्रतिकूला॥** कौसल्या म्हणजे पुत्रवात्सल्यरसाची साकार दैवी मूर्तीच! तर कैकयी म्हणजे राज्यलोभ, राजसत्तामद, निर्दयता, कठोरता, निर्लज्जपणा, कुटिलपणा, दंभकपटमदमान इ. आसुरी, राक्षसी गुण स्त्रीरूपाने आकारास आलेले.' ही तुलना वाचकांनी वाढवावी.

(२) **कनक कल्पवरलता वनिं - तुषारिं - 'नगर सकल वन गव्हर भारी'** (८१।२). भरताला सर्व परिवार दिसला तो **'जणूं वनजवन तुहिने सुकलें'** परिवार कमलवन आहे. दशरथ कल्पतरू होते पण कैकयी किरातिनी **'शाखे बसुनी बुंधा छाटी'** कौसल्या कनक कल्पलता आहे. याने दाखविले की पुरवासी लोकांपेक्षा परिवार कोमल आहे, व परिवारापेक्षा कौसल्या शरीराने व हृदयाने अधिक कोमल आहे. पति निधनाने कैकयीला हर्ष झाला होता व झाला आहे. ती महाविषवल्ली आहे. ज्या कल्पवृक्षाचा तिने आश्रय केला होता त्याला तिने आपल्या विषारीपणाने मारलाच. (क) तुषार = तुहिन = हिम 'तुषारस्तुहिनं हिमम्' (अमरे). पुढील दोन चौपायांचे विवरण कैकयी-कौसल्या तुलनेत आले आहे.

***हिं.*** *। मात तात कहँ देहि देखाई । कहँ सिय राम लखन दोउ भाई ॥३॥*
*। कइकइ कत जनमी जग माझा । जौं जनमि त भइ काहे न बाँझा ॥४॥*
*। कुल कलंकु जेहिं जनमेउ मोही । अपजस भाजन प्रियजन द्रोही ॥५॥*

*। को तिभुवन मोहि सरिस अभागी । गति असि तोरि मातु जेहि लागी ॥६॥*
*। पितु सुरपुर बन रघुबर, केतु । मैं केवल सब अनरथ हेतू ॥७॥*
*। धिग मोहि भयउँ बेनुबन आगी । दुसह दाह दुख दूषन भागी ॥८॥*

म. *। माते! दाखव तात कुठे ते - । बंधु राम लक्ष्मण सह सीते ॥३॥*
*। जगीं जन्मली कइकइ कां ही । जन्मे तरि का वांझ न राही ॥४॥*
*। ती प्रसवे मज स्वकुल-कलंका। अपयश पात्रा प्रिय द्रोहका ॥५॥*
*। त्रिभुवनिं मजसा कोण अभागी । तव गति अशि माते! ज्यालागीं ॥६॥*
*। पिता स्वर्गि, रघुवर वनिं, केतू-। मी केवळ सब अनर्थ-हेतू ॥७॥*
*। धिग् मजला वेणू-वन-दहना । दोष-दुःख-अति दाह-भाजना ॥८॥*

**अर्थ** - माते ! बाबा कुठे आहेत ते दाखव; व सीतेसह दोघेबंधू रामलक्ष्मण कुठे आहेत ते दाखव ॥३॥ कैकयी जगात जन्मालाच का आली ? बरे आली जन्माला तर वांझोटी का नाही झाली? ॥४॥ तिने माझ्यासारख्या स्वकुलाला कलंक लावणाऱ्या, प्रियजनांचा द्रोह करणाऱ्या व अपयशाचे पात्र बनणाऱ्याला जन्म दिला ॥५॥ माते ! तुझी अशी दशा ज्याच्यामुळे झाली, त्या माझ्यासारखा अभागी त्रिभुवनांत कोण आहे ? ॥६॥ पिता स्वर्गात (गेले) रघुवर राम वनात गेले, इत्यादी सर्व अनर्थाचा हेतू केवळ मीच (धूम) केतू आहे. ॥७॥ वेणुवनात अग्नी (दहन) झालेल्या व अतिदोष, दुःखे व अतिदाह यांचे भाजन-स्थान बनलेल्या मला धिक्कार असो.॥८॥

**टीका - चौ. ३ - (१) माते** ! भरत कैकईशी बोलला त्यांत त्याने 'माता' शब्द मुळीच वापरला नाही कारण **'माता स्यान्माननात् च सा'** (स्कं. पु.) मान देण्यास अति योग्य अशी कैकई नाहीच; म्हणून तर भेट झाली (४ वर्षांनी) तेव्हा तिला नमस्कार करण्याची इच्छा झाली नाही किंवा तिच्याकडून निघतानां ही नमस्कार केला नाही व सांगूनसुद्धा निघाला नाही. (क) **दाखव** शब्द दोन्हीकडे घेणे योग्य आहे, याने सुचविले की प्रथम दशरथांच्या मृत देहाचे दर्शन व मग रामलक्ष्मण व सीता यांचे दर्शन झाल्याशिवाय अन्य कशानेही समाधान होणे शक्य नाही. सीतारामलक्ष्मण कोठे आहेत हे कैकयीला विचारले व वनांत गेल्याचे सर्व तिने सांगितलेही; दाखव असे तिला सांगितले नव्हते!

**चौ. ४-५- (१) कइकइ** - हा शब्द भाव गर्भित आहे. तिला माता जननी म्हणावयाचे नाही; व तिचे प्रसिद्ध नाव, ती रामवैरीण बनल्याने, उच्चारावयाचे

नाही; पण अर्थबोध झाला पाहिजे म्हणून 'कइकइ' असा उच्चार केला. ती जन्मालाच आली नसती तर रामवनवास, राजाचे मरण आणि कौसल्येची व प्रजेची दुर्दशा झाली नसती. (क) याच्या पुढली एक पायरी अध्याहृत आहे की जन्माला आली तर आली; पण रघुकुळातली राणी झाली नसती तर सर्व अनर्थ टळले असते. राणी होऊनही वांझ राहिली असती तरीही कोणाचे काही अकल्याण झाले नसते. **(ख) ती प्रसवे मज स्वकुल कलंका - द्रोहका** - तिने मला जन्म न देता दुसऱ्या एखाद्यास दिला असता तर निदान मी कुलकलंकादि ठरलो नसतो. येथून पुन्हा सर्व दोष स्वतःवर घेण्यास सुरुवात केली.

**चौ. ६ (१) 'त्रिभुवनिं मजसा.... गति अशि माते...'** पुत्राने जन्माला येऊन, स्वधर्माने मातेला व पित्याला सुख देऊन सुस्थितीत ठेवणे हे त्याचे कर्तव्य आहे. हे जो करील तो भाग्यवान, पण माझ्यामुळे पित्याला मरण आले आणि माते ! तुझीही अशी दुर्दशा झाली आहे; म्हणून माझ्यासारखा अभागी पुत्र त्रैलोक्यात नाही. **(क) तव गति अशि** - यावरून ठरते की कैकईच्या शरीराची व हृदयाची अशी दशा झालेली भरतास दिसली नाही. साम्राज्यसत्ता हाती आल्याचा परम आनंद होऊन जी तनमनवाणीने उत्साही आहे व जशी अहंकाराने फुगलेली आहे, तशी शरीराने फुगलेली व वस्त्रालंकारानी फुललेली असणारच. तिनेच उत्तम वस्त्रे व विभूषणे घातलेली नसती तर कुबडी तिच्यापुढे नटून येणे शक्य नव्हते. **गति** = दुर्दशा, मागल्या दोह्यात व पुढील चौपाईत वर्णिली आहे.

**चौ. ७ - (१) पिता स्वर्गि रघुवर वनिं, केतू - मी'** हिंदीत रघुवर व केतू हे शब्द जवळ जवळ आल्याने ऐकताना केतूचा संबंध 'रघुवर' शी जोडला जातो; म्हणून मराठीत शब्दक्रम बदलून **'रघुवर व केतू यांचा एकत्र उच्चार केला जाण्याची शक्यता ठेवली नाही.**

**(क)** रघुवर केतू याचा सरळ अर्थ न लागल्याने अर्वाचीनानी रघुकुलकेतू असा अपपाठ केला आहे. (मा. पी. प) भरत सर्व दोष स्वतःवर घेऊन म्हणत आहेत की **'केतू मी'** मी धूमकेतूसारखा जन्मास आलो. माझा जन्म राजा, राण्या, राजपुत्र, प्रजा इत्यादी सर्वांचे अहित करणारा धुमकेतूच्या उदयासारखा ठरला. "दुष्ट उदय **जगदार्तीहेतू।** प्रथित **अधम** जैसा **ग्रह केतू'** (७।१२१।२०) धूमकेतूचा उदय झाला म्हणजे जगावर, राजा, राजपुत्र इत्यादिकांवर काही काळाने आर्ति= संकटे - अनर्थ ओढवतात; उदय झाल्याबरोबर अनर्थ घडत नाहीत.

भरत म्हणतात तसेच माझ्या जन्मानंतर काही काळाने हे अनर्थ ओढवले.

**चौ. ८. (१) वेणूवनदहना-** दहन - अग्नि, अनल, आग. ज्या वेणूच्या, कळकाच्या घर्षणाने अग्नि उत्पन्न होतो, तोसुद्धा जळतोच; म्हणून भरत म्हणतात की मला सुद्धा अतिदुःख व दाह यांचे कोठार (भाजन) बनावे लागले व जे जे दोष लोक देतील ते ते शान्तपणे, न बोलता, साठवून ठेवण्याचे मोठे पात्रही व्हावे लागले. 'कुटिल कठोर कुबुद्धि **अभागिनि। होइ आग रघुवंश बेणुबनिं** (४०।४) असे कैकयीविषयी लोकांनी म्हटले आहे. (तेथे टीकेत विस्तार पहावा) तेच येथे भरत स्वतःविषयी म्हणाले - **"विहिरीत असेल तेच लोट्यात दिसेल"** कैकयीला अनेकांनी दिलेले बहुतेक दोष, जवळजवळ त्याच भाषेत भरतांनी स्वतःवर घेतले आहेत; मात्र लोक काय काय म्हणाले हे त्यांना अजून माहीत नाही. ही तुलना करून दाखविणे **हा एका स्वतंत्र लेखाचा विषय आहे.** वाचकांनी हा उद्योग करण्यासारखा आहे. लेखाचे शीर्षक वर दिले आहेच. 'खाण तशी माती' ही म्हण त्याच अर्थाची असली तरी खाण व माती हे दोन्ही शब्द स्त्रीलिंगी आहेत. कैकयी व भरत यात तसे नाही, म्हणून विहीर कैकयी. लोटा(पोरा) भरत.

***हिं. दो.*** ***। मातु भरत के बचन मृदु सुनि पुनि उठी सँभारि॥***
***। लिए उठाइ लगाइ उर लोचन मोचति बारि ॥१६४॥***

***हिं*** ***। सरल सुभाय मायँ हियँ लाए । अति हित मनहुँ राम फिरि आए ॥१॥***
***। भेंटेउ बहुरि लखन लघु भाई। सोकु सनेहु न हृदयँ समाई ॥२॥***
***। देखि सुभाउ कहत सबु कोई । राम मातु अस काहे न होई ॥३॥***

***म.दो.*** ***भरत वचन मृदु परिसुनी उठे सावरुनि माय ॥***
***। घे उठवुनि हृदयीं तया नेत्रांतुनि जल जाय ॥१६४॥***

***म.*** ***। उजू स्वभाव माय हृदिं घेई - । प्रेमें, राम परत जणुं, येई ॥१॥***
***। मग लक्ष्मण-लघु-बंधुसि भेटत। शोक हृदीं स्नेह हि ना मावत ॥२॥***
***। बघुनि स्वभाव सर्वहि म्हणती । का न असे अशि राममाय ती ॥३॥***

**अर्थ** - भरताचे नम्र (मृदु) भाषण ऐकून माता सावरून उठली व तिने भरताला उठवून पोटाशी धरला आणि तिच्या डोळ्यांतून पाणी वाहू (जाऊ) लागले ॥ दो. १६४॥ सरळ स्वभावाच्या मातेने (भरतास) अशा प्रेमाने कवटाळला की जणू रामच (वनातून) परत आले आहेत. (असे तिला वाटले असावे) ॥१॥ मग राममाता लक्ष्मणाच्या धाकट्या भावाला (कडकडून) भेटली; आणि शोक

व स्नेह तिच्या हृदयात मावेनासे झाले. ।।२।। हा तिचा स्वभाव पाहून सर्वच म्हणू लागतात की राममाताच ती ! ती अशी का बरं असणार नाही? ।।३।।

**टीका - दो. (१) उठे सावरुनि माय** - भरताला पाहतांच उठून धावत येताना पडली होती व भरत (शत्रुघ्न) तिच्या पायांशी पडले होते. भरत आतापर्यंत जे बोलले ते कौसल्येच्या पायाशी पडलेले असताच बोलले. भरत जे बोलत होते ते तिला ऐकू येत होते पण उठून बसण्याची शक्तीच नव्हती; नाहीतर इतकावेळ ती भरत शत्रुघ्नांस पडलेले राहू देती ना. आता आपली व्याकुळता धैर्याने आवरून, सांभाळून उठली कशीतरी.

**चौ. १ - (१) उजू स्वभाव** - उजू = ऋजू, सरळ; सरळ स्वभावाचा मुद्दाम उल्लेख करण्यासारखीच ही वेळ आहे. ज्या सवतीने रामास वनात धाडले, जिने रामाचे राज्य ज्याला देवविले तो त्या सवतीचा मुलगा भेटण्यास आला असता त्याला उठवून घेऊन हृदयाशी कवटाळते आणि डोळ्यांतून जलधारा वाहतात! यापेक्षा परम प्रेमळ व अत्यंत सरळ स्वभावाचा पुरावा तो काय पाहिजे. भरतजननीचे चित्र आपण पाहिलेच आहे. सरळ म्हणण्यास कारण हे - **'राम भरत सुतयुग सम मानी'** (५५।६) असे मनाने मानले होते, तसेच आता प्रत्यक्ष कृतीत दिसले म्हणून सरळ म्हटले. चित्त वाणी आणि क्रिया यात एकरूपता असणे हे सरळ स्वभावाचे वा महात्म्यांचे लक्षण आहे.

'चित्ते वाचि क्रियायां च महतामेकरूपता' कौसल्या भरतास किती प्रेमाने भेटली हे उत्प्रेक्षेने सांगतात. **(क) राम परत जणु येई** - दशरथांचे निधन ऐकून राम परत आले असते व ते मातेला भेटण्यास आले असते तर ती जितक्या प्रेमाने भेटली असती तितक्याच प्रेमाने भेटली भरतास. भेटण्याचा उल्लेख दोह्यांत करून पुन्हा येथे करण्याने सुचविले की वारंवार हृदयाशी धरीत आहे. वनात जाण्याची आज्ञा मागण्यास राम कौसल्येकडे गेल्यावर अशीच वारंवार प्रेमाने भेटली आहे. ५२।२ व ५२।४ पहा. **'राम माय ती स्वभाव सरला'** (५५।७) असे पूर्वी म्हटलेच आहे. **'शोकविवश वदवेना काही । घडि घडि आलिंगिती हृदयाही'** (४४।५) हे असे दशरथांनी रघुनाथास आलिंगन दिले तसेच कौसल्या भरतास देत आहे!

**चौ. २-३ (१) लक्ष्मण लघुबंधु** - म्हणण्यात भाव हा आहे की ज्या भावनेने व प्रेमाने लक्ष्मणास भेटली असती तितक्याच प्रेमाने जणू लक्ष्मणच समजून भेटली. **(क) कां न असे अशि राम माय ती** - राम शत्रूवर सुद्धा प्रेम करणारे,

शत्रूचे सुद्धा हित चिंतणारे, मग त्यांची माता रामवैरी बनलेल्या सवतीच्या मुलावर पुत्रवत प्रेम करील यात नवल काय! **'रिपुहित, अमचे कार्य घडावे। असे शत्रुशी तुम्ही वदावे'** (६।१७।८) असे रामचंद्रानी अंगदास सांगितले आहे. आता कौसल्येच्या समतेचा नमुना आणखी पहा -

*हिं.* ***। मातँ भरतु गोद बैठारे । आँसु पोंछी मृदु वचन उचारे ॥४॥***
***। अजहुँ बच्छ बलि धीरज धरहू । कुसमउ समुझि सोक परिहरहू ॥५॥***
***। जनि मानहु हियँ हानि गलानी । काल करम गति अघटित जानी ॥६॥***
***। काहुहि दोसु देहु जनि ताता । भा मोहि सब बिधि बाम बिधाता ॥७॥***
***। जो एतेहुँ दुख मोहि जिआवा। अजहुँ को जानइ का तेहि भावा ॥८।***

*म.* ***। घे निजांकि माता भरताला । अश्रु पुसुनि मृदु वदली बाळा! ॥४॥***
***। बा! अझुनिहि धर धीर वासरा । शोक सोड हा कुसमयिं न बरा ॥५॥***
***। नको मानु मनिं हानी-ग्लानी । काल-कर्म-गति अघटित गणुनी ॥६॥***
***। द्यावा दोष न कुणाहि ताता! । सर्वस्वीं मज वाम विधाता ॥७॥***
***। या दुःखांतही मला जगवि तो । न कळे अजुनिहि काय वांछितो ॥८॥***

**अर्थ** - कौसल्येने भरताला आपल्या मांडीवर घेतला (बसविला); त्याचे अश्रू (आपल्या पदराने) पुसले, व गोड शब्दांनी म्हणाली की बाळा ! ॥४॥ बा ! वासरा (वत्सा) अजूनही धीर धर; कुसमयीं - अयोग्यवेळी, शोक करणे बरे नाही (हे जाणून) शोक सोड. ॥५॥ काळाची व कर्माची गति अघटीत असते हे जाणून, हानीची ग्लानि मनात (सुद्धा) मानू नकोस ॥६॥ (तसेच) बाळा ! (ताता) कोणालाही दोष देऊ नकोस बरे; विधाता सर्व प्रकारे माझ्यावर उलटला आहे. त्याला कोण काय करणार ! ॥७॥ (कारण) त्याने या अशा दुःखांत (सुद्धा) मला जगविली आहे; (तेव्हा) अजूनही आणखी काय करण्याची त्याची इच्छा आहे ते काही कळत नाही.॥८॥

**टीका. चौ ४ (१) घे निजांकि** - पूर्वी म्हटले की जणू रामालाच भेटली; आणि **'रामभरत सुतयुग सम मानी'** (५५।६) त्याचे आणखी प्रत्यंतर मांडीवर घेऊन आपल्या पदराने डोळे पुसणे व गोड शब्दांनी सांत्वन करणे याने मिळाले. आणि हे सर्व भरताने शपथा घेण्याच्या आधी ! **कोण म्हणेल की कौसल्या सावत्र आई आहे?** भरतजननीच्या भरताशी वागण्यात यांतला लवलेश तरी दिसला का? **मग भरताची सावत्र आई कोण?** ती तर 'भरत कर्णमन शूल सम वाणी' बोलली!

**चौ. ५. (१) अजुनिही धर धीर वासरा** - वत्सा, **वासरा**, हे अत्यंत प्रेमाचे मधुर शब्द आहेत. **अजुनिही** म्हणण्यात भाव हा की जरी असे सर्व अनर्थ झाले असले तरी तुझ्यासारख्याने धीर सोडून कसे चालेल? स्वतःला कुलकलंक, प्रियद्रोही, दोषी म्हणून स्वतःचा धिक्कार करणे ही आत्मग्लानीने अधीर झाल्याची लक्षणे तिला दिसली म्हणून म्हणाली की **धीर धर**. आता सर्व परिवाराला, प्रजेला व आम्हा मातांना, तुझ्या शिवाय कोणाचा आधार नाही. तूच आता मुख्य आधार आहेस. तूच जर असा शोकाने अधीर झालास तर आम्ही स्त्रियांनी, मातांनी व इतरांनी कसे व कोणाच्या जिवावर दिवस काढावे?

**चौ. ६. (१) नको मानु मनि हानी ग्लानी** - हानि अपरिमित, कल्पनातीत झाली ही गोष्ट जरी खरी असली तरी आता त्याबद्दल शोक चिंतेने व्याकुळ होऊन, ती भरून निघणार आहे का ? व जी हानी झाली ती कोणी जाणून बुजून का केली आहे? **काळकर्मगतीनेच** या सर्व **अघटित** घटना घडल्या. प्रारब्ध कर्माची फळे काळाच्या गतीने ज्याच्या त्याच्या पदरात पडत असतात. ती फळे पदरात पडण्याची पद्धती काळ, वेळ या गोष्टी सुद्धा कोणाच्या हातात नाहीत. कित्येक वेळा फळ पदरात पडण्याची पद्धती अगदी कल्पनातीत अघटित, विलक्षण असते. सुखदुःखे, लाभहानि इ. दिवसरात्री प्रमाणे येतात व जातात. **'सुखिं हर्षति जड दुःखीं रडती। धीर मनीं उभयां सम गणती ॥ धीरा विवेक विचारीं'** (-१५० ५-८ पहा) हे पण दिवस जातील. आज गेलेच ना २०।२१ दिवस; म्हणून आता मन खट्टू करून बसण्याचा काही उपयोग नाही. अधिक हानी व दुःख होणार नाही इकडे लक्ष नको का द्यायला? व ते आता तुझ्याशिवाय कोण देणार.

**चौ. ७-८ (१) द्यावा दोष न कुणाहि** - भरताने आपल्या जननीला दोष दिले हे राममातेला बरे वाटले नाही. **'कोणी कुणा सुख दुःख न दाता । निज कृत कर्म भोग ते ताता!** ज्याला त्याला आपल्या कर्माचे फळ मिळत असते. त्यांत इतर कोणाचा दोष नसतो. **कोणाला दोष देण्याची इच्छा झाली की रोष करण्याची इच्छा व्हायचीच. (क)** माझ्या या दुर्दशेचे कारण तू किंवा इतर कोणीही नसून **'सर्वस्वी मज वाम विधाता'** माझेच प्रारब्ध सर्व प्रकारे प्रतिकूल झाले व त्याची फळे मी भोगीत आहे. माझ्या कर्मानि ही दुःखे जर मला सहन करावयाची नसती तर मी एवढे दिवस जगलेच नसते; पण कर्माची फळे भोगविण्यासाठी कर्मानुसार विधाता जगवीत आहे. नाहीतर वियोगाच्या दिवशीच प्राण जाण्यास

काय हरकत होती? पण अजून दुःख म्हणा सुख म्हणा भोगणे शेष आहे; तोपर्यंत मी काय आणि कोणी काय धैर्याने सर्व सहन केलेच पाहिजे.

(२) **न कळे अझुनिही काय वांछितो** - कौसल्येला धास्ती वाटत आहे की भरत रामवियोग असह्य होऊन या आत्मग्लानीने, कोणास न सांगता वनात निघून जाईल की काय? तसे झाल्यास प्रिय प्रजेचे पालनपोषण कोण करणार ? भरताविषयीची ही व याच्या पुढील ही धास्ती कौसल्येच्या मुखांतून उघडउघड बाहेर पडणार आहे; पण त्यास अजून वेळ आहे. कौसल्येला मनापासून वाटत आहे की भरताने राज्याचा स्वीकार करून, पित्याचे शेष वचन पूर्ण करावे. पण या गोष्टी बोलून दाखविण्याची ही वेळ नाही व ती उतावीळपणा करणारी नाही. कैकयीचा उताविळपणा व पुत्रवात्सल्य पाहिलेच आपण !

***हिं.दो.***	***। पितु आयसु भूषन बसन तात तजे रघुबीर।।***
***।। बिसमउ हरषुन हृदयँ कछु पहिरे बलकल चीर ।।१६५।।***

***म.दा.***	***।। पित्राज्ञे भूषण वसन त्यजुनि तात! रघुवीर।।***
***।। हर्ष विषाद न जरा हृदिं नेसति वल्कल-चीर ।।१६५।।***

**अर्थ** - बाळा ! (भरता) रघुवीराने वडिलांच्या आज्ञेने वस्त्रे व भूषणे यांचा त्याग केला व शोक किंवा हर्ष न मानता वल्कलवस्त्रे नेसले ।।दो.१६५।।

**टीका**. - (१) **रघुवीर** शब्दाने त्या प्रसंगी दिसून आलेली चार प्रकारची वीरता येथे सुचविली आहे. पित्राज्ञा पालनात **धर्मवीरता**; हर्षविषाद रहित राहण्यात **विद्यावीरता (ज्ञानवीरता)**; राज्यत्यागादि करण्यात **त्यागवीरता,** व त्या सर्व अतिबिकट प्रसंगात दिसलेली ऋजुता, सरलता म्हणजे **ऋजुतावीरता** दिसून आली. **(क) पित्राज्ञे त्यजुनि** - कौसल्येच्या या शब्दामुळे तिच्या परमशुद्ध निर्विकार हृदयाची जेवढी प्रशंसा करावी तेवढी थोडी! वस्त्रे भूषणे त्यागण्याची व वनात जाण्याची आज्ञा दशरथाने आपल्या मुखाने दिली नसली तरी **तापस वेष विशेष उदासी । चौदा वर्ष राम वनवासी'** हा दुसरा वर कैकयीने मागितला व मागेल तो वर देण्याची प्रतिज्ञा राजाने रामशपथपूर्वक केली होती; म्हणून ती राजाज्ञा, पित्राज्ञा नव्हती असे म्हणता येत नाही. कौसल्येने असे मानण्यात तिचा सरळ स्वभाव व रागद्वेषरहित वृत्ती व भरतप्रेमपरिप्लुतता दिसून येतात. **(ख) हर्षविषाद न जरा हृदिं** - राज्य देऊ सांगुनि दिधले वन । ऐकुनि हर्ष विषाद रहित मन' (१४९।७) यांतील हर्ष शब्दाचा संबंध 'राज्य देऊ' सांगण्याशी आहे. राज्य मिळणार हे

ऐकल्यावर हर्ष झाला नाही व वनात जा, वल्कले धारण कर, असे ऐकल्यावर विषाद, खेद वाटला नाही.

हिं. *। मुख प्रसन्न मन रंग न रोषू । सब कर सब बिधि करि परितोषू ॥१॥*
*। चले बिपिन सुनि सिय सँग लागी । रहइ न राम चरन अनुरागी ॥२॥*
*। सुनतहिं लखनु चले उठि साथा । रहहिं न जतन किए रघुनाथा॥३॥*
*। तब रघुपति सबही सिरु नाई । चले संग सिय अरु लघु भाई ॥४॥*

म. *। राग रोष ना, प्रसन्न आनन । सकलां विविध परीं परितोषुन॥१॥*
*। जात वना सीता गत संगीं । राहि न रामचरण - अनुरागी ॥२॥*
*। श्रवत उठुनि गत लक्ष्मण साथ हि । राहि न यत्न करित रघुनाथ हि ॥३॥*
*। तैं रघुपति सर्वां शिर नमती । लघुबंधू-सीते सह निघती ॥४॥*

**अर्थ** - मनांत कशाची आसक्ती (राग. हिंदी - रंग) नाही व कोणावर रोष नाही; मुख प्रसन्न होते; सर्वांचा विविध प्रकारे परितोष करून (रघुनाथ) वनांत जाण्यास निघाले ॥१॥ हे ऐकून सीताही त्यांच्याबरोबर निघाली, रामचरणी अनुरागी (अनुराग करणारी) असल्यामुळे (सर्वांनी सांगून सुद्धा) राहिली नाही. ॥२॥ हे ऐकून लक्ष्मणसुद्धा वनात बरोबर जाण्यास निघाला. व रघुनाथाने (घरी ठेवण्याचा) यत्न केला तरीही राहिला नाही ॥३॥ मग सर्वांना नमन करून रघुपति निघाले - चालू लागले व त्यांच्याबरोबर धाकटा भाऊ लक्ष्मण व सीताही गेली.॥४॥

**टीका. (१) सकला विविधपरीं परितोषुन** - ८०।१ पासून ८१।१ पर्यंत हे वर्णन आहे. **(क) राहि न यत्न करित रघुनाथहि - रघुनाथ** शब्दाने सुचविले की अयोध्या अनाथ राहू नये या दृष्टीने समजूत घालण्याचा प्रयत्न रामचंद्रांनी केला. **'घेउन गेलो तुम्हास वनिं जर । होइ अयोध्या अनाथ अति, तर'** (७१।३) असे लक्ष्मणास सांगितले आहे. कौसल्येने सुद्धा रामाची 'आज्ञा' विचारली व तेथे रघुनाथ शब्दच वापरला आहे. ५९।७ व ६०।६ सटीक पहा.

हिं. *। रामु लखनु सिय बनहि सिधाए । गइउँ न संग न प्रान पठाए ॥५॥*
*। यहु सबु या इन्ह ऑखिन्ह आगे । तउ न तजा तनु जीव अभागें ॥६॥*
*। मोहि न लाज निज नेहु निहारी । राम सरिस सुत मैं महतारी ॥७॥*
*। जिऐ मरै भल भूपति जाना । मोर हृदय सत कुलिरव समाना ॥८॥*

दो. *। कौसल्या के बचन सुनि भरत सहित रनिवासु ॥*
*॥ व्याकुळ बिलपत राजगृह मानहुँ सोक निवासु ॥१६६॥*

म. *॥ गत वनिं राम नि सीता लक्ष्मण । गेल्ये ना पाठविले प्राण न ॥५॥*
*। हे घडले देखत नयनां या । त्यगि न अभागि जीव तरि काया ॥६॥*
*॥ लाज न मज मत्प्रेम पहातां । रामसदृश सुत मी तन्माता ॥७॥*
*॥ जिवन मरण नृप नीट समजले । ह्रदय कुलिशशत- सम मम घडलें ॥८॥*

दो. *॥ परिसुनि कौसल्या-वचन भरत नि राणीवास ॥*
*॥ व्याकुळ विलपति, राजगृह जाणों शोकनिवास ॥१६६॥*

**अर्थ -** राम सीता व लक्ष्मण वनांत गेले; आणि मी गेल्ये नाही तर नाहीच, पण प्राणही (बरोबर) पाठविले नाहीत. ॥५॥ हे सगळे माझ्या या डोळ्यादेखत घडले तरी माझा अभागी जीव देहाला सोडून गेला नाही ॥६॥ माझे प्रेम पाहून मला लाज नाही वाटत (म्हणण्यास) की रामासारखा पुत्र नी मी त्याची माता ! ॥७॥ जगणे (जीवन) व मरणे हे महाराजांनाच चांगले समजले; (पण) माझे ह्रदय मात्र शंभर वज्रांसारखे (कठोर) घडलेले (बनविलेले) आहे. ॥८॥ कौसल्येचे बोलणे ऐकून भरत व सर्व राणीवसा व्याकुळ होऊन असा विलाप करीत आहेत की जणू सगळे राजगृह शोकनिवासच बनले आहे. ॥दो. १६६॥

**टीका. चौ. ५-६ (१) गेल्ये ना पाठविले प्राण न** - रामलक्ष्मण व सीता वनात जाण्यास चालू लागल्याबरोबर माझे प्राण सहज निघून जाणे जरूर होते; ते नाहीच गेले; पण निदान मी बरोबर गेले असते तर काही तरी लाज राहिली असती; पण तेही घडले नाही. मुद्दाम प्राणत्याग केला असता तरी प्रेम सत्य ठरले असते. **(क)** मी रामविमुख होऊन जगले. त्याअर्थी माझा **जीव अभागी** आहे. भाग्यवंत असता तर देहासह, सीता व लक्ष्मणाप्रमाणे बरोबर गेला असता किंवा महाराजांसारखा देहाला सोडून गेला असता.

**चौ. ७-८- (१) लाज न मज - मी तत्माता** - मातेचे पुत्र प्रेम पित्यापेक्षां जास्त असते. तिच्या प्रेमरसानेच त्याचे पोषण व संवर्धन झालेले असते. पित्याचा व पुत्राचा संबंध माता व पुत्र याच्यापेक्षा पुष्कळच कमी असतो. असे असता व रणांगणात हजारो वीरांना ठार मारताना हर्ष मानणारे असे कठोर पुरुषांचे अंतःकरण असते, तरीसुद्धा, राजाचा जीव रामविरहाने राहू शकला नाही. मी स्त्री असून राम-जननी असून जगले आहे. त्याअर्थी राममाता म्हणवून घेण्याची माझी व माझ्या प्रेमाची पात्रता नाही. मी राममाता आहे असे म्हणतांना मला लाज वाटली पाहिजे. **हे कौसल्येचे वचन आत्मग्लानीचे आहे, आर्ताचे वचन आहे हे विसरू नये.**

(२) **जिवन-मरण... समजले...घडले - 'पावति दशरथ जिवन मरण फला जगत रामविधुवदन विलोकित। रामवियोगें मरण सुशोभित'** (१५६।१-२) राजांचे हृदय पुरुषांचे असून ते रामविरहव्यथा सोसू शकले नाही आणि माझे हृदय स्त्रियांचे, आईचे, असून मला रामविरहव्यथा सोसता येते; याचा अर्थ हाच की माझे हृदय मातेचे नसून, शेकडो वज्रांसारख्या कोणत्या तरी विलक्षण कठीण अशा पदार्थाचे ते बनलेले असले पाहिजे.

(३) सुमंत्राची आत्मग्लानि व रामविरहव्यथा, दशरथांची आत्मग्लानि व रामविरह पीडा तशीच कौसल्येची व भरताची; **यांची तुलना** मानसांतील वचनांनी **करण्याचे स्वतंत्र विषयाचे कार्य वाचकांवर सोपवावे लागत आहे.**

**दोहा - (१) राजगृह जाणों शोकनिवास** - प्रथम **'शोक शोक करि धरुनी हो! तन'** (२९।७) असा शोक कैकयीच्या कोपभवनांत दशरथ रूपानेच होता. नंतर सुमंत्राला तो राजवाडा दुरूनच **'विपद विषाद (शोक) वास जणु भासत'** (३८।५) असे झाले. नंतर सर्व अयोध्या **'नगरी करुणरस - कटक करि चाल पिटुन डंक्यास'** (४६) असे घडले. नंतर सर्व अंतःपुर **'भवन भयद वाटे तया जणुं कीं प्रेतनिवास'** (१४७) असे सुमंत्रास दिसले. नंतर **'शोकाकुल सब राण्या रडती'** (१५६।३) अशी दशा झाली; आणि आता दशरथांच्या मरणाच्या १५।१६ व्या रात्री सुद्धा ते सर्व राजगृह (अंतःपुरांतील राजवाडे) शोकनिवास बनले. दशरथाचे रूप घेतलेल्या शोकाला तो देह सोडावा लागल्याकारणाने त्याने अनेक रूपे घेतली व आता सर्व अंतःपुरात (कैकयीचे सोडून) तोच अनेक रूपांनी विलाप करीत आहे.

***हिं.*** ***। बिलपहिं बिकल भरत दोउ भाई। कौसल्याँ लिए हृदयँ लगाई ॥१॥***
***। भाँति अनेक भरतु समुझाए। कहि बिबेकमय बचन सुनाए ॥२॥***
***। भरतहुँ मातु सकल समुझाई। कहि पुरान श्रुति कथा सुहाई॥३॥***
***। छल बिहीन सुचि सरल सुबानी। बोले भरत जोरि जुग पानी ॥४॥***

***म.*** ***। विलपति विकल भरत दो भ्राते। कौसल्या धरिते हृदयातें ॥१॥***
***। नानापरि करि भरत-सांत्वना। किति विवेकमय सांगुनि वचनां ॥२॥***
***। भरत सांत्विती सब मातानां। वदुनि कथा नियमागम नाना ॥३॥***
***। छलविहीन शुचि सरल सुवाणी। भरत बोलले जोडुनि पाणी ॥४॥***

**अर्थ** - भरत व शत्रुघ्न हे दोघे व्याकुळ होऊन विलाप करीत असता कौसल्येने त्या भावांना पोटाशी धरले ॥१॥ व तिने पुष्कळ विवेकपूर्ण वचने

सांगून भरताचे (व शत्रुघ्नाचे) सांत्वन केले. ॥२॥ (मग) श्रुति (निगम) व पुराणे (आगम) यांतील विविध कथा सांगून भरताने सकल मातांचे सांत्वन केले.॥३॥ नंतर निष्कपट, पवित्र व सरल अशी वाणी भरत हात जोडून बोलू लागले. ॥४॥

टीका. - चौ. २-३ (१) **नानापरिं करि भरत सांत्वना -- वचना** - नुकतीच भरताची समजूत घालून त्याला धीर दिला तरि तो पुन्हा शोकाकुल होऊन विलाप करीत असलेला पाहून कौसल्येने भरतास हृदयाशी धरला व राम परमात्मा आहेत हे मर्म त्यास हळूच सांगितले. असे केल्याशिवाय भरताचा शोक कमी होणार नाही व काही तरी भलताच प्रसंग ओढवेल, हे जाणून तिने अवतारमर्म सांगितले व नंतर उघड अनेक नित्यानित्यविवेक सांगणारी वचने सांगितली. कौसल्या व सुमित्रा रामावतार रहस्य जाणणाऱ्या आहेत हे पूर्वीच सिद्ध झाले आहे. **(क) भरत सांत्विती सब मातांना** - यावरून ठरले की या वेळी तरी भरताच्या हृदयांतील शोकाचा पूर साफ ओसरला व त्याला धीर आला आहे. **'सब मातांनां'** या उल्लेखाने सिद्ध होते की इतर पुष्कळ राण्या येथे आहेत. या राण्यांचा अधिकार साधारण असल्याने वेदपुराणांतील गोष्टी सांगून **'सत् हरिभजन जगत् स्वप्नासम'** म्हणून ईश्वर ठेवील त्या स्थितीत समाधानाने राहून त्याचे भजन करण्याशिवाय आपल्या जीवांच्या हाती काही नाही. तोच मला व तुम्हाला आधार आहे. इ. सांगून सांत्वन केले.

**चौ. ४ - (१) छलविहीन शुचि सरल सुवाणी** - भरत रामप्रेमी आहेत व रामप्रिय आहेत **'कोण जगीं प्रिय सम भरताही'** (२।७।७) असे रामच म्हणाले आहेत. आणि रामचंद्रास छलकपट मुळीच आवडत नाही 'मजसि कपट छल छिद्र न भावे' मग भरताच्या हृदयात **छल** कपट कसे असेल? व हृदयांतच नाही ते वाणीत कसे येईल? जे मनात आहे तेच बोलून दाखवीत आहेत म्हणून **सरल** आहे; आणि शास्त्रनुकूल संतसंमत, सत्य प्रिय, बोलणार आहेत म्हणून **शुचि** = पवित्र आहे. आणि या सर्व सुंदर गुणानी युक्त आहे म्हणून **सु-वाणी** आहे. आता भरत विविध शपथा घेऊन सर्व मातांची व परिवारादिकांची खात्री करीत आहेत की जननीने जे केले त्यातील काही सुद्धा त्यांस माहीत नव्हते व तिने केले ते त्यास मुळीच मान्य नाही. निष्कारण झालेला गैरसमज दूर होऊन, निष्कारण होणारी अकीर्ती टळावी व लोकांनी निंदा करून परनिंदेसारखे घोर पातक नकळत

पदरात घेण्यास जागा राहू नये म्हणून अशा प्रकारच्या शपथा घेण्याची प्रथा पूर्वी होती. दिव्य करणे ही याच्या पुढली व शेवटची पायरी होती.

हिं. *। जे अघ मातु पिता सुत मारे । गाइ गोठ महिसुर पुर जारे ॥५॥*
*। जे अघ तिय बालक बध कीन्हें । मीत महीपति माहुर दीन्हें ॥६॥*
*। जे पातक उपपातक अहहीं । करम बचन मन भव कबि कहहीं ॥७॥*
*। ते पातक मोहि होहुँ बिधाता । जौं यहु होइ मोर मत माता ॥८॥*

म. *। जें अघ माय बाप सुत मारुनि । गोगोष्ठ किं भूसुरपुर जाळुनि ॥५॥*
*। जें अघ नारी बालक मारुनि । मित्र महीपति यां विष घालुनि ॥६॥*
*। जीं पातक उपपातक असतीं । कर्मवचनमन-भव कवि वदती ॥७॥*
*। ती पापें विधि देवो मातें । हें मत जर मज संमत माते! ॥८॥*

**अर्थ** - माता पिता किंवा पुत्र यांची हत्त्या केल्याने जे पाप लागते; गाईचे गोठे व ब्राह्मणाचे गाव यांना आग लावण्याने जे पातक लागते.॥५॥ स्त्री वा बालक यांचा वध केल्याने जे पाप लागते; व मित्र किंवा राजा यांना विष घातल्याने जे पाप लागते. ॥६॥ जी कायिक, वाचिक, मानसिक पापे कवींनी वर्णिली आहेत व जी पातके व उपपातके आहेत.॥७॥ हे माते ! हे मत जर मला संमत (मान्य) असेल तर ती सर्व पापे विधाता मला देवो.॥८॥

**टीका.** - (१) पातकाचे वर्गीकरण विविध प्रकारे केलेले आढळते. त्यांतील पंचमहापातकांचा उल्लेख येथे केलेला नाही. 'ब्रह्महत्या सुरापानं स्तेयं (स्वर्णस्तेयं) गुर्वंगनागमः' ही चार महापातके आहेत व या चौघांपैकी कोणाची संगती करणे हे पाचवे महापाप आहे. यांच्या समान किंवा यांच्या खालोखाल असलेल्या काही पातकांचा उल्लेख वर केलेला आहे. **(क) वा. रा.** ७५ मध्ये भरताने अशाच शपथा केल्या आहेत. (श्लो. २१-५८) त्यांतील काही गोष्टी पापमय आहेत हे पुष्कळांना माहीत नाही म्हणून काहींचा उल्लेख करणे योग्य वाटते – सूर्यासमोर लघुशंका करणे, बसलेल्या गाईला लाथ मारणे, प्रजेकडून कर घेऊन त्यांचे रक्षण न करणे, गुरुंजवळ शिकलेली विद्या विसरणे; नैवेद्य समर्पण न करता भोजन करणे, दरिद्री असून पुष्कळ संतती होणे, संधिकाळात (सूर्योदयापूर्वी तीन घटका व सूर्यास्तानंतर तीन घटका) झोपणे, ही पातके आहेत. तेथे आणखी पुष्कळांचा उल्लेख आहे. **(ख) महाकाव्यात पापांचे वर्णन असावे** असा नियम आहे. लोकशिक्षण व नीतिमार्ग प्रदर्शन या गोष्टी याने सहज साधतात. पण **पापपुण्याची कल्पना**

**ज्यांस मान्य असेल त्यांना म्हणजे माणसांना यांचा उपयोग होतो. राक्षसांना किंवा पशूंना अशा वर्णनांचा उपयोग नाही; कारण त्यांना पापपुण्य हा भेदच माहीत नाही !**

(२) **स्कं. पु.** (मा. कु. खं. अ. ३६) मध्ये महापातके व उपपातके यांचे विस्तृत वर्णन आहे. माता-पितावध वगैरे येथे दोन चौपायांत वर्णिलेली महापातके आहेत असे स्कंदपुराणावरून ठरते. कोणी यांना महापातकसमान मानतात. यापेक्षा अधिक विस्ताराची आवश्यकता वाटत नाही. मा.पी. मध्ये बराच विस्तार टीकाकारांनी केलेला आहे.

*हिं.दो.* ***। जे परिहरि हरि हरचरन भजहिं भूतगन घोर ॥***
***॥ तेहि कइ गति मोहि देउ बिधि जौं जननी मत मोर ॥१६७॥***

*म.दो.* ***। जे सोडुनि हरिहरचरण भजति घोर भूतांहि ॥***
***॥ तद्गति विधि दे जननिमत जर हें मान्य मला हि ॥१६७॥***

**अर्थ** - हरि व हर यांचे चरण सोडून (यांस न भजतां) जे कोणी घोर भूतांनां भजतात त्यांना जी दुर्गती प्राप्त होते ती, हे जननीचे मत जर मला मान्य असेल तर विधि मलाहि देईल - देवो ॥१६७॥

**टीका. - (१) तद्गति =** त्यांची गति; त्यांना मेल्यावर मिळणारी गति. 'भूतानि यान्ति भूतेज्याः' (भ.गी.) ज्या भूतप्रेत पिशाचादिकांचे भजन करावे त्यांचे रूप भजन करणाराला मेल्यावर मिळते. भूतप्रेत पिशाचादिकांची उपासना करून, लोकांत विविध चमत्कार करून दाखविता आले तरी मेल्यावर दुर्गती मिळते, **भूतपिशाच्चादि व्हावे लागते.** कर्णपिशाच साह्याने ज्योतिष; वाटेल ती फळे, पेढे वगैरे वाटेल तेव्हा काढून देणे, सोन्याचांदीच्या लगडी, देवतांच्या मूर्ती वगैरे काढून दाखविणे; इत्यादी चमत्कार यक्षिणी, योगिनी, भूते, पिशाच इत्यादींना मंत्रांनी वश करून सहज करून दाखविता येतात ! पण शेवटी दुर्गती. असे चमत्कार करणारी माणसे आहेत, पाहिली आहेत. **हा दोहा वाचकांना सावध करण्यासाठी फार उपयुक्त आहे.** **(क) हरि व हर** या दोघांचाच उल्लेख असला तरी हरिहरांचे विविध अवतार व सूर्य, देवी, गजानन इत्यादींचा अंतर्भाव यांत केलाच पाहिजे. मानसांतच पंचायतनपूजा उचित व कर्तव्य म्हणून वर्णिली आहे. (२७३।४-५ पहा.)

*हिं.* ***। बेचहिं बेद धरमु दुहि लेहीं । पिसुन पराय पाप कहिं देहीं ॥१॥***
***। कपटी कुटिल कलहप्रिय क्रोधी । बेद बिदूषक बिस्व बिरोधी ॥२॥***
***। लोभी लंपट लोलुपचारा । जे ताकहिं परधनु परदारा ॥३॥***

*। पावौं मैं तिन्ह कै गति घोरा । जौं जननी यहु संमत मोरा ।।४।।*

म. *। वेदविक्रयी धर्मदुही जे । पिशुन पराविं पाप वदती ते ।।१।।*

*। कुटिल कलीप्रिय कपटी क्रोधी । वेद-बिदूषक विश्व-विरोधी ।।२।।*

*। लंपट लोभि लोलुपाचारी । जे परधनकामी परदारी ।।३।।*

*। त्यांची घोर गती मी पावें । जर माते ! मातें हें ठावें ।।४।।*

**अर्थ** - वेदाची विक्री करणारे, धर्माचें दूध काढून घेणारे, दुसऱ्यांची पापे सांगणारे जे पिशुन (चहाडखोर);।।१।। कुटिल, कपटी, युद्ध - भांडण - कलह ज्यांना प्रिय वाटतात. क्रोधी, वेदांची निंदा-थट्टा वगैरे करणारे, विश्वाशी (सर्वांशी) विरोध करणारे; ।।२।। लोभी, विषयलंपट, दंभी (लोलुपाचारी), परधनाची कामना करणारे, परस्त्रीलंपट ।।३।। यांना जी दुर्गती मिळते (घोरगति) ती हे माते ! हे जर मला माहीत असेल तर मला मिळो-मिळेल.।।४।।

**टीका. चौ. - १ - (१) वेदविक्रयी = वेदांची विक्री करणारे;** म्हणजे कोण व वेदविक्रय म्हणजे काय? अपात्र - अनाधिकारी व्यक्तींना वेदशास्त्रादि शिकविणे, ज्यांना यज्ञयागादि कर्मे करण्याचा अधिकार नाही अशांची ती कर्मे करणे, वेदस्मृतिपुराणोक्त कर्म चालविताना पैसे पदरात पडले म्हणजे झाले ही दृष्टी ठेऊन कसेतरी कर्म चालविणे; यजमानाला प्रसन्न ठेऊन पैसे पदरात पडून घेण्यासाठी शास्त्राने निषिद्ध ठरविलेल्या गोष्टींना 'चालेल' म्हणून संमती देणे, अमुक इतकी दक्षिणा द्याल तर अमुक कर्म करीन, चालवीन असे म्हणून, म्हणजेच वेदशास्त्रातील कर्म मोल ठरवून करणे म्हणजे वेदविक्रय होय. **असा वेदांचा विक्रय जे करतात ते वेद विक्रयी. (क) धर्म दुही -** पुष्कळ दूध देईल म्हणून गाईला ओली वैरण घालून दूध काढतात त्याप्रमाणे धर्माचरणाच्या नावाखाली या जगात प्रतिष्ठा, कनक (धन) कामिनी, कीर्ती इ. मिळविण्याचा प्रयत्न करणारे म्हणजे धर्मदुही. भिक्षा सुखाने मिळावी, उदरनिर्वाह सुखाने चालावा म्हणून जटा, दाढी वाढवून बोवा बनणे, संन्यास घेऊन द्रव्य मिळविणे व त्याचा संग्रह करणे; योगाभ्यास करून योगाचे प्रयोग, समाधी वगैरे लावून, दाखवून पैसा, मानसन्मान मिळविणे. बिदागी ठरवून कथा, कीर्तन प्रवचनादि करणे; असलेल्या किंवा नसलेल्या सद्गुणादिकांच्या पाट्या, जाहिराती लाऊन धनकीर्ती आदि मिळविणे; मानसन्मान, धन, प्रतिष्ठा, पूजा यांचा लाभ होतो म्हणून मंत्रोपदेश देत सुटणे इत्यादी गोष्टी करणारे व **धर्माच्या नावावर** इतर मार्गांनी **पैसे उकळणारे सर्व**

**धर्मदुही होत.** उदा. सार्वजनिक सत्यनारायण, नवसाचे सत्यनारायण, वेदपाठशाळा, गोशाळा, अनाथालये इ. अनेक नावांखाली पैसे उकळून स्वार्थ साधणारे सगळे धर्मदुही होत. यांना धन देणे म्हणजे पापाचरण, आळस, असत्य, दंभ, कपट इत्यादींचे पोषण करून समाजाची व धर्माची हानी करणे आहे. अशा धर्मदुही लोकांना धर्मध्वजी, लिंगवृत्ती असेही म्हणतात. याचा इतका विस्तार टीकेत करण्याचे कारण इतकेच की अशा धर्मदुहीचा भरणा हिंदुसमाजात फार झाला आहे व दिवसेंदिवस संख्या वाढत आहे. याना शेवटी घोर गती मिळते.

**चौ. २. (१) कलीप्रिय** - **कलि = कलह; 'कलहविग्रहै.... कलिसंस्फोटसंयुगः**(अमरे) कलि = कलह, युद्ध, भांडण, शिवीगाळ, वादविवादाची आवड, मारामारी, कज्जेदलाली, कण्या टाकून कोंबडे झुंजवणे इत्यादी कलि- कलह- प्रियतेचीच उदाहरणे आहेत **(क) वेदविदूषक** = वेदांची निंदा करणारे, वेदांना दोष देऊन वैदिक धर्म कर्माची टवाळी थट्टा, उपहास करणारे उदा - वेद हे माणसांनी ब्राह्मणांनी आपल्या फायद्यासाठी लिहिले; ते जुने झाले, चालू युगात त्यांचा काही उपयोग नाही इ. प्रकारे वेदविरोध करणे; वेद शास्त्रादी सद्ग्रंथांचे अर्थ स्वतःच्या मतास अनुकूल असे पूर्वापार संबंध सोडून लावणे इ. करणारे वेदविदूषक होत. वेदशास्त्रांविषयी संशय घेणे, का आणि कशासाठी असे प्रश्न वेदाज्ञेविषयी विचारणे या गोष्टीसुद्धा वरील सदरातच पडतात **(ख) विश्वविरोधी** - येथे विश्व = विष्णु असा अर्थ करणे योग्य आहे किंवा विश्व = सर्व, सगळे, ज्याच्या त्याच्याशी विरोध करणारा; व विष्णुविरोध करणारा हे दोन्ही अर्थ मानसात आहेत 'कलि महिमा **विरोध दिशी चारी'** (७।१०४।५) ' **रोगी सदा संतत जो क्रोधी। विष्णुबिमुख श्रुति संत विरोधी'** (६।३१।१) क्रोधी, विष्णुविमुख (= विरोधी) आणि श्रुति (वेद) विरोधी या तिघांचा या एकाच चौपाईत एकाच माळेचे मणि (जिवंत शव) म्हणून उल्लेख केला आहे तसाच येथे क्रोधी, वेदविदूषक व विश्वविरोधी यांचा केला आहे. 'विश्व विष्णुः' (वि.सह,) एकतर विष्णु ऐवजी विश्व हा लेखक प्रमाद मानला पाहिजे किंवा विश्व = विष्णु हा अर्थ घेतला पाहिजे, कारण सगळ्या विश्वाशी विरोध कोणीच करू शकत नाही.

**चौ. ३ (१) लोलुपाचारी** = विषयलोलुप असून सदाचाराचे, धर्माचरणाचे, अवडंबर करणारा; म्हणजेच दंभी, **दांभिक सदाचारी**. कलिप्रभाव वर्णनात हाच अर्थ आहे. **'सदाचारि जो दंभ बहु करी'** (७।९८।५ टी.प.) **(क) ल. टे.** - येथे

उल्लेख केल्यापैकी काहींना जिवंत शव समान' म्हटले आहे. **'कौल कामवश कृपण-विमूढहि । अति दरिद्र अयशी अति बृद्धहि ॥ रोगी सदा संतत जो क्रोधी। विष्णुविमुख श्रुतिसंतविरोधी ॥ तनुपोषक निंदक अघखाणी । जीवत शवसम चौदा प्राणी'**(६।३१।२-४) कौल = वामपथ धरती (चौ. ७); कामवश = परधनकामी, परदारी; कृपण = लोभी; तनुपोषक = विषयलंपट; निंदक = पिशुन; क्रोधी; विष्णुविमुख व श्रुतिविरोधी = वेद- विदूषक. वरील चौदांपैकी या आठांचा येथे प्रत्यक्ष उल्लेख आहे. या सर्वांना घोर गति मिळते. **'तानहं द्विशतः क्रूरान् संसारेषु नराधमान्॥ क्षिपान्यजत्स्यमशुभान् आसुरीष्वेव योनिषुं'** (भ.गी) यांना प्रथम घोर नर्कात पडावे लागते व नंतर आसुरी योनींत जन्मावे लागते. पहिल्या शपथेत मातापिता इत्यादींचा वध वगैरे **राक्षसी प्रकृतीची** उदाहरणे दिली; ती तमोगुणीप्रकृतीची उदाहरणे आहेत. दुसऱ्या शपथेत (दो. १६७) तमोगुणप्रधान रजोगुणी प्रकृतीचा उल्लेख केला. येथे तिसऱ्या शपथेत रजोगुणप्रधान तमोगुणीप्रकृतीचे दिग्दर्शन केले. **ही आसुरी प्रकृतीची उदाहरणे आहेत.** भ. गीतेत मुख्य तीन प्रकृतींचा स्पष्ट उल्लेख आहे; नीट शोधून पहावे. (दैवी, आसुरी व राक्षसी प्रकृती).

*हिं.* ***। जे नहिं साधुसंग अनुरागे । परमारंभ पथ विमुख अभागे ॥५॥***
***। जे न भजहिं हरि नर तनु पाई । जिन्हहि न हरिहर सुजसु सोहाई ॥६॥***
***। तजि श्रुतिपंथु बाम पथ चलहीं। बंचक बिरचि बेष जगु छलहीं ॥७॥***
***। तिन्ह कै गति मोहि संकर देऊ । जननी जौं यहु जानौं भेऊ ॥८॥***

*म.* ***। जे नहिं साधुसंग - अनुरागी । पथ परमार्थ - विमुख अभागी ॥५॥***
***। नरतनु मिळुनि न हरिला भजती । हरिहर - सुयशा प्रिय न मानती ॥६॥***
***। श्रुतिपथ त्यजुनि वाम पथ धरती । वंचक वेषें जगा ठकवती ॥७॥***
***। त्यांची गति मज देवो शंकर । जननि ! भेद हा मी जाणे जर ॥८॥***

**अर्थ** - साधुसंगती बद्दल ज्यांना प्रेम वाटत नाही; जे अभागी परमार्थमार्गापासून विमुख आहेत ॥५॥ मनुष्य देह मिळाला असून जे भगवंताचे (हरीचे) भजन करीत नाहीत; ज्यांना हरि व हर यांचे सुयश प्रिय वाटत नाही' ॥६॥ श्रुतिमार्गाचा त्याग करून जे वाममार्ग धरतात; (वाममार्गाने जातांत) आणि जे वंचक असून वेषाच्या बळावर जगाला (लोकांना) फसवितात॥७॥ जननि! (माझ्याजननीने केलेला) हा भेद जर मला माहीत असेल तर त्या सर्वांची, गति शंकर मला देवोत ॥८॥

**टीका. चौ. ५ (१) जे नहिं साधुसंग- अनुरागी** - 'प्रथमभक्ति संतांची संगति' (३।३५।८) या प्रथम व मुख्य साधनाचा येथे प्रथम उल्लेख केला; पहिली भक्ती सांगितली. **(क) पथपरमार्थ विमुख अभागी** - परमार्थपथ विमुख असणारे अभगी होत. परमार्थाचा उलट दिशेने (त्या मार्गाकडे पाठ वळवून) वागणारे म्हणजे प्रपंचातच रमणारे लोक अभागी होत. परमार्थपथ = मोक्षाचा-ज्ञानाचा मार्ग = **ज्ञानमार्ग. 'परमार्थी पथिं परम सुजाणू'** (१।४४।२ टी.प.) असे भरद्वाज होते. ते ज्ञानमार्ग प्रवीण होते. परमपरमार्थ = भक्ती, प्रेमभक्ती, (९३।६) सार हे की जे भक्तिमार्गाचाही अवलंब करीत नाहीत व ज्ञानमार्गाचाही अवलंब करीत नाहीत ते अभागी. ज्ञानमार्गात ही साधुसंगतीची आवश्यकता असतेच. (१।३।७) 'सतां संगतिरेवात्र प्रथमं साधनं स्मृतम्' (अ.रा.) साधुसंगतीत त्यांच्यावरील प्रेमामुळे शमदमादी साधन संपन्न होऊन ज्ञान रूपी फल मिळते. **'शमयमनियमचि फुले ज्ञान फला हरिपदरति रस'**.(१।३७।१४) त्या रसाचे वर्णन पुढल्या चौपाईत आहे.

**चौ. ६. (१) नरतनु मिळुनि न हरिला भजती** - ज्ञान झाल्यानंतर साधन भक्तीनेच साधुकृपेने हरिभक्ति मिळते; म्हणून ज्ञानानंतर हरिभजनाचा उल्लेख केला. हरिला भजत नाहीत ते इतर कोणाला तरि भजतात. **'नरतनु मिळुनि विषयिं मन देती । सुधा देति ते शट विष घेती'** (७।४४।२) उलट मार्ग धरला म्हणजे उलट दिशेला जाणारच. **(क) हरिहर-सुयशा प्रिय न मानती'** - ज्ञान व भक्ति प्राप्तीचे सुलभ साधन संतसंगतीत हरिहरकथा श्रवण हे आहे. **'वेणी (त्रिवेणी) हरिहरकथा विराजे । श्रवत सकल मुदमंगलदा जे'** (१।२।१० टी.प.) **'परिसुनि समजति मुदित....'** (१।२) या दोह्यावरील टी. पहावी. हरिहरकथा-प्रेम नसेल तर श्रवणाने काही लाभ होणार नाही व संतसंगतीचाही लाभ - कृपा होत नाही- **'विण सत्संग न हरिकथा त्यांविण मोह न जात ॥ मोहनाशविण रामपदिं दृढ अनुराग न तात॥** (७।६ टी.प.) पण या सर्व गोष्टींचे मूळ आहे वेदधर्मानुसार आचरण. म्हणून पुढल्या चौपाईत श्रुतिपथाचा उल्लेख करतात.

**चौ. ७ (१) श्रुतिपथ तजुनि वामपथ धरती - श्रुतिपथ** = वेदधर्ममार्ग. **'विरतिस धर्म योग दे ज्ञाना'** (३।१६।१) **वामपथ** = वेदविरुद्ध मार्ग, उलटा मार्ग. येथे वाममार्ग म्हणजे केवळ कौलमार्ग नव्हे. या सर्व मार्गांना पाखंडी मार्ग म्हणतात. यानाच (१।१२।२) पूर्वी कुपंथ म्हटले आहे. **'गति कुपथीं श्रुतिपथा सांडिती । कपटकाय कलिपंक भांडि तीं' टीका पहावी. असे लोक 'वंचक मिरविति रामभक्त वर । काम-**

**कोप- कनकांचे किंकर'** (१।१२।३) हाच अर्थ. **'वंचक, वेषें जगा ठकवती'** यांत आहे. **'बघुनि सुवेषहि, जगवंचक जे । वेषबले पुजिले हि जात ते'** (१।७।५ टी.प.)

**चौ. ८- (१) जननि ! भेद हा मी जाणे जर - हा भेद** म्हणजे कैकयीने केलेले कपट व घरभेदेपणा. **(क) त्यांची गति मज देवो शंकर** - शंकर रघुकुलाचे इष्ट देव असल्याने त्यांचा उल्लेख करणे साहजिक आहे.

*हिं.दो. । मातु भरत के बचन सुनि साँचे सरल सुभायँ ॥*
*॥ कहति राम प्रिय तात तुम्ह सदा बचन मन कायँ ॥१६८॥*

*हिं. । राम प्रान हु तें प्रान तुम्हारे । तुम्ह रघुपतिहि प्रानहु तें प्यारे॥१॥*
*। बिधु बिष चवै स्त्रवै हिमु आगी । होइ बारिचर बारि बिरागी ॥२॥*
*। भएँ ग्यानु बरु मिटै न मोहू । तुम्ह रामहि प्रतिकूल न होई ॥३॥*

*म.दो. । सत्य भरत वच सहज ऋजु परिसुनि वदली माय ॥*
*॥ तात! राम प्रिय तू सदा अससि वचन मन काय ॥१६८॥*

*म. । प्राण राम प्राणाहुनि तुजला । प्रिय तू प्राणांहुनि रघुपतिला ॥१॥*
*। विधु विषवर्षा करि हिमआगी। होति वारिचर वारि - विरागी ॥२॥*
*। ज्ञान न नाशी जरि मोहासी । तूं रामा प्रतिकूल न होसी ॥३॥*

**अर्थ** - भरताचे सत्य व सहज सरल (ऋजु) भाषण ऐकून माता कौसल्या म्हणाली की बाळ ! तूं वाणी मन काया यानी सदा रामप्रिय आहेस ।।दो.१६८।। राम तर तुला प्राणांहून अधिक प्राण आहेत व तू रघुपतीला प्राणांपेक्षा अधिक प्रिय आहेस ।।१।। (कदाचित) चंद्र विषाचा वर्षाव करील व हिम आगीचा वर्षाव करील; जलचर (मासे) कदाचित जल-विरागी बनतील (जलाचा त्याग करतील) ।।२।। व ज्ञान (सुद्धा) जरि कदाचित मोहाचा नाश करू शकले नाही तरी सुद्धा तू (कधी) रामाला प्रतिकूल (विरोधी) होणार नाहीस.।।३।।

**टीका. दो. - राम प्रिय तू वचन मन काय - 'प्रेमे पुलकित वदति परस्पर'** (२।७।५) शरीराने रामचंद्रास प्रिय; 'गत किति दिन वाटे चुकलेसे' (७।६) मनाने रामास प्रिय; 'कोण जगीं प्रिय सम भरता ही' (७।७) वाणीने रामप्रिय ही रामवचनेच आहेत. **(क) सदाप्रिय - 'रामा निशिदिन बंधु सुचिंता । जशि अंडांची कासवि चिंता'** (७।८) कोणी म्हणतील की असे रामप्रेम भरतावर वनवासापूर्वी असेल; वनवासनिमित्ताने कमी झाले नसेल कशावरून? कवींना या शंकेची शक्यता वाटली व म्हणून ते आधार देण्यास विसरले नाहीत. **'पहा**

**भरत! रघुवरमनिं काहीं । प्रेमपात्र तुजसम कुणि नाही ।। 'सितारामलक्ष्मण सुप्रीती। वर्णित तुम्हा रात्र सरली ती ।। स्नानीं मर्म किं कळे प्रयागीं । होत मग्न तुमचे अनुरागीं** ।।२०८।३.५।। यांत अश्रूरोमांच व स्तब्धता हे शरीराने प्रेमाचे चिन्ह! आणखी पुष्कळ उदाहरणे आहेत; ती वाचकांनी संकलित करावी.

**चौ. १ - (१) प्राण राम प्राणाहुनि तुजला** - तुला राम प्राणाहुन प्राण आहेत, म्हणजे प्राणांपेक्षा प्रिय आहेत. शंका - यांत भरताचे वैशिष्ट्य ते काय? सर्वच जीवांना राम प्राणांपेक्षा प्रिय आहेत. 'जीवन जीवां प्राणां प्रियही। सकल सखा निःस्वार्थि रामही' (७४।६।२९० पहा) ही शंका पुढील संदर्भाकडे दुर्लक्ष केल्याने उत्पन्न झाली आहे. सर्व प्राणिमात्रांस प्राणांपेक्षा प्रिय असलेला राम = अंतरात्मा आहे; आणि येथे पुढल्याच चरणात राम = रघुपति हा अर्थ स्पष्ट केलेला आहे. अतिव्याप्ति दोष 'रघुपति' शब्दाने काढून टाकला आहे. दशरथनंदन रघुपति सर्व प्राणिमात्रांस प्रिय नाहीत. **'प्रेम तुम्हावर तसं रामाचे। सुखजीवनिं जगिं जसं मूर्खाचे।। मम मत हेच किं भरत तुम्ही तर । रामस्नेहचि जणू देहधर' (२१८।६।८)** भरद्वाजमुनींनी याप्रमाणे दोघांविषयी मत देऊन कौसल्येच्या मताला दुजोरा दिला आहे.

**चौ. २-३ - (१) तू रामा प्रतिकूल न होसी** - येथे या दोन चौपायांत कौसल्येने भरताला जे सांगितले तेच काही पुरजनांनी इतरांस कधीच सांगितले आहे- **'प्राणप्रियहि राम भरतासी ।।८।। स्रवे चंद्र जरि अनलकण विषसम होई सुधाहि।। स्वप्निं न कधिं करिती भरत रामाविरुद्ध काहिं'** (२।४८।-) यावरील विस्तृत टीका पहावी. (येथे मूळात कौसल्येने भरताला बहुवचनाने संबोधिले आहे; पण हिंदीत नित्याच्या व्यवहारात माता पुत्रास बहुधा बहुवचनानेच संबोधितात; मराठीत तसे करणे अस्वाभाविक व प्रेमाची न्यूनता दर्शविणारे ठरेल म्हणून अशा प्रेमाच्या संबंधात मराठीत एकवचन मुद्दाम वापरले आहे.)

**(२) विधु विष-वर्षा करि** - चंदातून अमृताचा स्राव न होता विषाचा वर्षाव होईल. हे संभवनीय नाही; पण विरही व्यक्तींना तसा अनुभव येतो. **'विषसंयुत करनिकर पसरतो। विरहवंत नरनारि जाळतो'** (६।१२१।..) **'रामस्नेह सुधाकर-सार हि'** (३२५।८) हे भरताविषयीच म्हटले आहे. चंद्राने सुधावृष्टि न करणे म्हणजे रामस्नेह - रामप्रेम नष्ट होणे; व विषाची वृष्टि करणे म्हणजे - **'परधन विषाहुनी विषभारी'** रामराज्य रूपी परधन, त्याचे ग्रहण करणे. रामप्रतिकूल होण्यात या दृष्टान्ताने **रामप्रेमत्याग व रामराज्यग्रहण** या गोष्टी सुचविल्या. कौसल्या म्हणते **या दोन्ही गोष्टी**

**तुझ्याकडून होणे शक्य नाही.** भरताचा 'रामप्रेम अचल विधु! (आहे) व त्यांत **'दोष न'** (३२५।६) **या दृष्टान्ताने स्वभावत्याग व विरुद्ध स्वभावग्रहण सुचविले गेले.** हे भरताच्या बाबतीत शक्य नाही. (क) **हिम आगीवर्षा करि-** यांत स्वभाव त्याग व विरुद्ध स्वभावप्राप्ती हेच वैशिष्ट्य आहे. मग दुसरा दृष्टान्त का? **येथे हेतू दुसरा आहे.** हिमाचा स्वभाव शीतलता देऊन तापहरण करणे हा आहे. तो जाऊन आगीचा वर्षाव करणे म्हणजे ताप वाढविणे आहे. याने उलट स्वभाव होणे दर्शविले. शीतलता देऊन तापहरण करण्यांत सेवाभाव आहे; आणि ताप वाढविण्यात शत्रुता आहे. या दोन्ही गोष्टी भरताकडून घडणे शक्य नाही. कौसल्या या दृष्टान्ताने सुचविते की **तू रामाची सेवा करून त्यास सुख देशील. त्याचे दुःख वाढविण्यास कारणीभूत होणार नाहीस.** हा भाव पहिल्या दृष्टान्ताने दर्शविता येत नाही. **पुढील दोन दृष्टान्त फक्त स्वभाव त्यागाचे आहेत,** विरुद्ध स्वभावप्राप्ती त्यांत नाही, म्हणून यांहून ते भिन्न आहेत. पण **दोन का**?

(३) **'होति वारिचर वारिविरागी-** येथे वारिचर = मीन, मासे असाच अर्थ घेणे योग्य आहे. विरागी होणे म्हणजे आसक्ति, अनुराग, नष्ट होणे, द्वेष, शत्रुत्व करणे नव्हे. मासा जलावाचून जगूं शकत नाही; हा त्याचा स्वभाव बदलून तो इतर जलचरांसारखा कदाचित पाण्यावाचून जगेलही; पण कौसल्या सुचविते की **रामावाचून भरत जगणे शक्य नाही.** हे मागील दोन्ही दृष्टातांनी दिसण्यासारखे नाही; म्हणून हा तिसरा द्यावा लागला. (क) **'ज्ञान न नाशी जरि मोहासी'** मोहनाश करणे हा ज्ञानाचा स्वभाव आहे. **'यज्ज्ञानार्के भवनिशि नासत'** (२७७।१) **'सर्वहि मोहनिशे निजणारे'** (९३।२) **'ज्ञान होइ मोहभ्रम भंगहि'** (९३।५) हा स्वभाव कदाचित नष्ट होईल. येथे ज्ञान = आत्मज्ञान, जीवशिवैक्य. हे ज्ञान झालेल्यांचा आत्मस्वरूपा विषयींचा मोह नष्ट झालेला असतो; पण अशा मुनींना सुद्धा रघुपतिचरित्र पाहून ऐकून मोह होतो. गरुड, सती, भरद्वाज महाज्ञानी असून रघुनाथ चरित्राविषयी मोह त्यांना झालेला आहे. कौसल्या सुचवीत आहे की **रघुपतिचरित्राविषयी मोह तुला कधी होणार नाही.** वरील तीन दृष्टांतांनी सुचविलेल्या गोष्टी का घडणार नाहीत याचे कारण या चौथ्या दृष्टान्ताने ध्वनित केले आहे; व **असा मोह न होण्याचे कारण** दोह्यात आधीच सांगून ठेवले आहे की **भरत रामाला सदा प्रिय आहेत.** येथे जणू ज्ञानीरामभक्तिसंपन्न मातेने **भरताला हा वरच दिला** आहे असे वाटते. भरताला रघुपतिचरित्राविषयी मोह कधीच झाला नाही. इंद्रादि देवांनी

भरतहृदयांत मोह उत्पन्न करण्यासाठी केलेले प्रयत्न फुकट गेले आहेत हे पुढे (२१७।७-२१८ पहा २९५।१-८ पहा) दिसेल (या भागावरील मा.पी. पहा !)

हिं *। मत तुम्हार यहु जो जग कहहीं । सो सपनेहुँ सुख सुगति न लहहीं ॥४॥*
*। अस कहि मातु भरत उर लाए । थन पय स्रवहिं नयन जल छाए ॥५॥*
*। करत बिलाप बहुत यहि भाँती । बैठेहिं बीति गई सब राती ॥६॥*

म. *। तुज हे संमत जे जगिं म्हणती । ते स्वप्निं न सुख सुगति पावती ॥४॥*
*। वदुनि असे त्या हृदयीं धरले । स्रवती स्तन पय, नेत्र सजळले ॥५॥*
*। यापरिं करितां विलाप भारी । बसल्या सरली रात्र च सारी. ॥६॥*

**अर्थ** - हे तुला संमत आहे असे जे कोणी म्हणतील त्यांना स्वप्नातसुद्धा सुख वा सद्‌गती मिळणार नाही. ॥४॥ असे म्हणून कौसल्या मातेने भरतास हृदयाशी धरल्याबरोबर तिच्या स्तनांतून दूध पाझरू लागले व नेत्र सजल झाले ॥५॥ या प्रमाणे पुष्कळ विलाप करता करता बसल्या बसल्याच ती सारी रात्र संपली ॥६॥

**टीका - चौ. ४ - (१) तुज हे संमत ..... पावती** - मागील चौपाईत श्रीराममातेने भरताला जणू **वरच दिला व येथे** भरताची निंदा करणारास, त्यांच्यावर दोषारोप करणारास **शाप च दिला आहे.** भरत महाभागवत आहेत. भागवताची - भक्ताची निंदा करणारास कधी सुख मिळणार नाही, म्हणजेच तो दुःखी होईल; व सद्‌गती मिळणार नाही, म्हणजे दुर्गती प्राप्त होईल असा हा परमप्रेमी ज्ञानीभक्त - हृदयाने तळतळून दिलेला शाप आहे. **'होति उलूक संतनिंदारत । मोहनिशाप्रिय ज्ञानभानु गत '** (७।१२१।२६) **(क)** राम वनवासवार्ता अयोध्येत पसरल्यावर कोणी **'एक म्हणती की भरत-संमती' 'मिटुनि कान करिं, चाविति रसने। एक म्हणति हे असत्य वदणे ॥ वदता असे नास सुकृतासी । प्राणप्रियहि राम भरतासी ॥** (४८।६-८) अयोध्येतील काही लोकांचे भरताच्या स्वभावाचे ज्ञान कौसल्येचे भरताविषयीचे मत यांत अगदी साम्य आहे. असत्य भाषण हेच फार मोठे पाप आहे आणि सर्व सुकृताचा नाश झाला की, दुःख प्राप्ती व दुर्गती प्राप्ती होणारच. या काही लोकांनी व कौसल्येने जो शाप दिला तो वाणीने दोषारोप- निंदा करणास दिला आहे; पण प्रभूंनी स्वतः **'मनिं आणति कुटिलता तुम्हांवर । करिति लोक ते धाता इहपर'** (२६३।७) असा शाप पुढे दिला आहे. परंतु शापविमोचनही करून ठेवलेले पहा - **'मिटे पाप संसार सब अखिल अमंगल**

**नाश ॥ लोकिं सुयश परलोकिं सुख स्मरतां तव नामास'** (२६३।)

**चौ. ५ (१) स्रवती स्तन पय** - राम कौसल्येचा निरोप घेण्यास गेल्यावर कौसल्या त्यास **'घे मांडीवर दे आलिंगन। झरे प्रेमरस पयोदिं शोभन'** (५२।४) असे झाले. राम माता परमानंदनिर्भर होऊन रामास भेटली तेव्हा तिची जी स्थिती झाली, तशीच दशा शोकाकुल होऊन भरतास हृदयाशी धरल्यावर तिची झाली. **'रामभरत सुत युग सम मानी'** (५५।६) या वचनाची पूर्ण प्रतीति येथे दिसली. हे पाहून सहजोद्‌गार निघतात की **भरत धन्य धन्य ही कौसल्या ॥ धन्य सुकवि तुलसी कौशल्या॥** येथे राममातेच्या भरतप्रेमाची पराकाष्ठा दिसली. दुसऱ्या कोणत्याही काव्यांत सावत्र मातेचे इतके परमोच्च, परमनिर्दोष आदर्शभूत चरित्र पाहण्यास सापडणे अशक्य आहे.

**चौ. ६. (१) विलाप करता रात्र संपली** - भरत रामवनवासाच्या २९ व्या दिवशी सकाळी अयोध्येत आले. दशरथांच्या मरणानंतरची १५ वी रात्र भरताने कौसल्येच्या महालांतच काढली.

***"भरतागमन - प्रेम - वर्णन" प्रकरण समाप्त झाले.***

●●●

## "नृप-क्रिया प्रकरण" (१६९।७ - १७१।१)

*हिं.* *। बामदेउ बसिष्ठ तब आए। सचिव महाजन सकल बोलाए ॥७॥*
*। मुनि बहु भाँति भरत उपदेसे । कहि परमारथ बचन सुदेसे ॥८॥*
*हिं. दो.* *। तात हृदयँ धीरजु धरहु करहु जो अवसर आजु॥*
*॥ उठे भरत गुर बचन सुनि करन कहेउ सबु साजु ॥१६९॥*
*म.* *। वामदेव तैं वसिष्ठ आले । अणविति सचिव-महाजन सगळे ॥७॥*
*। मुनि बहु उपदेशिति भरताला । वदुनि उचित परमार्थि वचाला ॥८॥*
*म.दो.* *। तात! धीर हृदिं धरुनि कर समयोचित जें, आज ॥*
*॥ गुरुवचने उठुनी भरत करण्या सांगति साज ॥१६९॥*

**अर्थ** - तेव्हा (सकाळी) वामदेव व वसिष्ठ आले व सचिव आणि सगळे महाजन यांना बोलावून आणविले. ॥७॥ मुनीनी प्रसंगानुरूप (सुदेसे, उचित) परमार्थाच्या चार गोष्टी सांगून भरताला पुष्कळ उपदेश केला. ॥८॥ (व मग म्हणाले) तात! हृदयात धीर धरा व या समयी जे करणे उचित आहे ते आज करा. गुरु वचनाने (ते ऐकून) भरत उठले व सर्व तयारी (साज) करण्यास सांगितली. ॥दो. १६९॥

**टीका. - चौ. ७-८- (१) वामदेव** हे सचिवांपैकी एक असून महर्षि होते. सचिव आणि महाजन यांस बोलावून आणविले. भरत आल्यानंतर शोकाचे साम्राज्य अंतःपुरात पसरलेले असता मुद्दाम स्वेच्छेने तेथे कोण जाणार? **वि.ल.टे.** या (७व्या) चौपाईपासून दाहव्या ओळीत दाहव्या दिवसाची क्रिया केल्याचा उल्लेख आहे. १२।१३।१४ या ओळीत दाने दिल्याचे वर्णन आहे. एको द्दिष्ट अकराव्या दिवशी असते. बाराव्या दिवशी सपिंडी झाली म्हणजे कर्त्याचे सुतक पूर्णपणे फिटते; म्हणून बाराव्या ओळीत **वि-शुद्ध** झाल्याचा उल्लेख आहे; अकराव्या दिवशीच कर्ता शुद्ध होतो. अशी कालनिदर्शनाची गूढ कला अनेक ठिकाणी वापरलेली आहे. वसिष्ठ वामदेवादी मुनि ज्या कार्यासाठी आले आहेत त्याचा उपक्रम आता दोह्यात फार जपून करतात.

**दो. (१) जे समयोचित** - सर्व राण्यांच्या समक्ष बोलत असल्यामुळे दशरथांच्या नावाचा किंवा उत्तरक्रियेचा उल्लेख मुळीच केला नाही. **समयोचित** म्हणजे तुम्ही घरी आल्यानंतर पुत्र या नात्याने प्रथम करावयाचे आवश्यक ते कार्य आज करा

असे सांगितले (क) **गुरुवचने उठुनि** - गुरुजींची आज्ञा ऐकताच जसे काहीही विचारपूस न करता मामाकडून निघाले त्याप्रमाणेच येथे केले. वसिष्ठांच्या म्हणण्याचा आशय भरतांस सहज समजला, व पुढील तयारी करण्याची सूचना त्यानी तेथे जमलेल्या सचिवांस दिली. येथेही सुमंत्रांचे नाव नाही ! आता कार्याला प्रारंभ होईल.

*हिं.* ***। नृप तनु बेदबिदित अन्हवावा । परम बिचित्र बिमानु बनावा ॥१॥***
***। गहि पद भरत मातु सब राखी । रहीं रानि दरसन अभिलाषी ॥२॥***
***। चंदन अगर भार बहु आए । अमित अनेक सुगंध सुहाए ॥३॥***
***। सरजु तीर रचि चिता बनाई । जनु सुरपुर सोपान सुहाई ॥४॥***
***। एहि बिधि दाह क्रिया सब कीन्ही । बिधिवत न्हाइ तिलांजुलि दीन्ही ॥५॥***

*म.* ***। वेद विदित नृप तनुला स्नपविति । परम विचित्र विमाना सजविति ॥१॥***
***। विनवि भरत मातानां राखत । सकल, दर्शनाभिलाषि राहत ॥२॥***
***। आले चंदन - अगरु-भार किती । वस्तु सुगंधी रुचिर नसे मिति ॥३॥***
***। चिता शरयुतटिं रचुनि सजवली । जणुं सुरपुर - सोपान शोभली ॥४॥***
***। दाहक्रिया सविधि सब केली । स्नाने करुनि तिलांजलि दिधली ॥५॥***

**अर्थ** - वेदविदित नृपाच्या तनूला वेदविदित पद्धतीने स्नान घातले व परम विचित्र विमान सजविले.॥१॥ भरताने विनंती करून सर्व मातांना राहविल्या व त्या रामदर्शनाच्या अभिलाषेने (प्रबळ इच्छेने - आशेने) राहिल्या (सती गेल्या नाहीत.)॥२॥ चंदन, अगरु यांचे भारेच्या भारे व अनेक सुगंधी सुंदर पदार्थ अगणित आले (महाजनांनी व इतरांनी स्वयंस्फूर्तीने आणले).॥३॥ शरयूच्या तीरावर चिता रचून अशी सजविली गेली की जणू काय स्वर्गात जाण्याचा सुंदर जिनाच.॥४॥ या प्रमाणे सर्व दाहक्रिया विधिपूर्वक केली गेली; व सर्वांनी स्नान करून तिलांजली दिल्या.॥५॥

**टीका. - चौ. १-२ (१) वेदविदित नृप-तनुला - 'रघुकुलमणि जे अयोध्याधिपति । नामें दशरथ विदित वेदिं अति'** (१।१८८।७) या प्रमाणे 'वेदविदित दशरथ' असे म्हणून दशरथ चरित्राचा उपक्रम केला होता. त्या दशरथांचा हा शेवटचा संस्कार वर्णित असता पुन्हा 'वेदविदित' शब्द वापरला. म्हणून वेदविदित नृप असा अन्वय करणे (हिंदीत) जरूर आहे; अनुवाद तसाच झाला आहे. **स्नपविति** - स्नान घातले. (क) **विमान** - महाराष्ट्रात संन्याशांच्या देहाला वाहून (उचलून) नेण्यासाठी पाळणा किंवा पालखी यांचा जसा उपयोग करतात किंवा लिंगायतांत

मृतदेह वाहून नेण्यासाठी विमानासारखी पालखी बनवितात तशी सम्राटाच्या योग्यतेला साजेल अशी विमानाच्या आकाराची (पुष्पकासारख्या) पालखी तयार करून ती सुंदर वस्त्रे, पुष्पहार, केळीचे खांब इत्यादिकांनी विभूषित केली. ती सोन्याची रत्नखचितही असेल.

(२) **विनवि भरत मातानां राखत सकल** - राजाचा देह विमानांत घालून बाहेर नेण्याच्या वेळी सर्व राण्या सती जाण्यासाठी मागोमाग निघाल्या; तेव्हा भरताने त्यांस प्रार्थना केली व त्या प्रार्थनेला मान देऊन रामदर्शनाच्या इच्छेने राहिल्या; सती गेल्या नाहीत. सातशेपेक्षा जास्त राण्यांना, आपल्या मातांना, आपल्या डोळ्यांदेखत सजीव जळताना वज्रहृदयी पुत्राला सुद्धा पाहवणार नाही. तसे घडले असते तर भरत जिवंत राहणे शक्यच नव्हते. **(क)** राण्या सती का गेल्या नाहीत व भरताने अशी विनंती केल्याचा उल्लेख अ. रा. व वा. रा. यांत नसता गोस्वामींनी का केला ? व भरताने विनंती का केली? अशा शंका विचारल्या जातात म्हणून त्यांचा थोडा समाचार घेणे जरूर आहे :

## (३) राण्या सती का गेल्या नाहीत ?

पतिनिधनानंतर प्रत्येक स्त्रीने सती गेलेच पाहिजे असे धर्मशास्त्र सांगत नाही. त्या स्त्रीची इच्छा असेल तर सती जावे नाहीतर विधवा धर्माचे पालन करून ईशचिंतनांत काळ घालवावा असे शास्त्र सांगते; म्हणून **सती का गेल्या नाहीत हा प्रश्न विचारणे अविवेक आहे;** तथापि गोस्वामींनी स्पष्ट शब्दांत उत्तर दिलेले आहेच. यापेक्षा अधिक विस्ताराची खरोखर जरूरच नाही; तरीपण मानसांतच याचे आदिकारण सापडते. **(क) 'वर्ष चार दश बसुनि वनिं पाळुनि पितृवचनास ॥ येऊन पाहिन पाय मी म्लान करी न मनास'** (५३) यांत १४ वर्षांनी परत येऊन कौसल्यामातेचे दर्शन घेण्याची प्रतिज्ञा प्रभूंनी केली आहे. 'राम करूं इच्छिति तें घडतें । कोणि नसति जे करिति उलट तें' 'राम सत्य संकल्प प्रभु' (५।४१). त्या प्रभूच्या इच्छेमुळे विनंती करण्याची इच्छा भरतास झाली व प्रभूच्या सत्यसंकल्पामुळेच ती विनंती मान्य करण्याची इच्छा राण्यांना झाली. 'प्रेरक हृदिं रघुवंश विभूषण'. यापेक्षा अधिक चर्चा नको.

## (४) भरताने विनंती का केली?

याचे व्यावहारिक उत्तर प्रथम (२) मध्ये दिले आहे. ही शंका विचारणारांस

असे विचारणे भाग आहे की सातशे राण्या (माता) सती जाण्यास निघाल्या असता, तुम्ही भरताच्या जागी असतात तर काय केले असतेत? विनंती केली नसतीत तर तुम्ही मनुष्य नसून, पुत्र नसून रावणापेक्षा निर्दय कोणीतरी यमच ठरणार ! **(क)** कैकयी (मानसांतील) सती जाण्यास निघाली नव्हती असे म्हणण्यास आधार नसून **'सब माता' 'राखत सकल'** या शब्दांत कैकयीचा समावेश होतोच; व मानसांतील कैकयीला तर इतरांपेक्षा अधिक आनंद झाला असता; कारण तिच्यातील सुरमाया पळून गेल्यामुळे दुष्ट कैकयी उरलेली नसून पश्चात्तापाने मृतवत झालेली कैकयी राहिली आहे. वा. रा. असे झालेले नाही; तिचा दुष्टपणा शिल्लक राहिला आहे. यापेक्षा अधिक चर्चा करण्याची आवश्यकता नाही.

## (५) गोस्वामींनी हे वर्णन का केले?

वा. रा. माता सती गेलेल्या नाहीत व भरताने विनंतीही केलेली नाही. तेथे ही 'त्या सती का गेल्या नाहीत' हा प्रश्न अविवेकी व्यक्ती विचारतील हे जाणून वाल्मीकीचेच अवतार असणाऱ्या गोस्वामींनी गुरुपरंपरेने श्रवण केल्याप्रमाणे वर्णन केले. एवढ्यानेच ज्यांचे समाधान होणार नाही त्यांनी प्रस्तावनेतील (छापील) **श्रीरामचरितमानस - विचित्रकथा प्रबंध** (पृ. १२४) हे समग्र प्रकरण लक्षपूर्वक पाहावे.

**चौ. ३-५ (१) चंदन** — चंदनांत अनेक जाती - प्रकार आहेत; **अगरु =** अगुरु, ही एक पिवळी व काळी चंदनाची जात आहे. कृष्णागुरु = काळा चंदन, शिसवीच्या लाकडांचा नार, गाभा. याशिवाय अनेक वृक्षांच्या काष्ठांना सुगंध येतो. उदा. बकुळीची काष्ठे (जाडी) जाळून पहावी. **सुगंधी द्रव्ये —** कालगुरु, लोहवात, सरलद्रव (देवदाराचा डिंक) कस्तुरी, गोरोचन, अंबर, फलकर्पूर (गहुला) कापूर, तैलपर्णिक, नागरमोथा, रक्तचंदन; वाळा, कंकोळ, मलिगंधि (मोगऱ्याच्या फुलांसारखा सुगंध येणारे काष्ठ) गुगुळ, (अमरकोष —) इत्यादी; शिवाय सुवासिक फुले, अत्तरे वगैरे. **(क) चिता रचून (बनाई =) सजविली -** चितेवर गालिचा सारखी सुवासिक कोमल कुसुमांची शेज रचून, सर्व चिता पुष्पमाला, हार, गुलाल, बुक्का इत्यादींनी शृंगारली असेल. **(ख) शरयूतटी-** तिकडील टीकाकार लिहितात की अयोध्येच्या पूर्वेस चार कोसांवर बिल्वहरिघाट या ठिकाणी दहन केले. याला हल्ली **बेल हरघाट** म्हणतात. **(ग) दाहक्रीया** = दहनविधि; मेलेला देह जाळण्याची शास्त्रोक्त पद्धती. **(घ) स्नाने करूनि तिलांजली दिधली -**

दहनविधि पूर्ण झाल्यावर, प्रथम, क्रिया करणाराने स्नान करून अश्म्यावर तिलयुक्त जल त्या मृताच्या नावाने द्यावयाचे असते. व मग इतर नातेवाईक, इष्ट मित्र वगैरे तसेच करतात.

हिं. *। सोधि सुमृति सब बेद पुराना । कीन्ह भरत दसगात बिधाना ॥६॥*
*। जहँ जस मुनिबर आयसु दीन्हा । तहँ तस सहस भाँति सबु कीन्हा ॥७॥*
*। भए बिसुद्ध दिए सब दाना । धेनु बाजि गज बाहन नाना ॥८॥*

दो. *। सिंघासन भूषन बसन अन्न धरनि धन धाम ॥*
*॥ दिए भरत लहि भूमिसुर भे परिपूरन काम ॥१७०॥*

म. *। श्रुति-स्मृति अनुसार पुराणां । भरत करति दशगात्र-विधाना ॥६॥*
*। आज्ञा देति जिथें जशि मुनिवर । तिथें तसे कृत सर्व अमित वर ॥७॥*
*। होति विशुद्ध देति बहु दानां । धेनु वाजि गज वाहन नाना ॥८॥*

दो. *। सिंहासन भूषण वसन अन्न धरणि धन धाम ॥*
*॥ भरत भूसुरां देति ते झाले प्रपूर्ण-काम ॥१७०॥*

**अर्थ** - श्रुति-स्मृति-पुराणोक्त पद्धतीने भरताने दहा दिवसांची क्रिया (दशगात्र विधान) यथासांग केली.॥६॥ वसिष्ठादि मुनिवरांनी जिथे जे जसे करण्याची आज्ञा दिली तिथे ते तसे अनेकपट व उत्तम (वर) प्रकारे केले. ॥७॥ (बाराव्या दिवशी) विशेष शुद्ध झाले व पुष्कळ दाने दिली ती - धेनू, घोडे, हत्ती, नाना प्रकारची वाहने ॥८॥ सिंहासने, विविध अलंकार, वस्त्रे, धान्यादि पदार्थ, जमीन (भूमि) धन, घरे इ. भरताने (व शत्रुघ्नाने) ब्राह्मणांना दिली व ते (दान घेणारे ब्राह्मण) सर्वबाजूनी पूर्णकाम झाले. (आणखी काही मिळावे अशी इच्छा राहिली नाही.) ॥दो. १७०॥

**टीका - चौ. ६-७ (१) दशगात्रविधान** हा शब्द हेतुपूर्वक वापरलेला दिसतो. दहा दिवस, रोज जी क्रिया करावी म्हणून सांगितले आहे त्यांतील हेतु या दशगात्रविधान शब्दाने सूचित केला आहे. प्रत्येक दिवसाच्या क्रियेत त्या प्रेताच्या अतिवाहिक देहाच्या रचनेसाठी एका गात्राची (अवयवाची अथवा अवयव समूहाची) निर्मिती होत असते. त्यांचा क्रम असा आहे - पहिल्या दिवशी शिर (मस्तक) २. डोळे, कान, नाक इ. ३ भुज, छाती, मान, ४. पाठीमागला भाग, कुक्षि, कटि, नाभि, गुद, लिंग, ५. ऊरू जानू, जंघा, ६. गुल्फ पादांगुलि आदि. ७. अस्थि मज्जा शिरा आदि, ८. नख रोमादि, ९. शेष राहिलेले सर्व अवयव

आणि १०. दाहव्या दिवसाच्या क्रियेत क्षुधातृषानिवृत्ति याप्रमाणे सर्व अवयवांची निर्मिती होते. (ऋग्वेदी ब्रह्मकर्म) या प्रकारे दहावे दिवशी अतिवाहिक देहाची रचना पूर्ण झाल्यास तो अतिवाहिक देहधारी तेथून निघून जातो व तत्क्षणी कावळे त्या प्रेत-पिंडावर तुटून पडतात. **(क) अतिवाहिक देहाविषयी** 'यातना शरीर' (दो. १४६) च्या टीकेत लिहिले आहे.

(२) दशगात्र विधानाचा उल्लेख म्हणजे दाहव्या दिवसाची क्रिया पूर्ण झाल्याचा उल्लेख या सहाव्या चौपाईत केला; दोह्याच्या दोन ओळी व दोन चौपाया मिळून १० ओळी झाल्या. वसिष्ठादि मुनि आले त्याच दिवशी दहन संस्कार म्हणजे पहिल्या दिवसाची क्रिया उरकली. याप्रमाणे पहिल्या दिवसाच्या क्रियेपासून १० व्या दिवसाच्या क्रियेपर्यंतचे वर्णन १० ओळीत केले. **(क)** पुत्राला पितृमरणाची वातमी समजल्यापासून १० दिवस मृताशौच (सुतक) असते. ११ व्या दिवशी सर्व सपिंडांचे सुतक फिटते व ते शुद्ध होतात. तसाच क्रिया कर्ताही शुद्ध होतो; पण त्यास पुढील क्रिया करावयाची असल्याने त्यास कर्मांग-अशौच सपिंडीपर्यंत असते. बाराव्या दिवशी सपिंडी करण्यास परवानगी आहे; म्हणजे आठव्या चौपाईत, म्हणजे १२ व्या ओळीत वि-शुद्ध (विशेष शुद्ध) झाल्याचा उल्लेख करून सुचविले की सपिंड श्राद्ध १२ व्या दिवशी केले. ११ व्या दिवशी एकोद्दिष्ट श्राद्धविधि उरकल्यानंतर दान संकल्प करण्यांची पद्धती इकडे प्रचलित आहे; पण भरताने व शत्रुघ्नाने १२ व्या, १३ व्या व १४ व्या दिवशी (रोज) दाने दिली हे तीन ओळीत दानांचा उल्लेख करून सुचविले आहे.

**चौ. ८. (१) होति विशुद्ध** या विषयी वर आधीच लिहिले आहे; व त्यास आधार असा (१३-१०-५४) वा. रा. पाहतां सापडला. **'द्वादशेहनि संप्राते** श्राद्धकर्माण्यकारयत् ॥१॥ **ब्राह्मणेभ्यो ददौ पुत्री राज्ञस्तस्यौर्ध्वदेहिकम'** (२।७७।१-३). वर ज्या दानांचा उल्लेख केला तीच दिली असे समजू नये. 'धेनु' ने वृषादिकांचे दान; वाहने = पालख्या, रथ, मेणे इ. वसन शब्दाने शय्या वगैरे, अन्न शब्दाने धान्य, तेल, तूप मीठ, गूळ, मध इत्यादी पदार्थ, अशाप्रकारे अनेक वस्तू सुचविल्या आहेत.

***श्री मानस-गूढार्थचंद्रिका अयोध्या काण्ड अध्याय १६ वा समाप्त.***



# अध्याय १७ वा

*हिं. । पितुहित भरत कीन्हि जसि करनी । सो मुख लाख जाइ नहिं बरनी ॥१॥*
*म. । करणि पितृहिता कृत जशि भरते। लाखमुखींहि न ती सांगवते ॥१॥*

**अर्थ** - पित्याच्या कल्याणासाठी भरताने जशी क्रिया केली ती लाख मुखानी सुद्धा वर्णन करून सांगता येत नाही. सांगता येणार नाही. ॥१॥

**टीका - (१) पितृहिता** - याने सांगून ठेवले की ही क्रिया व तदंगभूत दाने इ. गोष्टी त्या मृताच्या कल्याणासाठी करावयाच्या असतात. त्या श्रद्धेने व यथाविधि केल्या तर त्या त्या मृतांचे कल्याण होते; पितरादि कर्त्यावर संतुष्ट होतात.

**वि. ल. टे.** अलीकडे मृताशौच वगैरे (सुतक, सोहेर) पाळण्याचे बहुतेक बंदच झाले आहे; परंतु या बाबतीत योगाभ्यासी मंडळींस आलेल्या अनुभवाचा येथे उल्लेख करून ठेवणे वाचकांच्या कल्याणाच्या दृष्टीने कर्तव्य वाटते. जे खाली लिहिले आहे त्याबद्दलचा लेख योगी श्रीयुत वामनराव दत्तात्रय गुळवणी, मास्तर पुणे (नारायण घ.नं. २०) यांना आलेल्या पत्रांत (साधकाच्या) पहावयास सापडला. एक ध्यानाभ्यासी पुरुष रोज अभ्यासास बसला म्हणजे प्रथम पंचायतन देवतांच्या एकाक्षर बीजमंत्रांचा उच्चार आपोआप क्रमशः होत असे. एका बीजाचा उच्चार झाला की त्या देवतेचा प्रवेश शरीरात झाल्याचा व नंतर थोड्या वेळाने ती देवता निघून गेल्याचा अनुभव क्रमशः रोज येत असे. पण एक दोन दिवस बीजोच्चारादि काही आपोआप घडले नाही व मुद्दाम बीजांचा उच्चार करूनसुद्धा देवतांचा प्रवेश नित्याप्रमाणे झाला नाही. त्यामुळे व कारण न समजल्यामुळे तो खिन्न झाला. पण दोन दिवसांनी त्यास कळले की ते दोन दिवस मृताशौचातले होते. व पुढेही ११ दिवसं पूर्ण होईपर्यत पूर्वीचे अनुभव आले नाहीत. अशौच निवृति झाल्यावर पूर्ववत अनुभव येऊ लागले. यावरून प्रत्यक्ष प्रमाणानेही ठरले की अशौचांत शरीरात अपवित्रता उत्पन्न होते. वाटेल त्या दंतकथेवर व व्यक्तीवर विश्वास ठेवणारा हा लेखक नाही. कोकणात कोकणस्थ जातीत जन्मलेली व पाश्चात्य शिक्षण इ. अनेक संस्कारांनी पक्की चिकित्सक बनलेली ही बुद्धी आहे. हस्तलिखित, विद्यमान नवशिक्या साधकाने लिहिलेला अनुभव श्री. गुळवणींना आलेल्या पत्रांत पाहिला म्हणूनच वरील उल्लेख येथे केला आहे.

येथे 'नृपक्रिया' प्रकरण समाप्त झाले. येथून पुढे भरतचरित्राच्या प्रमुख भागाचा प्रारंभ होतो. त्यांतील - **"सपुरजन" गेले भरत जिथे प्रभु सुखघन"** हे प्रकरण व त्यांतले **अयोध्येतील प्रथम दरबार प्रकरण** (१७१।२ - १८५।४)

*हिं.* ***। सुदिनु सोधि मुनिबर तब आए । सचिव महाजन सकल बोलाए ॥२॥***
***। बैठे राजसभाँ सब जाई । पठए बोलि भरत दोउ भाई ॥३॥***
***। भरतु बसिष्ठ निकट बैठारे । नीति धरममय बचन उचारे ॥४॥***
***। प्रथम कथा सब मुनिबर बरनी । कैकइ कुटिल कीन्हि जसि करनी ॥५॥***
***। भूप धर्मब्रतु सत्य सराहा । जेहिं तनु परिहरि प्रेमु निबाहा ॥६॥***

*म.* ***। बघुनि दिवस शुभ मुनिवर आले । सचिव महाजन सकल अणविले ॥२॥***
***। राजसभे बसले सब जाउनि । भरत सबंधु घेति बोलावुनि ॥३॥***
***। भरता निकट वसिष्ठ बसविती । नीति-धर्ममय बचन बोलती ॥४॥***
***। मुनिवर वदले प्रथम कथेसी । कैकयि करणी कुटिल करि जशी ॥५॥***
***। नृप-धर्मव्रत सत्यहि वानिति । त्यजुनि तनुस जे प्रेम निभाविति ॥६॥***

**अर्थ -** शुभ दिवस पाहून मुनिश्रेष्ठ वसिष्ठ आले आणि सचिव महाजन व इतर सगळे सभासद यांना बोलावून आणविले ॥२॥ सर्व मंडळी राजसभेत जाऊन बसली तेव्हा (वसिष्ठांनी) भावासह भरतांस बोलावून घेतले. ॥३॥ (भरत आल्यावर) वसिष्ठांनी भरतास आपल्याजवळ बसविले आणि नीतिमय व धर्ममय भाषणास प्रारंभ केला. ॥४॥ प्रथम मुनिवर वसिष्ठांनी कैकयीने कुटिल करणी जशी केली ती सर्व कथा सांगितली. ॥५॥ (नंतर) शरीराचा त्याग करून ज्यानी आपल्या प्रेमाचा निर्वाह केला त्या दशरथ राजांचे धर्मव्रत व सत्यव्रत यांची प्रशंसा केली.॥६॥

**टीका - चौ. २-४- (१) बघुनि दिवस शुभ** - भरताला राज्य समर्पण करण्याच्या फार महत्त्वाच्या शुभ कार्याचा विचार व निर्णय सभेत करावयाचा असल्याने त्या कार्यास अनुकुल असा शुभ दिवस पाहिला. वसिष्ठांच्या व कौसल्यादि सर्वांच्या इच्छेप्रमाणे भरताने राज्याचा स्वीकार केला असता तर जितके शुभ = कल्याण झाले असते, 'कल्याणं मंगलं शुभम्' (अमरे) त्याच्या अनंतपटीनी कल्याण व सर्वांचे समाधान या शुभदिवशी भरविल्या जाणाऱ्या सभेने होणार आहे. वसिष्ठ त्रिकालज्ञ सर्वज्ञ असल्याने भरत राज्यस्वीकार करणार नाहीत हे पक्के जाणत असले तरी व्यवहार व्यवहाराच्या मार्गाने करणे जरूर होते. **(क) भरत सबंधु**

**घेति बोलावुनि** - शत्रुघ्न छायेप्रमाणे भरतानुगामी आहे; व त्याला न बोलावला तरी तो भरताबरोबर येणार हे माहीत असले तरी राजपुत्र नात्याने या महत्त्वाच्या सभेत बोलावणे कर्तव्यच होते. दोघांना बोलावले यांत अलौकिक असे काही नाही. **(ख) वसिष्ठ भरता (निज) निकट बसविती** - भरतशत्रुघ्न आल्याचा उल्लेख गाळून सुचविले की निरोप पोचताच **दोघे बंधू त्वरेने आले.** शत्रुघ्नास जवळ बसविल्याचा उल्लेख नसला तरी जसे दोघांना बोलावले तसे दोघांना जवळ बसविले. उजव्या बाजूस भरत व डाव्या बाजूस शत्रुघ्नास बसविले. जसे राम विश्वामित्र लक्ष्मण जनकसभेत दिसले तसेच भरत वसिष्ठ शत्रुघ्न या सभेत शोभले असतील. **जवळ बसविणे हे प्रेमाचे व आदराचे लक्षण आहे. 'भेटणे, हृदयाशी धरणे, बसविणे' प्रस्तावना** पृ. ५५७ पहा. कानांत हितगुज सांगण्यासाठी जवळ बसविले इत्यादि कल्पना करणे दुस्तर्क आहेत. सभेच्या पूर्वी भरतास एकांतात भेटून सांगण्यास वसिष्ठांस मनाई कोणी केली असती?

(२) **नीति-धर्ममय वचन बोलती** - नीतीचा उल्लेख प्रथम करून सुचविले की वसिष्ठ आपल्या भाषणात राजनीतीला प्रामुख्य देऊन बोलणार आहेत; पण भरत राजनीतीला महत्त्व न देता धर्माकडेच लक्ष देणार आहेत. श्रीकृष्ण व अर्जुन यांची कुरुक्षेत्राच्या रणभूमीत अशीच भूमिका आहे; पण येथे धर्मनीतिपुढे राजनीतीला संपूर्ण शरणचिठी द्यावी लागणार आहे. राजनीतीला प्राधान्य कोठे व धर्मनीतीला प्रामुख्य कोठे द्यावयाचे हे ठरविणे फार बिकट असते व देशकालपरिस्थितीवर अवलंबून असते.

**चौ. ५ - (१) प्रथम वदले... कैकयि करणी कुटिल करि जशी'** - भरताने राज्याचा स्वीकार करावा हा मुख्य विषय प्रतिपादन करावयाचा आहे; म्हणून 'भरतराज्य' या विषयाचा उगम जेथून व जसा झाला त्याचा उल्लेख करून मुख्य विषयाचा उपन्यास करण्याची भूमिका तयार करणे जरूर होते. प्रश्न एवढाच उरतो की 'कुटिल' शब्द येथे का वापरला? **कुटिल** शब्द येथे कैकयीला वापरलेला नसून तिच्या करणीला वापरला आहे व तो वसिष्ठांनी वापरलेला नसून कवींनी वापरला आहे. कवींनी कैकयीलाही अनेकवेळा कुटिल, कपटी, कुमती म्हटले आहे. वसिष्ठ कैकयीला निर्दोषी ठरविणार आहेत.

**चौ. ६ - (१) नृप-धर्मव्रत सत्य हि वानिति** - धर्मव्रत व सत्यव्रत यांची प्रशंसा केली. पूर्वी ठेव म्हणून ठेवलेले वर ठेवणारीने मागितले असता देण्यास

प्रतिज्ञाबद्ध झाले यांत धर्मनिष्ठा, व्रत म्हणून धर्माचे पालन करणे धर्मव्रत दिसून आले. प्रतिज्ञा केल्याप्रमाणे मागणाराने वर मागितल्यावर दिले. नाकबूल झाले नाहीत, वचन मोडले नाही यांत सत्यव्रत दिसून आले. प्रशंसा करण्याने सुचविले की महाराजांनी जे केले ते दुष्कर असून केले हे अगदी योग्यच केले. अत्यंत प्रशंसनीय केले. रामवनवास व भरताला राज्य देण्याचे मान्य करून राजांनी स्वतःची व कुलाची कीर्ती वाढविली इ. सांगितले. **(क) त्यजुनि तनुस जे प्रेम निभाविति** - रामप्रेमाची पूर्ति देहत्याग करून केली. हा चरण वसिष्ठोक्ति नाही हे लक्षात ठेवणे जरूर आहे. **(ख)** राजाच्या धर्मव्रताची व सत्यव्रताची जी प्रशंसा केली ती ध्वनित करते की राजानी दिलेले वचन पूर्ण करण्याची निम्मी जबाबदारी ही सभा व भरत यांच्यावर आहे. महाराजांचे एकवचन पूर्ण करण्याची जबाबदारी रघुनाथांवर होती ती त्यांनी पूर्ण केली व आनंदाने वनात गेले इ. मुनींनी सांगितले व राहिलेले दुसरे वचन पूर्ण करण्याची जबाबदारी तुमच्यावर आहे हा मुख्य मुद्दा सांगावयाचा आहे; पण रामवनवासाची स्मृती जागृत होताच वसिष्ठांची काय दशा झाली ते पुढील चौपायांत कवी सांगतात.

हिं ***। कहत राम गुन सील सुभाऊ । सजल नयन पुलकेउ मुनिराऊ ॥७॥***
***। बहुरि लखन सिय प्रीति बखानी । सोक सनेह मगन मुनि ग्यानी ॥८॥***
दो. ***। सुनहु भरत भावी प्रबल बिलखि कहेउ मुनिनाथ ॥***
***। हानि लाभु जीवनु मरनु जसु अपजसु बिधि हाथ ॥१७१॥***
म. ***। वदत राम-गुण-शिला-स्वभावा । लोचन सजल पुलक मुनिरावा ॥७॥***
***। लक्ष्मण-सिता-प्रीति मग वानुनि । स्नेहिं शोकिं बुडले ज्ञानी मुनि ॥८॥***
दो. ***। पहा भरत भावी प्रबल कथित बिकल मुनिनाथिं ॥***
***॥ हानि लाभ जीवन मरण यश अपयश विधिहातिं ॥१७१॥***

**अर्थ** - रामचंद्रांच्या (रूप) गुण, शील व स्वभावाचे वर्णन करताना मुनिश्रेष्ठांच्या डोळ्यात पाणी आले व अंगावर रोमांच उठले ॥७॥ मग लक्ष्मण व सीता यांची रामप्रीति वाखाणून ज्ञानीमुनि स्नेह व शोक यांत बुडले (मग्न झाले; तटस्थ झाले) ॥८॥ (नंतर काही वेळाने) मुनिनाथानी व्याकुळ होऊन सांगितले की हे पहा ! भरत ! भावी प्रबल असते आणि हानि लाभ, जीवन, मरण, यश, अपयश इ. गोष्टी विधिच्या (प्रारब्धाच्या) हाती असतात. ॥दो. १७१॥

**टीका. - चौ. ७ - (१) वदत राम गुण शिला-स्वभावा ... मुनिरावा-** यांतील पूर्वार्ध एकाच शब्दाच्या फरकाने पूर्वी दोन वेळा आला आहे. **रामरूपगुण शिला स्वभावा । बघुनि परिसुनी प्रमोद रावा'** (२।१।८). **'रामरूप गुण शिला स्वभावा । स्मरुनी स्मरुनि शोक हृदिं रावा'** (१४९।६) **रूप** शब्द येथील चौपाईत नाही तो या द्विरुक्तीने येथे घ्यावयाचा आणि अश्रुरोमांच आले ते शोकामुळे आले हे (१४९।६) वरून जाणावयाचे आहे. १४९।६ व ही येथील चौपाई यांनी दाखविले की राम परमात्मा आहेत हे न जाणणाऱ्या दशरथांची स्मरणाने जी दशा झाली ती तशीच हे रहस्य जाणणाऱ्या मुनिराज वसिष्ठांची झाली (१४९।६ टी.प.)

**चौ. ८ (१) स्नेहिं शोकिं बुडले ज्ञानी मुनि** - रामवनवासाच्या साहव्या रात्री दशरथ मरण झाले; नंतर १५ व्या दिवशी भरत आले; नंतर १४ दिवस क्रिया व दान यांत गेले म्हणजे ६ + १५ + १४ = ३५ दिवस गेले. अधिक काही दिवस शुभ दिवस सापडेपर्यंत गेले. ते ५/७ धरले तर रामलक्ष्मणसीता यांचा विरह झाल्यानंतर ४०/४२ व्या दिवशी वसिष्ठांसारखे विज्ञानी ब्रह्मनिष्ठ शोकाकुल झाले. रामलक्ष्मणसीता प्रेम वर्णन करता करता वाणी रुद्ध झाली, मन आपले कार्य विसरून या तिघांच्या स्नेहामुळे विरहजनित शोक रस सागरात त्याने बुडी मारली व देह तटस्थ झाला. मूर्च्छा आली नाही इतकेच ! मग ज्या भरताला त्यांचे वनगमन पाहण्यास सापडले नाही, राममुखातील सांत्वनाचे शब्द ऐकावयास मिळाले नाहीत, त्यांची काय दशा असेल हे कोण कसे सांगणार ! हे येथे ध्वनित केले. वसिष्ठ शोकाकुल झाले यावरून कोणी म्हणेल की ते अज्ञानी होते; म्हणून 'ज्ञानी मुनि' हे शब्द मुद्दाम घालून सुचविले की - **'तयां समीप किं मोह नि ममता । ही सियरामस्नेह - महत्ता ॥ रामस्नेहरसाळ मनाचा । साधुसभे अति आदर त्याचा'** (२७७।२)

**दो. (१) पहा भरत भावी प्रबळ** - भाव हा की ज्या गोष्टी घडल्या त्या होऊ न देणे माझ्या शक्तीच्या बाहेरचे होते. हे भावी माझ्या शक्तीच्यापेक्षा प्रबळ होते; नाहीतर मी हे होऊ दिले नसते. **(क) कथित विकल मुनिनाथिं** - हे मुनिनाथ असून, शोक करू नका वगैरे सांगण्यासाठी बसले असून यांना अजून शोक आवरता येत नाही. व्याकुळ होऊनच बोलत आहेत. येथे पुन्हा व्याकुळतेचा उल्लेख करून सुचविले की वारंवार व्याकुळ होत आहेत. मग भरतासारखा प्रेमळ भाऊ या मुनींच्या उपदेशाने राज्याचा स्वीकार करील व अयोध्येत राहील

हे कसे शक्य आहे? **(ख) हानि लाभ, जीवन मरण, यश, अपयश विधिहातिं -** सर्व लोकांना वाटत आहे की रामवनवास म्हणजे महा हानी झाली, देवांना वाटत आहे की मोठा लाभ झाला. कैकयीला वाटत होते की फार मोठा लाभ झाला. राण्या सती जाण्यास निघाल्या असता त्या जिवंत राहिल्या; म्हणून त्यांना वाटते राम वनवासास गेले, राजे मरण पावले आणि आम्ही अभागी जिवंत राहिलो. दशरथ राजा व रामलक्ष्मण सीता यांना सुयश मिळाले आणि कैकयीला अपयश मिळाले; पण या गोष्टी व्हाव्या किंवा होऊ नयेत असे वाटण्याचा काही उपयोग नाही. दैवयोगाने त्या होणारच. त्या चुकविता येणे कोणाच्याही हाती नाही. म्हणून आता सांगतील की यांत कोणाचाच दोष नाही.

***हिं. । अस बिचारि केहि देइअ दोसू । ब्यरथ काहि पर कीजिअ रोसू ॥१॥***
***। तात बिचारु करहु मन माहीं । सोच जोगु दसरथ नृपु नाहीं ॥२॥***
***। सोचिअ बिप्र जो बेद बिहीना । तजि निज धरमु बिषय लयलीना ॥३॥***
***। सोचिअ नृपति जो नीति न जाना । जेहि न प्रजा प्रिय प्रान समाना ॥४॥***
***। सोचिअ बयसु कृपन धनवानू । जो न अतिथि सिव भगति सुजानू ॥५॥***
***। सोचिअ सूद्र बिप्र अवमानी। मुखर मानप्रिय ग्यान गुमानी ॥६॥***
***। सोचिअ पुनि पतिबंचक नारी । कुटिल कलहप्रिय इच्छाचारी ॥७॥***

***म. । हें जाणुनि कोणा द्या दोषा । वृथा कुणावर करणें रोषा ॥१॥***
***। तात ! विचार करुनि मनिं पाही । शोचनीय नृप दशरथ नाहीं ॥२॥***
***। शोच्य विप्र जो वेद - विहीन । त्यजुनी स्वधर्म विषयीं लीन ॥३॥***
***। शोच्य नृपति जो नीति न जाणत । प्रजा प्राणशी प्रिय ना वाटत ॥४॥***
***। वैश्य कृपण धनवान शोच्य तो । जो न अतिथि - शिव - भक्ति जाणतो ॥५॥***
***। शूद्र विप्रअपमानि शोच्य तो । मानी ज्ञानगर्वि बहु वदतो ॥६॥***
***। शोचनीय पतिवंचक नारी । कुटिल कलहरत इच्छाधारी ॥७॥***

**अर्थ** - हे जाणून कोणाला दोष द्यावा (या) व कोणावर वृथा क्रोध करावा ॥१॥ तात ! मनात विचार करून पहा (म्हणजे कळेल) कीं राजा दशरथ शोचनीय नाहीत.॥२॥ जो विप्र वेदविहीन असेल (वेद पठन केलेले नसेल) व स्वधर्माचा त्याग करून विषयांत मग्न असेल तो शोच्य : शोक करण्याजोगा आहे.॥३॥ जो राजनीती जाणत नाही व ज्याला प्रजा प्राणासारखी प्रिय वाटत नाही तो राजा शोच्य आहे.॥४॥ जो वैश्य धनवान असून कृपण आहे, आणि

अतिथिभक्ती व शिवभक्ति जाणत - करत नाही तो शोच्य आहे.।।५।। जो शूद्र ब्राह्मणांचा अपमान करतो, ज्याला ज्ञानाचा गर्व आहे, जो मानी आहे आणि जास्त बोलतो तो शोच्य आहे.।।६।। जी स्त्री पतीची वंचना करते आणि कुटिल, कलहप्रिय व स्वेच्छाचारी आहे ती शोचनीय आहे. ।।७।।

**टीका. चौ. १ - (१) हें जाणुनि कोणा द्या दोषा** - हानिलाभ जीवनमरण इ. गोष्टी दैवाच्या प्राबल्याने घडल्या व घडतात हे जाणल्यावर झालेल्या अपरिमित हानीबद्दल किंवा मरणाबद्दल कोणालाही दोष देण्यास जागा नाही. कारण अशा अवश्यं भावी गोष्टी घडण्यास ज्या कोणीतरी निमित्त होतात त्या व्यक्तींचासुद्धा तो दोष नसतो. सांगितले की राजांना किंवा कैकयीला दोष देण्याचे कारण नाही; व त्यांच्यावर रोष करण्याचेही कारण नाही. रोष करणे निरर्थक - व्यर्थ आहे.

**चौ. २-३ (१) सूचना - दशरथ राजा शोचनीय नाहीत** हा मुख्य प्रस्तुत विषय आहे; पण त्या निमित्ताने चार वर्ण, स्त्रिया व चार आश्रम यांच्या धर्माचा विचार अगदी संक्षेपाने करून मग तीन चौपायांत मानवधर्म सुचविला आहे; व नंतर मुख्य विषयाचा उपसंहार केला आहे. शोचनीयांच्या यादीत एकंदर बारा प्रकार आहेत. भ. गीतेतील **'अशोच्या नन्वशोचस्त्वम्'** हा श्लोक अध्यात्मदृष्टीनेच सांगितला असल्याने तेथे शोचनीय कोण याचा विस्तार केलेला नाही. येथे कर्म-धर्म मार्गाचाच विचार असल्याने हा विस्तार योग्यच आहे. अध्यात्म दृष्टीने कोणीच शोच्य नाही. **(क) शोच्य विप्र जो वेद विहीन** - वेदहीनच नव्हे तर वेदविहीन. **'त्रिभ्य एव तु वेदेभ्यः सारं सारम दूदुहहत्'** असा जो तिन्ही वेदांचे सार असलेला गायत्री मंत्र त्याचे अनुष्ठान सुद्धा करीत नाहीत ते वेदविहीन. **'सावित्री (= गायत्री) मंत्रसारोऽपि वरं विप्रः सुयंत्रितः ॥ नाऽयोत्रितः त्रिवेदोऽपि सर्वाशी सर्वविक्रयी' (शाकल). वेदाध्ययन न केलेला = वेदहीन.** या श्लोकांतील अयंत्रितचा अर्थ येथे विषयलीन शब्दाने सांगितला आणि सर्वाशी = वाटेल ते खाणारा व सर्व विक्रयी = वाटेल ते पदार्थ विकणारा याचा अर्थ 'त्यजुनी स्वधर्म' या शब्दांनी सांगितला असे म्हटले तरी चालेल. **'वर्णानां ब्राह्मणो गुरुः'** म्हणून त्यांचा उल्लेख प्रथम केला.

**चौ. ४-६ - (१) शोच्य नृपति जो नीति न जाणत... वाटत** - याने सुचविले की दशरथ राजा नीति जाणत होते व त्यांना प्रजा प्राणांसारखी प्रिय होती;

कारण ते शोचनीय नाहीत हे आधीच सांगितले आहे. आणखी हे ध्वनित केले की नीतीचे पालन करून राजांच्या प्राणप्रिय प्रजेचे पालन करण्याची जबाबदारी त्यांच्या इच्छेप्रमाणे - भरतानी स्वीकारणे जरूर आहे. **'जिथें प्रजा प्रिय दुःखी भारी । तो नृप खचित निरय अधिकारी'** ही नीती रघुनाथांनी सांगितली आहे. (७१।६-७) **(क) वैश्य कृपण धनवान शोच्य तो । न भक्ति जाणतो** - धनवान वैश्याने आपले धन उदारपणाने बाकीच्या तीन वर्णांच्या सेवेत खर्च केले पाहिजे. १।२८७।३-५ टी. पहा. अतिथि पूजा-सेवा भक्तीने केल्यानेच व शिवभक्तीने धनधान्यादि संपत्तीची प्राप्ति होते व वृद्धी होते. **'इच्छित फळ विण शिव आराधन । न मिळे करुनि योग जप साधन'** (१।७ व ८) **(ख)** शूद्र विप्र-अपमानि शोच्य तो ।... बहुवदतो – द्विजां शूद्र उपदिशती ज्ञाना । कंठिं जानवें, घेति कुदानां ।।२।। 'शूद्र भांडती द्विजांसह आम्हि किं कांहीं न्यून ।। ब्रह्म जाणि तो विप्रवर बघती संतापून' (७।९९।) असे कलियुग - प्रभाव वर्णनांत सांगितले आहे. **(ग)** या प्रमाणे चार ओळींत चार वर्णांचे धर्म सुचविले. आता स्त्री जातीचा धर्म सुचवितात. शूद्रांनंतर सर्व वर्णांच्या स्त्रियांचा उल्लेख करून स्त्री-शूद्र समता धार्मिक बाबतीत सुचविली.

**चौ. ७ - (१) पतिवंचक** - पतीला फसविणारी, त्याचा विश्वासघात करणारी; कपट-असत्य, लपवालपव यांचा प्रयोग (उपयोग) पतीवरसुद्धा करणारी, पतिसेवा करून त्याच्या डोळ्यांत धूळ फेकणारी. **कलहरत** - कलह = भांडण, तंटा, कुटुंबकलह इत्यादी गोड वाटणारी; व स्वतःच्या इच्छेप्रमाणे वागणारी म्हणजे पतीची व गुरुजनांची आज्ञा न मानणारी स्त्री शोचनीय आहे. ही सर्व विशेषणे कैकयीला लागू आहेत की नाहीत याचा शोध घ्यावा ! आता ब्रह्मचर्यादि चार आश्रमांचे धर्म सुचवितात.

*हिं. । सोचिअ बटु निज ब्रतु परिहरई । जो नहिं गुर आयसु अनुसरई ।।८।।*

*दो. । सोचिअ गृही जो मोह बस करइ करम पथ त्याग ।।*
*।। सोचिअ जती प्रपंच रत बिगत बिबेक बिराग ।।१७२।।*

*हिं. । बैखानस सोइ सोचै जोगू । तपु बिहाइ जेहि भावइ भोगू ।।१।।*
*। सोचिअ पिसुन अकारन क्रोधी । जननि जनक गुर बंधु बिरोधी ।।२।।*
*। सब बिधि सोचिअ पर अपकारी । निजतनु - पोषक निरदय भारी ।।३।।*
*। सोचनीय सबहीं बिधि सोई । जो न छाड़ि छलु हरिजन होई ।।४।।*

म. *। ब्रह्मचर्य जो व्रत ना पाळी । शोच्य किं बटु गुर्वाज्ञा टाळी ॥८॥*
दो. *। शोच्य गृही जो मोहवश कर्मपथाला त्यागि ॥*
*॥ शोच्यहि यती प्रपंच - रत जो न विवेकि विरागि ॥१७२॥*
म. *। वानप्रस्थहि शोका-जोगा । त्यजुनि तपा ज्या आवड भोगां ॥१॥*
*। पिशुन शोच्य विण हेतू क्रोधी । जननि जनक गुरु बंधु विरोधी ॥२॥*
*। शोच्य सर्वपरिं पर-अपकारी । निजतनु पोषक निर्दय भारी ॥३॥*
*। सर्वपरीं अति शोच्य सतत तो । जो त्यजुनी छल हरिस न भजतो ॥४॥*

**अर्थ** - जो बटु (ब्रह्मचारी) ब्रह्मचर्यव्रताचे पालन करीत नाही व गुरुची आज्ञा मोडतो तो शोचनीय होय. ॥८॥ जो गृहस्थाश्रमी मोहाने कर्ममार्गाचा त्याग करतो तो शोचनीय होय. व जो यति = संन्यासी प्रपंचात मग्न असतो आणि ज्ञानवैराग्यहीन असतो तो शोच्य होय. ॥दो.१७२॥ जो वानप्रस्थ तपाचा त्याग करून भोगांत आसक्त असतो तो शोचनीय - जाणावा ॥१॥ पिशुन (चहाडखोर, परपापवक्ता); निष्कारण क्रोध करणारा, आईबाप, विद्यागुरु व भाऊ यांच्याशी विरोध करणारा शोचनीय होय. ॥२॥ दुसऱ्यांना अपकार करणारा आपल्या शरीराचेच पोषण करणारा व फार निर्दय असणारा हे सर्व प्रकारे शोचनीय होत.॥३॥ जो अन्य भरंवसा (छळ) सोडून हरिभक्ति करीत नाही तो सर्व प्रकारे नेहमी अतिशोच्य होय.॥४॥

**टीका.** (१) पूर्वीच्या पांच ओळीत ब्राह्मण, क्षत्रिय (राजा) वैश्य, शूद्र असा उतरता क्रम (अवरोह) स्त्रियांपर्यंत घेतला. आता ब्रह्मचर्य, गार्हस्थ असा चढता क्रम सुरू केला; पण गृहस्थानंतर वानप्रस्थ व संन्यासी असा आरोह (चढता) क्रम पाहिजे होता; तथापि येथे बटु, गृहस्थ, यती व वानप्रस्थ असा क्रम आहे. संन्यासी वानप्रस्थापेक्षा हीन ठरविला; आणि एकाच दोह्यांत शोच्य गृहस्थ व शोच्य यती यांचा उल्लेख करून दोघांची किंमत सारखीच ठरविली. म्हणजेच मोहाने कर्ममार्गाचा त्याग करणारा गृहस्थ आणि त्यागिलेल्या प्रपंचाचा, प्रवृत्ति मार्गाचा पुन्हा आश्रय करणारा संन्यासी या दोघांची किंमत सारखीच व असा शोच्य यती शोच्य वानप्रस्थापेक्षा हीन हेही दाखविले. त्यागलेल्याचा पुन्हा स्वीकार करणे म्हणजेच ओकून टाकलेले अन्न पुन्हा खाण्यासारखे आहे. अशाला वान्ताशी = ओकलेले खाणारा असेच श्रुतीतही म्हटलेले आहे. येथल्या शोच्य गृहस्थ व शोच्य यतींच्या वर्णनाप्रमाणेच एकाच श्लोकात श्रुतींनी वर्णन केले आहे. **'द्वाविमौ न विरज्येते विपरीतेन कर्मणा ॥ निरारम्भो गृहस्थच कार्यवांश्चैव भिक्षुकः (यति,**

**संन्यासी)'** (नार. प. उ. ६।३०) कर्म न करणारा गृहस्थ व कर्मपरायण यति हे दोघेही विपरीत कर्म करणारे आहेत; म्हणून ते शोभत नाहीत; म्हणजे त्या त्या आश्रमांस कलंकभूत ठरतात. या एकाच श्लोकांत प्रथम गृहस्थाचा व नंतर यतीचा उल्लेख येथील दोह्यांत केल्याप्रमाणेच केला आहे. **(क)** या वर्णाश्रम धर्म विवेचनाचे सार हे की श्रुति-स्मृति पुराणांनी ज्याचा जो धर्म सांगितला आहे त्याचा त्याग करणारे शोचनीय होत व त्याग न करणारे प्रशसंनीय होत. उ.कां. १२७।५ पासून धन्य कोण हे सांगून वर्णधर्माचे वर्णन केले आहे. प्रस्तावनेत 'वर्णाश्रमधर्मादि' प्र. ११।३ पहा.

**(२) चौ. २-४ - (१) शोच्य पिशुन -** वर सांगितलेल्या वर्णाश्रमधर्मपालनाच्या दृष्टीने जरी कोणी एखादा शोच्य नसला तरी या व पुढील दोन चौपायांत सांगितलेल्या लक्षणांपैकी एखादे असेल तर तो शोच्य ठरतोच. **(क) शोच्य पिशुन - कारण 'पाप पिशुनते सम कीं आन'** (७।११२।१०) **बिण हेतू क्रोधी - 'बहुत अवज्ञा प्रभु जैं घडे । ज्ञात्याचे मन रोषा चढे'**(७।१११।१५) असा सकारण क्रोध मोठमोठ्या ज्ञानी महामुनींनासुद्धा येतो पण तो शोचनीय नाही. निष्कारण, क्षुद्र कारणामुळे क्रोध येणे शोचनीय आहे. **(ख) जननिजनक गुरु...** येथे गुरु = विद्यागुरु किंवा वडील माणसे जी आईबापांच्या खालोखाल पूज्य, सेव्य असतात ती. ही तीन लक्षणे म्हणजे नरकांतून आलेल्यांची चिन्हे आहेत. **'अत्यन्त कोपः कटुकाच वाणी दरिद्रताच स्वजनेषु वैरम् ॥ नीच प्रसंगः कुलहीनसेवा चिन्हानि देहे नरकागतस्य** (चाणक्य) **'कार्पण्यवृत्तिः स्वजनेषु वैरं कुचैलता नीचजनेषु भक्तिः ॥ अतीव रोषः कटुकाच वाणी नरस्य चिन्हं नरकागतस्य'** (प.पु.) या दोन श्लोकांत फारसा फरक नाही. **भाव हा की व्यक्तिधर्माचरण पुष्कळ चांगले केले तरी ही लक्षणे असतील तर तो पुन्हा दुर्गतीला जाणारच !**

**(२) शोच्य सर्व परिं पर - अपकारी - निर्दय भारी -** 'परअपकार' (परपीडा) निर्दयता व स्वतःच्या शरीराच्या सौख्याची इच्छा ही खललक्षणे आहेत. **'परपीडेसम अधम न कांहीं ॥ नरतनु पावुनि परां पीडिती । सतत महा भवभया सोशिंती'** (७।४१।१-३) हे प्रभूंनी दुर्जनांविषयीच म्हटले आहे; मागल्या चौपाईतील लक्षणे सुद्धा दुर्जन लक्षणेच आहेत. **(क) निजतनुपोषक** = कुटुंबांतील इतर व्यक्तींचे काहीही झाले तरी जो स्वतः एकटाच नाना भोग भोगून देह पुष्ट व सुखी ठेवण्याचा प्रयत्न करतो तो. **वर्णाश्रम धर्माचे पालन करीत असून ही लक्षणे असतील**

**तर तो सर्वप्रकारे शोच्य होय.**

(३) **जो त्यजुनी छल हरिस न भजतो** - येथे या सर्व वर्णनाचे पर्यवसान शेवटी हरिभक्तिमध्येच केले; भरताने घेतलेल्या शपथांत हेच दिसते. **(क)** मनुष्य शरीर मिळून हरिभक्ति न करणे म्हणजे ईश्वराशी कृतघ्न बनणे आहे. कृतघ्नता, हे घोर पातक आहे. 'कधिं तरि करुणेने नर देहीं । धाडि ईश विण हेतू स्नेही' (७।४४।६) या करुणेचा दुरुपयोग करणे म्हणजेच हरिभजन न करणे ही सर्वापेक्षा अति शोचनीय स्थिति आहे. **(ख) दुसरा भाव हा** की वर्णाश्रमधर्मातील शोच्यता हरिभक्तीने नष्ट होऊ शकेल; पण हरिभक्तिविमुख धर्माचरणाच्या पालनाने **'पुनरपि जननं पुनरपि मरणम्'** ही परंपरा व क्लेश चुकणार नाहीत. **'चराचरा द्रोही नर असुनी । येइ समय मज शरण लक्षुनी । त्यजुनि मोहमद विविध छलासी । सद्य साधुसम करतो त्यासी'** (५।४८।२-३) ५।४४।१-३ पहा । आता मुख्य विषयाचा उपसंहार करतात.

हिं. *। सोचनीय नहिं कोसलराऊ । भुवन चारिदस प्रगट प्रभाऊ ॥५॥*
*। भयउ न अहइ न अब होनिहारा । भूप भरत जस पिता तुम्हारा ॥६॥*
*। बिधि हरिहरु सुरपति दिसिनाथा । बरनहिं सब दसरथ गुन गाथा ॥७॥*
दो. *। कहहु तात केहि भाँति कोउ करिहि बड़ाई तासु ॥*
*॥ रामलखन तुम्ह सत्रुहन सरिस सुअन सुचि जासु ॥१७३॥*
म. *। शोचनीय नहिं कोसलरावहि । भुवनिं चतुर्दश प्रगट प्रभावहि ॥५॥*
*। झाला ना, होणें ना नाहीं । भूप भरत सम तव जनकाही ॥६॥*
*। विधिहरिहर सुरनाथ दिशापति । दशरथ गुणगाथा सब बानति ॥७॥*
दो. *। तन्महती कशि वर्णवे तात ! सांग कोणास ॥*
*॥ राम लक्ष्मण नि तुम्हिं उभय, असे सूनु शुचि ज्यांस ॥१७३॥*

**अर्थ** - कोशलराव दशरथ मुळींच शोचनीय नाहीत; (कारण) त्यांचा प्रभाव चौदाही भुवनांत प्रगट आहे.॥५॥ भूप भरत ! तुमच्या पित्यासारखा भूप झाला नाही, नाही व पुढे होणार नाही.॥६॥ 'ब्रह्मा, हरि, हर, सुरनाथ (इन्द्र) व दिशापति (दिक्पाल) हे सर्व दशरथांच्या गुणकथा वर्णीत आहेत.॥७॥ ज्यांना रामलक्ष्मण तुम्ही व शत्रुघ्न असे पवित्र पुत्र झालात त्यांची महती कोणास व कशी वर्णन करता येईल.॥दो. १७३॥.

**टीका. - वि. ल. ठे. या दोह्याच्या अंगभूत सातच चौपाया आहेत;** या

कांडातील कविसंकेताप्रमाणे आठ चौपाया असावयाच्या म्हणजे एक चौपाई मुद्दाम कमी घातलेली आहे. या युक्तीने सुचविले की ही सभा दशरथांची क्रिया परिपूर्ण झाल्यावर सातव्या दिवशी भरली आहे. पूर्वी (१७१।८) टीकेत आपण अंदाजाने ५।७ ठरविले आहेत. आता निश्चितपणे ठरले की दशरथ निधनाच्या ३६ व्या दिवशी व रामवनवासाच्या ४२ व्या दिवशी ही सभा भरलेली आहे.

**चौ. (१) शोचनीय नहि कोसलराव हि** - वर जे शोचनीय म्हणून सांगितले त्यांच्यातील कोणत्याही प्रकारची शोचनीयता कोसलाधिपति दशरथांच्या ठिकाणी नव्हती - भाव हा की त्यांनी भूपधर्माचे उत्तम प्रकारे आदर्श पद्धतीने पालन केले. ब्रह्मचर्याश्रमांत ब्रह्मचर्य व्रताचे पालन करून गुरुसेवा व गुर्वाज्ञा पालन केले. गृहस्थाश्रमी झाल्यावर गृहस्थाश्रमाचे परमोत्तम पद्धतीने पालन केले. खलांच्या व इतर शोचनीयांच्या दुर्गुणांपैकी एकही त्यांच्या ठिकाणी नव्हता; आणि हरिभक्तीने मनुष्यजन्माचे सार्थक करून घेतले; म्हणूनच ब्रह्मलोकापासून पाताळापर्यंतच्या १४ भुवनांत त्यांचा प्रभाव प्रगट आहे; कीर्तिरूपाने ते प्रगट आहेत; म्हणून शोचनीय नाहीत. (२) मागील दोह्याच्या दुसऱ्या चौपाईत ज्या मुख्य विषयाचा उपक्रम केला तोच येथे पुढे चालू केला आहे. राज्याचा स्वीकार करून दशरथांसारख्या सर्व भुवनविख्यात पित्याचे व राजाचे राहिलेले एक वचन तुम्ही पूर्ण करणे तुमचे कर्तव्य आहे हा मुख्य मुद्दा सांगावयाचा असल्याने वसिष्ठ दशरथ-मरण-शोकाचीच चर्चा येथे करीत आहेत. रामवियोगशोक भरतास परमावधीचा झाला आहे हे वसिष्ठ उत्तम प्रकारे जाणतात; पण त्याचा उल्लेख जाणून बुजून ते टाळीत आहेत. त्याचा उल्लेख केल्यास भरताला कदाचित मूर्छासुद्धा येईल हे ते स्वतःच्या स्थितीवरून जाणतात. राजाची वास्तविक प्रशंसा करून, त्यांच्या प्रतिज्ञा पालनाची वाहवा करून हळुहळु भरतास हे सांगावयाचे आहे की रामचंद्रांनी जसे एक पितृवचन पूर्ण केले व राजाज्ञा पाळली; तसे दुसरे पितृवचन पूर्ण करून दशरथांस सत्यप्रतिज्ञ ठरविण्याची जबाबदारी पुत्र या नात्याने व राजाज्ञा पालनाची जबाबदारी प्रजा या नात्याने तुमची आहे; ती तुम्ही पूर्ण करावी. **जे ध्येय लोकव्यवहार दृष्टीने व राजनैतिक दृष्टीने साधावयाचे आहे, त्याच्या आड येणाऱ्या गोष्टी स्वतःस कितीही प्रिय असल्यातरी त्या काही काळ बाजूस सारणे हे व्यवहार व नीतिनिपुण, आत्मनिग्रही, मानसशास्त्रपटु कार्यकारी नेत्याचे व वक्त्याचे उत्तम लक्षण व आद्य कर्तव्य आहे.** (क) भरताचा रामस्नेह व

रामविरह शोक आपण उल्लेख न करताही सहजच सर्व सभेच्या आपोआप दृष्टीस पडणारच हे वसिष्ठ भरतस्वभावावरून व कौसल्येच्या सन्निध त्यांच्या पाहिलेल्या दशेवरून उत्तम प्रकारे जाणतात. भरताच्या परम निर्मल रामप्रेमाविषयी लोकांची निःसंदेह खात्री व्हावी असे मुनिनायकांस वाटत आहेच. ज्या भरत स्वभावाचे व रामप्रेमाचे ज्ञान अयोध्येतील पुष्कळ लोकांस उत्तम प्रकारे आहे, (दो. ४८ पहा) ते वसिष्ठात नसेल अशी शंका घेणे म्हणजे सूर्य उगवला की रात्र सुरू होते असे म्हणण्यासारखेच आहे.

**चौ. ६ - (१) भूप भरत सम तव जनकाही** - यांत मोठी मौज केली आहे. वसिष्ठ सभेत बोलत आहेत; भरत व सभासद ऐकत आहेत हे लक्षात ठेवावे; हे नाट्यश्राव्य काव्याचे एक उदाहरण आहे. पुढे जे सांगावयाचे आहे ते 'भूप भरत' या दोन शब्दांनी स्पष्टपणे सूचित केले आहे; अन्यथा **'भूप भरत जस पिता तुम्हारा'** च्या जागी **'भरत पिता जस भूप तुम्हारा'** असे 'भरत पित्यासम भूप तुझ्याही' सहज म्हणता आले असते. भरताच्या हृदयावर व सभेच्या मनावर न कळत संस्कार केला की भूप भरत आहेत. 'भूप भरत' हे शब्द ऐकताच पुढील शब्द ऐकण्यापूर्वी श्रोत्यांच्या मनावर काय परिणाम होईल याचा विचार करावा. हा झालेला संस्कार पुढील शब्द ऐकल्याने पुसून जाण्यासारखा नाही. येथे **मानसशास्त्र व वक्तृत्व कला यांचा एक सुंदर नमुना आहे. 'श्रृणु, दशमुख खद्योत उजेडें'** (५।९।७) या चौपाईची टीका पाहून तुलना करावी, 'खद्योत'च्या पुढे जरा थांबावे म्हणजे दशमुखखद्योत ! असा उघड उघड अर्थ कानांतून मनांत शिरतो.

**चौ. ७ - (१) विधि हरिहर... बानति** - हे सर्व आपापल्या लोकांत दशरथांचा अलौकिक महिमा गात आहेत की असा भूप झाला नाही, होणार नाही वगैरे. **(क) विधि =** विधाता, विधान कर्ता, तसेच दशरथ होते. **हरि =** पापांचे हरण करणारा; तसेच अयोध्यापति होते. **हर =** संहार करणारा, त्रिपुरासुरादि देवशत्रूंचा संहार करणारे; तसेच दशरथ देवशत्रूंचा व प्रजेच्या शत्रूंचा व राज्याच्या शत्रूंचा संहार करणारे होते. **सुरनाथ =** देवांचा नाथ, पण त्याचेही संरक्षण दशरथांनी केलेच व इंद्राच्या समीप त्याच्या सिंहासनावर बसत होतेच. **दिशापति =** दिक्पाल, जसे एकेका दिशेचे पालन करतात तसे एकटे दशरथ दशदिशांना आपल्या रथासह गमन करून आर्तांचे रक्षण करीत असत. या प्रत्येक गुणाबद्दल हे सर्व देव दशरथांची प्रशंसा करीत आहेत.

**दो. (१) तन्महती कशि वर्णवे** - दशरथांचा महिमा अवर्णनीय, अनिर्वचनीय आहे; कारण की अनिर्वचनीय असे जे वेदतत्त्व ते साकार होऊन चार सूनु (पुत्र) रूपाने ज्यांच्या घरी प्रगट झाले त्यांचा महिमा कसा वर्णन करता येईल व कोण कधी करू शकेल? देव अंशतः वर्णन करतात. **'वेदतत्त्व नृप ! तव सुत चारी'** (१।१९८।१) असे वसिष्ठ दशरथांसच म्हणाले आहेत. **'दशरथ गुणगण वर्णन न घडे । त्यांसम जगिं नहि अधिक कुणिकडे'** (२०९।८) दो. २०९ पहावा. **'दशरथ महिमा' प्रस्तावना पृ. २१७ पहा.** वसिष्ठांनी दशरथांससुद्धा असेच सांगितले आहे. **'श्रृणु नृप ज्यास विमुख अनुतापति । यद्भजनाविण ताप न नाशति ॥ झाला तुमचा सुत तो स्वामी । राम पुनीत - प्रेम - अनुगामी'** (२।४।७-८) **'जगीं तुम्हांसम सुकृती काही । भूत न, नाहीं, होणें नाहीं ॥५॥... राजन् रामसदृशसुत ज्यांचे ॥ वीर विनीत हि धर्मव्रतचर । चारी गुणसागर बालक वर'** (१।२९४।५-७ पहा.) **(क) रामलक्ष्मण** - असे म्हणण्यात भरतापेक्षा लक्ष्मणाची श्रेष्ठता दाखविणे हा हेतु नसून लक्ष्मण रामानुगामी असल्यामुळे रामाच्या बरोबर उल्लेख केला. रामलक्ष्मण भरतशत्रुघ्न असा जोडीनेच यांचा उच्चार केला जातो. खेळ खेळताना सुद्धा एका बाजूस राम लक्ष्मण व दुसऱ्या बाजूस भरत शत्रुघ्न असत - **'राम लखन इक ओर, भरत रिपुवदन लाल इक ओर भए'** (गीता. पद ४५ बा. कां.) ओर = बाजू, इक = एक.

*हिं.* *। सब प्रकार भूपति बड़ भागी । बादि बिषादु करिअ तेहि लागी ॥१॥*
*। यहु सुनि समुझि सोचु परिहरहू । सिर धरि राज, रजायसु करहू ॥२॥*
*। रायँ राजपदु तुम्ह कहुँ दीन्हा । पिता बचनु फुर चाहिअ कीन्हा ॥३॥*
*। तजे रामु जेहिं बचनहि लागी । तनु परिहरेउ राम बिरहागी ॥४॥*
*। नृपहि बचन प्रिय नहिं प्रिय प्राना । करहु तात पितु बचन प्रवाना ॥५॥*

*म.* *। सर्वपरीं भूपति बहुभागी । वृथा खेद करणें त्यांलागीं ॥१॥*
*। त्यजा शोक हें ऐकुनि समजुनि । पाळा राजाज्ञा शिरिं मानुनि ॥२॥*
*। नृपें राज्यपद दिलें तुम्हांला । सत्य करावे पितृवचनाला ॥३॥*
*। त्यक्त राम ज्या वचनालागीं । त्यक्त शरीर राम-विरहागीं ॥४॥*
*। वचन नृपां प्रिय, प्रिय त्यां प्राण न । करा तात पितृ-वचन-परिपालन ॥५॥*

**अर्थ** - भूपति सर्व प्रकारे फार भाग्यवान होते; (म्हणून) त्यांच्यासाठी खेद करणे व्यर्थ आहे.॥१॥ हे ऐकून व विचार करून शोक सोडा व राजाज्ञा

शिरावर धरून तिचे पालन करा.।।२।। राजांनी राज्यपद तुम्हाला दिलेले आहे. तरी तुम्ही पित्याचे वचन सत्य करणे जरूर आहे.।।३।। ज्या वचनासाठी (राजांनी) रामाचा त्याग केला व रामविरह अग्नीने देहाचा त्याग केला.।।४।। ते वचन (पाळणे) राजांना प्रिय आहे, प्रिय वाटले; त्यांना प्राण प्रिय वाटले नाहीत. म्हणून तात ! पितृवचनाचे तुम्ही पूर्ण पालन करावे. करा.।।५।।

**टीका. - चौ. १-२ (१) सर्वपरीं भूपति बहुभागी** - असे चार पुत्र झाले हे तर परम भाग्याचे लक्षण आहेच; पण कुल, सुहृद, रूप, वैभव, धन, कीर्ति, धर्म, कर्म, नीति, विद्या, गुरु-संत-विप्र सुर धेनु सेवा, सत्संगति, संतकृपा, सत्य सत्ता इत्यादि सर्व गोष्टींनी ते भाग्यवान होते. **'संपत् सरस्वती सत्यं संतानं सदनुग्रहः ॥ सत्ता सुकृत संभारः सकाराः सप्त दुर्लभाः' इतके सांगितले तरी भरताच्या मुखावरील विषाद कमी होत नाही असे पाहून म्हणतात - (क) त्यजा शोक हें ऐकुनि समजुनि** - मी सांगितले ते तुम्ही ऐकलेतच, तरी या वेळी शोक करणे उचित की कर्तव्य पालन करणे उचित याचा माझ्या वचनांच्या आधारे विचार करा, शोक सोडा, आणि राजाज्ञा शिरसावंद्य मानून त्या प्रमाणे करा. राजाज्ञा कोणती ते सांगतात. :

**चौ. ३ - (१) नृपें राज्यपद दिलें तुम्हांला** - पितृवचनाला - राजा या नात्याने ते वर देणे त्यांचे कर्तव्य होते ते त्यांनी केले. पिता या नात्याने त्यांनी रामाला वनवास दिला नाही. राजाज्ञा पालन करणे सगळ्या प्रजेचे कर्तव्य आहे. येथे वसिष्ठांनी सर्व सभेला हे ध्वनित केले की भरतराज्याभिषेक तुम्हाला रुचत नसला तरी प्राणप्रिय राजाची आज्ञा पालन करणे तुमचेही कर्तव्य आहे. विरोध करणे राजविरोध ठरेल. भरतांस राजाज्ञापालन व पितृवचन सत्य करण्यास सांगण्यात हेतू हा आहे की तुमच्यावर प्रजाजन म्हणून व राजपुत्र म्हणून अशी दुहेरी जबाबदारी आहे. तुम्ही जर राजाज्ञेचे व पितृवचनाचे परिपालन प्रजाधर्म व पुत्रधर्म म्हणून केले नाहीत तर अनीति व अधर्म घडेल.

**चौ. ४-५ - (१) त्यक्त राम ज्या वचनालागीं** - राजा या नात्याने जी दोन वचने दिली त्यांतील एका वचनाचे पालन करण्यासाठी राजा या नात्याने रामाचा त्याग करणे कर्तव्य होते ते केले. राजानेच वचनभंग केला की प्रजा करणारच व राजपुत्राने राजाज्ञेचा भंग केला तरीही प्रजा तसेच करील. राम पुत्र असल्याने पिता या नात्याने पुत्रविरहाग्नीने शरीर टाकले. **(क) वचन नृपां प्रिय, प्रिय त्यां प्राण न** - राजाने आपले वचन पाळणे हा राजधर्म आहे. राजा या भूमिकेवरून

वागताना इतर व्यक्तिधर्माचा विचार त्यात मिसळता कामा नये. **राजाने राजनीतीचा भंग करून व्यक्तिधर्माला महत्त्व देणे अधर्म आहे.** भ. गी. त भगवंतांनी याच तत्त्वाचा उपदेश केला आहे. काका, मामा, गुरु, पुत्र इत्यादींचा विचार रणभूमीत उपयोगी नाही. तो विचार स्वतःच्या घरात योग्य ! **'रघुकुलरीतिस कदा खंड ना । जावो प्राण हि वचनभंग ना'** या दशरथवचनाचीच आठवण येथे दिली आहे. **(ख) सत्य करावे पितृवचनाला** - तुम्हीही पुत्रधर्माचे पालन करताना इतर नात्यांचा विचार बाजूस ठेवला पाहिजे. **'सर्व धर्मि पित्राज्ञा श्रेष्ठचि'** (५५।८). असे देवी कौसल्या रघुनाथांस म्हणाल्या आहेत. तेच वसिष्ठ भरतांस सुचवीत आहेत. राजाज्ञा व पितृवचन यांची सांगड घातली - **'नीतीधर्ममयवचन'** ते हेच मुख्य. ज्या तुमच्या पित्याला आपले वचन रामापेक्षा सुद्धा प्रिय होते, त्या पित्याचे राहिलेले वचन सत्य करणे हे तुमचे पुत्र या नात्याने रामाप्रमाणेच कर्तव्य आहे किंवा नाही याचा विचार करा.

***हिं.*** ***। करहु सीस धरि भूप रजाई । हइ तुम्ह कहँ सब भाँति भलाई ।।६।।***
***। परसुराम पितु अग्या राखी । मारी मातु जगत सब साखी ।।७।।***
***। तनय 'जजातिहि जौबनु दयऊ । पितु अग्याँ अघ अजसु न भयऊ ।।८।।***

***दो.*** ***। अनुचित उचित बिचारु तजि जे पालहिं पितु बैन ।।***
***।। ते भाजन सुख सुजस के बसहिं अमरपति ऐन ।।१७४।।***

***म.*** ***। करा धरुनि शिरिं भूपाज्ञेला । यांत भलेपण सर्व तुम्हांला ।।६।।***
***। परशुराम मानुनि पित्राज्ञा । वधिति जननि विश्रुत लोकांनां ।।७।।***
***। दिलें ययातिस यौवन तनयें । पित्राज्ञें त्यां अयश अघ न ये ।।८।।***

***दो.*** ***। अनुचित उचित विचारविण पितृवचना करतात ।।***
***।। जगिं सुख सुयशा पात्र ते अमरपुरीं वसतात ।।१७४।।***

**अर्थ** - राजाज्ञा शिरसावंद्य मानून त्या प्रमाणे करा. यांत तुम्हाला सर्व चांगलेपणाच (भलेपणा)च मिळणार आहे.।।६।। परशुरामाने पित्याची आज्ञा मानून आपल्या मातेला ठार मारली हे सर्व लोकांत प्रसिद्ध (विश्रुत) च आहे.।।७।। ययातीला त्याच्या पुत्राने ('पुरु'ने) आपले यौवन दिले; पण पित्याच्या आज्ञेमुळे त्या दोघांना पाप लागले नाही की अपकीर्ति झाली नाही.।।८।। उचित की अनुचित याचा विचार न करता जे पित्याच्या वचनाचे पालन करतात त्यांना या जगात पुष्कळ सुख व सुयश लाभते (व मेल्यावर) ते अमरपुरीत निवास

करतात.।।दो.१७४।।

**टीका. - चौ. ६. (१)** यापूर्वी **'पाळा राजाज्ञा शिरिं मानुनि'** (चौ-२), **'सत्य करावें - पितृवचनाला'** (चौ.३) **'करा तात पितृवच परिपालन'** (चौ.५) असे तीन वेळा सांगून सुद्धा भरत काहीच बोलत नाहीत, मुखावरील खिन्नता कमी होत नाहीच पण उलट चिंतेची दाट छाया पसरलेली दिसली. तेव्हा वाटले की जगात वाईटपणा येईल या भीतीने भरत मान्य करीत नसतील; म्हणून येथे चौथ्या वेळी सांगतात की यात तुम्हाला वाईटपणा न येता सर्व चांगुलपणाच पदरात पडेल; येथे सुख सुकीर्ती लाभ होईल व अंती इंद्राच्या अमरावतीत वास करण्यास सापडेल. याला दोन दृष्टान्त देतात.

**चौ. ७-८ - (१) परशुरामाची या संबंधी कथा** १।२७६।२ च्या टीकेत व **ययातीची कथा** २।१४८।६ च्या टीकेत दिली आहे. त्या ययातीच्या तनयाचे नाव 'पुरु' होते. या दोघांना मिळालेल्या आज्ञा अनुचित होत्या, मातृहत्या हे महापातकासमान आहे व यौवन देणे हे सुद्धा पाप आहे. परंतु पित्याच्या आज्ञेने त्या गोष्टी केल्या गेल्याने त्यांना पाप तर नाहीच लागले, पण दोघांची कीर्ती अजरामर झाली. **(क) पहिल्या दृष्टान्तावर आक्षेप** घेता येण्यासारखा आहे की परशुराम परमेश्वराचे अवतार आहेत. शिवाय त्यांना माहीत होते की वडील प्रसन्न झाल्यास ते माझ्या मातेला पुन्हा जिवंत करू शकतील व याप्रमाणे लगेच घडलेही. शिवाय **'न देवचरितं चरेत्'** म्हणून हे उदाहरण निरुपयोगी ठरण्यासारखे वाटल्यामुळे दुसरे दिले. **या पहिल्या दृष्टान्तात पित्याची आज्ञा पालन करणे इतकेच साम्य आहे. (ख)** पुरूला पित्याकडून पुन्हा यौवन परत मिळाले आहे व आज्ञा पालन केल्यामुळे पित्याने ज्येष्ठ पुत्राला राज्य न देता हा सर्वांत लहान असून पुरूला राज्य दिले व त्याने घेतले. याने त्याची अपकीर्ती न होता कीर्तीच पसरली. तसेच येथे पित्याच्या आज्ञेने वडील भावाचे राज्य स्वीकारल्यास कोणीच दोष देणार नाही व उलट चांगलेपणाच मिळेल. **हे सादृश्य या दृष्टान्ताने दाखविले आहे.** वरील दोन उदाहरणांवरून दिसून येणारा सत्य सिद्धान्त सांगतातः-

**दो. (१) अनुचित उचित विचारविण** - या दोघांच्या पित्यांनी दिलेल्या आज्ञा अगदी अनुचित होत्या तरी त्यांनी त्याचा विचार केला नाही; कारण तसा विचार पुत्राने करणे हा धर्म नव्हे. **'आज्ञापालनं धर्मः'** तुमच्या पित्याने तर अनुचित आज्ञा दिलेली नाही; मग तुम्ही एवढे विचारात पडलेले का दिसता? **'पित्राज्ञा**

**पालनं धर्मः' एवढाच विचार पुत्राने करावयाचा असतो.** त्या दोघांनी जर पाप केले असते, म्हणजेच त्या आज्ञा पालन करण्यात जर पाप लागले असते तर त्यांची कीर्ती सर्व लोकांमध्ये कशी पसरली असती? **'पुण्याविण किं मिळे यश पावन'** (७।११२।७) **आज्ञा उचित असो की अनुचित असो सैन्यातील वीराप्रमाणे पुत्राने तिचे पालन करणे हे मोठे पुण्य आहे.** पुन्हा पाचव्या वेळी सांगतात :-

***हिं.*** ***। अवसि नरेस बचन फुर करहू। पालहु प्रजा सोकु परिहरहू ॥१॥***
***। सुरपुर नृप पाइहि परितोषू । तुम्हकहुँ सुकृतु सुजसु नहिं दोषू ॥२॥***
***। बेद बिदित संमत सबही का । जेहि पितु देइ सो पावइ टीका ॥३॥***
***। करहु राजु परिहरहु गलानी । मानहु मोर बचन हित जानी ॥४॥***

***म.*** ***। सत्य अवश्य भूप वच करणें । पाळा प्रजा शोक परिहरणें ॥१॥***
***। नृप सुरपुरिं पावति परितोषा । सुकृत सुयश पावाल न दोषा ॥२॥***
***। वेद विदित संमत सर्वांसी । पिता देइ तो करि राज्यासी ॥३॥***
***। करा राज्य कीं ग्लानी टाकुनिं । माना मम वचना हित जाणुनि ॥४॥***

**अर्थ** - भूपतीचे वचन अवश्य सत्य करावे; आणि प्रजेचे पालन करून प्रजेचा शोक नाहीसा करावा ॥१॥ (हे केल्याने) स्वर्गात भूपतींना परितोष होईल; आणि तुम्ही सुकृत (= पुण्य) व सुयश पावाल; दोष पावणार नाही ॥२॥ (कारण) हे वेदात वर्णिलेले व सर्वांना मान्य आहे की पिता ज्याला देईल त्याने राज्य करावे. ॥३॥ म्हणून तुम्ही निरुत्साह व दुःखशोक (ग्लानि) सोडून माझे वचन हितकारक आहे हे जाणून माना (त्या प्रमाणे करा) ॥४॥

**टीका - चौ. १ - (१) पाळा प्रजा शोक परिहरणे -** शोक परिहरणे, पाळा प्रजा आणि प्रजाशोक परिहरणे हे अर्थ यांतून निघतात आणि हे सर्व घेणे आवश्यक आहे. राजाच्या मरणाने प्रजा शोकाकुल व दुःखी आहे. महाराज गेल्याला ३५ दिवस होऊन गेले! कोणी राजा आमचे पालन करणार नाही; आमचे कसे होणार व काय होणार अशी चिंता प्रजेला लागली आहे. म्हणून पित्याप्रमाणे प्रेमाने प्रजेचे पालन करू लागा म्हणजे त्यांची चिंता, शोक, दुःख नष्ट होतील; पण हे घडण्यास प्रथम तुम्ही शोक, विषाद इ. धैर्याने बाजूस ठेवले पाहिजेत **'जिथे प्रजा प्रिय दुःखी भारी । तो नृप खचित निरय-अधिकारी'** (७१।६) असे होऊ न देण्याची जबाबदारी आता तुमची आहे. (भरत मनांत म्हणत असतील की राज्य रामाचे आहे, माझे नाही; त्यांना परत आणा म्हणजे

सर्वांचा शोक वनांत पळून जाईल !)

**ल. टे.** - या प्रकरणात वारंवार हे दाखविले आहे की सर्व प्रजेला सुखी व संतुष्ट ठेवणे हा राजाचा व राज्यसत्ताधीशांचा मुख्य धर्म आहे. 'पाळा प्रजा शोक परिहरणे. (१७५।१); (१७५।६; १७६।४; ६८।६; ५५; ७१।३; ७१।६; १५२।४; ३१५।६; ३१५।८; ३०६।५; ८५।१; १८०।४; याशिवाय आणखी पुष्कळ वचने सापडतील त्यांचा वाचकांनी संग्रह करावा.

**चौ.** २-४ (१) **'नृप सुरपुरिं पावति परितोषा** - आपले वचन भरताने, प्रिय पुत्राने पूर्ण केले म्हणून संतोष व प्रजेचा शोक नाहिसा होऊन त्यांचे चांगले पालन पोषण होऊ लागले म्हणून संतोष होईल. **'जो तोषवी स्वजनकास सुपुत्र तोच' (क) करा राज्य कीं ग्लानी टाकुनि'** - एवढे सांगितले तरी भरत दीन दुःखी निरुत्साही (ग्लानि करीत असलेले) दिसत आहेत असे पाहून वसिष्ठ आपले स्वतःचे वजन थोडेसे पारड्यात घालतात. **'माना ना मम वचना हित जाणुनि'** येथे वसिष्ठांनी 'माझी आज्ञा' असे म्हटले नसून 'मम वचना' एवढेच म्हटले. मम वचन = माझा उपदेश; माझे म्हणणे, जे आतापर्यंत सांगितले ते. कौसल्यादि याला 'गुरु-आज्ञा' म्हणून उपदेश करणार आहेत; पण त्यात राजनैतिक शुद्ध हेतु आहे, की भरत गुरु-आज्ञा भंग करणार नाहीत. पण भरत 'गुरुनींकृत उपदेश' असे यथार्थ म्हणतील.

**हिं.** ***। सुनि सुख लहब राम बैदेहीं । अनुचित कहब न पंडित केहीं ॥७॥***
***। कौसल्यादि सकल महतारीं । तेउ प्रजा सुख होहिं सुखारीं ॥६॥***
***। मरम तुम्हार राम कर जानिहि । सो सब बिधि तुम्ह सन भल मानिहि ॥७॥***
***। सौंपेहु राजु राम के आएँ । सेवा करेहु सनेह सुहाएँ ॥८॥***

**हिं. दो.** ***। कीजिअ गुर आयसु अवसि कहहिं सचिव कर जोरि ॥***
***॥ रघुपति आएँ उचित जस तस तब करब बहोरि ॥१७५॥***

**म.** ***। श्रवुनि, राम-वैदेहि सुखावति । पंडित कोणि न अनुचित ठरवति ॥५॥***
***। कौसल्यादि सकल माताही । प्रजा-सुखें पावती सुखाही ॥६॥***
***। तव मर्मा रामाच्या जाणति । भले सर्वपरि तुम्हिं, ते मानति ॥७॥***
***। येतां राम राज्य सोंपावें । स्नेहें सुंदर पद सेवावे ॥८॥***

**दो.** ***। करा च गुर्वाज्ञा कथिति सचिव जोडुनी हात ॥***
***॥ रघुपति येतां उचित जें तें करणे तैं तात ॥१७५॥***

**अर्थ** - हे ऐकून राम व वैदेही यांना सुख होईल; व कोणीही पंडित अयोग्य

ठरवणार नाहीत. ।।५।। कौसल्यादि सगळ्या मातांना सुद्धा प्रजेच्या सुखाने सुखच होईल ।।६।। तुमचे व रामचंद्रांचे मर्म जे जाणतील (व जाणतात) ते मानतील की तुम्ही सर्व प्रकारे चांगले आहांत. ।।७।। राम परत आल्यावर राज्य त्यांना सोपवावे व सुंदर चरणांची सुंदर स्नेहाने सुंदर सेवा करावी. ।।८।। सचिव हात जोडून म्हणाले की गुरुंची आज्ञा करा च (अवश्य पाळावी). आणि तात ! रघुपति आले म्हणजे जे योग्य वाटले ते त्यावेळी करावे ।।दो. १७५।।

**टीका - चौ. ५ - (१) राम वैदेहि सुखावति - सुखावति =** सुख पावतील, सुखी होतील. रामराज्य आपण स्वीकारले तर त्यांस दुःख होईल किंवा रागावतील अशी शंका स्वप्नांतसुद्धा मनात आणू नका. कारण की तुम्ही पितृवचन पूर्ण करून प्रजेला सुखी केलेत हे त्यांनी ऐकले म्हणजे ते **'आनंदसिंधु सुखराशी'** असूनसुद्धा त्यांस आनंद होईल. वैदेही तर विदेहांचीच तनया तिला सुखदुःखादि सर्व समान वाटत असले, ती देहबुद्धिरहित असली तरी तिला सुद्धा सुख होईल. 'बंधु भरतसा भूप !' (१२५।-) असे प्रभु वाल्मीकीस म्हणालेच आहेत. **(क) पंडित अनुचित टरवणार नाहीत.** भाव हा की इतर अज्ञानी, मूर्ख, दुर्जन कोणी म्हणाले कदाचित तरी त्याला काही किंमत नाही. नीति, धर्म इ. जाणणारांनी नावे ठेवली तर गोष्ट निराळी; पण ते अशक्य आहे; कारण यांत शास्त्र, धर्म, नीतिविरुद्ध, संतमतविरुद्ध काही घडतच नाही.

**चौ. ६-७ - (१) कौसल्यादि सकल माता -** कौसल्या राममाता व सुमित्रा लक्ष्मण माता यांना ते सहन होणार नाही अशी शंका घेणेसुद्धा अयोग्यच. कारण त्यांना व इतर सर्व मातांना तुम्ही आणि राम सारखेच वाटतात व प्रजेच्या सुखाने सुखी होणाऱ्या त्या सर्व आहेत; म्हणून त्यांना सुद्धा समाधान होईल. **(क) तव मर्मा रामाच्या जाणति -** तुमचे अन्योन्य प्रेम - ज्यांना माहीत आहे, किंवा भविष्यकाळी जे जाणतील ते तुम्हाला चांगलेच म्हणतील. ज्यांना हे मर्म माहीत नाही अशा व्यक्ती अयोध्येत असतील असे मला वाटत नाही.

**चौ. ८ - (१) येतां राम राज्य सोंपावे -** सोपविणे याचे दोन अर्थ होतात. आपली वस्तू संरक्षणासाठी दुसऱ्याच्या ताब्यात, पदरात घालणे किंवा ज्याची वस्तू त्याला परत देऊन जबाबदारीतून मोकळे होणे. वालीने अंगदाला रघुवीराच्या हाती सोपविला व दशरथांनी रामलक्ष्मणास विश्वामित्रांच्या हाती सोपविले; पण कायमचे नव्हेत. वसिष्ठांच्या मनात हा दुसरा अर्थ आहे; पण सचिवांच्या मनाने

पहिला अर्थ घेतला आहे. **(क) येतां** = आल्यावर; **किती काळाने हा उल्लेख नाही.** तुम्ही किंवा कोणी जाऊन आणलेत तर त्यावेळी सुद्धा; हा भाव गर्भित आहे. परंतु हा भाव सचिवांच्या ध्यानात न आल्याने ते आता थोडी भिन्न मतपत्रिका जोडतील. सुमंत्र यात असते तर असे घडले नसते.

**दो. - सचिव हात जोडूनी कथिति** - वसिष्ठांनी केलेल्या उपदेशाला 'आज्ञा' हे नाव देऊन येथे सचिव व पुढे कौसल्या भरतावर दडपण आणण्याचा प्रयत्न करतात. सचिव **गुर्वाज्ञा कराच.** असे हात जोडून म्हणून संमति देतात; पण आपला मतभेदही स्पष्ट सांगतात. सचिव म्हणतात राम आल्यावर त्यावेळी तुम्हाला जे योग्य वाटेल ते करा. **(क)** भिन्नमत प्रदर्शनाने एवढे नक्की ठरले की वसिष्ठ आणि सचिव आधी कार्यकारिणीची गुप्त बैठक भरवून नंतर आले नव्हते. सचिवानी विचार केला की चौदा वर्षानंतर काय करायचे त्याचे विषयी आजच कशाला बोला ! भरताच्या हेतुविषयी सचिव किंचित साशंक दिसतात.

## आज्ञा का हितोपदेश?

(१) वसिष्ठांनी राजाज्ञा, पित्राज्ञा असे शब्द अनेकवेळा वापरले पण **'माझी आज्ञा' असे ते एकदाही म्हणाले नाहीत. 'माना मम वचना हित जाणुनि'** ही जर आज्ञा असती तर 'हित जाणुनि' असे म्हणण्याची व पुढील चौपायांची आवश्यकताच नव्हती. आज्ञा देताना कारणे व पुढील परिणाम इ. सांगण्याची आवश्यकता नसते. वसिष्ठांची आज्ञा असती तर भरतांनी त्याबद्दल 'उपदेश' हा शब्द वापरला नसता. **'गुरूंनी कृत उपदेश शुभ मला'** (१७७।१) **(क)** सचिवांच्या बोलण्यावरूनच ठरते की ते मनात 'आज्ञा' असे मानीत नाहीत. तसे असते तर भिन्न मत जाहीर करण्याची शक्यताच नव्हती कारण त्यांत वदतोव्याघात दोष होतो. गुरूंच्या आज्ञेचे पालन करा म्हणजे राम आले की राज्य परत त्यांना सोपवा हे सचिवांनी म्हटले असे ठरते व नंतर पुन्हा राम आल्यावर उचित वाटेल ते करा म्हणजे वाटल्यास राज्य परत द्या नाहीतर देऊ नका असे सांगितले असे ठरते; म्हणजे गुरू-आज्ञेचा भंग करण्यास हरकत नाही असे सांगितल्याप्रमाणेच ठरते. **(ख)** कौसल्या म्हणते 'पुत्र पथ्य गुर्वाज्ञा आहे.' म्हणजे कौसल्यासुद्धा मनात 'आज्ञा' असे समजत नाहीच. तसे समजली असती तर 'आज्ञा' म्हटल्यावर उचित, अनुचित, पथ्य, कुपथ्य अपथ्य हा विचार

करण्यास सांगण्याची आवश्यकताच नाही. गुर्वाज्ञा पालन करणे हे तुझे कर्तव्य आहे इतके सांगणेच आवश्यक होते. **यावरून ठरले की वसिष्ठांनी जे सांगितले ती आज्ञा नसून हितोपदेश आहे.** म्हणून तर भरतास आपली बाजू मांडण्यास व माझे म्हणणे ऐकून घ्या व **मग काय ती आज्ञा द्या** असे म्हणण्यास जागा राहिली. वसिष्ठांनी आज्ञा दिल्यास राम आपली प्रतिज्ञा व पित्राज्ञा मोडून सुद्धा परत येतील अशी खात्री असणारे रामप्रेममूर्ती भरत स्वतः वसिष्ठांच्या आज्ञेचा भंग करतील हे शक्यच नाही. **(ग)** वसिष्ठांनी आज्ञा दिली असती तर काहीही न बोलता आज्ञेप्रमाणे केल्याशिवाय दुसरा मार्गच नव्हता; व भरताने यावेळी राज्याचा स्वीकार केला असता तर भरताला मनापासून राज्य पाहिजेच होते; तो कैकयीला सामील होताच वगैरे अनेक अपवादाचे खापर भरताच्या माथी फोडण्याचे श्रेय वसिष्ठांच्या पदरात पडले असते. हे जाणूनच त्यांनी आज्ञा दिली नाही; इतकेच नव्हे तर रामचंद्रास परत आणण्याच्या हेतूने चित्रकूटास जाण्याचा प्रयत्न करण्याची सवड वसिष्ठ गुरूंनी भरतासाठी मुद्दाम निर्माण करून ठेवली व गुरुवचनांतील गूढ भाव जाणूनच भरत पुढे बोलणार आहेत. भरताच्या परमोच्च आदर्श चरित्र चित्रणाचा जगजाहीर खरा प्रारंभ या वसिष्ठांच्या भाषणापासूनच झाला.

**हिं.** ***। कौसल्या धरि धीरजु कहई । पूत पथ्य गुरु आयसु अहई ॥१॥***
***। सो आदरिअ करिअ हित मानी । तजिअ बिषादु कालगति जानी ॥२॥***
***। बन रघुपति सुरपुर नरनाहू । तुम्ह एहि भाँति तात कदराहू ॥३॥***
***। परिजन प्रजा सचिव सब अंबा । तुम्हही सुत सब कहँ अवलंबा ॥४॥***

**म.** ***। कौसल्या धरि धीर म्हणे हे ! । पुत्र, पथ्य गुर्वाज्ञा आहे ॥१॥***
***। ती आदरणे हितकर मानुनि । त्यजणे खेद कालगति जाणुनि ॥२॥***
***। वनिं रघुपति सुरपुरिं नरराणा । तूं तर कातर असा सुजाणा ॥३॥***
***। प्रजा सचिव सब माता परिजन । सकलां बाळ ! तूंच अवलंबन ॥४॥***

**अर्थ** - कौसल्येने धीर धरला व म्हणाली की हे पुत्र ! (बा मुला !) गुरुजींची आज्ञा पथ्य आहे ॥१॥ (म्हणून) ती हितकर आहे असे मानून तिचा आदर राखणे जरूर आहे; (म्हणून) कालगती जाणून खेद सोडून दे. ॥२॥ रघुपति वनात आहे आणि नरपति (नरराणा, नरनाथ) अमरपुरींत आहेत; आणि तू तर असा घाबरट झाला आहेस. ॥३॥ प्रजा, सचिव, सर्व माता व परिवार या सगळ्यांना बाळा ! एकमात्र तूंच आतां आधार आहेस ॥४॥

**टीका. चौ. १-२ - (१) हे पुत्र ! पथ्य गुर्वाज्ञा आहे** - सर्वांना 'रामवियोग कुरोग' झाला आहे. कौसल्येच्या म्हणण्याचा भाव हा आहे की हा रोग रामदर्शनरूपी औषध मिळाल्यावाचून बरा होणार नाही हे जरी खरे असले तरी पथ्य पालनानेसुद्धा रोगाची पीडा पुष्कळ कमी होते. 'गुरुणां वचनं पथ्यं कवीनां रसवद्वचः' पथ्य पालन करणे असाध्य रोग्याला आवडत नाही हे खरे पण पथ्य पालनाचे कष्ट सोसले की रोगाचे क्लेश कमी होतात. पण भरताला मनांत वाटत आहे की 'कुरोगास या औषध नाही' 'राम परततां कुरोग नासे' (२१२।२।६) नुसते पथ्य पालन करीत बसण्यापेक्षा औषध मिळविण्याचा यत्न करणे चांगले.

**(क) येथील कौसल्येचे भाषण** तिच्या परम विशाल, उदार हृदयाचे, प्रजाप्रेमाचे, वात्सल्याचे, धैर्याचे व कर्तव्यनिष्ठेचे नितांत रमणीय अमल रूप दाखवीत आहे. राम भरत सुत सम' या दृष्टीने या भाषणाची तारीफ करावी तेवढी थोडीच. **(ख) धरि धीर** - सुचविले की कौसल्या फार व्याकुळ झाली होती पण कर्तव्य जाणून शोक आवरला, मन वज्रासारखे घट्ट केले तेव्हा बोलण्याची शक्ति आली. **(ग) कालगति** - काळाच्या प्रेरणेने ठरलेल्या वेळी ठरलेल्या घटना घडावयाच्याच. 'नको मानुं मनिं हानी ग्लानी। काल-कर्म-गति अघटित गणुनी' (१६५।६) असे पूर्वी कौसल्या भरतासच म्हणाली आहे. 'कालोऽहि दुरतिक्रमः'. **(घ) हितकर मानुनि** - कौसल्या म्हणते की गुर्वाज्ञा हितकर आहे असे मानून तिचा आदर राख; व वसिष्ठ म्हणाले 'माना मम वचना हित (= हितकर) जाणुनि. रोग्याला पथ्य हितकर वाटत नसले तरि हितकर मानून पालन केल्यास हित होते.

**चौ.** ४ - (१) सर्व राज्य, सर्व प्रजा, सर्व सचिव, सर्व माता, सर्व परिवार, निराधार, अनाथ, दीन दशेत आहेत. तुझ्या शिवाय कोणाचाच आधार नाही. आम्ही सर्वांनी व प्रजेने कोणाच्या तोंडाकडे पहावे याचा विचार कर आणि सर्वांना धीर येईल असे कर.

*हिं.* *। लखि बिधि बाम काल कठिनाई । 'धीरजु धरहु मातु बलि जाई ॥५॥*
*। सिर धरि गुर आयसु अनुसरहु । प्रजा पालि परिजन दुःख हरहू ॥६॥*
*। गुर के बचन सचिव अभिनंदनु । सुने भरत हिय हित जनु चंदनु ॥७॥*
*। सुनी बहोरि मातु मृदु बानी । सील सनेह सरल रस सानी ॥८॥*

*म.* *। बघुनि वाम विधि काळ कठोर । तनु ओवाळि माय, धर धीर ॥५॥*
*। गुर्वाज्ञा शिरिं धरुनी आचर । प्रजे पाळि, परिजन दुःखा हर ॥६॥*

*। गुरूचें वचन सचिव - अनुमोदन । श्रुत भरतें जणुं हृदया चंदन ॥७॥*
*। वरती श्रुता मातृ-मृदु-वाणी । स्नेह, शील, ऋजुता-रस-खाणी ॥८॥*

**अर्थ** - बा ! माता आपला देह तुझ्यावरून ओवाळून टाकते; पण दैव फिरले आहे व काळ कठोर आहे हे ध्यानात घेऊन (पाहून) धीर धर ॥५॥ गुरूंची आज्ञा शिरावर धरून त्याप्रमाणे कर; प्रजेचे पालन कर आणि परिवाराचे दुःख दूर कर; ॥६॥ छातीला जणू चंदनासारखे असणारे गुरूंचे वचन व त्याला सचिवांनी दिलेले तें अनुमोदन भरताने ऐकले ॥७॥ त्यावर आणखी स्नेह, शील व सरलता या रसांची खाण असलेली मातेची मृदुवाणी (भरताने) ऐकली. ॥८॥

**टीका - चौ. ५-६ - (१) तनु ओवाळि माय** - वसिष्ठांचे आज्ञावजा सांगणे, सचिवांची विनंती व मी स्वतः सांगितले, तरी भरत दुःखीच व राज्य स्वीकारण्याची त्याची इच्छा दिसत नाही.' हे पाहून कौसल्येचे हृदय कळवळले; तिला वाटले की ही आणखी एक महान विपत्ती कोसळणार की काय? म्हणून इडापिडा दूर व्हावी आणि भरताच्या हृदयाला धीर यावा म्हणून म्हणाली की 'तनु ओवाळी माय.' **(क) धीर धर** - कौसल्येचा भाव हा आहे की काळ कठोर व प्रतिकूल असल्याने रघुनाथ १४ वर्षे झाल्याशिवाय परत येऊ शकत नाहीत. महाराजा स्वर्गात गेले आहेत ते राज्य करण्यासाठी व प्रजेचे पालन करण्यासाठी परत येणार नाहीत. राजांच्या आज्ञेप्रमाणे केल्याशिवाय प्रजेचे दुःख नष्ट होणार नाही; व राज्य चालविण्याची जबाबदारी शिरावर घेण्यासारखी दुसरी व्यक्ती नाही हे जाणून आतां तरी धीर धर. **(ख) प्रजे पाळि, परिजन दुःखा हर** - प्रजेचे पुत्रांप्रमाणे पालन करणे हेच आमचे व सर्व परिवाराचे दुःख दूर करण्याचे साधन आहे. कैकयीच्या मुखांतून असला एक तरी शब्द, एकदा तरी निघाला काय? कालगतीचा उल्लेख कौसल्येने हा तिसऱ्यावेळी केला.

**चौ. ७ - (१) हृदया जणुं चंदन** - चंदनाने शरीराची आग काही काळ शांत होते. तसे वसिष्ठांचे वचन व त्यास सचिवांचे अनुमोदन, यांनी भरताच्या हृदयाचा ताप दूर व्हावयास पाहिजे होता. कारण की त्यांच्या भाषणाने अयोध्येचे राज्य मिळत होते. ते मिळाल्यावर सुखोपभोगांना काय तोटा व दुःख राहिल कशाला **असे अजून सचिव व प्रजा यांना वाटत आहे**. परंतु **'भक्तउर-चंदन'** एकमात्र भगवान राम आहेत हे भरत चांगले जाणतात. विरहानल दाहाने जळत असलेल्या भरताच्या हृदयाला रामचंद्र चंदनाचा स्पर्श झाल्याशिवाय त्रिभुवनाचे राज्य सुद्धा

भरत हृदयचंदन होऊ शकत नाही. राज्यरोहणरूपी चंदन शोक व लोकनिंदारूपी विकराल ज्वालानी वेष्टित आहे. म्हणून पुढे भरत म्हणतात 'शोकसमाज राज्य का गणना । दृष्ट रामसिय-लक्ष्मण-पद ना' (१७८।३)

**चौ. ८ - (१) स्नेहशील ऋजुता - रस - खाणी** - स्नेह तर कौसल्येच्या प्रत्येक वाक्यात भरलेला आहे. शील इतके विमल की सवतीच्या मुलाला रामराज्यावर बसविण्यासाठी दुःखशोकाचे सर्व डोंगर धैर्याने दूर ठेऊन, जीव तोडून ती प्रयत्न करत आहे; भरतास अंतःपुरात जे सांगितले तेच येथे अधिक स्पष्ट करून समयोचित म्हणून सांगत आहे; आत बाहेर अगदी एक हेतु व एकाच प्रकारचे बोलणे; म्हणून ऋजुता-सरलता रसाने भरलेले आहे. ऋजुतावीर रामाचीच माता!

***हिं. छं.*** ***। सानी सरल रस मातु बानी सुनि भरतु ब्याकुल भए ॥***
***॥ लोचन सरोरुह स्रवत सींचत बिरह उर अंकुर नए ॥***
***। सो दसा देखत समय तेहि बिसरी सबहि सुधि देह की ।***
***॥ तुलसी सराहत सकल सादर सीवँ सहज सनेह की ॥१॥***

***म. छं.*** ***। रस-खाणी सरला मातृवाणी भरत परिसुनि विव्हळे ।***
***॥ लोचन सरोजे स्रवति सिंचति विरह अंकुर नव जळे ॥***
***। बघुनी दशा ती समयिं त्या सब देहभाना विसरती ।***
***॥ सुस्नेह सीमा सहज, तुलसी आदरें सब वानती ॥१॥***

**अर्थ** - स्नेहरसाची व सरलतेची खाणच अशी मातेची ती वाणी ऐकून भरत विव्हळ (व्याकुळ) झाले. नेत्ररूपी कमळे पाझरू लागून (हृदयातील) विरहाच्या नवीन अंकुरांवर (जणू) जलसिंचन करीत आहेत. ती भरताची दशा पाहून त्या समयी सर्व लोक देहभान विसरले; तुलसीदास म्हणतात की भरताच्या सहज सुंदर स्नेहाची सीमा सर्व लोक आदराने (मनांत) प्रशंसू लागले. (वानिती) ।।छंद।।

**टीका - (१) ल. टे.** हिंदी छंदाच्या पहिल्या चरणांत, भरताची व्याकुळता कवीच्या हृदयात शिरून, तिने छंदोभंग निर्माण केला आहे; पण अनुवादकाचे हृदय वज्राचे घडविलेले असल्याने अनुवादांत तो सहज निर्माण झाला नाही मुद्दाम निर्माण करण्यांत स्वारस्य नाही ! हिंदीतील पहिला चरण छंदोभंग दोष काढून टाकलेला व जसा आहे तसा असे दोन्ही खाली लिहिले आहेत दोन्ही. तालावर वाचून पहावे म्हणजे मूळचा चरण वाचताना कशी गडबड उडते व

अडखळावे लागते ते कळेल.

**सुधारलेला चरण** - रस२, सरल३, सानी४, मातु३, बानी४, भरत३, सुनि ४ व्याकुल भए ।

**मूळचा चरण** - सा२,नी३ स रल४ रस, मातु३ बानी४, सुनि३ भ । रत४ व्याकुल ५ भए ।

२,३,४,३,४,३,४,५ असे मात्रांचे तुकडे पडले पाहिजेत. सुधारलेल्या चरणांत सर्व शब्द मूळचेच आहेत पण क्रम किंचित बदलल्या बरोबर ३ व ४ मात्रांचे खंड सहज पडले; पण मूळच्या चरणांत । अशी उभी रेघ दिलेल्या ठिकाणी तोडावे लागते; व पुढील अक्षरे ऱ्हस्व असल्याने उच्चार करणे कठीण जाते. परंतु **हा छंदोभंग दूषण नसून नाट्यांतील भूषण आहे. याने भरताची व्याकुळता दाखविली आहे. भरताला हुंदके येत आहेत** हे याने दाखविले. मराठीत छंदोभंग पाहिजे असल्यास सरला रस खाणि मातृवाणी परिसुनि भरत विव्हळे' शब्द तेच आहेत, पण सहज सरल तालबद्ध चालीवर वाचता येते का ही ओळ?

(२) **स्नेह, शील व सरलता** हे गुण हृदयाला आनंद देणारे असले तरी ते भरताला रामविमुख करून रामचंद्रांच्या जन्मसिद्ध हक्काला नष्ट करू बघत आहेत. **'जळो संपदा सकल सुख सुहृद बंधू पितृ माय ॥ रामपदोन्मुख होत जी करिति न मुदा सहाय'** (१८५) असे पुरवसी लोकांना सुद्धा वाटते. मग भरताला काय वाटत असेल बरे? एखाद्या कुटिल चाणक्यनीति-विशारदाने हे सांगितले असते तर भरताला इतके वाईट वाटले नसते. वसिष्ठांनी ५।६ वेळा विविध प्रकारे सांगितले; सचिवांनी हात जोडून सांगितले व कौसल्येनेही तेच सांगितले; पण व्याकुळतेला कारण फक्त **मातृवाणीच** झाली. **(क)** अशा सरळ, प्रेमळ, सुशील अलौकिक राममातेला दुःख देण्यासाठी, मला निमित्त करून, कैकयनन्दिनीने कुटिलता व कठोरतामूर्ति बनून रामासारख्या बंधूला वनांत पाठवून, दशरथासारख्या पित्यास व सम्राटास ठार मारून सर्व प्रिय प्रजेला शोकचिंतासागरांत लोटावी ना! इत्यादी विचारांनी आत्मग्लानि, पश्चात्ताप वगैरेंचा जोर पुन्हा होणे साहजिक आहे. हे भरत पुढे स्पष्टच सांगत आहेत. अन्यायाने विश्वासघाताने, निर्दयतेने, सूडबुद्धीने, मत्सराने मिळविलेले कलंकित राज्य मी ग्रहण करावे काय? रामद्रोही, मातृपक्षपाती असे म्हणवून घ्यावे काय? अशा अलौकिक मातृदेवीच्या इच्छेचा अव्हेर करावा काय? इत्यादी अनेक परस्पर विरोधी विचारांनी हृदय संतप्त

झाले आणि रामवनवास ! माझ्यामुळे_व या दोन पालुपदांवर भरताचे विचार येऊ लागले **हेच ते नवे जोमांत फुटलेले, विरहांकुर !**

(३) **लोचन सरोजे स्रवति सिंचति** - नेत्रांतून घळघळां अश्रुप्रवाह सुरू झाले व ते जल संतप्त झालेल्या हृदयभूमीत जोमाने उगवलेल्या नवीन विरहांकुरांचे पोषण करू लागले. भाव हा आहे की अश्रुमोचनाने विरहशोकाग्नी शीतल न होता तो अधिकाधिक भडकत चालला. (क) **बघुनी दशा ती** - ही निःशब्द व्याकुळतेची दशाच इतकी बोलकी झाली की त्या जलधारानी संशयग्रस्त व्यक्तींच्या हृदयांतील संशय मळ धुवून टाकला; व भरताचे ते रामप्रेम पाहून सर्व आपला शोक विसरून तटस्थ झाले. **देहभाना विसरती** देहाची सुद्धा शुद्धी राहिली नाही व सावध झाल्यावर आदराने जो तो आपल्या मनांत भरताची प्रशंसा करू लागला. **भरताच्या या निःशब्द भाषेनेच आजची सभा जिंकली, हे सुचविले.** आतां शब्दांनी जिंकणे फार सोपे झाले आहे. सर्वांच्या हृदयाची आता अशी तयारी झाली आहे की भरत म्हणतील ते सर्वानुमते बिनविरोध अगदी मान्य ! **निःस्वार्थी शुद्ध सरल हृदयाच्या अनन्य प्रेमात किती सामर्थ्य असते याचा हा पहिला नमुना आहे.**

***हिं. सो.*** *। भरतु कमल कर जोरि धीर धुरंधर धीर धरि ॥*
*॥ बचन अमिअँ जनु बोरि देत उचित उत्तर सबहि ॥१७६॥*

***म. सो.*** *। भरत कराब्ज जुळून धीर धुरंधर धीर धरी ॥*
*॥ वचन अमृतिं घोळून सकलां उचितोत्तर देति ॥१७६॥*

**अर्थ** - धैर्यधुरंधर भरताने धीर धरला व आपले कमलांसारखे हात जोडून व आपल्या वचनास (जणू) अमृतात घोळून ते (आता) सगळ्यांना योग्य उत्तर देतात :

॥ दो. १७६ ॥ (अमृतिं = रामस्नेहामृत, १८४।१ पहा) (बोरि = बुचकळून, बुडवून)

**टीका (१) वचन अमृतिं घोळून .. देति** - गुरू माता पिता स्वामी इत्यादि माणसांनी हितोपदेश केल्यानंतर त्यांना उत्तर देणे हा शिष्य पुत्रसेवक यांचा धर्म नाही. विरुद्ध उत्तर देणे तर ऐकणारांस अप्रसन्न करते. पण भरत असे उत्तर देणार आहेत की आपला अनादर झाला असे कोणासच न वाटता हे उत्तर म्हणजे शब्द नसून केवळ शुद्ध अमृतच वाटणार आहे. सर्वांच्या कर्णपुटांत असे अमृत घालणार आहेत की रामविरह विषाने मृतवत झालेल्या हृदयाचे

संजीवन होऊन तीं पुन्हा पूर्ववत टवटवीत व उत्साहमय होतील. **(क) कराब्ज** = कर कमल प्रेक्षक श्रोत्यांना भरताविषयी किती आदर वाटत आहे हे कमल शब्दाने ध्वनित केले आहे.

(२) **भरताचे भाषण** १७७।१ पासून १८३ अखेरपर्यंत आहे. **'जयति वचनरचना अति नागर'** (१।२८५।३) हे जसे परशुरामाने रामलक्ष्मणांविषयी म्हटले; तसेच किंवा त्याहूनही सुंदर व सर्वांग परिपूर्ण **'भरतभारती मंजु मराली'**च आहे हे आता दिसेल.

***श्री मानस गूढार्थचंद्रिका अयोध्या काण्ड अध्याय १७ वा समाप्त***

●●●

# अध्याय १८ वा

*हिं. । मोहि उपदेसु दीन्ह गुर नीका । प्रजा सचिव संमत सबही का ॥१॥*
*। मातु उचित धरि आयसु दीन्हा । अवसि सीस धरि चाहउँ कीन्हा ॥२॥*
*। गुर पितु मातु स्वामि हित बानी । सुनि मन मुदित करिअ भलि जानी ॥३॥*
*। उचित कि अनुचित किएँ बिचारू । धरमु जाइ सिर पातक भारू ॥४॥*
*म. । गुरुनीं कृत उपदेश शुभ मला । प्रजा सचिव संमत तो सकलां ॥१॥*
*। आई आज्ञपि समुचित गणुनी । इच्छितोच करण्या शिरिं धरुनी ॥२॥*
*। गुरुपितृमातृ - स्वामि - हित - वचने ॥ मुदित मनें शुभ जाणुनि करणें ॥३॥*
*। उचित किं अनुचित करत विचारा । धर्मनाश,शिरिं पातक भारा ॥४॥*

**अर्थ** - गुरुजींनी मला जो उपदेश केला तो चांगला (शुभ, नीका) च आहे; आणि तो प्रजा व सचिव यांना व सर्वांनाच मान्य आहे. ॥१॥ तो उपदेश अगदी उचित आहे असे ठरवून आईने (कौसल्या मातेने) पण आज्ञा दिली आहे व त्याप्रमाणे तो शिरसा वंदून करण्याची माझीही इच्छा आहे ॥२॥ गुरुपिता माता व स्वामी (प्रभु, सेव्य) यांचे वचन हितकारक असते; म्हणून ते शुभ मानून प्रसन्न मनाने करणे जरूर आहे ॥३॥ ते योग्य की अयोग्य असा (नुसता) विचार केला तरी सुद्धा धर्मनाश होतो व पातकांचा भारा डोक्यावर बसतो. ॥४॥

**टीका. चौ. १-२ (१) गुरुनीं कृत उपदेश** - याने ध्वनित केले की **गुरुजींनी आज्ञा दिली असे वाटत असेल तर तो गैरसमज आहे.** या चार चौपायांत सर्वांच्या म्हणण्याची महती सांगतात. शिष्य प्रजाजन व पुत्र या नात्यांनी माझे कर्तव्य मी जाणतो. मी येथील कोणाच्याही म्हणण्यास विरोध करीत नाही; विरोध करण्यासारखे त्यांत अनुचित नाहीच इ. गोष्टी सांगितल्या आहेत. यांतील प्रत्येक चौपाई भरताविषयी आदर व प्रेम वाढविण्यास समर्थ असून श्रोत्यांचे नेत्रांना व कानांना अत्यंत उत्सुकतेने भरताकडे आकर्षण करणारी आहे !

**चौ. ३. (१) गुरू पितृमातृ स्वामि** - येथे उत्तरोत्तर श्रेष्ठतेचा क्रम वापरला आहे; कारण पित्यापेक्षा माता श्रेष्ठ हे निर्विवाद आहे. **गुरू = कुलगुरू. स्वामींचे वचन सर्वांत श्रेष्ट असे भरत सांगू इच्छितात. 'स्वामि राम शुभ दासा दूषण'** (२३४।२) हे भरत वचन आहे. राम परमात्मा आहेत हे भरत जाणतात आणि म्हणूनच मातेच्या पेक्षा स्वामीश्रेष्ठ हे येथे सुचविले आहे. भाव हा आहे की

पिता विद्यमान नाहीत; गुरू व माता यांचे मतैक्य आहे; पण स्वामींची आज्ञा काय आहे ते नक्की समक्ष समजल्याशिवाय माझ्या स्वतःच्या इच्छेला काहीच किंमत नाही. स्वामींची इच्छा कळल्याशिवाय मला काहीच ठरविता येत नाही.

**चौ. ४ - (१) उचित किं अनुचित करत विचारा** - मी असा विचार मुळीच करीत नाही. गुरू पिता माता यांची इच्छा व वचने कळली आहेत; व ती शिरसावंद्य आहेत; पण स्वामींची आज्ञा न घेता करता येत नाहीत इतकेच. भाव हा आहे की धर्मनाश होऊ नये व पातक लागू नये हे खरे; **पण ज्या धर्माचरणाने व पुण्याने परमोत्तम धर्माची भागवत धर्माची हानि होत असेल तो धर्म त्याज्यच ठरतो. 'जळो कर्म सुख धर्महि साधन । जिथे रामपदपंकज भाव न'** (२९१।१) हे वसिष्ठ वचनच आहे. **'आपली आज्ञा सकलां मस्तकिं'** (२९१।४) हे ही वसिष्ठ प्रभूंनाच सांगतात. रामाज्ञा या बाबतीत काय आहे ते ऐकल्याशिवाय काहीच करता येत नाही. **हा अंतरीचा भाव आहे**. हा पुढे निराळ्या भाषेत भरत स्पष्ट सांगणार आहेत.

***हिं.*** *। तुम्ह तौ देहु सरल सिख सोई । जो आचरत मोर भल होई ॥५॥*
*। जद्यपि यह समुझत हउँ नीके । तदपि होत परितोषु न जी कें ॥६॥*
*। अब तुम्ह बिनय मोरि सुनि लेहू । मोहि अनुहरत सिखावनु देहू ॥७॥*
*। ऊतरु देउँ छमब अपराधू । दुखित दोष गुन गनहिं न साधू ॥८॥*

***म.*** *। तुम्हिं तर द्यां ऋजु उपदेशा, जो । करिल भलें मम आचरतां तो ॥५॥*
*। जरि हें मी जाणतो नीटसें । परि परितोष न जीविं होतसे ॥६॥*
*। अतां विनति मम ऐकुन घेणें । मग मज जोगी शिकवण देणें ॥७॥*
*। क्षमा ! देत उत्तर अपराधू । आर्त - दोष - गुण गणति न साधू ॥८॥*

**अर्थ** - तुम्हीं तर जो उपदेश दिलात तो इतका सरळ आहे कीं त्याचे आचरण केले असता माझे बरे होईल. ॥ ५॥ हे जरि मला चांगले कळत आहे तरि (त्याने) माझ्या जिवाचे समाधान (परितोष) होत नाही.॥६॥ म्हणून आपण माझी विनंती (आधी) ऐकून घ्यावी व मग मला योग्य असा उपदेश द्यावा.॥७॥ मी उत्तर देत आहे हा अपराध आहे; पण आपण क्षमा करावी; कारण की साधू आर्ताचे (दुःखी) दोषगुण पहात नाहीत.॥८॥

**टीका. चौ. ५-६ (१) जरि हें मी म्हणतो** - गुरु पिता माता इत्यादींचे वचन अनुचित असले तरी विचार न करता त्याचे पालन केले पाहिजे. आपण तर

माझ्या हिताचेच सांगितलेत व ते केल्यास माझे इहपर हित होईल. या सगळ्या गोष्टी खऱ्या; पण असे करण्याने माझ्या जीवीची तळमळ जाणार नाही; त्यामुळे माझा नाइलाज झाला आहे. याबद्दल माझे मलाच वाईट वाटते. बुद्धीला सर्व गोष्टी पटतात पण मनाची तळमळ जात नाही.

**चौ. ७-८ (१) अतां बिनति मम** - सुचविले की आपण जो उपदेश केलात तो सर्वसामान्य आहे. साधारणपणे सर्व राजपुत्रांस योग्य असा आहे; परंतु तो माझ्या योग्यतेचा नाही; कारण की त्याने माझे समाधान होत नाही व होणे शक्य नाही. माझ्या जिवाला परितोष कशाने होईल ते आपण आधी कृपा करून ऐकून घ्यावे व मग माझी पात्रता, योग्यता पाहून सांगावे. **(क) क्षमा ! देत उत्तर अपराधू** - उपदेश शिरसामान्य न करून त्या विषयी काही बोलणे, आपली बाजू मांडणे म्हणजेच उत्तर देणे. असे उत्तर देणे पाप, अपराध आहे. **'श्वशुर - पित्यांसम तुम्हिं हितकारी । प्रत्युत्तरणें अनुचित भारी'** (९७।८) सीता सुमंत्रास म्हणाली आहे. **'तुम्हां तात बहु काय सांगुं बरं ! । पापलाभ देतां प्रत्युत्तर'** (९५।८) राम सुमंत्रास म्हणाले आहेत.

**(२) आर्त दोष गुण गणति न साधु** - हे सुभाषित झाले आहे. **'बाल दोषगुण - गणति न साधू'** (१।२७५।५) असे विश्वामित्रांनी भृगुपतींना सांगितले आहे. या दोन वचनांनी सुचविले आहे की **बाल व आर्त (दुःखी, कष्टी, संकटग्रस्त) यांची योग्यता सारखीच.** बालकांची विचारशक्ती तरी किती ! तसेच आर्ताचे असते. **'आर्त कधीं न बिचारें वदतो । डाव जुगाऱ्या अपला दिसतो'** (२५८।१) आर्ताची विचारशक्ती बालकासारखी झालेली असते. म्हणून त्यांच्यात काही गुण दिसले तरी प्रशंसा करण्याचे कारण नसते व दोष दिसले तरी रोष करण्याचे कारण नाही. साधू दोन्हींकडे दुर्लक्षच करतात; म्हणजे दोघांबद्दल क्षमा करतात.

*हिं.दो. । पितु सुरपुर सिय रामु बन करन कहहु मोहि राजु ॥*
*॥ एहि तें जानहु मोर हित कै आपन बड़ काजु ॥१७७॥*

*म.दो. । सिता राम वनिं नाकिं नृप म्हणां राज्य कर तात ! ॥*
*॥ समजां मम हित होइ कीं महा कार्य निज यांत?॥१७७॥*

**अर्थ** - सीताराम वनांत आहेत; राजे स्वर्गात आहेत; आणि मला म्हणता की तात ! राज्य कर. याने माझे हित होईल असे वाटते की तुमचे काही महत्कार्य याने साधणार आहे असे वाटते ? ॥ दो. १७७ ॥ (नाक = स्वर्ग)

**टीका. (१) म्हणां राज्य कर तात !** - भाव हा की जे राज्य देण्याच्या नुसत्या चर्चेने रामचंद्रांस वनांत जावे लागले व ज्याच्या निमित्ताने (माझ्यामुळे) पित्याला स्वर्गात जावे लागले, असे जे अनर्थाचे मूळ व शोकाचे कूळ, ते राज्य मला करावयास सांगता ? **'शोकसमाज राज्य का गणना'** असे पुढे म्हणणार आहेत. **(क) समजा मम हित होइ ? – 'यांत भलेपण सर्व तुम्हाला' 'माना वचना हित जाणुनि' ही वसिष्ठ वचने व 'ती आदरणें हितकर मानुनि'** हे कौसल्या वचन यांवर कटाक्ष आहे. भाव हा की राज्य स्वीकारण्यात माझे मुळीच हित नसून अत्यंत अकल्याण आहे असे मला वाटते.

**(२) की निज महा कार्य होइ (असें) समजां ? - 'पाळा प्रजा शोक परिहरणें' 'सकल माताही । प्रजासुखें पावती सुखाही' 'सकलां बाळ ! तूंच अवलंबन' 'प्रजे पाळि परिजन - दुःखां हर'** या वसिष्ठांच्या व कौसल्येच्या वचनांवर कटाक्ष आहे. भाव हा आहे की मी राज्य ग्रहण केल्याने या गोष्टी साधतील असे तुम्हांस वाटते. पण मला वाटते की मी तसे केल्यास सर्वांवर नवीन अनर्थ ओढवतील. प्रजेचा शोक वाढेल व सर्वांना पश्चात्ताप करावा लागेल. असे का याचे कारण १७९।१-३ मध्ये सांगतील.

**ल. टे. - हें भरताचें प्रश्नात्मक उत्तर** इतके प्रभावी आहे की **'बृहस्पतीसमोवक्ता'** असे या एका दोह्यानेच म्हणता येईल - या प्रश्नांची उत्तरे देण्याची ताकद प्रजा, सचिव व कौसल्या यांची तर नाहीच पण वसिष्ठांची मतिसुद्धा अशी कुंठित झाली की हा दरबार बरखास्त होईपर्यंत त्यांनीसुद्धा पुन्हा एक शब्द उच्चारला नाही ! या प्रश्नांचे उत्तर येत नाही असे ठरताच भरताची विजयी भारती निर्भय व निःसंकोचपणे गंगाप्रवाहासारखी वाहू लागली. स्वतःचे हित कशात आहे हे आता प्रथम सांगतात.

***हिं.*** ***। हित हमार सियपति सेवकाई । सो हरि लीन्हि मातु कुटिलाई ॥१॥***
***। मैं अनुमानि दीख मन माहीं । आन उपाय मोर हित नाहीं ॥२॥***
***। सोक समाजु राजु केहि लेखें । लखन रामसिय बिनु पद देखें ॥३॥***

***म.*** ***। सीतापति - सेवें अमचें हित । तें तों जननि-कुटिलतेनें हृत ॥१॥***
***। मी विवरुनि पाहिलें मनांही । अन्य उपायीं हित मम नाहीं ॥२॥***
***। शोक-समाज राज्य का गणना । दृष्टि राम-सिय-लक्ष्मण-पद ना ॥३॥***

**अर्थ** - सीतापतीच्या सेवेत (च) आमचे (सर्वांचे) हित आहे; व ते तर

जननीच्या कुटिलपणाने नाहीसे केले आहे.॥१॥ मी मनात पुष्कळ विचार करून पाहिला, तेव्हा ठरले की माझे (तरी) हित अन्य उपायांनी होणे शक्य नाही.॥२॥ जोपर्यंत रामसीता व लक्ष्मण यांच्या पायांचे दर्शन (दृष्टि=दर्शन) नाही तोपर्यंत शोकसमाज राज्याची गणना (किंमत) ती काय ? ॥३॥

**टीका. चौ. १-२ (१) अमचें हित =** आपले सर्वांचेच हित सीतापति रामचंद्रांची सेवा करण्यात आहे; व ते हित चोरले गेले आहे. सीतापति परमात्मा आहेत हे भरत जाणतात; म्हणून त्या भावनेने हें मत त्रिसत्य आहे. मला राज्य समर्पण करण्यात कोणाचेच हित नाही; पण हे सर्वांच्या विषयांचे माझे मत सर्वांनाच पटेल न पटेल; म्हणून माझ्या स्वतःविषयी मी खात्रीपूर्वक सांगतो की **(क) अन्य उपायीं हित मम नाहीं -** माझे हित तरी अन्य कोणत्याही साधनांनी होणार नाही. दोह्याच्या उत्तरार्धातील 'ममहित' आणि 'तुमचें महा कार्य' याचे एकच उत्तर येथे पहिल्या चौपाईत 'अमचें हित' याने दिले व नंतर 'समजां मम हित होइ?'चे उत्तर या दुसऱ्या चौपाईत दिले व पुढील चौपाईत अधिक स्पष्ट केले आहे.

**चौ. ३ (१) शोकसमाज... दृष्टि रामसिय लक्ष्मण-पद ना - 'दृष्टिर्ज्ञानेऽक्ष्मि दर्शने'** (हैम,) **'पाळा प्रजा शोक परिहरणें'** या वसिष्ठांच्या वचनावर आणि १७६।६ चे हे उत्तर आहे. भाव हा की माझ्या व प्रजेच्या व परिवाराच्या शोकाचे मुख्य कारण भूपतिमरण नसून रामवनवास व सीता व लक्ष्मणही वनात जाणे हे आहे. जोपर्यंत कारणनाश होत नाही तोपर्यंत कार्यनाश होणे अशक्य आहे. प्रजेच्या शोकाचे एकच कारण आहे ते दूर केले गेले तरच प्रजेचा शोक दूर होईल. माझ्या शोकाची तर अनेक कारणे आहेत. त्यांत राज्य न मिळणे हे अंशतः सुद्धा कारण नाही. माझ्या निमित्ताने रामवनवास; रामलक्ष्मण सीतावियोग; माझ्यामुळे प्रजेला शोक, माझ्यामुळे राजांना शोक व त्यांचे मरण; माझ्यामुळेच कुळाला कलंक, ही सर्व माझ्या शोकाची कारणे आहेत. म्हणून मी राज्याचा स्वीकार करणे म्हणजे शोकसमुदायांत रात्रंदिवस निवास करणे आहे. माझ्या व सर्वांच्या शोकाचा विनाश सीतारामलक्ष्मण पददर्शन झाल्याशिवाय होणार नाही. मुख्य भाव हा की रामदर्शन झाल्यावर प्रभूंनीच तशी आज्ञा दिली तर मग काय करावयाचे ते पाहता येईल; **पण प्रभु मला शोक समाजात ढकलणार नाहीत.**

(२) **शंका -** सुमंत्राबरोबर भरताला म्हणून पाठविलेला संदेश, जो त्यांनी दशरथांस सांगितला तो, भरत आल्यानंतर किंवा या वेळी त्यांस कोणी का

सांगितला नाही? 'सांगा निरोप येतां भरतां । नीति न सोडा राज्य पावतां ॥ **पाळा प्रजा कर्म मन वाणीं** । इत्यादि (१५२।३-४). यांतील ठळक अक्षरांतील संदेश या वेळी सांगितला असता तर सर्व चर्चा बंद झाली असती. **समाधान** - (१५३।४ टी.प.) सचिवांनी अनुमोदन देताना सुमंत्र जर हजर असते तर त्यांनी हा निरोप सांगणे जरूर होते व सांगितलाही असता; पण तेच बेपत्ता झालेले आहेत आणि तो निरोप येथेही न सांगण्याने या पूर्वीच्या अनुमानाला येथे सबळ पुरावा मिळाला आहे. **(क) पुन्हा शंका =** मग सुमंत्राने राजाज्ञा मोडली की नाही ? **समाधान** - रामाज्ञा मोडील असा कोणी त्रैलोक्यांत असणे शक्य नाही हे पूर्वी अनेक वेळा दाखविले आहे. ज्या अर्थी निरोप सांगितला नाही त्या अर्थी ती रामाज्ञा नव्हती हे ठरले. वस्तुस्थिती अशीच आहे. तो निरोप रामचंद्रांनी स्वतः पाठविला नव्हता. त्यांनी दिलेल्या अधिकारात राजांचे समाधान करून त्यांस धीर देण्यासाठीच सुमंत्राने इतर सर्व निरोप सांगितले आहेत.

**(३) शंका** - तो निरोप सुमंत्राने सांगितला तेव्हा कौसल्या तेथे हजर होती. तिने तो सुमंत्राने सांगितलेला निरोप एकदासुद्धा कसा सांगितला नाही? समाधान सुमंत्र संदेश सांगत असताच सर्व राण्या व्याकुळ झालेल्या होत्या व लगेच दशरथ मरण पावले. त्या शोकांत त्या निरोपाची आठवण कौसल्या किंवा इतर राण्या यांस राहिली नाही; व याचे कारणही तो संदेश रामचंद्रांनी पाठविलेला नव्हता हेच आहे.

**(४) शंका** - लक्ष्मण भरतापेक्षा लहान असून भरतानी सेवाभावसूचक 'पद' शब्द का वापरला ? **समाधान** - लक्ष्मण सर्वस्वाचा व पत्नीचासुद्धा त्याग करून सीतारामसेवा परायण होऊन रामाबरोबर वनात गेला; म्हणून भरत लक्ष्मणांस महा भाग्यवान समजतात व स्वतःला अभागी समजतात. '**अहह धन्य लक्ष्मण बहुभागी । रामपदारविंद अनुरागी ॥ कपटी कुटिल हि मी प्रभु जाणति । म्हणुन नाथ मज सवें न राखति**' (७।१।३-४) '**त्रिभुवनिं मजसा कोण अभागी**' (१६४।६) वयोवृद्ध, तपोवृद्ध, ज्ञानवृद्ध वगैरे वृद्धांचे अनेक प्रकार आहेत त्यांत नुसत्या वयोवृद्धतेला विशेष मान नाही, हे सर्व उत्तरोत्तर अधिक पूज्य, मान्य व वंद्य आहेत. त्याप्रमाणेच **लक्ष्मण रामसेवावृद्ध व तपोवृद्ध असल्याने भरतांस पूज्य व आदरणीय वाटले.**

***हिं.*** *। बादि बसन बिनु भूषन भारु । बादि बिरति बिनु ब्रह्म बिचारू ॥४॥*
*। सरुज सरीर बादि बहु भोगा । बिनु हरिभगति जायँ जप जोगा ॥५॥*
*। जायँ जीव बिनु देह सुहाई । बादि मोर सब बिनु रघुराई ॥६॥*

*। जाउँ राम पहिं आयसु देहू । एकहिं आँक मोर हित एहू ॥७॥*
*। मोहि नृप करि भल आपन चहहू । सोउ सनेह जड़ता बस कहहू ॥८॥*
म. *। वृथा वसनविण भूषण भारहि । वृथा विरतिविण ब्रह्मविचारहि ॥४॥*
*। सरुज शरीर वृथा बहु भोगहि । विण हरिभक्ति वृथा जप योगहि ॥५॥*
*। वृथा जिवाविण काया सुंदर । वृथा सर्व माझें विण रघुवर ॥६॥*
*। आज्ञा द्या जातो रामाप्रति । हा सिद्धान्त एक हित मम अति ॥७॥*
*। मज नृप करुनी स्वहित वांछितां । तें स्नेहज जडता-वश कथितां ॥८॥*

**अर्थ -** वस्त्रांवाचून अलंकार भूषणे व्यर्थ व भारभूत होत. वैराग्याशिवाय ब्रह्मविचार व्यर्थ होय.॥४॥ शरीर रोगी असेल तर पुष्कळ भोग निष्फळ होत; आणि हरिभक्ती विरहित जपयोग इ. निरर्थक होत.॥५॥ जिवावाचून सुंदर काया वाया होय; व रघुवरावाचून माझे सर्वच निरुपयोगी आहे.॥६॥ मी रामाकडे जातो कारण हा एकच सिद्धान्त आहे की हे एकच माझे मोठे हित आहे; (म्हणून) आपण आज्ञा द्यावी.॥७॥ मला राजा करून आपण आपले हित इच्छिता ते (केवळ) स्नेहाने उत्पन्न झालेल्या मोहाला (जडतेला) वश होऊन आपण सांगता (आपणांस तसे वाटते.)॥८॥

**टीका. -** पहिल्या पाच चरणांत पांच दृष्टान्त दिलेले असून ती पांच सुभाषिते आहेत. यांचा संबंध मागल्या चौपाईशी आहे व प्रत्येकात हेतु आहे.

**चौ. ४ - (१) वृथा वसनबिण भूषण भारहि -** शरीरावर मुळीच वस्त्र नसणे हा प्रथम निर्लज्जपणा आहे; असे असता विविध भूषणे अंगावर घालणे हा शुद्ध **वेडेपणा,** त्या शरीराची **विटंबना,** भूषणांचा **अपमान** व शरीराला वृथा भार होय. सीता म्हणालीच की - **'भोग रोग सम भूषण भारहि'** (६५।५) **(क)** रामदर्शन हे वस्त्रासारखे आहे, राज्य भूषणांसारखे आहे. भरत म्हणतात रामदर्शन न घेता राज्यरूपीभूषण धारण करणे म्हणजे नग्न शरीराला भूषणांनी सजविणे आहे. **यात माझे हित, माझी शोभा नसून निर्लज्जपणा, वेडेपणा, स्वतःची विटंबना, त्या राजसिंहासनाचा अपमान व मला व पृथ्वीला भार आहे. 'सर्व परीं भूषित विधुवदना । वरनारि न शोभे विण बसना'** (१।३०।४) **'राम बिमुख संपत्ती सत्ता । असली नसली प्राप्त सम गता'** (५।२३।५ टी.प.)

**(२) वृथा विरतिविण ब्रह्मविचारहि -** वैराग्यावाचून ब्रह्मज्ञानाची प्राप्ती होणे - अशक्य आहे. 'ज्ञान किं होइ विरागविण' (७।८९) पण येथे ज्ञान न म्हणता

ब्रह्मविचार म्हटले. वैराग्याशिवाय ब्रह्मविचार करण्याचा अधिकारच नाही. **वैराग्यहीन ब्रह्मविचार पंगु; शोकमोहनाश करून चिरस्थिरसुख देण्यास असमर्थ आहे.** ब्रह्मविचार करणे मुख्यतः संन्याशांचा धर्म आहे; पण **'पात्र** सकल नृप **उपहासासी** । जेविं **विरागविना** संन्यासी' (१।२५१।३) **विनाविराग ब्रह्मविचार उपहासास्पद, शोकमोह वाढविणारा व दुःखदायी ठरतो.** तसेच रामविमुख राहून राज्य स्वीकारणे उपहासास्पद, शोकमोह वाढविणारे व दुःखदायीच ठरणार. वैराग्यहीन माणसाला ब्रह्मविचार सांगणारा (महावाक्योपदेश करणारा) स्नेहादिकांनी जडतावश झालेला असेल तोच सांगेल. **'अज्ञस्याऽल्पप्रबुद्धस्य अहं ब्रह्मेति यः वदेत् । महानरकजालेषु स तेन विनियोजितः'** (श्रुति; गरुड पु.) मला राज्य करण्यास सांगणारे असेच करीत आहेत.

**चौ. ५ (१) सरुज शरीर वृथा बहु भोगहि** - शरीर रोगी असता भोगसामग्री समोर दिसल्याने किंवा असलेलीचे स्मरण होण्याने दुःख शोक वाढतात; व भोग भोगल्यास मरणच येते. तसेच रामवियोगरूपी कुरोगांत राज्यभोग सेवन हे कुपथ्य होऊन माझा विनाश होईल. **'रामवियोग कुरोगें मृतवत'** (१५८।७) किंवा दिसणारे सर्व राज्यभोग व रामाचे वनवास क्लेश यांची तुलना करीत राहण्याने शोकदुःख वाढणार.' **'मागि कुपथ्य गदाकुल रोगी । देइ न वैद्य बघा मुनि योगी'** (१।१३३।१) मी तर मला झालेल्या कुरोगात हे कुपथ्य नको म्हणत आहे; पण आपण सर्व मला कुपथ्य करण्यास सांगत आहात. म्हणून आपण वैद्य नसून **पुत्रस्नेहाने मोहित होऊन रोगी पुत्राला, 'खारे बाबा दोन घास' असे प्रेमाने विनवून कुपथ्य देणाऱ्या मातेसारखे आहात आपण**; स्नेहाने जडतावश सांगतां.

**(२) विण हरिभक्ति वृथा जप योगहि - 'विरतिस धर्म योग दे ज्ञाना । ज्ञान मोक्ष दे श्रुति करि गाना'** (३।१६।१) **'यज्ञानां जपयज्ञोऽस्मि'** यज्ञ हे धर्माचरण आहे. म्हणून येथे हरिनामजप हा विषय नसून योगाशी संबंध असलेला जप येथे विवक्षित आहे; म्हणून जप-धर्माचरण धर्माने विरति, विरतीने योग, योगाने ज्ञान व ज्ञानाने मोक्ष मिळतो. असा मोक्षलाभ झाला तरी **'तथा मोक्षसुख बघ खगराया टिकु न शके हरिभक्ति बिना या'** (७।११९।६) **'भक्तिहीन नर शोभे कैसा । दिसे वारिविण वारिद जैसा'** (३।३५।६) आणि **'करुनि कष्ट जरि (ज्ञान) मिळे कुणाला। भक्तिहीन तो प्रिय नहिं मजला'** (७।४५।४) ही दोन्ही रामवचनेच आहेत. रामविरहानलाने मी जळत असता मला रामविमुख करून राज्य समर्पण करण्याने मोक्षसुखासारखेच ते राज्य मला पृथ्वीला व प्रजेला सुखदायक होणार नाही; कारण

भक्तिहीन मोक्षसुख विनाशी आहे व रामाला असले ज्ञानी आवडत नाहीत.

**चौ. ६ - (१) वृथा जिवाविण काया सुंदर - काया = देह.** जीव नसलेला देह = शव, मढे; ते सुंदर असले तरी अपवित्रच. जेथे ते असेल ते स्थान स्मशान, ते कुटुंब अशुचि, सर्वच अपवित्र. त्याप्रमाणे **'प्राणांप्राणहि जीव जिवाचा'** असे जे राम ते नसता मी राजा होणे म्हणजे मृतदेहाने राजा होण्यासारखे आहे आणि मला राज्यावर बसविणे म्हणजे मढ्याला राज्यावर बसविणे आहे. मला राजा करणे म्हणजे राजसिंहासन अशुचि बनविणे, सर्व रघुकुल अशुचि, परिवार, पुरजन अशुचि; व नगरी स्मशानच बनविणे आहे. अशौचांत संध्येशिवाय इतर नित्यकर्म, पूजा, पाठ, वेदपठन, श्रौतस्मार्त कर्मे, श्राद्ध, तर्पण, तीर्थयात्रा, ब्राह्मणभोजन, अतिथि सत्कार इ. सर्व धर्म-कर्मांचा लोप असतो; तसा माझ्या राज्यात धर्म-कर्मांचा लोप होईल; व रसा रसातळी जाईल ! सुंदर शवाला राजसिंहासनावर बसविणारे स्नेहाने जडतावश झालेलेच ठरणार !

(२) **वृथा सर्व माझें विण रघुवर** - राम रघुकुल श्रेष्ठ असल्याने तेच राजा होण्यास लायक आहेत. मी सर्वस्वी नालायक आहे. सर्व म्हणजे धर्म, अर्थ, काम, मोक्ष, व्यर्थ आहेत; नको आहेत; फक्त रघुवर पाहिजेत. राज्य नको म्हणण्याने **अर्थ नको** हे ठरले, जप नको = **धर्म नको**; योग नको = **ज्ञान, मोक्ष नको**; सुंदरकाया, भोग, भूषणे नकोत = **काम नको** हे दर्शविले. **'अर्थ न धर्म न कामरुचि नको गतिहि निर्वाण ॥ जन्म जन्म रति राम पदिं'** पाहिजे फक्त (२०४) हेच येथे सुचविले.

**चौ. ७ - (१) आज्ञा द्या जातो रामाप्रति** - या चौपाईने स्पष्ट सांगितले की वर दाखविल्याप्रमाणे मी व माझे सर्व रामाशिवाय व्यर्थ असल्याने रामाकडे जाणे हा एकच एक माझ्या हिताचा मार्ग आहे. हा सिद्धान्त आहे; यात तिळमात्र शंका नाही. हिंदीतील आँक = सिद्धांत. (हिं. म. को.)

**चौ. ८ - (१) मजनृप करुनी... स्नेहज जडतावश कथितां** - पांच दृष्टांतांच्या टीकेत स्पष्ट दाखविले आहे की 'मला राजा केल्याने कोणाचेही हित न होता, तुमचे सर्वांचेही अहितच होणार आहे. आणि हे वाटणे व राज्य कर असे सांगणे स्नेहजनित मोह (जडता) कसा आहे हे ही प्रत्येक ठिकाणी दाखविले आहे. सन्निपात ज्वराने फार आजारी असलेल्या आवडत्या पुत्राला अत्यंत प्रेमळ वृद्धमाता स्नेहामुळे दिवाळीतली पक्वान्ने थोडथोडी, आग्रहाने, विनवण्या करून खायला घालते, पण

तिला माहीत नसते की यामुळे तो मरेल, व सर्व कुटुंब शोक सागरात बुडेल व अनेक अनर्थ होतील. तसेच आपले सांगणे आहे. स्नेहामुळे आर्त बनल्याने सर्वांची विचारशक्ती कुंठित झाल्यामुळे ही जडता, हा मोह झाला आहे. जे सर्वस्वाचा विनाश करणारे आहे ते आपल्याला हितकर वाटत आहे; हा आपला दोष नसून माझ्यावरील आपल्या स्नेहाचा दोष आहे. **प्रेम व वैर अंध असतात.** या चौपाईतील 'जडतावश' चा अर्थ पुढे दोह्यांतच 'मोहवश' शब्दाने स्पष्ट केला आहे.

**प्रश्न** !

(१) वसिष्ठ, कौसल्या, सचिव इत्यादी पूज्य मंडळीला उद्देशून **'जडतावश कथितां'** हे मर्यादाभंग करणारे शब्द भरतांनी कसे वापरले ? या प्रश्नाचे उत्तर अमृतांत घोळलेल्या शब्दांनी (उत्तर देण्यास प्रारंभ करण्यापूर्वीच) देऊन ठेवले आहे : **'क्षमा ! देत उत्तर अपराधू । आर्त दोष गुण गणति न साधू'** (१७७।८) यावरील टीका पहावी. (क) भरतांनी दिलेल्या पाची दृष्टांतांनी ही स्नेहजनित जडता सिद्ध झाली आहे; म्हणून काही तरी लटपट करून हे शब्द वसिष्ठ व कौसल्या यांना उद्देशून नसून सचिवादिकास उद्देशून आहेत असे म्हणून अंग झाडून पळवाट काढण्यात अर्थ नाही. राज्य करण्याची सूचना, उपदेश, आज्ञा सचिवांच्या नसून वसिष्ठ व कौसल्या यांच्या आहेत; हे नाकारण्यास फटच नाही. सचिवांनी फक्त वसिष्ठांच्या म्हणण्यास अनुमोदन दिले आहे. असे असता हे शब्द त्यांना उद्देशून नाहीत असे म्हणणे म्हणजे डोळे झाकून घेऊन सूर्य उगवला नाही असे म्हणण्यासारखेच आहे. या भाषणाने भरत सर्वांचे परमहितच साधणार आहेत. भरतांच्या या शब्दांनी कोणालाही तिळमात्र दुःख न होता आनंदाने गुदगुल्याच होत आहेत. स्तन्य पिणाऱ्या बालकाने मातेच्या गालावर चापट मारली तरी मातेला फार आनंदच होतो; तसे येथे घडत आहे. वा. रामायणात भरतांनी वसिष्ठांची तोंडावर निंदा केली आहे. **'विललाप सभामध्ये जगर्हेच पुरोहितम्'** (२।८२।१०) - भरताला हृदयाशी घेतल्यावर कौसल्येच्या स्तनांतून दुग्धधारा उडू लागल्याच आहेत. ती भरताच्या शिशुभावाची जाज्वल्य प्रतीतीच आहे. भरताचे हे शब्द वसिष्ठांस अपमानास्पद वाटले असते तर ते भरताबरोबर जाऊन सर्वांच्या देखत रामाजवळ वशिला लावतेच ना. **'शिष्यादिच्छेत् पराजयम्'** हे या भरतभाषणाने येथे एकदा सत्य ठरले. वसिष्ठांनी ज्या हेतूने भरतास बोलण्यास प्रवृत्त केला, तो त्यांचा हेतु अपेक्षेबाहेर सफल झाला आहे.

कैकयीचे पक्षपाती कोणी असल्यास त्यांच्या व कैकयीच्या तोंडास व कृतीस कुलुप व खीळ घालण्याचे काम भरताच्या मुखानेच परभारे झाले, हे पाहून बहुजन समाजाने समाधानाची ढेकर दिली असेल. 'जातो रामाप्रति' या एका वाक्याने सर्व बाजू अशी उलटून टाकली की धन्य भरत ! धन्य भरत' असे ध्वनि सभेच्या हृदयांत उमटू लागले असतील.

गोस्वामींचे मानसशास्त्राचे ज्ञान, व्यवहारनिपुणता व शब्दपटुता यांचे परमोच्च स्वरूप या भरतभाषणावरून दिसून येते.

*हिं. दो.* ***। कैकेई सुअ कुटिल मति राम विमुख गतलाज ॥***
***॥ तुम्ह चाहत सुखु मोहबस मोहि से अधम के राज ॥१७८॥***
*हिं.* ***। कहउँ साँचु सबु सुनि पतिआहू । चाहिअ धरमसील नरनाहू ॥१॥***
***। मोहि राजु हठि देइहतु जबहीं । रसा रसातल जाइहि तबहि ॥२॥***
*म. दो.* ***। कैकेयीसुत कुटिलमति रामविमुख गतलाज ॥***
***॥ तुम्हिं वांछा सुख मोहवश मज अधमा द्या राज्य ॥१७८॥***
*म.* ***। सत्य वदें विश्वासा धरिजे । धर्मशील नरनाथ पाहिजे ॥१॥***
***। हटें द्याल मज राज्या जेव्हां । रसा रसातळिं जाइल तेव्हां ॥२॥***

**अर्थ** - कैकईचा मुलगा, कुटिलबुद्धि, रामविरोधी व लज्जाहीन अशा मला अधमाला राज्य देता व मोहवश तुम्ही सुख इच्छिता ! ॥१७८॥ मी सत्य सांगतो, तुम्ही माझ्यावर विश्वास ठेवा की नरनाथ (राजा) धर्मशील असला पाहिजे ॥१॥ तुम्ही ज्यावेळी हट्टाने मला राज्य द्याल त्याच वेळी ही रसा = पृथ्वी रसातळाला जाईल (हे लक्षांत असू द्या) ॥२॥

**टीका दो.** (१) **'कैकेयीसुत कुटिलमति ...'** कुटिलबुद्धि, रामविमुख व निर्लज्ज - हे तीन महादोष माझ्यांत आहेत; व त्याचे कारण मी कैकयीसुत आहे. विहिरीत असेल तेच लोट्यात यावयाचे ! कुटिलपणाने राजाचा विश्वासघात करून माझ्यासाठी राज्य मिळविले - रामविरोधी - रामद्रोही असल्याने रामास दुःखद अटी घालून वनांत पाठविले, व निर्लज्ज असल्याने पतीचे शव घरात असता नटून सजून मला ओवाळण्यास आली. हे मातेचे दोष तिच्या सुतात नसतील असे कोण म्हणेल ! माझ्यातही हे आहेतच - एवढे मोठे राज्य विनाश्रम, विना अधिकार, तुम्ही सर्व आग्रहाने पदरात टाकीत असता कोणता शहाणा नको म्हणेल? मी तोंडाने नको म्हणत असलो तरी हे बोलण्यास मी जिवंत

राहिलो यावरून माझ्या प्राणांना राज्यभोग हवे असतीलसे वाटते; म्हणून मनांत एक, प्राणात एक व जनात दुसरेच असा मी कुटिलमति आहे. (चौ. ७ पहा). माझ्यामुळे रामास वनवास! असा मी रामविरोधी आहे. गुरू, माता इत्यादींना स्नेहजड, मोहवश इत्यादि म्हणत प्रत्युत्तर देत आहे आणि रामबंधु म्हणवून घेऊन रामविरहाने हृदय विदीर्ण झाले नाही यावरून मी निर्लज्ज - गतलाज आहे, ही सर्व लक्षणे अति अधर्मी माणसाची आहेत. अशा अधर्मी तरुणाला राजा करून, त्याच्या राज्यात सुखाची आकांक्षा करता याला मोह नाही म्हणावयाचे तर काय? हे भाषण अति आत्मग्लानीचे आहे; व काही लोकांच्या मनात भरताविषयी जे संशय आहेत त्यांचा ध्वनि यांत आहे.

**चौ. १-२ - (१) धर्मशील नरनाथ पाहिजे - 'राज्ञि धर्मिणि धर्मिष्ठाः पापे पापाः समे समाः ॥ राजानमनुवर्तन्ते यथा राजा तथा प्रजाः'** (मा. पी. मधून) 'जसा राजा असेल तशी प्रजा बनते. राजा धर्मनिष्ठ असेल तर प्रजा धर्मनिष्ठ, राजा पापी असेल तर प्रजा पापी, व राजा मध्यम असेल तर प्रजा मध्यम होते.' म्हणून राजा धर्मशील = धर्मनिष्ठ धर्मव्रती असावा. मी अति अधर्मी, पापी आहे. मला राजा केलात की रसा = पृथ्वी रसातळाला गेलीच म्हणून समजा. अधर्माचा, पापांचा भार असा वाढेल की तो पृथ्वी, शेष इत्यादींना सहन होणार नाही. राजानेच प्रजेला हे आदर्श उदाहरण घालून दिल्यासारखे होईल की येन केन प्रकारेण बापाला ठार मारून, पित्यासमान असणाऱ्या वडीलभावास हाकलून देऊन संपत्ती व सत्ता यांचा वाटेल त्या कुटिल कपटी मार्गानी संग्रह करावा. हा आदर्श निर्माण झाला की धर्मशास्त्र ग्रंथांत राहील; कायदे-कानू सरकारी दप्तरात राहतील व घोर अनर्थ ओढवतील. दिवसाढवळ्या धर्मशील वडील भावाचे धाकटे भाऊ गळे कापतील, व राज्याचाच काय पृथ्वीचा विनाश होईल हा मुद्दा इतका महत्वाचा आहे की यावर इतर कोणी उत्तर देणे शक्यच नाही, पण रामचंद्राससुद्धा मान वाकवावी लागणार आहे. हे भरताचे मत नुसते आत्मग्लानीचे नसून यांत राजनीति व धर्म यांच्या समन्वयाचा श्रेष्ठ सिद्धान्त आहे. पण **'धर्मशील नरनाथ पाहिजे'** या **भरत**वचनाची, **भरत**खंडात भारतात आज काय दशा आहे व त्याचा परिणाम काय होत आहे याचा विचार करावा.

***हिं.*** ***। मोहि समान को पाप निवासू । जेहि लगि सीय राम बन बासू ॥३॥***
***। रायँ राम कहुँ काननु दीन्हा । बिछुरत गमनु अमरपुर कीन्हा ॥४॥***

*। मैं सठु सब अनरथ कर हेतू । बैंठ बात सब सुनउँ सचेतु ॥५॥*

*। बिनु रघुबीर बिलोकि अबासू । रहे प्रान सहि जग उपहासू ॥६॥*

म. *। पापनिवास कोण कीं मजसा । ज्यास्तव सिताराम वनवासा ॥३॥*

*। रायें रामा कानन दिधलें ॥ विरहिं अमरपुरिं जाउनि बसले ॥४॥*

*। मी शठ सकल अनर्था कारण । गोष्टि ऐकतो बसुनि सचेतन ॥५॥*

*। विण रघुवीर बघुनि आवासा । जगले प्राण सहुनि उपहासा ॥६॥*

**अर्थ** - ज्याच्यामुळे सीताराम वनवासास गेले, त्या माझ्यासारखा पापांचे निवासस्थान दुसरा कोण असेल? ॥३॥ राजांनी रामास कानन दिले व विरहाने आपण अमरावतीत जाऊन राहिले ॥४॥ या सर्व अनर्थाचे मूळ (हेतु, कारण) मी दुष्ट (शठ) च असून मी जिवंतपणे (स्वस्थ) बसून सर्व गोष्टी ऐकत आहे ॥५॥ (रामाचे) निवासस्थान (आवास) रघुवीर विहीन पाहिल्यावर (या जगांत) उपहास सहन करून सुद्धा माझे प्राण अजून जगले (राहिले) आहेत ! ॥६॥

**टीका - चौ. ४-५ - (१) राये रामा... रामपुरिं वसले** - राजे घाईघाईने स्वर्गाला गेले याचे कारण इतकेच की माझ्यासारख्या पापनिवासाचे तोंड पाहण्याची पाळी येऊ नये; व वचनबद्ध झाल्यामुळे पापमय मुलाला राज्यावर बसविण्याचा अधर्म करण्याची पाळी स्वतःवर येऊ नये. नाहीतर जे रामविरह सहन करून सहा दिवस राहू शकले त्यांना आणखी १५ दिवस येथे राहणे अशक्य होते की काय? **(क) गोष्टी ऐकतो बसुन सचेतन** - भाव हा की राज्याचा स्वीकार करण्याविषयी मला जे सांगण्यात आले ते कानांत पडतांच माझे प्राण निघून जाणे जरूर होते; ते नाही झाले तर निदान प्रगाढ मूर्छा तरी यावयास हवी होती. ती पण आली नाही. यावरून ठरले की माझे हृदय शठाचे आहे प्रेमळ बंधूचे नाही.

**चौ. ६ - (१) जगले प्राण सहुनि उपहासा** - यावरून स्पष्ट दिसते की भरत आल्यापासून त्यांची प्रच्छन्न वा उघड उघड निंदा होत होती. अशी निंदा होणे मनुष्य स्वभावानुसार स्वाभाविक आहे. लोक म्हणणारच की 'माती तसा घडा' रामविरहाचे दुःख भरताला असते तर केव्हाच रामाला भेटण्यास गेला असता इ. इ.

हिं. *। राम पुनीत विषय रस रूखे । लोलुप भूमि भोग के भूखे ॥७॥*

*। कहँ लगि कहौं हृदय कठिनाई । निदरि कुलिसु जेहिं लही बडाई ॥८॥*

हिं. दो. *। कारन तें कारजु कठिन होई दोसु नहिं मोर ॥*

*॥ कुलिस अस्थि ते उपल ते लोह कराल कठोर ॥१७९॥*

*हिं.* ***कैकेइ भव तनु अनुरागे । पावँर प्रान अघाइ अभागे ॥१॥***
***। जौं प्रिय बिरह प्रान प्रिय लागे । देखब सुनब बहुत अब आगे ॥२॥***
*म.* ***। राम पुनीत विषय रस - रुक्षू । लोलुप भूमी भोग बुभुक्षू ॥७॥***
***। किती वदूं मी हृदय - कठिणता । कुलिशा लाजवि मिळवि महत्ता ॥८॥***
*दो.* ***। कार्य कठिण कारणाहुनि माझा दोष न लेश ॥***
***॥ उपल - अस्थि - हुनि लोह - पवि कठिण कराल विशेष ॥१७९॥***
*म.* ***। कैकेयी भव - तनु - अनुरागें । पामर पुरते प्राण अभागे ॥१॥***
***। प्रियविरहीं प्रिय मला प्राण जर । पुढे दिसेल कळेल फार, तर ॥२॥***

**अर्थ** - (माझे प्राण) रामरूपी पवित्र विषयाच्या रसांत अगदी उदास (रुक्ष) आहेत, आणि विषय लोलुप असून भूमी व भोग यांची भूक लागलेले आहेत ॥७॥ माझ्या हृदयाची कठिणता कोठवर सांगू ? वज्राला लाजवून (त्याचा अनादर करून) त्याने मोठेपणा मिळविला आहे ! ॥८॥ (पण) यांत माझा जरा सुद्धा (लेश) दोष नाही (कारण) कार्य आपल्या कारणापेक्षा कठीण असतेच ! (उदा.) दगड (उपल) व अस्थि (हाडे) यांच्यापेक्षा लोह, लोखंड (तलवार) व वज्र (पवि) अधिक कठीण व विशेष भयंकर (कराल) असतातच. ॥दो. १७९॥ कैकयीपासून उत्पन्न झालेल्या या तनूच्या अनुरागाने (आसक्तीने) हे पामर नीच प्राण पुरते अभागी आहेत. ॥१॥ प्रिय रामाच्या विरहांत सुद्धा मला माझे प्राण प्रिय वाटतात तर (एवढ्याने काय झाले?) पुढे अजून पुष्कळ पाहण्यास व ऐकण्यास सापडेल ! ॥२॥

**टीका - चौ. ७ (१) राम पुनीत विषय रसु रुक्षू** - रुक्षू - रुक्ष, उदासीन. उपहास - अपवाद, निंदा सहन करताना सुद्धा प्राण कां गेले नाहीत याचे कारण सांगतात. या प्राणांना रामरूपी पवित्र विषयाच्या रसाची खरी गोडी असती तर तो विषय चोरला गेल्याबरोबर प्राण देहांतून निघून गेले असते. पाणी नाहीसे करून माशाला ठेवला की त्याचे प्राण रहात नाहीत. महाराजांचे प्राण रामरसासक्त होते म्हणून ते राहिले नाहीत; माझे प्राण राहिले ! राहिले कशाला ? विविध विषयांची लालसा व पृथ्वीपति भूमीपति होऊन ऐश्वर्यभोग - याची इच्छा या प्राणांना असली पाहिजे म्हणूनच ते राहिले असावेत. **(क) दुसरा अर्थ** राम पुनीत असल्याने ते विषयरसरुक्ष होते, आहेत; म्हणून ते आनंदाने वनांत गेले; पण मी भवनात राहिलो कारण मी पडलो पापनिवास ! त्यामुळे माझ्या प्राणांना रामरसासक्ति नाही व विषयांची पक्की भूक लागलेली

आहे हे ठरते. गूढ ध्वनि हा आहे की हे असे माझ्याविषयी तुम्हांला मनांत वाटते. वाटले; म्हणूनच राजा हो असे मला म्हणाला. !

**चौ. ८ - (१) किती बदूं मी हृदय कठिणता -** प्राण नाही गेले तर निदान रामवनवास, रामविरह, लोकनिंदा व राजा हो हें ऐकणे हे चार घाव पडल्यावर हृदयाचे तरी तुकडे तुकडे उडावयास हवे होते; पण तेही घडले नाही. एवढे आघात वज्रावर झाले असते तर वज्राचे सुद्धा तुकडे उडाले असते. 'शूल कुलिश असि अंगिं झेलती -' (२२५।४) ते दशरथ महाराज रामवनवास व रामविरह हे दोन घाव होताच मरण पावले. जे उघड्या छातीवर कुळिशाला - वज्राला फुलाप्रमाणे झेलीत असत त्यांचे हृदय वज्रापेक्षा कठीण असलेच पाहिजे; ते ही दोन घावांनी विदीर्ण झाले व प्राण गेले; आणि माझ्या हृदयावर चार आघात होऊन हृदय फुटले नाही तेव्हा माझे हृदय किती कठीण आहे हे कसे सांगता येणार? असे माझे हृदय अति कठोर जाणूनच लोक त्याची प्रशंसा करीत असतील - अशी मिळवी महत्ता. म्हणूनच म्हणतात की राज्य कर. इतके कठीण होण्याचे कारण सांगतात:-

**दो. - (१) कार्य कठिण कारणहुनि -** कैकयी कारण आहे, भरत कार्य आहे. कार्य करण्यापेक्षा कठीण व कठोर असते. जिला पतिमरणाचे दुःख लेशमात्र नाही व रामवनवासाने जी हर्षाने फुलली तिचा मी मुलगा तिच्यापेक्षा अधिक कठीण, कठोर व रामविरोधी झालो यांत नवल नाही व माझा दोष नाही. **(क) दधीचि ऋषींच्या अस्थींचे** केलेले वज्र त्या अस्थींपेक्षा अनंतपट कठीण व भयंकर झाले. **दगडापासून जन्मलेल्या लोखंडाचे** शस्त्र तसेच दगडापेक्षा कठीण व भयंकर झाले. दगडापासून जन्मलेल्या लोखंडाचे शस्त्र तसेच दगडापेक्षा कठीण व कराल. दगडाने गळा कापता येत नाही तो दगडापासून जन्मलेल्या लोखंडाने - तलवारीने एका फटक्यांत कापता येतो ! **'क्रोधें जळत पुढें बहु दिसली । जणूं रोष तलवार उपसली ॥ लक्षि महीप कठोर कराला । सत्य किं घेइल मम जीवाला'** (३१।१,३) अशा कैकयीरूपी कराल कठोर तलवारीपासून झालेला मी तिच्यापेक्षा अधिक कठोर व कराल असणारच; तिने राजांचा गळा कापून त्यांचा प्राण घेतला. तर मी रामाचे राज्य घेणे योग्यच ठरणार ! बंधुप्रेमाच्या नावाखाली, तोंडाने नको नको म्हणत, राजाज्ञेच्या नावाने, पितृवचन परिपालनाच्या मिषाने राम राज्याचा अपहार मी करणारच !

**चौ. १. (१) कैकेयीभव - तनु अनुरागे ... अभागे -** आपला जन्म कैकयीच्या

पोटीं झाला याबद्दल भरताला वारंवार पश्चात्ताप, विषाद वाटत आहे. **'कैकेयीसुत कुटिलमति'** (१७८ पहा) **'जगीं जन्मली कइकइ कां ही । जन्मे तरि कां वांझ न राही ॥ ती प्रसवे मज स्वकुलकलंका । अपयशपात्रा प्रियद्रोहका ॥ त्रिभुवनिं मजसा कोण अभागी '** (१६४।४ - ६). असे कौसल्येस म्हणाले. **'होति दुष्ट अशि तुज इच्छा जर । कां मज जन्मतां न वधला तर'** (१६१।७) असे कैकयीला म्हणाले आहेत. सतीलासुद्धा आपला देह दक्षापासून झाल्याचा पश्चात्ताप झाला व त्यामुळेच त्या देहाचा तिने योगाग्नीने त्याग केला.

**चौ. २ - (१) प्रिय विरहीं प्रिय... पुढे दिसेल, कळेल फार -'** भाव हा की भोगलीं हीं दुःखे काहीच नाहीत. पुढे फार भोगावी लागतील. आजपर्यंत निंदा ऐकली ती काहीच नाही पुढे पुष्कळ ऐकावी लागेल, लागणार आहे; म्हणून तर प्राणांचा या क्षूद्र देहावर एवढा लोभ आहे.

*हिं.* ***। लखन राम सिय कहूँ बनु दीन्हा । पठइ अमरपुर पतिहित कीन्हा ॥३॥***
***। लीन्ह बिधवपन अपजसु आपू । दीन्हेउ प्रजहि सोकु संतापू ॥४॥***
***। मोहि दीन्ह सुख सुजसु सुराजू । कीन्ह कैकई सब कर काजू ॥५॥***
***। एहि तें मोर काह अब नीका । तेहि पर देन कहहु तुम्ह टीका ॥६॥***

*म.* ***। लक्ष्मण - राम - सिते वन दिधलें । स्वर्गी पाठवुनि पतिहित केलें ॥३॥***
***। घे वैधव्या अयशा आपण । प्रजे शोक संताप समर्पण ॥४॥***
***। दे सुख सुयश सुराज्य मला तरि । कैकयि सर्वांचे कार्या करि ॥५॥***
***। याहुनि भले काय मम आतां । त्यावर अभिषेका करूं बघतां ॥६॥***

**अर्थ -** लक्ष्मण राम व सीता यांना वन दिले; स्वर्गात पाठवून पतीचे हित केले ॥३॥ स्वतः वैधव्य व अपयश आपल्याला घेतले; प्रजेला शोक व संताप दिला ॥४॥ मला तर सुख, सुयश व सुराज्य दिले. (त्याप्रमाणे) कैकयीने सर्वांचीच कामे केली ॥५॥ यापेक्षा माझे आता अधिक चांगले ते काय व्हायचे राहिले आहे! (कीं) त्यावर (भरीला) तुम्ही मला राज्याभिषेक करू पाहता ! ॥६॥

**टीका - चौ. ३-६ -** (१) वशिष्ठांनी म्हटले आहे की **'यास्तव कोणा देणे दोष न । वृथा कुणावर करणे रोष न'** यांत कैकयीला निर्दोषी ठरविली आहे; आणि **'यांत भलेपण सर्व तुम्हाला'** असे म्हटले आहे. या वचनांचे येथे वक्रोक्तीने खंडन केले आहे. **(क)** रामलक्ष्मणांसारखे सुबंधू व सीतेसारखी भावजय यांना वनवास देऊन माझ्या निमित्ताने त्यांचे कल्याण केल्यामुळे मला भलेपणा मिळाला;

भावांच्या ऋणातून मोकळा झालो ! माझ्यासाठीच पित्याला स्वर्गात धाडल्यामुळे पुत्र या नात्याने चांगलाच भलेपणा मिळाला. मातेला वैधव्य व अपयश अशा दोन गोष्टी माझ्यामुळेच मिळाल्या; पित्याला एकच ! पित्यापेक्षा मातेचे महत्त्व अधिक म्हणून माते विषयीचे जे पुत्राचे कर्तव्य ते सहज केले गेल्याने त्यांतही भलेपणा वाट्यास आलाच. प्रजेलाही शोक व संताप या दोन गोष्टी दिल्या गेल्याने राजा या नात्याने भलेपणा पदरांत पडलाच आणि मला तर तीन गोष्टी मिळाल्या. १४ वर्षे भरपूर सुख, जन्मभर सुयश आणि सुराज्य ! म्हणजे सर्वांच्यापेक्षा माझाच जास्त फायदा केला गेला. हा स्वतःला सर्वात जास्त भलेपणा मिळाला तेव्हा 'यांत भलेपण सर्व' मला मिळालेच आहे व ते मातेनेंच दिले आहे. कोणत्या बाबतीत भलेपणा मिळाला नाही हेच मला कळत नाही. म्हणून विचारतात की **याहुनि भले काय मम आतां?** तेव्हा तुम्हीं म्हणता त्याप्रमाणे राज्याभिषेक करून घेऊन नवा कोणता भलेपणा मला मिळणार ते तरी सांगा. राज्याभिषेक करून घेऊन भाऊ, पिता, माता, प्रजा व मी स्वतः यांची जी जी कामे, यांच्यासंबंधी जी जी कर्तव्ये मी करावयाची ती कैकईने आधीच उत्तम प्रकारे करून ठेवली व मला सर्वांच्या ऋणातून व जबाबदारीतून मुक्त केला आहे. कोणाविषयी काही कर्तव्य करणे शेष राहिलेच नाही; मग राज्याभिषेक करून घ्यायचा तो कशासाठी?

(२) **सर्वांचे कार्यां करि** - याने वरील पांच वर्ग सोडून राहिलेल्या इतरांची कार्ये असा ध्वनि निघतो. वनातील कोळी भिल्ल, पशुपक्षी, वृक्षलतादि, ग्राम,नद्या, पर्वत, भूमी, सर्व राक्षस, वानरगण, वालीसुग्रीव, देव इत्यादि सर्वांचे कार्य कैकयीनेच केले आहे. पण **हा भाव भरताच्या मनातील नसून कवींच्या मनांतील आहे. भरताच्या मनांतील भाव** वक्रोक्तीने **हा आहे** की वर उल्लेखिलेल्या पाच वर्गांचे अत्यंत अकल्याण कैकईने आधीच केले आहे आणि तिच्या मुलाला तुम्ही म्हणता राज्याभिषेक करतो! त्यामुळे यांतील कोणत्या गोष्टीत मला बदल करता येईल आणि खरोखर भलेपणा मिळू शकेल?

*हिं.* *। कैकइ जठर जनमि जग माहि । यह मोहि कहँ कछु अनुचित नाहीं ॥७॥*
*। मोरि बात सब बिधिहिं बनाई । प्रजा पाँच कत करहु सहाई ॥८॥*

*दो.* *। ग्रह ग्रहीत पुनि बात बस तेहि पुनि बीछी मार ॥*
*॥ तेहि पिआइअ बारुनी कहहु काह उपचार ॥१८०॥*

म. *। जन्मुनि कैकइ जठरिं जगामधिं । काहिं न मजला अनुचित यामधिं ॥७॥*
*। विधि रचि सगळ्या मम योगाला । प्रजा पंच मग साह्य कशाला ॥८॥*
म. दो. *। ग्रह गृहीत नी वातवश त्यांतहि इंगळीमार ॥*
*॥ त्यास पाजणें वारुणी वदा काय उपचार ॥१८०॥*

**अर्थ -** कैकयीच्या उदरीं या जगांत जन्मास आलेल्या मला यामधे अनुचित असे काही नाहीच ॥७॥ माझा सर्व योग विधात्यानेच जुळवून आणलेला असता प्रजा आणि पंच साह्य करण्यास पाहिजेत तरी कशाला ! ॥८॥ आधी ग्रहांच्या तडाक्यात सापडलेला (ग्रहाने पछाडलेला) त्यांत वात झालेला, त्यांतही इंगळीने नांगी मारलेली (इंगळी चावलेली) असे असतां त्याला वारुणी - मदिरा पाजणे हा काय उपचार आहे (त्यावर)? सांगा पाहू ! ॥दो. १८०॥

**टीका - चौ. ७-८ (१) काहीं न मजला अनुचित यामधिं - यामधिं -** तुम्हीं मला राज्याभिषेक करण्यास तयार झालांत यात. कैकयीच्या मुलाला जे योग्य व कैकयीला जे मनापासून पाहिजे आहे तेच तुम्ही करीत आहात. मुलगा राजा झालेला पाहून तिला परमानंद होईल आणि कैकयीचा सुत राजा झालेला पाहून तुम्हालाही तसाच आनंद होणार ! **(क)** भाव हा आहे की माझ्यासारख्या अति पापी, अति अयशी म्हणजे जिवंत शवासारख्याला मेलेल्याला, मारून तुम्ही कोणता पुरुषार्थ साधणार, काय पौरुष गाजविणार? **'जीवत शवसम चौदा प्राणी' (६।३१।४) या चौदांपैकी अति अयशी, सतत रोगी, विष्णुविमुख, श्रुति - संतविरोधी, तनुपोषक आणि अघखाणी** हे सहा प्रकारचे जिवंत - शवत्व' भरत म्हणतात माझ्या ठिकाणी आहे. रामवियोग कुरोग झाला आहे. 'ना विष्णुः पृथिवीपति' रामचंद्र असून मी त्यांना विमुख म्हणजे विष्णुविमुख आहे. वडील भावाचे राज्य निष्कारण माझ्या पदरात टाकलेले असल्याने मी श्रुतिसंतविरोधी आहे. पापनिवास आहे वगैरे आधीच सांगितले आहे. **'मृता मारणे नहि पुरुषत्व हि'** (६।३१।१) तुम्ही राज्याभिषेक करून मला जे साह्य करू पाहता त्याची मुळीच जरूर नाही. मी एकाप्रकारे नाही सहा प्रकारांनी आधीच मेलो आहे.

**दो. - (१)** ग्रहाने पछाडलेला भुताने पछाडलेला, नंतर वात झालेला, त्यांतही इंगळी चावलेला असेल त्याला औषध - उपचार म्हणून दारू पाजण्याप्रमाणेच मला राज्याभिषेक करणे आहे. **१. ग्रह गृहीत -** येथे सूर्यादि नवग्रह हा अर्थ करता येत नाही; कारण ते कोणाला धरीत, पकडीत, पछाडीत नाहीत. पकडतात,

पछाडतात देवग्रहादि असुर राक्षस पिशाच भूतग्रह वगैरे. **'हर्षविषादां ग्रहांविपुलता' (७।१२१।३३ टी. पहा.)** देवग्रहादि हे ग्रह म्हणजे भूतपिशाचांप्रमाणे पकडून, बाधा देणारे, नऊच आहेत. सर्वांची लक्षणे निराळी असली तरी ती उत्तम वैद्याशिवाय कोणास ओळखता येत नाहीत; व भुताने पिशाच्चाने पकडले असेच म्हणतात. येथे पकडले आहे देवग्रहांनी; पण दशरथ म्हणतात **'पिशाच्चसा लागून तुज वदवि काळ मम पाहि'** (३५) काळ हा एक देवच आहे. पण मुख्य ग्रह बनले देव - ते सरस्वतीला म्हणाले **'आइ असे कर आज ॥ जाति राम राज्या त्यजुनि वनिं'** (२।११।.) तेव्हा सरस्वती ग्रह बनली व तिने प्रथम कुबडीला पछाडली आणि **'फिरवूनि जाइ मतीस'** (२।१२) पण तेवढ्याने कैकयीला पछाडतां येईना तेव्हा सुरमाया ग्रह बनली आणि कैकयी 'सुरमायावश वैरिणिसि सुहृद प्रतीती मानी' (२।१६) **सुरमायेने कैकयीला पछाडली,** आणि तिच्याकडून रामलक्ष्मण सीता यांना वन देवविले. २. **वातवश - 'काम वात कफ लोभ अमित तो'** (७।१२१।३०) वरील देवग्रहांनी पछाडलेल्या कैकयीला भरतराज्य ही कामना झाली. हाच वात झाला. त्या वाताच्या जोरांत ती क्रोधरूपी नंगी तलवार बनून दशरथांस ठार मारण्यास तयार झाली. त्या तलवारीच्या कठोर, निर्दय, मत्सरी, लोभी घावांनीच दशरथ मरण पावले. **'क्रोधे जळ पुढे बहु दिसली । जणूं रोष तरवार उपसली ॥ दिसे नृपास कठोर कराला । सत्यच घेइल मम जीवाला'** (३१।१-३) **'रामवियोगे मार न मजला'** (३४।७) अशा विनवण्या करून सुद्धा त्या तरवारीने ऐकले नाही. शेवटी रामवियोगरूपी त्या तरवारीच्या धारेनेच दशरथ स्वर्गास पाठविले गेले व **'घे वैधव्या अयशा आपण'** हा झाला परिणाम. **'स्वर्गि पाठवुनि पतिहित केले ॥' अशा या दोन गोष्टी साधल्या.**

३. **इंगळीमार** - याचा परिणाम **'प्रजे शोक संताप समर्पण'** ही गोष्ट कैकयीने केली. कैकयी इंगळी बनल्याचा व तिने नांगी मारल्यावर विष सर्व नगरांत पसरल्याचा उल्लेख पूर्वीच केलेला आहे. **'वृत्त तीक्ष्ण अति नगरिं पसरले' । इंगळी विष जणुं देहीं चढलें॥ परिसुनि सकल नारिनर विव्हळ । वेलि बिटप जशिं बघुनि दवानल ॥ कळें जिथें ज्या तो शिर पिटतो । थोर विषाद धीर अति सुटतो** ॥६-८॥ **'उर अपुरा शोकास' (दो. ४६)** या प्रमाणे प्रजेला शोक संताप दिला गेला व शोकसंताप देणारी इंगळी कैकई हे मानसाधारे ठरले. **(क)** या सर्व गोष्टींचे मूळ कारण भरत आहेत; म्हणून त्यांनी या तीन गोष्टींचा संबंध स्वतःशी जोडला.

'जशी माती तसा लोटा, जे विहिरीत तेच लोट्यात यावयाचे.

**४. त्यास पाजणे वारुणी वदा काय उपचार** - भरत ग्रहग्रहीत, वातवश व इंगळी चावलेला आहे. त्याला औषधोपचार म्हणून वारुणी = मदिरा = मद पाजीत आहेत. राज्याभिषेक करून राज्यसत्ता देणे म्हणजे दारू पाजण्यासारखे आहे. **'माजे जगचि राज्यपद मिळता'** (२२८।८) **'कुणा राज्यपद दे न कलंकू'** **(२२९।१)** असे लक्ष्मण भरता विषयी संशयाने म्हणालेच पुढे. **'बंधो ! नृपपद इतरिं कठिण तर ॥ चढे पिउनि मद भूपां तयांही । साधुसभा जिहिं सेवित नाहीं'** (२३१।६-८) याप्रमाणे राज्यमदाला मद = मदिरा मद म्हटलेच आहे. **मतितार्थ** - भरत म्हणतात की मी रामवनवास, रामविरह, दशरथमरण, मातांचे वैधव्य व प्रजेचा शोकसंताप यानी अधीच अत्यंत दुःखी असता तुम्ही मला राज्यरूपी मदिरा पाजून माझे कल्याण करू बघता ! ही काय कल्याण करण्याची रीत आहे की त्या वारुणीच्या मदाने मोहित होऊन ही सर्व दुःखे मी विसरेन असे तुम्हांस वाटते? की अत्यंत गर्ह्य अशी ही मदिरा पाजून मला धर्मभ्रष्ट, दारुड्यासारखा उन्मत्त बनविण्याचा आपला विचार आहे ? की आहे तरी काय ?

*हिं.* ***। कैकइ सुअन जोगु जग जोई । चतुर बिरंचि दीन्ह मोही सोई ॥१॥***
***। दसरथ तनय राम लघु भाई । दीन्ही मोहि बिधि बादि बड़ाई ॥२॥***
***। तुम्ह सब करहु कढ़ावन टीका । राय रजायसु सब कहँ नीका ॥३॥***
***। उतरु देउँ केहि बिधि केहि केहि । कहहु सुखेन जथा रुचि जेही ॥४॥***

*म.* ***। कैकयि सूनु - योग्य जगिं जेंही । चतुर बिरंचि मला दे तेंही ॥१॥***
***। दशरथतनय राम-लघु-भाऊ । दिला विधीनें वृथा प्रभाऊ ॥२॥***
***। तुम्हिं म्हणतां कर राज्यारोहण । राजाज्ञा ती सर्वां शोभन ॥३॥***
***। उत्तर कैसें कोणा द्यावें । रुचे जयां जें सुखें म्हणावें ॥४॥***

**अर्थ** - कैकईच्या सुताला जगांत जे योग्य आहे तेच चतुर विरंचीने मला दिले आहे.॥१॥ दशरथांचा पुत्र व रामचंद्रांचा धाकटा भाऊ हा मोठेपणा (प्रभाऊ = प्रभाव) मात्र विधीने मला व्यर्थ दिला.॥२॥ तुम्ही सर्व मला राज्यारोहण करण्यास सांगता आणि ती – राजाज्ञा आहे व सर्वांना चांगली आहे (असे तुम्ही म्हणतां) ॥३॥ तेव्हा आता मी कोणाला काय काय उत्तर देऊ ! ज्यांना जे वाटेल ते त्यांनी सुखाने म्हणावे.॥४॥

**टीका. - चौ. १ - (१) कैकयि सूनु योग्य - तेहीं** - यांतील सूनु (सुअन)

आणि विरंचि हे शब्द भावगर्भित आहेत. सूयते इति सूनु, कैकयिसूनु = कैकयीच्या ठिकाणी असलेल्या गुप्त गुणांना प्रसवणारा. विरंचि = विशेष रचना करणारा. भाव हा की ब्रह्मदेवाने माझी अशी काही विशेष रचना केली आहे की कैकयीच्या ठिकाणी असलेल्या गुणांची उत्पत्ति माझ्यांतून व्हावी. म्हणजेच मला कुटिल, कठोर, निष्ठूर, रामद्रोही, राजघाती, कुलकलंकी, प्रजापीडक, पितृघाती, धर्मविध्वंसक असा तयार केला.

**चौ. २ - (१) दशरथ तनय, रामलघुभाऊ - तनय =** तनोति कुलम्, तनु विस्तारे, कुळाचा, कुलधर्मांचा, कुलकीर्तीचा विस्तार करणारा = तनय. हा मोठेपणा मला विनाकारण दिला; कारण हा वरील गुणांच्या विरुद्ध गुणवान आहे. **राम =** आनंदसिंधु सुखराशी, त्यांचा धाकटा भाऊ, हा मोठेपणाही विनाकारणच दिला; कारण हाही वरील सर्वगुणांच्या विरुद्ध आहे. पण हा विधीने दिलेला प्रभाव आहे. विधीने केलेले विधान कोणास बदलता येत नाही. **(क) गूढ ध्वनि हा आहे की** विशेष रचना विशेष काळापुरतीच टिकणार व जे विधीनिर्मित आहे ते टळू शकणार नाही. भाव हा की वरील दुर्गुणांचे मजवर केले जाणारे आरोप त्या आनंदसिंधूत, त्या स्नेहशील सुखसागरात बुडून जातील. कैकयीसूनु न राहता दशरथ तनय रामलघुबंधूच शिल्लक राहील.

**चौ. ३-४ (१) तुम्हिं म्हणतां कर राज्यारोहण** - 'सत्य अवश्य भूप वच करणें । पाळा प्रजाशोक परिहरणें ॥' वेदविदित संमत सर्वांसी । पिता देइ तो करि राज्यासी' (१७५।१,३) 'नृपें राज्यपद दिलें तुम्हांला । सत्य करावें पितृवचनाला' (१७४।३) इत्यादी प्रकारे अनेक वेळा वसिष्ठांनी सांगितले. 'कराच गुर्वाज्ञा' (१७५) सचिवांनी सांगितले. 'गुर्वाज्ञा शिरिं धरुनी आचर' (१७६।६) कौसल्या म्हणाली. **(क) रुचे जयां जें सुखें म्हणावें** - भाव हा की मी कोणाच्या तोंडास हात देऊ शकत नाही. ज्याला जे वाटेल ते त्याने खुशाल म्हणावे, बोलावे.

*हिं.* *। मोहि कुमातु समेत बिहाई । कहहु कहिहि के कीन्ह भलाई ॥५॥*
*। मो बिनु को सचराचर माहीं । जेहि सिय रामु प्रानप्रिय नाहीं ॥६॥*
*। परम हानि सब कहँ बड़ लाहू । अदिनु मोर नहिं दूषन काहू ॥७॥*
*। संसय सील प्रेम बस अहहू । सबुइ उचित सब जो कछु कहहू ॥८॥*

*हिं.दो.* *। राम मातु सुठि सरलचित मो पर प्रेमु बिसेषि ॥ -*
*॥ कहइ सुभाय सनेह बस मोरि दीनता देखि ॥१८१॥*

म. *। मी नि कुमाता यां वाचोनी । कोण म्हणति कृत भलें म्हणोनी ॥५॥*
*। मजविण सचराचरांत कोणहि । ज्या प्राणप्रिय सिताराम नहिं ॥६॥*
*। हानि परम लाभ चि सब माना । दुर्दिन माझे दोष कुणा ना ॥७॥*
*। प्रेम-शील-संशयवश आहां । उचित सर्व जें सब वदताहां ॥८॥*

म.दो. *। राममाय अति सरलधी प्रेमा मजवरी भारी ॥*
*॥ वदे स्वभावें स्नेहवश बघुनि दीनता सारि ॥१८१॥*

**अर्थ :** मी आणि कुमाता सोडून इतर कोण म्हणतील की (भरताने राज्यग्रहण केले) हे चांगले केले?॥५॥ चराचरांसह या सर्व जगांत माझ्याशिवाय असा कोण आहे की ज्याला सीताराम प्राणप्रिय नाहीत ?॥६॥ जी परम हानि आहे त्याला तुम्ही सर्व परमलाभ मानतां ? पण यांत दोष कोणाचाच नाही; माझेच दिवस वाईट आहेत. (अदिनु = दुर्दिन) ! ॥७॥ तुम्ही सर्व प्रेमशील व संशय यांना वश आहात म्हणून आपण सर्व जे बोलत आहा ते सर्व योग्यच आहे.॥८॥ राममाता अति सरल बुद्धीची आहे आणि माझ्यावर तिचे फार प्रेम आहे. (त्यामुळे) माझी सर्व दीनता पाहून ती सहजच स्नेहवश होऊन तसे म्हणाली.॥दो.॥

**टीका. चौ. ५-६ (१) मी नि कुमाता यां वाचोनी -** राज्याचा स्वीकार मी केला की मी सहजच म्हणणार की तुमच्या सर्वांच्या आग्रहास्तव राजांची आज्ञा पाळली, पित्याचे वचन पूर्ण केले व अराजक राहू दिले नाही यांत मी वाईट काहीच न करता चांगलेच केले; कुमातेला तर हर्षवायू होईल. इतर कोणीसुद्धा म्हणणार नाही की भरताने राज्य घेतले, फारच चांगले झाले ! सांगा कोणी म्हणतील का? म्हणणार नाहीत याचे कारण उघड आहे. **(क)** ज्याला राम प्राणांसारखे प्रिय नसतील तोच म्हणेल की चांगले केले. तुम्हा सर्वांतच काय सर्व चराचर सृष्टीत राम प्राणप्रिय नाहीत असा जीवजंतु कोणीच नाही. 'जीवजंतु जगिं कोण असाही । प्राणप्रिय रघुनाथ नं ज्याही' (१६२।६) आहे का तुमच्यात कोणी राम प्राणप्रिय नसलेली व्यक्ती ? कसा दुर्भेद्य पेच टाकला आहे सचिवादि सर्व प्रजेपुढे ! हे म्हणणे गुरु, सचिव, महाजन, परिवार इत्यादी सर्वांना (कौसल्या सोडून) उद्देशून आहे. सर्वांना राम प्राणप्रिय असता रामाचे राज्य रामविरोधी पुरुषाला देण्यास का तयार झाले याचे उत्तर पुढील दोन चौपायांत आहे.

**चौ. ७-८ (१) हानि परम लाभचि सब मानां -** भाव हा की **तुम्ही सर्व मोहवश झाला आहात.** महा विक्राळ व्याळ तुम्हाला पुष्पहार वाटतो आहे. 'तुम्हिं

वांछा सुख - मोहवश मज अघमा द्या राज्य ।।१७८।। असा उपक्रम केला आहे; त्याचा येथे उपसंहार करीत आहेत. **(क) दुर्दिन माझे** - माझे दिवस फिरले आहेत. दैव उलटले आहे माझ्यावर !' **(ख) परमहानि** - 'या सम हानिं असे कीं जगतीं । नरतनु मिळुनिहि राम न भजती' (७।२१२।९) भजणें = आश्रय करणे. रामाचा आश्रय करणे हा परम लाभ आहे; म्हणून रामविरोधी माणसाचा आश्रय करणे ही परमहानि. मी रामविरोधी असून, मला राजा करून माझे आश्रित होऊ पाहता, तेव्हा काय म्हणावे ? **रामाश्रय करण्याचे सोडून रामविरोधी भरताला विनविता म्हणजेच परमहानि परमलाभासारखी वाटत आहे.**

(२) **प्रेम - शील - संशय वश आहां** - कौसल्या मातेचा उल्लेख पुढे स्वतंत्र आहे. म्हणून येथे मुख्यतः वसिष्ठ व सचिवादि प्रजा यांना उद्देशून हे वचन आहे. वसिष्ठ भरत प्रेमाला व शीलाला म्हणजे स्वकर्तव्य बुद्धीला वश झाले आहेत. **'भरतभक्तिवश मम झाली मति'** (२५८।७) असे वसिष्ठ स्वतःच पुढे म्हणतात. दशरथांच्या वचनाची पूर्ति करविणे व राज्य राजहीन राहू न देणे हे कर्तव्य जाणून ते कर्तव्यपरायणतेला वश झाले आहेत. **सचिवादि बहुतेक मंडळी** संशयवश, **संशयग्रस्त आहेत,** म्हणूनच सचिवांनी वसिष्ठ वचनाला भिन्न मतपत्रिका जोडली. (१७५ टी.प.) **'तव मर्मा रामाचे जाणति । भले सर्वपरिं तुम्हिं; ते मानति'** (१७५।७) या वसिष्ठ वचनाने ठरते की ते संशयवश नाहीत. **'गुरुविवेक सागर । त्यांस बदरसम विश्व करावर'** असे पुढे भरतच म्हणत आहेत. म्हणजेच त्रिकालज्ञ, सर्वज्ञ, सर्वदर्शी आहेत. असे म्हणून संशयग्रस्त आहेत असे म्हणणे म्हणजे वदतो व्याघात आहे. **(क) उचित सर्व जें सब वदताहां** - भाव हा की तुमची बुद्धि संशय मोहवश झाली असल्याने तुम्ही असे बोलत आहात. हे तुमचे स्वाभाविक मत नाही. परिस्थितीजनित भ्रमसंशय दूषित आहे. संशय हे पिशाच आहे. पिशाचग्रस्त बोलतो ते मुद्दाम बोलत नाही; म्हणून जे जे बोललात किंवा बोलाल ते उचितच !

**दो. (१) राममाय अति सरलधी** - गुरु, सचिव महाजनादि सर्व प्रजा सरलमति आहेत व राममाता अतिसरलमति आहे. (राममाता संशयवश नाही. प्रेमाला विशेष वश झाल्याने तसे म्हणाली. अति प्रेमाने विवेकलोचन अंध होतात **'स्नेह वैर तुलसी उभय रहित विलोचन चारि' (दोहा. ३२६) 'वैर अंध, ना प्रेमीं बोधही'** **(क)** कोणी म्हणतात की अति सरलता हा दोष आहे; पण अदूरदर्शी व अविवेकीच

असे म्हणतील; कारण 'शील भीड अति ऋजू स्वभाव । कृपास्नेह सद्मचि रघुराव' (१८३।५) असे रामाविषयी आता लवकरच भरतच म्हणणार आहेत. अति सरल (ऋजु) स्वभाव जर दोष असेल तर राम सुद्धा दोषी ठरविले जातील. **ज्यांस अतिसरलता हा दोष वाटेल ते भगवंतापेक्षा श्रेष्ठ असे कोणीतरी कुटिलताप्रियच असणार ! (ख) बघुनि दीनता -** पितृहीन, जननीवात्सल्य विहीन, रामविरही, रामवनवास दुःख दुःखी, आत्मग्लानिने आर्त, लोकापवादभीत अशी अनेक प्रकारे दीनता उत्पन्न झाली आहे. प्रेमळ मातेपासून चुकलेल्या व दावाग्नीने घेरलेल्या हरिणपाडसासारखा सर्वस्वी दीन झाला आहे हे कौसल्येला माहीत आहे; राज्याची जबाबदारी अंगावर पडली म्हणजे त्या कार्यांत गुंतल्यावर ही दीनता सहजच पुष्कळ कमी होईल. सदा सर्वकाळ आत्मग्लानि करीत बसण्यास वेळच मिळणार नाही हे जाणून माझे दुःख कमी होईल या आशेने अति स्नेहामुळे व अति सरळ स्वभावाची असल्यामुळे - राममाता तसे म्हणाली. **हा भरताचा भाव आहे. ल. टे.** वसिष्ठांना उद्देशून केलेले हे व पुढील भाषण **वक्रोक्ति नसून अन्योक्ति अलंकार आहे.** वसिष्ठांचे निमित्त करून इतर सर्वांस उद्देशून आहे.

***हिं.*** ***। गुर बिबेक सागर जगु जाना । जिन्हहि बिस्व कर बदर समाना ॥१॥***
***। मो कहँ तिलक साज सज सोऊ । भएँ बिधि बिमुख बिमुख सब कोऊ ॥२॥***
***। परिहरि रामु सीय जग माहीं । कोउ न कहिहि मोर मत नाहीं ॥३॥***
***। सो मैं सुनब सहब सुखु मानी । अंतहुँ कीच तहाँ जहँ पानी ॥४॥***

***म.*** ***। जग जाणे गुरु विवेक सागर । त्यांस बदरसम विश्व करावर ॥१॥***
***। तिलक - साज मज सजती तेही । जैं विधि विमुख विमुख अवघेही ॥२॥***
***। या जगिं विना राम सीता ही । कोणि म्हणे ना 'मम मत नाहीं' ॥३॥***
***। सुखें सहित ऐकेन हि कानीं । अंतिं पंक कीं जेथें पाणी ॥४॥***

**अर्थ -** गुरु ज्ञान (= विवेक) सागर आहेत हे सर्व जगाला माहीत आहे; व हे विश्व त्यांना तळहातावरील बोरासारखे आहे.॥१॥ ते सुद्धा मला राज्यटिळक करण्याची तयारी करू लागले ! विधि - दैव उलटले की सर्वच उलटतात (विपरीत होतात).॥२॥ राम आणि सीता यांच्याशिवाय जगात कोणीही नाही की 'हे मला (भरताला) संमत नाही' असे म्हणेल.॥३॥ (तरीपण) मी ते सुखाने ऐकेन आणि सुखाने सहन करीन; (कारण) जिथे पाणी आहे तिथे अती (तळाला) चिखल असावयाचाच ! ॥४॥ (असे लोक म्हणणारच.)

**टीका. - चौ. ११२ (१) 'गुरु विवेक सागर... विश्व करावर** - १२५।७ टी.प. हे मीच म्हणतो असे नाही तर हे जगात सुप्रसिद्ध आहे. **विवेकसागर** = ज्ञानसागर, आत्मज्ञानी आहेत; व **'विश्व बदरसम करावर'** - याने सर्व विश्वाचे प्रत्यक्ष ज्ञान सुचविले. मी कुमातेला सामील आहे की नाही, तिचे मत, तिची करणी इ. मला मान्य आहे की नाही, मी रामविरोधी आहे की नाही इ. सर्व ते बिनचूक जाणतात. असे असून ते सुद्धा मला राजसिंहासनावर बसवू पाहतात हे मोठे आश्चर्य व माझे दुर्भाग्य आहे. यावरून हे नक्की ठरले की रामप्रिय भरताचा, आपल्या प्रिय शिष्याचा निर्दोषपणा आपण स्वतः न सांगता जगाला सहज कळावा म्हणूनच वसिष्ठांनी भरताला हा उपदेश केला व राज्याचा स्वीकार कर असे पाच वेळा सांगितले. वसिष्ठांचा हेतु भरताने जाणला आहे. **(क)** कौसल्या म्हणाली की 'पुत्र पथ्य गुर्वाज्ञा आहे' (१७६।१) त्याचेच जणू हे उत्तर येथे आहे. विश्व बोराप्रमाणे दोषांनी भरलेले आहे; त्याज्य आहे. रामवियोग कुरोगांत तर विश्वाचे राज्य पथ्य म्हणून दिले तरी ते अति कुपथ्यच ठरते; हे गुरुजींना माहीत असून तेसुद्धा पथ्याच्या नावाने अति कुपथ्य करण्यास सांगत आहेत; म्हणजे गुरुसुद्धा माझ्यावर उलटले ! मग सचिव व प्रजाजन उलटतील यात नवल ते काय ? **(ख) जैं विधि विमुख विमुख अवघेही - 'भरद्वाज बघ होइ जैं ज्यास विधाता वाम ॥ रेणु मेरुसम जनक यम तया ब्यालसम दाम (= हार)** (१।१७५). विधि प्रतिकूल झाल्यावर विधिपुत्र वसिष्ठ प्रतिकूल होतील तर त्यात काही नवल नाही. येथे **हा उपदेश आहे की शिष्य रामभक्तीसाठी सर्वस्वाचा त्याग करून रामशरण जात असता त्यास राज्यासारख्या उपाधीत, नरक प्राप्तीच्या मार्गात घालणे अनुचित आहे** ! पण आज असा कोण आहे ?

**चौ. ३-४ (१) बिना राम सीता ही... मम मत नाहीं** - भाव हा आहे की कैकयीने जे केले ते भरताच्या संमतीने केले असे ज्यांना खात्रीपूर्वक वाटत आहे, तेच मला राज्यावर बसविण्याचा प्रयत्न करीत आहेत. गुरुजीसुद्धा तसाच आग्रह करीत आहेत; यावरून त्यांचाही असाच समज असला पाहिजे असे लोक म्हणणारच. म्हणून आता मला राम व सीता यांच्या शिवाय कोणी त्राता उरला नाही. **(क) अंतिं पंक कीं जेथें पाणी** - हे लोकांना चांगले ठाऊक आहे. वापी, कूप, तलाव, डोह वगैरेंत स्वच्छ, स्फटिकासारखे निर्मळ, अगदी **न गाळता पिण्यासारखे जल** (= पाणी = पानीय) असले तरी त्याच्या तळाशी चिखल

असावयाचाच. नदीत पाषाण, गोटे, असले व पाणी उथळ असून वहात असले तर कदाचित चिखल नसतो; पण शेवाळ असते, एकूण एकच भाव हा की भरत वर वर प्रेमाच्या व वैराग्याच्या गोष्टी बोलत असला तरी तो मुलगा कोणाचा ? कैकयीचाच ! **'कुटिल कठोर कुबुद्धि अभागिनि'** व रामद्रोही ज्याची आई आहे तो तिच्यासारखा नसेल हे शक्यच नाही, असे लोक म्हणणारच, राज्याचा स्वीकार केला तर या व आणखी पुष्कळ पदव्या मिळणारच ! स्वीकार न केला तरीही उद्धट, गुरु, माता, पिता यांचे वचन न पाळणारा, उर्मट व परम अभागी म्हणणारच ! म्हणजे काही केले तरी लोकनिंदारूपी चिखल अंगावर उडणारच ! मग जे अटळ आहे त्याला भिऊन काय उपयोग ! तें सर्व **सुखें सहिन ऐकेन हि कानीं** - स्वतःचे प्रारब्ध, अभाग्य समजून ते सोसलेच पाहिजे. बरे ऐकू नये म्हणावे तर कान शाबूत आहेत व कोणाच्या तोंडाला हात देता येत नाही. कितीजणांच्या तोंडी लागू मी ! सर्व जगच जिथे बोलणार (सीताराम कौसल्या सोडून) तेथे दुसरा मार्गच नाही.

**वि. ल. ठे.** - मागल्या चौपाईत शारदा देवीने अशी खबरदारी घेतली आहे की फक्त राम व सीता यांचाच उल्लेख केला व भरताच्या वचनाला बाध येऊ दिला नाही. लक्ष्मणाचा उल्लेख केला गेला असता तर भरताचे रामभक्ताचे वचन असत्य ठरले असते. लक्ष्मण पुढे काय करणार आहेत याची जरासुद्धा कल्पना भरतांस नाही हे **'जीवनलाभ भला लुटि लक्ष्मण'** (चौ. ७) भरतांच्या या व इतर वचनांवरून ठरते. भरतास दोष देतील त्यांस सुख सद्गती मिळणार नाही अशी शापवजा वाणी कौसल्येची असल्याने **सीतारामांच्या जोडीला कौसल्या आहेच;** व गुरु 'विवेकसागर - विश्वबदर करावर' असे असल्याने **भरतास दोष देणाऱ्यांत ते नाहीत.** लक्ष्मणाने भरतावर कल्पनातीत दोषारोप केले आहेत. (दो. २२७-२३० पहावे.) **समन्वय साधण्याची कवींची अगाध सावधानता !** या उदाहरणांवरून स्पष्ट दिसते. अशी पुष्कळ उदाहरणे आहेत.

*हिं.* ***। डरु न मोहि जग कहिहि कि पोचू । परलोकहु कर नाहिन सोचू ॥५॥***
***। एकइ उर बस दुसह दवारी । मोहि लगि भे सिय राम दुखारी ॥६॥***
***। जीवन लाहु लखन भल पावा । सबु तजि राम चरन मनु लावा ॥७॥***
***। मोर जनम रघुबर बन लागी । झूठ काह पछिताउँ अभागी ॥८॥***

*दो.* ***। आपनि दारुन दीनता कहउँ सबहि सिरु नाइ ॥***

*॥ देखे बिनु रघुनाथ पद जिय कै जरनि न जाइ ॥१८२॥*

म. *। भय न मज किं जग म्हणेल खोटा । परलोकाचा नसे दुखोटा ॥५॥*

*। एकच दुःसह दाह मनाला । दुख मजमुळें सितारामाला ॥६॥*

*। जीवनलाभ भला लुटि लक्ष्मण । त्यजि सब लावी रामचरणिं मन ॥७॥*

*। मम जन्म च रघुनाथ - वनास्तव । कां अभागि पस्तावुं अवास्तव ॥८॥*

दो. *। माझी दारुण दीनता वदुं सकलां नमुं पाइं ॥*

*॥ ना दिसतां रघुनाथपद उर-जळजळ ना जाइ ॥१८२॥*

**अर्थ** - जग मला खोटा - नीच म्हणेल याचे मला मुळीच भय वाटत नाही; व परलोकाचा (नाश होईल याचा) मला मुळीच शोक (दुखोटा, दुःख) नाही.॥५॥ मनात एकच दुःसह वणवा पेटला आहे की माझ्यामुळे सीतारामांना दुःख भोगावे लागत आहे.॥६॥ जीवनाचा सुंदर लाभ लक्ष्मणाने लुटला; (कारण) सर्वस्वाचा त्याग करून त्यांनी सीतारामचरणी मन लावले.॥७॥ माझा जन्मच मुळी रघुनाथाला वनात धाडण्यासाठी ! मग मी अभागी खोटाच - निरर्थक - पश्चात्ताप कशाला करतो आहे ! ॥८॥ सर्वांना नमस्कार करून मी आपली दारुण दीनता सांगतो की रघुनाथचरणाचे दर्शन झाल्याशिवाय हृदयांतील जळजळ (दाह, आग) जाणार नाही.॥दो.१८२॥ (पाइं = पायि).

**टीका. चौ. ५-६ - (१) जग म्हणेल खोटा** - जग दोन्ही बाजूंनी निंदा कशी करील याविषयी 'अंति पंक जेथें की पाणी' (चौ. ४) च्या टीकेत लिहिले आहे. कोणी काही म्हटले तरी त्याचे मला भय वाटत नाही व वाटणार नाही. **(क) परलोकाचा नाहिं दुखोटा** - पुत्रधर्माचा त्याग केला; मातेच्या मनाविरुद्ध वागलो; तिला दोष दिला; राजाज्ञेचा भंग केला इ. मुळे उत्तम लोकप्राप्ति होणार नाही व कदाचित नर्कात पडावे लागेल; पण त्याचेही मला काही सोयरसुतक नाही. वाईट वाटत नाही. **(ख) एकच दुःसह दाब मनाला** - एकच शोकाचा वणवा हृदयाला सतत जाळीत आहे की सेवकामुळे स्वामींना वनवास ! सीतारामांना माझ्यामुळे दुःख भोगावे लागत आहे आणि १४ वर्षे भोगावे लागणार ! राजा होणे किंवा तुम्ही जबरीने मला राजा करणे म्हणजे या शोकपश्चाताप अग्नीवर घृताचा 'वसोर्धारा'च धरण्यासारखे होईल !

**चौ. ७-८ - (१) जीवन लाभ भला लुटि लक्ष्मण** - सर्वस्वाचा तृणासमान त्याग करून लक्ष्मण रामपदनिरत होऊन सेवा करीत आहेत म्हणून ते फार

भाग्यवान. जन्माला येऊन जो मुख्य लाभ करून घ्यायचा तो त्यांनी साधला; व मी स्वतः त्या लाभापासून वंचित राहिलो; म्हणून मी अत्यंत अभागी ! **'हें जाणुनी सवें वनिं जा हो ! । घेइ बाळ ! जगिं जीवन लाहो'** (७४।८) हे सुमित्रावचन सत्य केले गेल्याची साक्ष भरतमुखाने दिली जात आहे. तेथे असलेल्या सुमित्रेला हे ऐकून किती समाधान झाले असेल ! गूढभाव हा आहे की लक्ष्मणाने तर सर्वस्वाचा त्याग केला; मी मात्र **'रामपुनीतविषयरसरुक्षू । लोलुप भूमी भोग बुभुक्षू'** बनून बडबडत बसलो आहे आणि तुम्ही मला म्हणता राज्य कर ! **'सर्वस्वाची ममता सोडून (त्याग करून) रामपदारविंदनिरत होणे हाच मानव जीवनातील सुंदर उत्तम लाभ होय.**

(२) **मम जन्मच रघुनाथ वनास्तव** - रामसेवा, रामपदभक्ति यांचा लाभ होणे तर दूरच; पण मी इतका अभागी की रामचंद्रांना वनात धाडण्यासाठीच माझा जन्म ! **कां पस्तावुं - अवास्तव** - मी जो पश्चाताप करीत आहे तो वास्तविक नाही; खोटा आहे. खरा असता तर इतके दिवस जगलोच नसतो. तेव्हा आता हा पश्चात्ताप निरर्थक आहे. याने हृदयदाह शमणार नाही. माझे म्हणणे ऐकून मला योग्य अशी शिकवण द्या म्हणून विनविले, पण ते कोणी करीत नाही. रामाकडे जातो आज्ञा द्या, म्हणून विनंती केली पण ती आज्ञा सुद्धा मिळाली नाही. आता या असाध्य रोगावर एकच उपाय मला दिसतो तो सांगतो –

**दो. - ना दिसतां रघुनाथ पद उरजळजळ ना जाइ** - भाव हा की रामदर्शन झाले म्हणजे तत्क्षणी हा शोकाग्नि शांत होईल. मग पायांपडून वनांतच रामास राज्याभिषेक करू व आग्रह करून मोठ्या थाटाने अयोध्येत आणण्यास आपण आटोकाट प्रयत्न करू. या शिवाय सर्वांचा शोक दूर होण्यास दुसरा उपाय नाही इ. आता सांगतात -

*हिं.* *। आन उपाउ मोहि नहिं सुझा । को जिय कै रघुवर बिनु बूझा ॥१॥*
*। एकहिं आँक इहइ मन माहीं । प्रात काल चलिहउँ प्रभु पाहीं ॥२॥*
*। जद्यपि मैं अनभल अपराधी । भै मोहि कारन सकल उपाधी ॥३॥*
*। तदपि सरन सनमुख मोहि देखी । छमि सब करिहहिं कृपा बिसेषी ॥४॥*

*म.* *। अन्य उपाय न सुचे मला तर । जिविचें विदित कुणा विण रघुवर ॥१॥*
*। एकचि निश्चित दिसे मनासी । कीं प्रभातिं चलतो प्रभु पासीं ॥२॥*
*। यद्यपि मी वाईट अपराधी । जरी मजमुळें सर्व उपाधी ॥३॥*

*। तदपि शरण सन्मुख जैं बघतिल । क्षमुनि सकल बहु कृपा वर्षतिल ॥४॥*

**अर्थ** - मला तर दुसरा काहीच उपाय सुचत नाही; व रघुवराशिवाय माझ्या जीवीचे कोण जाणणार? ॥१॥ एकच उपाय मनाला निश्चित दिसतो की सकाळी मी प्रभुकडे चालू लागणार.॥२॥ जरी मी अगदी वाईट आहे, अपराधी आहे, व माझ्यामुळेच सर्व (उपाधी = अनर्थ) झाले. ॥३॥ तरी मला समोर शरणागत पाहतील तेव्हा सर्व काही क्षमा करून माझ्यावर अपार कृपा करतील (कृपेची वृष्टी करतील.) ॥४॥

**टीका - चौ. १-२ - (१) जिविंचे विदित कुणा विण रघुवर** - माझे म्हणणे ऐकून घेऊन शिकवण द्या असे सांगितले. 'आज्ञा द्या जातो रामाप्रति' अशी विनंती नंतर केली; पण कोणी एका शब्दानेही काही सांगितले नाही. म्हणून भरत म्हणतात की माझ्या जीवाची काय दशा झाली आहे याचे निदान कोणाला झालेले दिसत नाही व हे रघुवरांशिवाय इतर कोणास ते होणे शक्य दिसत नाही. म्हणून मी आपल्या मनाशी राहिलेला एकच एक उपाय करण्याचे निश्चित केले आहे. **(क) मला तर** - भाव हा की मला दुसरा उपाय सुचत नाही, दिसत नाही. दुसऱ्या कोणास सुचत असल्यास त्यांनी आताच सांगावा. **(ख) 'की प्रभातिं चलतो प्रभुपासीं'** पूर्वी रामाकडे जाण्यासाठी आज्ञा मागितली. (१७८।७) येथे तसे न म्हणता स्पष्ट सांगितले की उद्या सकाळ होताच मी चालू लागणार; आता कोणाच्या आज्ञेची वाट बघत राहणार नाही. **'तच्छ्रोभूते गमिष्यामि पादचारेण दण्डकान् ॥ शत्रुघ्नसहितस्तूर्ण वा न वा यूयमायात '** (अ.रा. २।८।८-९) हाच भाव येथे आहे. वा.रा. सारांश पुढे दिला आहे.

**चौ. ४ - (१) बहु कृपा वर्षतिल** - रघुनाथ लहानपणापासूनच माझ्यावर कृपा करीत आले आहेत. पण आता मी दीन, दुःखी, निराधार, अनाथ, भयभीत आहे असे पाहून व माझ्या हृदयांतील व्यथा जाणून पुष्कळ कृपा करतील. पादुका देतील ही कल्पनासुद्धा या वेळी भरताच्या मनात असणे शक्य नाही. भरत तर अभिषेकाची सर्व सामग्री घेऊन रघुनाथांस अयोध्येत परत आणण्याच्या हेतूने जात आहेत. अपार कृपा केली आहे हे मात्र खरे आहे आणि भरताने आग्रह केला असता तर प्रतिज्ञाभंग करून सुद्धा प्रभू आले असते.

*हिं । सील सकुच सुठि सरल सुभाऊ । कृपा सनेह सदन रघुराऊ ॥५॥*

*। अहिहुक अनभल कीन्ह न रामा । मैं सिसु सेवक जद्यपि बामा ॥६॥*

*। तुम्ह पैं पांच मोर भल मानी । आयसु आसिष देहु सुबानी ॥७॥*

*। जेहिं सुनि बिनय मोहि जनु जानी । आवहिं बहुरि राम रजधानी ॥८॥*

दो. *। जद्यपि जनम कुमातु तें मैं सठु सदा सदोस ॥*

*॥ आपन जानि न त्यागिहहिं मोहि रघुबीर भरोस ॥१८३॥*

म. *। शील भीड अति ऋजू स्वभाव । कृपा - स्नेह - सद्मचि रघुराव ॥५॥*

*। रिपु अहित हि कधिं राम नाचरतिं । मी शिशु सेवक जरी वाम अति ॥६॥*

*। तुम्हिंहि पंच मानुनि मम हित पर । द्या निरोप आशीर्वच सुंदर ॥७॥*

*। जेणें श्रवुनि विनति जन गणुनी । येति राम नृपधानिं परतुनी ॥८॥*

दो. *। जन्म कुमाताजठरिं जरि मी शठ दोषि सदा हि ॥*

*॥ त्यजिति न मज रघुवीर निज गणुनी, प्रतिति मलाहि ॥१८३॥*

**अर्थ** - शील, भीड (संकोच) अति ऋजु (सरल) स्वभाव कृपा व स्नेह यांचे (माहेर) घर म्हणजेच रघुराज (रघुराव, रघुराऊ) ॥५॥ रामचंद्रांनी कधी शत्रूचेसुद्धा (तो समोर शरण आल्यावर) अहित केले नाही; मग मी जरि अति वाकडा (वाम, कुटिल) असलो तरी त्यांचा शिशु व सेवक आहे. ॥६॥ तुम्ही पंच सुद्धा परम (पर) हित समजून मला निरोप द्या व असा सुंदर आशिर्वाद द्या की ॥७॥ जेणे करून माझी विनंती ऐकून व मला आपला दास (जन) समजून (गणुनी) राम राजधानीत (नृपधामि) परत येतील. ॥८॥ माझा जन्म जरि कुमातेच्या पोटी झालेला असला व मी सदाच शठ व दोषी असलो तरी आपला मानून रघुवीर माझा त्याग करणार नाहीत असा मला भरवसा (विश्वास, प्रतिति = प्रतीत) आहेच ॥दो. १८३॥ (भरताचे भाषण येथे समाप्त झाले.)

**टीका. - चौ. ५-६ -** (१) शील, संकोच (भिडस्तपणा), अति सरलता, कृपा व स्नेह यांची उदाहरणे व अवतरणे देण्याची आवश्यकताच नाही. सर्वत्र भरपूर आहेत. **(क) रिपु अहितहि कधिं राम नाचरति** - हे वचन **'तदपि शरण सन्मुख जै बघतिल'** या मागील संदर्भाला धरून लावले पाहिजे. शरण न आलेल्या शत्रूंचे पारमार्थिक हित रामानी साधले असले तरी ऐहिक हिताचा विनाश केलाच आहे. पुढील चरित्रांतील उदाहरणे न घेतली तरी ताटकेचा तिच्या कुळासह नाश केलाच आहे. शरण आलेल्या शत्रूचेही रामानी अहित केले नाही; असाच अर्थ करणे जरूर आहे. उदा. भृगुपतीचे आहे. भाव हा की शरणागत शत्रूचे सुद्धा राम अकल्याण करीत नाहीत; मग मी तर त्यांचा शिशूसारखा सेवक

आहे; शरण गेलो व समोर हात जोडून उभा राहिलो की ते माझे परम कल्याण करतीलच करतील. **'कोटि विप्रवध पाप जया ही । येतां शरण न त्यजू तया ही ॥ सन्मुख होइ जीव मम जेव्हा । जन्म कोटि अघ नासे तेव्हा । दुष्ट हृदय सत्यचि असता जर । मम सन्मुख येता तो का तर?** ॥ (५।४४।१-४) ही वचने रावणाचा भाऊ भेटण्यास आला आहे असा निरोप कळल्यानंतरची आहेत.

**चौ. ७-८ - (१) द्या निरोप आशीर्वच सुंदर** - मुळात **'आयसु'** शब्द आहे व त्याचे आज्ञा = हुकूम; परवानगी. व प्रयाणाच्या वेळी वडील माणसांचा निरोप (आज्ञा) घेतात तो असे तीन अर्थ मानसांत आहेत. येथे हुकूम व परवानगी हे अर्थ अयोग्य आहेत; कारण प्रातःकाळी मी चालू लागणार हा निश्चय भरताने आधीच जाहीर केला आहे; म्हणून निघण्यापूर्वीची आज्ञा = निरोप देणे घेणे हाच अर्थ येथे आहे. प्रातःकाळीच इतकी सर्व मंडळी एकदम निघण्यापूर्वी सर्वांना भेटणे शक्य नाही. संदेहाला जागा राहू नये म्हणून अनुवादांतील आज्ञा शब्द काढून 'निरोप' घातला गेला. **(क) द्या आशीर्वच सुंदर जेणे राम परतुनी येति** - माझे हित होणार हे नक्की निश्चित आहे; पण आपण प्रेमाने व अंतःकरणपूर्वक आशीर्वाद दिलेत तर आपल्या अमोघ आशीर्वादाच्या प्रभावाने माझ्या दीन सेवकाच्या विनवणीला मान देऊन राम अयोध्येत परत येतील. **ही विनंती विशेषतः वसिष्ठ वामदेवादि अमोघवचनी मुनिजनांस उद्देशून आहे.** पण पुढे दिसेल की अशा प्रकारचा आशीर्वाद सर्वज्ञ मुनींनी दिला नाही. राम परत येणार नाहीत हे त्यांना ठाऊक आहे व रामाच्या इच्छेच्या विरुद्ध असणारे आशीर्वाद कोणाचेही असले तरी ते निष्फळ ठरतात हे जाणून असत्यवादीपणाचा दोष येऊ नये म्हणून कोणीही असला आशीर्वाद दिला नाही. अशा प्रकारची सावधगिरी मानसांत पदोपदी दिसते. वा.रा. इतकी दिसत नाही. **ही तुलना करणे हा एका स्वतंत्र लेखाचा विषय आहे.**

**दोहा. - (१) जन्म कुमाते जठरिं .... मलाहि** - या दोह्यात कार्पण्य व रक्षिष्यतीति विश्वासः ही शरणागतीची दोन लक्षणे आहेत. 'मी शठ दोषि सदा हि । यांत कार्पण्य आहे. व त्याग करणार नाहीत असा दृढ विश्वास आहे. **(क) राजधानीत परत येतील** हा विश्वास सुद्धा खोटा ठरला असे नाही. भरत म्हणतील ते करण्यास प्रभु वचनबद्ध झालेही आहेत. पादुकारूपाने रामच सिंहासनाधिष्ठित झाले आहेतच. राम परत आल्यासारखा आनंद त्या योगे भरतास झाला आहे.

(३१६।८ पहा.) भरताला जेवढा विश्वास आहे तेवढा वसिष्ठादि मुनींना नाही म्हणून त्यांनी आशीर्वाद दिला नाही. वसिष्ठादि मुनी **'प्रौढ - तनय सम ज्ञानी'** भक्त आहेत व भरत **'बालक सुत - सम दास अमानी' भक्त आहेत. दोघांच्या भक्तीतील भेदामुळे विश्वासांत किती फरक पडला हे लक्षांत घेणे जरूर आहे.**

**वा.रा.** - दशरथांच्या दहनाच्या १४ व्या दिवशीच अमात्य व सभासद यांनी जाऊन राज्यावर बसण्याची विनंती भरतास केली. ती अमान्य करून अभिषेकाच्या सर्व पात्रांना प्रदक्षिणा नमस्कार करून उत्तर दिले की आपल्या सारख्या कुशल लोकांनी मला असे सांगणे योग्य नाही. **'राम पूर्वो हि नो भ्राता भविष्यति महीपतिः ॥ अहं त्वरण्ये वत्स्यामि वर्षाणि नव पञ्चच'** ॥८॥ 'मी चौदावर्षे अरण्यांत राहीन' **हे वचन असत्य ठरले आहे.** नन्दिग्राम म्हणजे अरण्य नव्हे. याप्रमाणे सांगून सैन्य तयार करण्याची आज्ञा दिली आहे. प्रवासाचा मार्ग वगैरे चांगला करण्यासाठी त्या त्या खात्यातील लोक कार्यास लागले आहेत. (सर्ग ८०) (क) सर्ग ८१।९ मध्ये वसिष्ठ दरबारात आले आहेत. सर्ग ८२ मध्ये सभेचे कार्य सुरू होते. **'इदं पुरोहितो वाक्यं वसिष्ठो मृदु चाऽब्रवीत्** ॥४॥ **पित्रा भ्रात्रा च ते दत्तं राज्यं निहत कण्टकम् ॥ तद्भुक्ष्व मुदितामात्यः शीघ्रमेवाभिषेचय'** ॥७॥ राज्याभिषेक करून घेण्याबद्दल **पुरोहित वसिष्ठांनी** सांगितले आहे. **'विललाप सभामध्ये जगर्हे च पुरोहितम्'** भरताने पुरोहित वसिष्ठांची तोंडावर निंदा केली आहे. 'राममेवानुगच्छामि' (१६) असे सांगून मग सांगितले की वाटेल ते करून वडील बंधूस परत आणण्याचा प्रयत्न करीन **न च आले** तर मीही वनांतच राहीन हे वचन खोटे ठरले. मग भरताने वसिष्ठांस सांगितले आहे की मार्गशोधक सुतार इ. लोकांना मी आधीच पुढे पाठविले आहेत. नंतर सुमंत्राला बोलावून यात्रेची व प्रयाणाची सर्व तयारी करण्यास सांगितले आहे. वसिष्ठ भरत संवाद ४-२० या १७ श्लोकांत आहे; **त्यात वसिष्ठांस गुरू म्हटले नसून पुरोहित म्हटले आहे. सुमंत्र मुख्य कार्यकर्ता व सारथी हजर आहे. प्रातःकाळी रथांत बसून आरंभीपासूनच भरत निघाले आहेत.** भावना मर्यादा इत्यादींची तुलना करण्यास इतके पुरे आहे. मानसांतील पुढील वर्णन पुढे आहेच. कोणते सरस निरस, कोणता आदर्श महनीय इत्यादी गोष्टींचा विचार वाचकांवरच सोपविणे भाग आहे. सर्ग ७९ - ८२ समग्र वाचून पहावे; लहानलहान आहेत.

(२) **वा. रा. कैकयी स्वभावाचे विशेष हिडिस चित्र पहा** - मानसांत भरताने

आल्यावर कैकयीची केलेली निर्भर्त्सना वा. रा. भरताने केलेल्य निर्भर्त्सनेच्या पासंगालासुद्धा पुरणार नाही. तुला ठार मारणेच योग्य इ. सुद्धा म्हटले आहे. इतके झाल्यावरसुद्धा दशरथांची क्रिया उरकल्यावर कैकयीने मागधसूतबंदी यांस आज्ञा देऊन पाहटेस भरताची अयोध्याधीश म्हणून स्तुती करविली आहे. भरत जागा झाल्यावर ती स्तुति ऐकतांच 'नाहं राजेति' म्हणून तो घोष बंद पाडला आहे. (सर्ग ८१।१-६ पहा) मानसांतील कैकयीने असे काहीच केले नाही. मानसांतील कैकयी यापुढे मृतवतच आहे. **(क) अ.रा.** - २।८ मध्ये १२ श्लोकातच हा दरबार व त्यांतील सर्व कार्य उरकले आहे. एकाच श्लोकांत वसिष्ठांच्या सूचनेला उत्तर दिले आहे. विशेष म्हणजे 'पादचारी, फलमूलकृताहारः, भूमिशायी जटाधारी असा राम परत येईपर्यंत राहणार. तुम्ही या किंवा कोणी येऊ नका, **मी राक्षसी कैकयी शिवाय इतर मातांना घेऊन शत्रुघ्नासह सकाळी जाणार** असे सांगितले आहे.

*हिं.* ***। भरत बचन सब कहँ प्रिय लागे । राम सनेह सुधाँ जनु पागे ॥१॥***
***। लोग बियोग बिषम बिष दागे । मंत्र सबीज सुनत जनु जागे ॥२॥***
***। मातु सचिव गुर पुर नर नारी । सकल सनेहँ बिकल भए भारी ॥३॥***
***। भरतहि कहहिं सराहि सराहि । राम प्रेम मूरति तनु आही ॥४॥***

*म.* ***। भरत-वचन सकलां प्रिय गमलें । रामस्नेह सुधें पाकवलें ॥१॥***
***। लोक वियोग - विषम - विषिं जळतां । जागति मंत्र सबीज ऐकतां ॥२॥***
***। माय सचिव गुरू पुर नर नारी । स्नेहें विकल सकल तैं भारी ॥३॥***
***। वानिति भरता फार वदति ही । साक्षात् रामप्रेम-मूर्ति ही ॥४॥***

**अर्थ** - भरताचे भाषण सर्वांना इतके प्रिय वाटले की जणू रामस्नेहरूपी सुधेतच पाकविलेले आहे ! ॥१॥ वियोग रूपी विषमविषाने जळत असलेले लोक जणू काय सबीज मंत्र ऐकल्याने सावध (जागे) झाले. ॥२॥ तेव्हां माता, मंत्री, गुरू पुरनरनारी इ. सर्वच स्नेहाने व्याकुळ झाली. ॥३॥ भरताची फार (पुनःपुन्हां) प्रशंसा करीत म्हणू लागले की ही रामप्रेमाची साक्षात मूर्तीच आहे. (भरत म्हणजे देहधारी रामप्रेमच!) ॥४॥

**टीका - चौ. १ - (१) भरत वचन ... रामस्नेहसुधें पाकवले - 'वचन अमृतिं घोळून उचितोत्तर देति'** (१७६) असा जो उपक्रम केला त्याचाच येथे उपसंहार केला. अमृत = रामस्नेहसुधा, रामस्नेहामृत, हा अर्थ येथे स्पष्ट केला. सुचविले की उत्तराला प्रत्युत्तर दिलेले मुनींनासुद्धा खपत नाही, पण भरताचे प्रारंभापासून

शेवटपर्यंतचे उत्तर सर्वांना फार आवडले. कारण की अथपासून इतिपर्यंत ते रामस्नेहामृतांत घोळून, पाकवून दिले गेले. त्यांत स्नेहजडता, मोहवशता, वारुणी पाजणे इ. कटु बीजे जरी होती तरी ती रामस्नेहसुधारसांत पाकवून दिली गेल्याने फारच चविष्ट लागली.

**चौ. २ - (१) लोक वियोग विषम विषिं जळतां** - पूर्वी म्हटले आहे की **'एक विधात्या देती दूषण । सुधा दाखवुनि दे विष उल्बण'** (४९।१) **'श्वास घेती जळती विषमज्वरीं । रामाविण जीवन आशा तरि'** (५१।५) या दोन्ही चौपायांची टीका पहावी व दो. ४८ पहावा. 'स्वप्निं न कधिं करिती भरत रामविरुद्ध काहिं' असे जे काही लोकांनी म्हटले त्याची प्रतीति आज ४२ व्या दिवशी आली. **(क)** येथे **विषम =** विषमज्वर, वियोग हे विष. विषमज्वराने लोक जळत होते. (५१।५) आणि 'रामाविण जीवन आशा तरि' असे त्यांस वाटत होते. पण सकाळी रामाकडे चलतो हा जणू सबीज मंत्र कानात शिरतांच जीवनाची आशा उत्पन्न झाली; व जणू काय मूर्छेतून जागे झाले. विषमज्वरांत **मूर्च्छा येते.** 'अन्तर्दाहोऽधिकस्तृष्णा प्रलापश्वसनं **भ्रमः**' (मा.नि.) **(ख)** नुसत्या मंत्रापेक्षा बीजाक्षराने युक्त असलेल्या मंत्रांत अधिक सामर्थ्य असते; ते बीजाक्षर पुष्कळ वेळा त्या देवतेचा एकाक्षर मंत्र असतो. ज्वराच्या मुख्य देवता विष्णु व शिव आहेत. पैकी हा वैष्णवज्वर आहे. हिंदी चौपाईत 'एकहिं आँक इहइ -' यांत आँ हे पाशबीज व नारायण बीज पण आहे. नारायणानेच आपला प्रेमपाश टाकल्यावर ती मूर्च्छा राहील कशी? भरत विष्णूचाच अवतार आहेत (एका काल्पामधे) 'विष्णु नारायणः = कृष्णः' (अमरे) नारायण हे विष्णूचेही नाव आहे. 'आँ' आकर्षणात्मक सर्वगत आहे (अक्ष. उ.) त्याने मूर्च्छेचे आकर्षण केले व सर्वगत असल्याने सर्वांच्या मूर्च्छेचे एकाच उच्चाराने आकर्षण केले गेले. विचार करावा की गोस्वामींचे मंत्रशास्त्रज्ञान किती विशाल व खोल असेल व काव्य लिहितांना ते सतत किती जागृत असेल!

**(२) जागति मंत्र सबीज ऐकता** - या चरणाने सुचविले की माता, सचिव, गुरु व भरत यांचा संवाद चालू असता इतर सर्व लोकांना कान असून ऐकू येत नव्हते, डोळे असून दिसत नव्हते व जणू मूर्च्छापन्न दशेतच बसलेले होते. **'रामाविण जीवन-आशा तरी?'** हे त्यांना माहीत असल्याने 'कोणी राजा होवो न होवो, आमच्या दुर्दशेत काही फरक नाहीच व्हायचा' असे वाटत होते. पण

रामाकडे सकाळी चलतो हे ऐकल्याबरोबर जीवनाची आशा उत्पन्न झाली. डोळे उघडले कान ऐकू लागले, मूर्छेतून जागृत झाल्यावर जसे होते तसे झाले. विषमज्वर उतरण्याची मुदत ७,१४,२१,४२ दिवस इ. आहे. आजचा ४२ वा दिवसच आहे. हे सहजासहजी घडले काय?

**चौ. ३-४ (१) माय सचिव गुरू - स्नेहें विकल भारी'** - सगळी सभा स्नेहाने फार व्याकुळ झाली. जेव्हा विषमज्वर भरला तेव्हा **'विलपति या परिं पुरनर नारी'** - (५९।४) तेव्हा शोकाने दुःखाने व्याकुळ झाले होते सगळे लोक. आतां राम व भरतस्नेहाने व्याकुळ झाले; अर्थात प्रेमाश्रू वाहू लागले, रोमांच, कंप, कंठावरोध इ. लक्षणे प्रगट झाली. **(क) साक्षात् रामप्रेममूर्ती ही** - भरद्वाजांनीही म्हटले आहे की **'मम मत हेच की भरत तुम्ही तर रामस्नेहचि जणू देहधर'** (२०८।८). आता वसिष्ठ सांगतातः-

***हिं.*** ***। तात भरत अस काहे न कहहू । प्रान समान राम प्रिय अहहू ॥५॥***
***। जो पावँरु अपनी जडताई । तुम्हहि सुगाइ मातु कुटिलाई ॥६॥***
***। सो सठु कोटिक पुरुष समेता । बसिहि कलप सत तरक निकेता ॥७॥***
***। अहि अघ अवगुन नहिं मनि गहई । हरइ गरल दुख दारिद दहई ॥८॥***

***म.*** ***। तात भरत कां वदां न ऐसें । तुम्हिं राम-प्रिय असां प्राणसे ॥५॥***
***। जो पामर आपल्या मतिजडतें । लादि तुम्हांवर जननि - कुटिलते ॥६॥***
***। तो शठ पूर्वज कोटि समेतां । वसे कल्पशत नरक-निकेतां ॥७॥***
***। अहि - अघ - अवगुण मणि ना ग्रहतो । हरि विष दुःख अधनता दहतो ॥८॥***

**अर्थ** - तात ! भरत ! तुम्ही असे का म्हणू नये बरं? तुम्ही रामाला प्राणांसारखे प्रिय आहांत व तुम्हाला राम प्राणांसारखे प्रिय आहेत. ॥५॥ जो नीच आपल्या बुद्धीच्या जडतेने (मूर्खपणाने) मातेची कुटिलता तुमच्यावर लादील ॥६॥ तो दुष्ट आपल्या कोटी पूर्वजांसहित शंभर कल्पे नरकात वास करील ॥७॥ सर्पाचे पाप व अवगुण सर्पमणि घेत नाही (उलट) विष नाहीसे करतो व दुःख आणि दारिद्र्य यांना जाळतो' ॥८॥

**टीका. चौ - ५ - (१) तुम्हिं रामप्रिय असा प्राणसे -'** या चौपाईपासून १८४ अखेर पर्यंतचे भाषण वसिष्ठांचे आहे. कारण की भरताच्या भाषणावर मान्यतेचा शिक्का वसिष्ठांकडून पडल्याशिवाय, वसिष्ठ भरतास अनुकूल आहेत असे सचिवादिकांस वाटणे शक्य नाही; कारण राज्याभिषेकाचा आग्रह त्यांनीच पाच

सहा वेळा केला आहे. वसिष्ठ प्रतिकूल आहेत असे वाटत आहे तोपर्यंत पुढील दोन चौपायांतील शापवाणी उच्चारण्याचे धाडस सचिव किंवा कोणी करणे शक्य नाही. भरतास तात ! म्हणणाऱ्यांत वसिष्ठ कौसल्या व सचिव यांशिवाय कोणी असणे शक्य नाही. हे भाषण कौसल्येचे नाही कारण भरत रामाला प्राणांसारखे प्रिय आहेत असे ती म्हणणार नाही; कारण प्रणांपेक्षा अधिक प्रिय आहेत असे ती कधीच म्हणाली आहे. वसिष्ठ बोलण्यापूर्वी सचिवांकडून पुढील शापवाणी उच्चारली जाणे शक्य नाही. रामचंद्रास भरत प्राणप्रिय आहेत असे कौसल्या, भारद्वाज, निषादराज, त्रिवेणीत वारिवाणी, इत्यादी अनेकांनी म्हटले आहे.

**चौ. ७ - (१) तो शठ .. बसे कल्पशत नरक निकेतां - निकेतां =** निकेतांत - हा वसिष्ठांनी दिलेला शाप आहे. **'तुज हें संमत जे जगिं म्हणती । ते स्वप्निं न सुख सुगति पावती'** (१६९ ।४) हा कौसल्येचा शाप आहे, हा या वसिष्ठ शापापेक्षां फारच सौम्य आहे. काही प्रजाजनांनी या सर्वांच्या आधी, राम वनवासास जाण्यापूर्वीच शाप दिला आहे तो तर अगदीच सौम्य आहे. (४८।८ पहा) व १६९।४८ पहा.

**चौ. ८ - (१) अहि - अघ - अवगुण मणि ना ग्रहतो -** भरताने स्वतःविषयी याच्या अगदी विरुद्ध सांगणारे दोन दृष्टांत दिले आहेत. 'कार्य कठिण कारणाहुनि.... उपल. अस्थिहुनि लोह-पवि कठिण कराल विशेष' (१७९) हा वसिष्ठांनी दिलेला दृष्टांत जितका समर्पक आहे तितके भरताने दिलेले दोन्ही दृष्टांत समर्पक नाहीत. दगड हे लोहाचे - तलवारीचे उपादानकारण व अस्थि हे वज्राचे उपादान कारण आहे; जसे माती मडक्याचे उपादान कारण. परंतु कैकयी भरताचे उपादान कारण नसून निमित्त कारण आहे. 'जन्महेतु सकलां पितृमाता । कर्म शुभाशुभ देइ विधाता' हेतु = निमित्त. वसिष्ठ म्हणतात कुमाता तुमचे उपादान कारण नाही. निमित्त कारणाचे गुण कार्यात उतरतात असे नाही. कुंभार मडक्यांचे निमित्त कारण आहे, लंगडा, पांगळा चोर इ. कुंभाराचे गुण मडक्यात येत नाहीत; माती उपादान आहे तिचे गुण मडक्यांत येतात. कुंभार मेला तर मडकी फुटत नाहीत. पण माती फुटली त्या मडक्यांतली की मडके फुटलेच. पुत्र जसा मातेच्या उदरांत, शरीरात असतो तसाच सर्पमणि सर्पाच्या शरीरात असतो. सर्प उपादान कारण नाही तशीच कैकयी. सर्पाच्या गुणांच्या (दुर्गुणांच्या) विरुद्ध गुण मण्यांत असतात तसेच कैकयीच्या पापांच्या विरुद्ध

पुण्य, आणि तिच्या अवगुणांच्या विरुद्ध असलेले सर्व सद्गुण तुमच्यात आहेत.कैकयीने आपल्या विषारी फुत्कारांनी रामवनवास व रामविरह यांनी सर्वांना मूर्छित केले होते. ते विष सर्पमण्याप्रमाणे तुम्ही उतरलेत. रामसेवकांचे सर्वस्व = श्रीराम सर्वांच्यापासून बलात्काराने हिरावून घेऊन सर्वांना दुःखी व दरिद्री केले होते; तुम्ही सर्पमण्याप्रमाणे लोकांचे ते **सर्वस्व** त्यांना मिळवून देऊन त्यांचे दारिद्र्य व दुःख दूर करून सर्वांना सुखी करणार. **'मुनी धन, जनसर्वस्व, शंभु-असु'** (१।१९८।२) असे राम आहेत.

*हिं. दो. । अवसि चलिअ बन रामु जहँ भरत मंत्रु भल कीन्ह ॥*
*॥ सोक सिंधु बुडत सबहि तुम्ह अवलंबनु दीन्ह ॥१८४॥*

*म.दो. । चला च वनिं रामाकडे भरत मंत्र शुभ फार ॥*
*॥ दिला शोकसागरिं बुडत सकलां तुम्हिं आधार ॥१८४॥*

**अर्थ** - वनांत रामाकडे (राम असतील तेथे) अवश्य (च) चलावे; भरत ! तुम्ही फार चांगला मंत्र (सल्ला) दिलात; शोकसागरात बुडत असतां तुम्ही सगळ्यांना आधार दिलात. ॥ दो. १८४।

**टीका. - (१) चला च वनिं रामाकडे** - असे वसिष्ठांनी म्हणताच सर्व प्रजा, सर्व लोक म्हणू लागले की चलाच. आम्हीही आपल्या बरोबर चलतोच. हा मंत्र, हा उपाय, वसिष्ठांसारख्यास सुचला नाही की काय? सुचला नाही असे कसे म्हणवेल? पण स्वतः सांगण्यापेक्षा भरताच्या मुखातून तो बाहेर पडल्याने भरताविषयीचे जे लोकमत तयार झाले ते स्वतः वसिष्ठांनी हा उपाय सांगून कालत्रयी झाले नसते. वसिष्ठांनी **'भरत ! मंत्र शुभ फार'** असे म्हणताच इतर सर्वही असेच म्हणू लागले की भरताने फारच उत्तम उपाय काढला. चला रामाकडे, चलाच वनात असे एकमेकास तेथेच लोक म्हणू लागले. पाहिजे होता तसा आशीर्वाद मात्र भरतास मिळाला नाही. पण ज्याने बुडताना वाचविले त्यास आशीर्वाद कोण देणार !

*हिं. । भा सब कें मोदु न थोरा । जनु घन धुनि सुनि चातक मोरा ॥१॥*
*। चलत प्रात लखि निरनउ नीके । भरतु मानप्रिय भे सबही के ॥२॥*
*। मुनिहि बंदि भरतहि सिरु नाई । चले सकल घर बिदा कराई ॥३॥*
*। धन्य भरत जीवनु जग माहीं । सीलु सनेहु सराहत जाहीं ॥४॥*

*म. । मोद मनिं न थोडा सर्वांना । घनस्वने चातक - मोरानां ॥१॥*

*। चलणे उदयिं कळत शुभ निर्णय । होति भरत सकलां प्राणप्रिय ॥२।*
*। नमुनि मुनिंसि भरता शिर नमवुनि । सकल निघाति घरिं निरोप घेउनि ॥३॥*
*। धन्य भरत जीवन या जगतीं । शीला स्नेहा वानित वळती ॥४॥*

**अर्थ** - सर्वांच्या मनांत थोडाथोडका आनंद नाही झाला ! जणू मेघांचा ध्वनि ऐकून चातकांना व मोरांना व्हावा तसाच जणु झाला ॥१॥ सकाळी (उदयीं) निघणार हा शुभ निर्णय कळतांच भरत सर्वांना प्राणप्रिय झाले ॥२॥ वसिष्ठादि मुनींना वंदन करून व भरताला मस्तक नमवून (नमस्कार करून) निरोप घेऊन मंडळी आपापल्या घरी जाऊ लागली. ॥३॥ भरताच्या शीलाची व स्नेहाची प्रशंसा करीत चालले आहेत व आपसांत म्हणतात की भरताचे जीवन धन्य आहे; धन्य भरत, धन्य भरत ! ॥४॥

**टीका. - चौ. १-२ - (१) मोद मनिं न थोडा सर्वांना** - अपरंपार आनंद झाला हे साहजिक आहे. शोकासागरांत बुडत असता प्राण वाचले, शोक दुःखमुक्त झाले. जे मनांत होते तेच झाले. **(क) घनस्वने चातक मोरांना - 'लोचन चातक करुनी राखति । जे दर्शन - जलधर अभिलाषति ॥ सरसरिता सागरीं निरादर । रूप - बिंदुजल मिळत सुखाकर'** (१२८।६-७) अशी रामरूप जल बिंदुपानाची तीव्र तृषा ज्यांना लागली आहे त्या चातकांनी भरताचे भाषण रूपी मेघध्वनि ऐकला. भरत आणि राम वर्णाने व रूपाने अगदी सारखेच आहेत. नील मेघ आहेत राम, त्यांचे दर्शनाने जलबिंदु मिळणार अशी आशा उत्पन्न झाली व सर्वलोक मोरासारखे आनंदाने नाचू लागले. चातक उपमानाने मानसिक आनंद दाखविला. मोराने कायिक व वाचिक दाखविला. मोर नाचू लागले म्हणजे मधुर मधुर आवाज करतात, तसे लोक भरताची प्रशंसा करीत आहेत. चातक आणि मोर असे दोन वर्ग घेणे बरे नव्हे. अद्याप जलधर दर्शन व्हावयाचे आहे; नुसता जलधरासारखा ध्वनि कानी आला आहे. मोरांना मेघजल प्रिय नसून मेघध्वनि प्रिय असतो व मेघदर्शन प्रिय असते. पुढे दर्शन झाल्यावर सर्व लोक चित्रकूटवनांत मोराप्रमाणे आनंदाने विहार करू लागल्याचे वर्णन आहेच. **'चहुंदिशिं वनिं फिरतात प्रमुदित अनुदिन लोक सब ॥ जसे पीन होतात प्रथम पाउसीं शिखी प्लव'** (२५१) शिखी = मोर

**(२) होति भरत सर्वां प्राणप्रिय** - भरत अयोध्येत आले तेव्हा कोणी त्यांचे तोंड पाहण्यास सुद्धा तयार नव्हते. जो तो त्यांना टाळण्याचा प्रयत्न करीत

होता. भरत रामविरोधी व कैकयीला सामील असणारच या संशय पिशाच्चाने सर्वांस पछाडले होते. तेच भरत साक्षात रामप्रेममूर्ति दिसू लागले व प्राणांसारखे प्रिय झाले; कारण त्यांच्यामुळे सर्वांना रामर्शनाचा लाभ होणार !

**उपदेश** - भरत पूर्ण निःस्वार्थी, निर्लोभ, परम रामभक्त असतां मुलगा आई सारखाच असणार या एका मुद्यावरच भर दिला गेल्याने किती अनर्थ झाला! भक्तनिंदेचे किती पातक न कळत पदरात पडले व सर्वांना किती त्रास झाला हे लक्षात ठेवावे व कोणाविषयी संशयग्रस्त होणे सोडून द्यावे, कारण निश्चित निर्णय करणे फार कठीण असते; म्हणून अशावेळी मनाने सुद्धा दोषारोप न करतां उदासीन राहणे हा उत्तम मार्ग आहे.

येथे **हा दरबार** बरखास्त झाला. मानसांतील हे वर्णन पाहिले म्हणजे इतर रामायणांतील भरतचरित्र अगदी नीरस व नसल्यासारखेच वाटते. येथील भरताच्या भाषणांतील प्रेम भावनांचे विश्लेषण करणे कोणाही मतिमान व्यक्तीस अशक्य आहे. **(क)** हे भाषण म्हणजे वक्तृत्वशैलीचे उपमारहित श्रेष्ठ उदाहरण आहे. सभा भरली होती भरताला राज्याभिषेक करण्यासाठी. पण भरताचे भाषण व त्यांतील आत्मग्लानि, रामप्रेम, नम्रता, सरलता इत्यादींचा असा प्रभाव पडला की सर्व सभासद धन्य भरत, धन्य भरत करीत भरताबरोबर रामदर्शनासाठी वनात जाण्यास स्वयं सिद्ध झाले व त्यांच्या मुखाने **'जळो संपदा सदन सुख सुहृद बंधु पितृमाय । राम-पदोन्मुख होत जी करिति न मुदा सहाय'** (१८५) असे उद्गार बाहेर पडू लागले. **(ख)** शेक्सपीअरच्या ज्यूलिअस सीझर नाटकात मार्कअँटनीने आपल्या वक्तृत्वप्रभावाने सीझरला पूर्ण विरोधी असलेल्या सभेस इतकी वश केली आहे की सर्व लोक मारलेल्या सीझरचे भक्त बनले व सीझरचा एक एक केस तरी आम्हांला स्मरणार्थ द्या अशी भिक्षा मागू लागले हे खरे. पण त्या भाषणांत केवळ लौकिक व्यवहारापलीकडील **उच्च ध्येय व परमोच्च भावना यांचा लेशसुद्धा नाही.** शिवाय प्रारंभी वक्त्याला सीझरची निंदा करावीच लागली. येथे त्यांतील लवलेश नाही.

**रामचरित मानसांतील भरतचरित्र** हा भाग बाजूस ठेवला तर मानसाचे ½ पेक्षा जास्त वैशिष्ट्य नष्ट केल्यासारखे हाईल. या उत्तरार्धात भक्ती, नीति, सरलता, सेवाभाव, नम्रता इत्यादि अनेक महनीय सद्गुणांचा जो परमोच्च आदर्श निर्माण केला आहे **तोच खरोखर मानसाच्या जगत्प्रियतेचे मुख्य कारण** आहे. यांतील

अगदी छोटेसे प्रकरण सुद्धा गोस्वामींच्या हृदयाची ओळख करून देण्यास पुरेसे आहे. अथपासून इतिपर्यंत वाचक असे मंत्रमुग्ध होतात की **'रामदास रामाहुनि मोठे'** ही प्रतीती पदोपदी येते. रामापेक्षा सुद्धा चित्ताचा तोल भरताकडेच अधिक जातो. हे चरित्र कितीही वेळा वाचले तरी त्यांतील नाविन्य न्यून होत नाही; आचारादि मर्यादांचा कोठे तिळमात्र भंग नाही. **या विषयी जेवढे लिहावे तेवढे भास्कराला आरत्या ओवाळण्यासारखे आहे.** अमृताची चव शब्दांनी कोण व कशी वर्णन करणार ! भरताने रामप्रेमसुधा सर्वांस सुलभ करून ठेवली आहे. ब्रह्मानंदाप्रमाणेच भरतचरित्रांतील परमानंद स्वानुभवानेच कळेल. तो शब्दानी सांगता येण्यासारखा नाही ! पण आता चित्रकूटास प्रयाण करण्याची तयारी झटपट करणे जरूर आहे.



## 'सपुरजन। गेले भरत जिथे प्रभु सुखघन' प्रकरण - (१८५-५)

*हिं । कहहिं परसपर भा बड काजू । सकल चलै कर साजहिं साजू ॥५॥*
*। जेहि राखहिं रहु घर रखवारी । सो जानइ जनु गरदनि मारी ॥६॥*
*। कोउ कह रहन कहिअ नहिं काहू । को न चहइ जग जीवन लाहू ॥७॥*
*दो. । जरउ सो संपति सदन सुखु सुहृद मातु पितु भाइ ॥*
*॥ सनमुख होत जो राम पद करै न सहस सहाइ ॥१८५॥*
*म. । कथिति परस्पर सुकार्य झाले । गमन तयारिस सकल लागले ॥५॥*
*। गेह रक्षणा ज्यांस राखिती । त्यां वाटे जणुं गळा कापिती ॥६॥*
*। 'रहा म्हणा न कुणा' कुणि सांगत । जीवनलाभ न कुणा आवडत ॥७॥*
*दो. । जळो संपदा सदन सुख सुहृद बंधु पितृ माय ॥*
*॥ रामपदोन्मुख होत जीं करिति न मुदा सहाय ॥१८५॥*

**अर्थ** - लोक एकमेकास सांगू लागले की मोठे कार्य झाले (साधले) सगळे लोक गमनाची तयारी करू लागले. ॥५॥ घर राखण्यासाठी रहा असे ज्यांस सांगितले गेले; त्यांना वाटले की जणू आपला गळाच कापला गेला ॥६॥ (हे पाहून) कोणी सांगू लागले की 'घरीं रहा' असे कोणी कोणाला सांगू नका; कारण की जीवनलाभ (मिळवणे) कोणाला आवडत नाही? ॥७॥ आग लागो त्या संपत्तीला, घराला, सुखाला, सुहृदांना, बांधवांना व आईबापांना जी कोणी रामपदांच्या सम्मुख होत असतां त्यांस आनंदाने (सहर्ष - सहस) साह्य होत.. करीत नाहीत ॥१८५॥ **या दोस्यांच्या अंगभूत सातच चौपाया आहेत.**

**टीका - चौ. ५ - (१) कथिति परस्पर सु-कार्य झाले - सु =** मोठे, अति, सुकार्य = मोठे कार्य झाले. सर्व बाजूनीच मोठा लाभ झाला. रामतीर्थाची यात्रा, ऋषिमुनींचे दर्शन, गंगायमुना प्रयाग इ. तीर्थक्षेत्रांचे दर्शनादि, रामदर्शन, रामसंगती इ. अनेक दुर्लभ लाभ सहज होणार ! भरतासारख्या रामस्नेहमूर्तींच्या, कौसल्येसारख्या राममातेच्या व वसिष्ठांसारख्या रामगुरुंच्या बरोबर तीर्थयात्रेचा लाभ कधी मिळाला असता? फक्त एक ती व्यक्ति नाही आली तर फार चांगलं होईल इत्यादी चर्चा लोक आपापसांत करीत आहेत.

**चौ. ६-७ - (१) त्या वाटे जणु गळा कापिती - हे कवींचे म्हणणे आहे. भगवंताला शरण जात असेल त्याला प्रपंचात अडकवून ठेवील तो त्याचा केसाने**

**गळा कापणारा परमहित-शत्रु आहे असे समजावे.** घराचा, संपत्तीचा इ. लोभ दाखवून ठेवणे म्हणजे विश्वासघात करण्यासारखे आहे. **(क)** कोणाला मातेने, कोणाला पित्याने, कोणाला भावाने इ. प्रकारे घर, संपत्ती, गुरे ढोरे वगैरेचे रक्षण करण्यासाठी राहण्यास सांगितले असेल. अशांना मनांत काय वाटले ते दोह्यांत सांगितले आहे. **(ख) जीवनलाभ न कुणा आवडत** - कोणी विचारवंत म्हणाले की घर संपत्ती इ. रक्षण करण्यासाठी कोणाला कशाला ठेवता. असेल प्रारब्धात तर राहील संपत्ती व गेली तरी पुन्हा मिळेल; पण जीवनाचा लाभ मिळविण्याची अशी संधी पुन्हा येणार नाही. प्रत्येकाला वाटणारच की या संधीचा फायदा घेऊन जीवन सफल करावे. **'जीवनलाभ भला लुटि लक्ष्मण । त्यजि सब लावी रामचरणिं मन'** (१८२।७) आपली संपत्ती लक्ष्मणाच्या संपत्तीएवढी तर नाहीच! लक्ष्मणाने केले तेच योग्य केले. **सर्वस्वाचा त्याग करून रामदर्शनाने कृतार्थ व्हावे हा जीवनलाभ कोणाला नाही आवडत?**

(२) अहो ! हा लाभ न आवडणारी एक मोठी कर्तृत्ववान महिला या रामपुरीत होती व आहे. कोणाचे नाव घेऊन आमच्या प्रश्नाचे उत्तर देणार ते कळले. तेवढा उल्लेख गाळून काय ते बोला ही लोकांमधील चर्चा व भावना ध्वनित करण्यासाठी, **या प्रश्नांचे उत्तर देणारी एक चौपाई गाळली; म्हणूनच येथे फक्त सात चौपाया आहेत.** दोहा ८, २०, ६४, १७३ मध्ये सातच आहेत; टी-पहा.

**दो. (१) 'जळो संपदा सदन सुख'** - भाव हा की यांतील जे काही किंवा जे कोणी रामभक्तिप्राप्तीच्या आड येत असेल त्याचा त्याग करणेच उचित व हिताचे आहे. 'महती सुख परिवार संपदा !'... 'हीं सब रामभक्तिला बाधक । वदति संत तव-पद-आराधक' तवपद = रामपद. (४।७।१७)

*हिं.* *। घर घर साजहिं बाहन नाना । हरषु हृदयँ परभात पयाना ॥१॥*
*। भरत जाइ घर कीन्ह बिचारू । नगरु बाजि गज भवन भँडारू ॥२॥*
*। संपति सब रघुपति कै आही । जौं बिनु जतन चलौं तजि ताही ॥३॥*
*। तौ परिनाम न मोरि भलाई । पाप सिरोमनि साइँ दोहाई ॥४॥*
*। करइ स्वामि हित सेवकु सोई । दूषन कोटि देइ किन कोई ॥५॥*

*म.* *। सजिति घरोघर वाहन नाना । हर्ष किं उदयीं करूं प्रयाणा ॥१॥*
*। भरत जाइ घरिं करी विचारा । पुरि हय गज गृह खजिना सारा ॥२॥*
*। असे सकल रघुपति - संपत्ती । त्यजुन जाउं जर विना यत्न ती ॥३॥*

*। तर परिणामि भलेंपण मम ना । स्वामीद्रोह अघाग्रणि गणना ॥४॥*
*। करी स्वामिहित सेवक तोही । कोटि दोष कुणि मज देवो ही ॥५॥*

**अर्थ** - सर्व लोक घरोघरी नाना प्रकारची वाहने - याने सजवू लागले; व सर्वांना हर्ष झाला आहे की सकाळी (रामाकडे जाण्यास) प्रयाण करणार.॥१॥ भरताने घरी जाऊन विचार केला की सर्व नगरी, हत्ती, घोडे, घरे, सगळा खजिना -॥२॥ वगैरे सर्व संपत्ती रघुपतिची रामाची आहे. तिच्या संरक्षणाचा काही यत्न न करता ती तशीच टाकून मी जाईन - गेलो -॥३॥ तर शेवटी त्यांत माझा भलेपणा नाही; कारण तो स्वामीद्रोह होतो व तो सर्व पापांत अग्रणी (शिरोमणि) म्हणून गणला आहे.॥४॥ जो स्वामीचे हित करील तोच (खरा) सेवक; मग (त्यांस) मला कोणी कोटि दोष देवोनात ! (दिले तरी चालतील) ॥५॥

**टीका. - चौ. १ सजिति घरोघर वाहन नाना -** दरबारांतून मंडळी परतली ती भरताला धन्यवाद देत व प्रातःकाळच्या प्रयाणाच्या गोष्टी बोलतच गेल्यामुळे ही बातमी तेव्हाच नगरभर पसरली. मग लोक प्रयाणाच्या तयारीत लागले. त्यांतील वाहनांचा उल्लेख तेवढा येथे केला. सर्वांना अत्यंत हर्ष म्हणजे आनंद, उत्साह वाटत आहे व केव्हा एकदा उजाडेल असे झाले आहे. जिकडे तिकडे प्रयाणाच्याच गप्पागोष्टी चालणार.

**चौ. २-४ (१) भरत जाइ घरिं करी विचारा -** या व पुढील चौपायांत परमार्थ मार्गातील पायाभूत महत्त्वाचा धडा शिकविला आहे. ज्ञानमार्गी असो, भक्तिमार्गी असो की केवळ प्रवृत्तिमार्गी असो, चित्ताच्या शांततेचा व समाधानाचा भंग व्हावयास नको असेल तर प्रत्येकाने हा धडा गिरवलाच पाहिजे - **'असे सकल रघुपतिसंपत्ती'** हा तो धडा होय. आहे तितके देवाचे, मग तो भरतासारखा सम्राटपुत्र असो की प्रज्ञानानंदासारखा संन्यासी असो. कमंडलु, कटिसूत्र, कौपीन यांवरसुद्धा ममत्व असेल; ही माझी आहेत असे मनात वाटत असेल, तर मोह कालत्रयी नष्ट होणार नाही व समाधान मिळणार व राहणार नाही. **'जवळ असलेले सर्व काही परमेश्वराचे आहे, माझे नाही ही भावना दृढ करणे हा आत्मनिवेदनातील पहिला** धडा आहे. **(क)** याचा अर्थ असा नव्हे की जवळ असलेल्या वस्तूंच्या संरक्षणाचा प्रयत्नच करावयाचा नाही; उलट ते सर्व स्वामींचे प्रभूंचे आहे या भावनेनेच त्याचे रक्षण करण्याची जबाबदारी यथा शास्त्रविधी भगवत्सेवा म्हणून निष्ठापूर्वक पार पाडली पाहिजे, याचेच नाव भगवत्सेवा.

स्वामींच्या संपत्तीचे संरक्षण करण्याची जबाबदारी सेवकाचीच. हे काम जो करणार नाही तर तो स्वामीद्रोही, स्वामीच्या संपत्तीचा विनाश करणारा, मोठा पापी ठरले. असे करताना लोक नावे ठेवणारच; पण **एकनिष्ठ सेवकाने त्या लोकनिंदेला भिता उपयोगी नाही.** ऐश्वर्यात राहून त्या ऐश्वर्याबद्दल लेशमात्र ममत्व न ठेवणे हे जितके बोलण्यास सोपे वाटते तितके कृतीने व चित्तांत बाणणे फार कठीण आहे व अगदी सोपेही आहे. **लक्ष्मणाने केला तसा त्याग करणे; या भरताने केलेल्या त्यागापेक्षा पुष्कळ सोपे आहे.** पाण्यात राहून कमलपत्राप्रमाणे अगदी अलिप्त राहणे - बाह्यत्यागापेक्षा कठीण आहे.

(२) भरताने सर्व संपत्तीच्या संरक्षणाची उत्तम व्यवस्था केली; प्रजेने तसे केले नाही यामुळे असे वाटण्याचा संभव आहे की भरत स्वतःस ह्या संपत्तीचा मालक समजतात; पण असे वाटणे हा भ्रम आहे. घरसंपत्ती आपली आहे असे ज्यांना वाटत होते त्यांनी त्यांच्या संरक्षणाची व्यवस्था केली नाही हे ठीकच आहे; स्वतःची म्हणून वाटणाऱ्या संपत्तीचा त्याग करणे, फेकून देणे सोपे आहे. पण दुसऱ्याची ठेव म्हणून ताब्यात असलेल्या संपत्तीचा तसा त्याग करणे फेकून देणे सोपे आहे. पण दुसऱ्याची ठेव म्हणून ताब्यात असलेल्या संपत्तीचा तसा त्याग करणे हा विश्वासघात ठरेल. स्वामींच्या संपत्तीचे संरक्षण सेवकाने न करणे योग्य ठरेल काय? सरकारी तिजोरी पाहऱ्यावरील सशस्त्र संरक्षकांची नसते; पण देहात प्राण असेपर्यंत तिचे संरक्षण करणे हे इमानी एकनिष्ठ सेवकांचे - संरक्षकांचे कर्तव्य आहे. तो आपल्या हातातील सोन्याची आंगठी गेली तरी पर्वा करणार नाही; पण तिजोरी व तिजोरीचे कुलूप सुरक्षित ठेवण्याचा प्रयत्न करील.

**चौ. ४ - (१) तर परिणामि भलेपण मम ना -** स्वामीच्या संपत्तीचे सेवकाने संरक्षण न करणे म्हणजे स्वामिद्रोह होय. द्रोह = वैरभावना. शिवधनुष्याचा भंग करणाऱ्याला भृगुपतींनी शिवद्रोही म्हटले; व ते धनुष्य त्यांच्या गुरूचे असल्याने गुरुद्रोही म्हटले. आपल्या गुरुच्या संपत्तीचा विनाश करणारा म्हणून गुरुद्रोही, गुरुवैरी असे त्यांस वाटले. तसेच भरत म्हणतात की मी माझ्या स्वामींच्या संपत्तीच्या संरक्षणाची व्यवस्था न लावणे म्हणजे स्वामीद्रोह, स्वामि वैर करण्यासारखे आहे. स्वामिद्रोह हे सर्व पापांत शिरोमणि = अग्रगण्य = अग्रणी होय. दोहाई = द्रोह, वैर, करणारा हा येथील विशेषार्थ नीट ध्यानात ठेवा. हाच २३०।८ मध्ये आहे.

**चौ. ५ - (१) करी स्वामिहित सेवक तोही... देवो ही** - स्वामींच्या संपत्तीचे संरक्षण करणे म्हणजे स्वामिहित करणे आहे. भरताने नगर गृहसंपत्ती संरक्षणाचा जो प्रयत्न केला त्यांतील हेतु ज्यांस कळणार नाही ते म्हणणार की मला राज्य नको वगैरे अघळपघळ गप्पा मारल्या. मग आता या संपत्तीची एवढी काळजी चिंता यांना कशाला? ममता असल्याशिवाय इतकी काळजी कोण वाहतो ? इ. इ. अनेक प्रकारे दोष देतील हे भरत जाणतात. पण सेवकाने स्वामिहित साधताना अशा लोकनिंदेचा आणि लोक काय म्हणतील याचा विचारसुद्धा करण्याचे कारण नाही. ॥ **करी स्वामिहित सेवक तोही । हें करिना तो स्वामी द्रोही ॥ हे त्याचे आचारसूत्र असले पाहिजे.**

**हिं.** *। अस बिचारी सुचि सेवक बोले । जे सपनेहुँ निज धरम न डोले ॥६॥*
*। कहि सब मरमु धरमु भल भाषा । जो जेहि लायक सो तेहिं राखा ॥७॥*
*। करि सबु जतनु राखि रखवारे । राम मातु पहिं भरतु सिधारे ॥८॥*

**दो.** *। आरत जननी जानि सब भरत सनेह सुजान ॥*
*॥ कहेउ बनावत पालकीं सजन सुखासन जान ॥१८६॥*

**म.** *। तैं शुचि सेवक बोलवि ते ही । स्वप्निं न चळले स्वधर्मि जे ही ॥६॥*
*। मर्म धर्म सब उत्तम कथिलें । जे ज्या लायक तिथें राखिले ॥७॥*
*। करुनि यत्न सब रक्षक टेवति । गेले भरत राममातेप्रती ॥८॥*

**दो.** *। जाणुनि जननी आर्त सब । भरतें स्नेहसुजाण ॥*
*॥ कथिल्या सजण्या पालख्या मेणे सौख्यद यान ॥१८६॥*

**अर्थ :** तेव्हा मग भरताने असेच पवित्र (एकनिष्ठ) सेवक बोलावले की जे कधी स्वप्नांतसुद्धा स्वधर्मापासून चळले (च्युत झाले) नव्हते.॥६॥ सर्व मर्म व सेवकधर्म यांचे उत्तम प्रकारे विवेचन करून त्यांस सांगितले; व जे सेवक ज्या कार्याला योग्य होते त्यांना तेथे तेथे (त्या त्या कार्यासाठी) ठेवले.॥७॥ (या प्रमाणे) सर्व व्यवस्था (प्रयत्न) करून सर्व ठिकाणी संरक्षक ठेवले व भरत राममातेकडे गेले.॥८॥ सर्व माता दुःखी व रामदर्शनार्थ उत्सुक आहेत (= आर्त) असे जाणून प्रेमात सुजाण असणाऱ्या भरताने पालख्या, मेणे वगैरे सुखदायक याने सजविण्याची (तयार करण्याची) आज्ञा दिली. ॥दो.१८६॥.

**टीका. चौ. ६-७-८ (१) शुचि सेवक = 'शुचि सुशील सेवक सुमति'** नुसते स्वामिनिष्ठ पण सांगकामे असले तर त्यांस शुचि म्हणता येणार नाही. (क) मर्म

– याचे दोन अर्थ होतात. राम मनुष्य नसून भगवान आहेत हे एक मर्म व दुसरे राजनैतिक सर्व मर्म = गुप्त गोष्टी. शत्रू कोणत्या बाजूने येणे अधिक शक्य; आल्यास त्याच्या नाशाची गुप्त साधनं कशी कोठे निर्माण करून ठेवली आहेत; त्यांचा उपयोग केव्हा कसा करावा; विशेष रक्षणीय विभाग कोणते; कोठे काय आहे; इत्यादि सर्व प्रकारची रहस्ये जशी जेथे आवश्यक तशी तेवढी सांगितली. **(ख) धर्म** = सेवक धर्म. त्यांना सांगितले की तुम्हाला सुद्धा रामदर्शनाची लालसा व तळमळ असणार हे मी जाणतो; पण **'असे सकल रघुपति - संपत्ती ॥' करी स्वामिहीत सेवक तोही** ॥' जो न करी तो स्वामिद्रोही ॥ तेव्हा विचार करा की निर्वंशाच्या संपत्तीप्रमाणे सर्व संपत्ती टाकून सर्वांनीच दर्शनास जाणे हा सेवक धर्म की दर्शनास न जाता स्वामींचे हित करणे हा सेवक धर्म ? माझ्या जागी तुम्ही असता तर संरक्षक ठेऊन गेला असता की नाही ? तुम्हाला मागे अडकवून ठेवणे माझ्या जिवावर आले आहे पण **'सेवकधर्म कटोर समस्ति किं'** बरे मी प्रभूंना वनांतच अभिषेक करवून राजधानीत परत आणण्याच्या हेतूने जात आहे. आले प्रभु की तुम्हाला दर्शन होईलच. न च आले तर तुमच्या जागी दुसरे नेमून तुम्हाला ती संधी देणे आमचे कर्तव्यच आहे. **(ग) गेले भरत राममातेप्रति** - स्वतःच्या जननीकडे गेले नाहीत; पण ती बरोबर आली आहे हे पुढे कळेल.

**दो. (१) जाणुनि जननी आर्त सब - आर्त** = दुःखीकष्टी, शोकाकुल व रामदर्शनासाठी तळमळणाऱ्या, अशक्त झालेल्या. वा. रा. वर्णन आहे की दशरथांची क्रिया उरकेपर्यंत सर्व राण्या (एक सोडून) नुसत्या उघड्या जमिनीवर, काहीही वस्त्र वगैरे न आंथरता झोपत होत्या. **(क) स्नेह सुजाण** - मातांचा रामावर किती स्नेह आहे हे भरत चांगले जाणत असल्याने त्याने कौसल्यादिमातांना बरोबर येण्याची व पालख्या वगैरेंत बसूनच निघण्याची प्रार्थना केली. रथांतून गेल्या तर त्यांस फार कष्ट होतील हे भरताने जाणले. पालख्या वगैरे तयार करविण्याची सूचना शत्रुघ्नास दिली असेल; कारण की पुढे मातांची सर्व सेवा शत्रुघ्नाकडेच सोपविली आहे. **(ख) ल.ठे.** - वा. रा. भरत या वेळी कौसल्येकडे गेल्याचा उल्लेख नाही; पण कौसल्यादि सर्व माता चित्रकूटात गेल्याचा उल्लेख आहे.

***हिं.*** ***। चक्क चक्कि जिमि पुर नर नारी । चहत प्रात उर आरत भारी ॥१॥***
***। जागत सब निसि भयउ बिहाना । भरत बोलाए सचिव सुजाना ॥२॥***
***। कहेउ लेहु सब तिलक समाजू । वनहिं देब मुनि रामहि राजू ॥३॥***

*। बेगि चलहु सुनि सचिव जोहारे । तुरत तुरग रथ नाग सँवारे ॥४॥*
*। अरुंधती अरु अगिनि समाऊ । रथ चढ़ि चले प्रथम मुनिराऊ ॥५॥*
*। बिप्रबृंद चढ़ि बाहन नाना । चले सकल तप तेज बिधाना ॥६॥*
*। नगर लोग सब सजि सजि जाना । चित्रकूट कहँ कीन्ह पयाना ॥७॥*
*। सिबिका सुभग न जाहिं बखानी । चढ़ि चढ़ि चलत भईं सब रानी ॥८॥*
दो. *। सौंपि नगर सुचि सेवकनि सादर सकल चलाइ ॥*
*॥ सुमिरि राम सिय चरन तब चले भरत दोउ भाइ ॥१८७॥*
म. *। चक्र - चक्रि - सम पुर नर - नारी । वांछिति उदय आर्त उरिं भारी ॥१॥*
*। जागत रजनी सरली सगळी । भरत सुज्ञ सचिवां घे जवळीं ॥२॥*
*। घ्या अभिषेक वस्तु सब सांगाति । वनिं ही रामा मुनि अभिषेकति ॥३॥*
*। चला शीघ्र; ते नमुनि परतले । त्वरें तुरग रथ नाग सजविले ॥४॥*
*। अरुंधती नी अग्नि ससाज हि । प्रथम रथीं निघती मुनिराजहि ॥५॥*
*। नाना वाहनिं विप्र - संहती । सकल तेज तप-निधान निघती ॥६॥*
*। लोक सकल सजसजुनी यानां । चित्रकूटिं करिति ही प्रयाणा ॥७॥*
*। शिबिका सुभग, न जाति वानल्या । त्यांत सकल राण्याहि चालल्या ॥८॥*
दो. *। सोपुनि पुर शुचि सेवकां, सकलां पाठवितात ॥*
*॥ स्मरुनि राम-सीता-चरण भरत बंधु चलतात ॥१८७॥*

**अर्थ** - सर्व पुर नरनारी चक्रवाक चक्रवाकी प्रमाणे मनात फार आर्त होऊन सूर्योदय होण्याची वाट बघत जागत आहेत.॥१॥ जागत असतांच सर्व रात्र संपली (उजाडले) व भरताने सुज्ञ सचिवांना जवळ बोलावले.॥२॥ त्यांना सांगितले की राज्याभिषेकाच्या सर्व वस्तु बरोबर घ्या; वनांतच मुनिश्रेष्ठ (वसिष्ठ त्यांस) राज्याभिषेक करतील.॥३॥ लवकर निघा. ते (सचिव) नमस्कार करून परत गेले व त्यांनी त्वरेने घोडे, रथ, हत्ती (वगैरे) सर्व सजविले - सुसज्ज केले.॥४॥ अरुन्धती, सर्व सामानासह अग्नी व मुनिराज वसिष्ठ प्रथम एका रथांत (सर्वांच्या पुढे) निघाले.॥५॥ (त्यांच्या मागे) सगळेच तेजतपनिधान असलेले विप्रांचे समुदाय (संहति-संहती, वृंद) नाना वाहनांत बसून निघाले.॥६॥ (त्यांच्या मागे) नगरांतील सर्व लोकांनी (नरनारी) आपापली वाहने सजून चित्रकूटास (जाण्यासाठी) प्रयाण केले.॥७॥ ज्या सुंदर शिबिकांचे वर्णन करता येणार नाही अशांमध्ये बसून सर्व राण्याही निघाल्या.॥८॥ नगर शुचि सेवकांच्या ताब्यात देऊन (सोपून) व

सर्व लोकांना आदराने (पुढे) धाडून, रामसीता यांच्या चरणांचे स्मरण करून भावासह भरत चालू लागले.॥दो.१८७॥ बनहिं = पटले तर, बनना = पटणे (हि.म.को.पहा.)

**टीका. - चौ. १ - (१) चक्र** = चक्रवाक, **चक्री** = चक्रवाकी. 'कोकश्चक्रः चक्रवाको' (अमरे) चक्रवाक चक्रवाकी यांचा रात्री वियोग होतो व ती अति व्याकुळ होऊन सूर्योदय होण्याची वाट बघत रात्र घालवितात. अशीच व्याकुळता सर्व स्त्रीपुरुषांना आली आहे. सर्वांचे रामावर किती प्रेम आहे हे या उपमेने दाखविले.

**चौ. ३ - (१) घ्या अभिषेक वस्तु सब -** अभिषेकति - या वरून ठरते की भरताने वसिष्ठांची संमति आधी घेऊनच ही आज्ञा दिली. पुढे चित्रकूटला भरत म्हणतातच - 'देव ! देव-अभिषेचना **संमतिने गुरुपाय ॥ तीर्थ सलिल आणिलें सब...'** (२।३०७।-) **(क) वनांत च राज्याभिषेक कां?** I शुभस्य शीघ्रं या न्यायाने तेथे गेल्याबरोबर करणे इष्ट. II नगरांत बेत ठरविला होता तो सफल झाला नाही. III परत न आले तरी राज्याभिषेक झाला म्हणजे राम राजे हे ठरले. ते परत येईपर्यंत वसिष्ठ राज प्रतिनिधि म्हणून व्यवस्था पाहू शकतील असा भरताचा हेतू असावा.

**चौ. ५ - (१) अरुंधती नी अग्निं ससाजहि -** मुळांत 'अगिनि समाऊ' असे शब्द आहेत त्यांचा अर्थ येथे स्पष्ट केला आहे. **अग्नि =** श्रौताग्नि होमाचे निरनिराळे अग्नि. दक्षिणाग्नि गार्हपत्याग्नि, आहवयाग्नि इत्यादी; शाखाभेदाने तीन, पाच असतात. वसिष्ठादि हे सर्व मुनि व विप्रच नव्हे तर लंकेतील रावणादि राक्षस सुद्धा अहिताग्नि होते. अरुंधती बरोबर असल्याने सर्व अग्नी बरोबर नेणे भाग आहे. रघुवीर विवाहाच्या वेळी अरुंधती गेली नव्हती म्हणून अग्नी बरोबर नेल्याचा उल्लेख तेथे नाही. एका अहिताग्नीच्या अग्नीतून अग्नी घेऊन इतरांना सायं प्रातर्होमादि अग्निकार्ये करता येतात. अग्नी नेले की अग्निकार्यास लागणारी सर्व सामग्री, पात्रे, दर्भ, आसने इत्यादी बरोबर नेणे भाग असते; म्हणून 'स-साज' = सामग्रीसहित असा स्पष्ट उल्लेख मराठीत केला आहे. अर्धी गाडी तरी सामान असते हे !

**चौ. ७ - (१) चित्रकूटिं करिति ही प्रयाणा -** येथे चित्रकूटाचा उल्लेख सर्व लोकांच्या वर्णनात करून सुचविले की राम चित्रकूटला राहिले आहेत ही बातमी

या वेळेपर्यंत सर्व लोकांना कळलेली आहे. **(क) ही बातमी कळली कशी ?** रामवनवासाच्या २१ व्या दिवशी भरत आले आहेत; तोपर्यंत सुमंत्राने सांगितलेल्या बातमीच्या आधारे यमुना ओलांडून राम वाल्मीकींच्या आश्रमाकडे गेले इतकी माहिती निषादराजाकडून सहज कळण्यासारखी होती. तेव्हा वसिष्ठांनी वाल्मीकींच्या आश्रमांत दूत पाठवून त्यांच्याकडून मिळविली असणे सरळ मार्ग आहे. रामचंद्रांनी भरद्वाजांस वाल्मीकींच्या आश्रमाचा रस्ता विचारला ते गुहाने ऐकले होते. तो फार रामप्रेमी असल्याने त्यानेही आपल्या हेरांना त्या बाजूस पाठवून सहज ही बातमी मिळविली असेलच व त्याने स्वतः जाऊन सर्व निरीक्षण केले असले पाहिजे हे **'नाथ पहा विटपांस विशाला'** (२३७।२) पासून २३७ पर्यंत त्याने केलेल्या वर्णनावरून नक्की ठरते. म्हणून त्याच्याकडूनही ही बातमी वसिष्ठांनी किंवा लोकांनीही मिळविली असेल.

**दो. (१) भरतबंधु चलतात** - सर्वांच्या पुढे गुरु वसिष्ठ, त्यांच्या मागे विप्रसमूह, त्यांच्या मागे पुरनरनारी; त्यांच्या मागे सर्व राण्या व सर्वांच्या शेवटी पायी, अनवाणी चालत भरत शत्रुघ्नासह निघाले. चतुरंग सैन्य सर्वांच्या पुढे धाडले गेले. **(क) स्मरुनि राम - सीताचरण** - गणेशादि कोणाचे स्मरण न करता, रामसीता यांचे स्मरण न करता, रामसीता चरणांचे स्मरण केले. रामसीतास्मरण करून निघाले असे म्हटले असते तर ठरले असते की सीतेचेसुद्धा आपादमस्तक ध्यान केले; म्हणजे भरत सीतेच्या मुखाकडे बघत असत असा भलताच अर्थ निघाला असता; म्हणून चरण हा महत्त्वाचा शब्द घातला व मर्यादा संरक्षण केले ! **लक्ष्मणासारखीच भरताची या बाबतीत वृत्ति होती हे दाखविले. किती सावधानता ही !**

*हिं. । राम दरस बस सब नर नारी । जनु करि करिनि चले तकि बारी ॥१॥*
*। बन सिय रामु समुझि मन माहीं । सानुज भरत पयादेहिं जाहीं ॥२॥*
*। देखि सनेहु लोग अनुरागे । उतरि चले हय गय रथ त्यागे ॥३॥*
*। जाइ समीप राखि निज डोली । राम मातु मृदु बानी बोली ॥४॥*
*। तात चढ़हु रथ बलि महतारी । होइहि प्रिय परिवारु दुखारी ॥५॥*
*। तुम्हरें चलत चलिहि सबु लोगू । सकल सोक कृस नहिं मग जोगू ॥६॥*
*म. । रामदर्शनोत्सुक नर नारी । जाति करिणि करि बघुनि किं वारी ॥१॥*
*। सीताराम वनीं मनिं जाणत । भरत बंधुसह जाती चालत ॥२॥*
*। बघुनी स्नेह लोक अनुरागति । त्यजुनि वाजिगज रथ, पदिं चालत ॥३॥*

*। टेवबि डोली जाउनि जवळीं । राममाय मृदु वचना वदली ॥४॥*
*। सांगे ऐक रथीं बस बाळा ! । प्रिय परिवार दुःखि बघ झाला ॥५॥*
*। चालति तुम्हिं चालतां सकल जन । सकळ शोककृश चलण्या शक्त न ॥६॥*

**अर्थ** - सर्व स्त्रिया व पुरुष रामदर्शनासाठी असे उत्सुक आहेत की जणू काय हत्तिणी व हत्ती वारि (जलाशय) पाहून तिकडेच जात आहेत.॥१॥ सीताराम वनात आहेत हे जाणून भरत (मात्र) भावासह पायीं चालत आहेत.॥२॥ तो स्नेह पाहून लोक इतके अनुरक्त झाले की सर्व हत्ती, घोडे रथ इत्यादी आपल्या वाहनांतून उतरून पायी चालू लागले.॥३॥ राममातेने भरताजवळ जाऊन आपली डोली खाली ठेवविली व ती मृदु वाणीने म्हणाली की - ॥४॥ बाळ ! रथांत बस बाबा ! ऐक माझं; सर्व प्रिय परिवार (किती) दुःखी झाला, बघ तरी ! ॥५॥ तुम्हीं चालतां, त्यामुळे सगळे लोक चालू लागले आहेत; ते शोकाने आधीच कृश झालेले असल्याने चालण्याचे त्राण नाही त्यांच्यांत !॥६॥

**टीका. चौ. १ - (१) रामदर्शनोत्सुक नर नारी - करि** = करी = हत्ती, **करिणी** = हत्तिणी. पुष्कळ व खोल जल असलेल्या जलाशयाकडे हत्ती-हत्तिणींचे कळप जसे अत्यंत उत्सुकतेने, इतर सर्व गोष्टी विसरून जातात तसेच जणू लोक चालले आहेत. केव्हा एकदा रामदर्शन होईल असे झाले आहे. **(क) वारी** = वारि, जल; हा वारि शब्द भावपूर्ण आहे. तृष्णा, मल, ताप, पथश्रम इत्यादींचे अपवारण - निवारण करणारे ते वारि-विरहविषमज्वराने लागलेली तहान, भरतनिंदेचे मळ, मनोमल, त्रिताप व भवपथश्रम यांचे निवारण करणारा मोठा अगाध जलाशय चित्रकूटात आहे हे जाणून जात आहेत.

**चौ. २ - (१) सीताराम वनीं... जाती चालत** - सीताराम वनवास - त्रास भोगीत असता आपण वाहनांत आरामशीरपणे जाणे हा सेवकधर्म नाही हे जाणून भरत मात्र पायी चालत आहेत. मग लोकांनी केले ते योग्य की भरताने केले ते योग्य ? याचे उत्तर पुढे भरतच देतात - **'पायींपायिं राम तर गेले ! आम्हांस्तव रथ हय गज केले ॥ उचित मला जाणें कीं मस्तकिं । सेवकधर्म कठोर समस्तिं किं ॥** (२०३।६-७) लोक आर्त होते व सर्व लोक दास्य भावनेने भक्ति प्रेम करणारे आहेत असे नाही. भरत इतरांच्यापेक्षा अधिक आर्त असूनसुद्धा रामबंधु असल्याने इतरांची व भरताची तुलना करणेच योग्य नाही.

**चौ. ३ - (१) बघुनी स्नेह लोक अनुरागति - 'बघुनी स्नेह'** - याने ध्वनित

केले की **'राम राम ! सीता ! वदत भारी प्रेमभरांत'** (२०३) असे भरत चालत आहेत. त्या शिवाय नुसत्या पायीं चालण्याने आदर, श्रद्धा दिसेल पण स्नेह दिसणार नाही. **अनुरागति** - भरताविषयी विशेष प्रेम उत्पन्न झाले असा अर्थ पुढील संदर्भाने घेणे जरूर आहे. रामप्रेमाधिक्य झाले असते तर भरत रथांत बसल्यावर सुद्धा हे लोक आपल्या वाहनांत बसले नसते. भरतासारखा रामप्रेममूर्ति व रामबंधु पायी चालत असता आपण वाहनांत बसून जाणे बरे नाही असे लोकांना वाटले. लोकांत **रामापेक्षाही भरतावर अधिक प्रेमादर वाढत चालला हे दाखविण्यास प्रारंभ येथून झाला. 'रामदास रामाहुनि मोठे'.** रामचंद्र पायी चालत गेले हे फक्त ऐकले; प्रत्यक्ष पाहिले नाही; व वर्ण रूपाने रामासारखाच दिसणारा रामदास प्रेमविव्हळ होऊन चालत असलेला प्रत्यक्ष दिसला. त्यामुळे असा फरक पडणे स्वाभाविक आहे.

**चौ. ४ - (१) ठेवबि डोली जाउनि जवळीं** - येथे डोलीचा मुद्दाम उल्लेख करून सुचविले की, पालख्या, मेणे वगैरे चांगले सुशोभित करून तयार होते तरी राममाता परिस्थिति जाणून पालखी, मेणा वगैरेंत न बसता अगदी साध्या यानात, डोलीत बसली व निघाली. ज्या शिबिका वगैरे सजविल्या त्यांत बाकीच्या सातशे राण्या व भरतजननी बसली. सुमित्रा कौसल्येबरोबरच असावयाची. दोघीच रामावतार रहस्य जाणतात. कौसल्या - राममाता व बाकीच्या राण्या यांच्या कृतीत व वृत्तीत व भावनांत भेद राहणारच ! **कौसल्येची बरोबरी व तुलना इतरांशी करणेच चुकीचे.**

(२) या तीन चौपायांत कौसल्येच्या स्वभावातील अनेक अलौकिक गुणांचे दर्शन होते. भरत, शत्रुघ्न सर्व (७०१) राण्यांच्या मागे होते व कौसल्या सर्व राण्यांच्या पुढेच असणार व डोलीत असली तरी डोली झाकलेलीच असणार. I असे असता तिलाच भरत दिसले; यावरून ठरते की ती प्रथमपासूनच साशंक असली पाहिजे, आणि भरत रथांत जातो की पायी याची कासवीप्रमाणे तिला चिंता लागलेली असावी, म्हणून तिने पाळत ठेवली. **किती अगाध प्रेम हे !** II भरत प्रजेपेक्षाही अधिक कृश व पायी प्रवासास अपात्र असलेच पाहिजेत. **त्यांस रथांत बसविणे हा मुख्य हेतु आहे.** पण नुसते सांगून भागणार नाही व शक्य तो सत्याग्रह करू नये असे वाटत असल्याने लोक वाहनांतून उतरून पायी चालू लागेपर्यंत कौसल्या काही करू शकत नव्हती. लोक उतरलेले पाहताच

त्या संधीचा फायदा घेतला. III कौसल्येचे लक्ष सगळ्यांवरच किती होते हे पण दिसले. डोळे मिटून रामस्मरण करीत बसली असती तर हे कशाला कळले असते ? यावरून दिसले की भरताची जितकी चिंता कौसल्या वाहते, तितकीच प्रजेचीही काळजी तिला लागली आहे. 'सा माता, मातरस्तेषां केवलं जन्म हेतवः' असे म्हणणे गैरवाजवी होईल काय ? IV प्रजेत चालत जाण्याची शक्ती नाही हे जितके खरे तितके हेही खरेच की प्रजा अशाही दशेत चालत असता आपण डोलीतून जाणेसुद्धा कौसल्येच्या प्रजावत्सल हृदयास अशक्य झाले व भरत पायी जात असता मातेने डोलीत जाणे असह्य झाले म्हणून डोली खाली ठेवविली. या प्रमाणे भरतावरील अगाध प्रेम, निःस्सीम प्रजावात्सल्य, भरतरामसमत्व, सर्वांची चिंता, प्रसंगावधान, सात्त्विक धृति, कर्तव्य तत्परता इ. **अनेक दिव्यगुणांचे दर्शन येथे झाले.** केवळ तीन चौपायांत इतके सांगून ठेवले ! लोक शोकाने किती कृश झाले आहेत हे पण या निमित्ताने दाखविले.

(३) भरत ज्या हेतूने सर्वांच्या मागे राहिले तो हेतु येथे निष्फळ ठरला; पण अनुभवाने सावध राहून भरतांनी पुन्हा असा प्रसंग येऊ न देता सेवकधर्माचे उत्तम पालन केलेले पुढे दिसेल. **वा. रा. हे काही नाही.** भरत प्रथमपासूनच रथांत बसून निघाले आहेत ! **(क)** प्रसाद व माधुर्यमय भाषेत आदर्श चरित्रचित्रण करण्याची आदर्श काव्यप्रतिभा व मानव स्वभावज्ञान यांचे येथे प्रशंसनीय दर्शन होते. भरत काय करतात ते आता पाहू.

*हिं.* ***। सिर धरि बचन चरन सिरु नाई । रथ चढ़ि चलत भए दोउ भाई ॥७॥***
***। तमसा प्रथम दिवस करि बासू । दूसर गोमति तीर निबासू ॥८॥***

*दो.* ***। पय अहार फल असन एक निसि भोजन एक लोग ॥***
***॥ करत राम हित नेम ब्रत परिहरि भूषन भोग ॥१८८॥***

*म.* ***। वचन धरुनि शिरिं चरणां नमुनी । बंधु उभय जाती रथिं बसुनी ॥७॥***
***। प्रथम दिनीं तमसा-तटिं वासा । करिति गोमतीं दुजा निवासा ॥८॥***

*दो.* ***। पय-अहार, फल अशन कुणि नक्ताशन करतात - ॥***
***॥ व्रत नेमां, रामास्तव भोगादी त्यजतात ॥१८८॥***

**अर्थ** - मातेचे वचन शिरसावंद्य मानून व तिच्या चरणांना वंदन करून दोघे बंधू रथात बसून चालू लागले.॥७॥ पहिल्या दिवशी तमसातीरावर वस्ती केली; दुसरी वस्ती गोमतीच्या तीरावर झाली.॥८॥ कोणी दुग्धाहार करू लागले,

कोणी फलाहारी बनले; कोणी नक्त भोजन करू लागले; या प्रमाणे रामदर्शनासाठी लोक नेम व्रते इ. करू लागले व भोगांचा त्याग केला.।।१८५।।

**टीका. चौ. (१) वचन धरुनि शिरिं... रथें बसुनी** - हे वाचल्यावर शंकेखोरांस असे वाटण्याचा संभव आहे की भरतास पैठणी आग्रह पाहिजे होता, सत्याग्रही युगांतील प्रायोपवेशनाच्या फार्सासारखा भरतांनी हा फार्स केला, पण असे म्हणणे अर्धवटांना व मस्तिष्कविकृति झालेल्यांनाच शोभेल. कोणी म्हणतील की सेवाधर्माचा भंग तरी झालाच. हे म्हणणारे नेत्र असून आंधळे ! **(क)** अयोध्येतून निघताना काही अंतर पायी चालल्यावर राम रथांत बसूनच शृंगवेरपुरापर्यंत गेले आहेत; तसेच भरत करीत आहेत म्हणून सेवाधर्म विघात झाला नाही. **(ख) वचन धरुनि शिरिं** - कौसल्येच्या आज्ञेला राम किती मान देतात, हे भरतांस पक्के माहीत आहे. कौसल्येने सांगितले तर राम आपली प्रतिज्ञा मोडून सुद्धा परत येतील अशी भरताची खात्री आहे. 'मातृवचनिं रघुराज परतती' (२५३।४) शिवाय कृश दुःखीदीन दुर्बळ झालेल्या लक्षावधि रामप्रिय व रामप्रेमी प्रजेस दुःख देणे मोठा अपराध घडला असता 'दुःखि दुःख पाहुनि सुखि सुख पर' हे संतांचे लक्षण आहे; व येथे रथांत बसण्याने सेवक धर्माचा विघात होत नाही हे जाणून भरत रथांत बसले. आपल्याविषयी लोकांची एवढी आदर बुद्धी असेल असे पूर्वानुभवावरून भरतास वाटत नव्हते; म्हणूनच ते पायी निघाले होते. **उपदेश - सेवक-धर्मनिष्ठा असावी, पण दुराग्रह नसावा.** परिस्थित्यनुसार वागलेच पाहिजे; पण आपल्या आग्रहाने, हट्टाने वा दुराग्रहाने आपल्या स्वामींस काय वाटेल? हा प्रश्न नेहमी पुढे असावा. भरताने लाखो लोकांना व दीन दुर्बळ प्रजेस दुःख देणे रघुनाथांस आवडले असते काय ?

**चौ. ८ - (१) प्रथमदिनीं तमसातटिं वासा करिति** - भरतानी तमसा, गोमती व सई या तीन ठिकाणी वस्ती केली व चौथ्या दिवशी शृंगवेरपुरात पोचले आहेत. रामचंद्रांनी फक्त तमसातीरीं एक वस्ती करून दुसऱ्या दिवशी शृंगवेरपुर गाठले आहे. लोक रथादि वाहनांतून जात असले तरी सर्व चतुष्पाद प्राणीसुद्धा रामविरहाने अति दीन व अति निःशक्त झाले आहेत. शेकडो पालख्या, मेणे बरोबर आहेत. पालख्या वाहून नेणारेसुद्धा शोककृश दुबळे झाले आहेतच **तरीसुद्धा चार दिवसांत शंभर मैलांचा प्रवास केलाच.** आज चांगले धट्टेखट्टे तालीमबाज जवान तरी रोज २५ मैल पालख्या (माणसे बसलेल्या) घेऊन जातील काय ?

आणि हे लक्षात ठेवले पाहिजे की सडका व सुखदायक रस्ते नव्हते तयार केलेले !

**(२) वा. रा. - सर्ग. ८३** - नऊ हजार हत्ती, साठ हजार रथ, एकलक्ष घोडेस्वार व पायदळ; सर्व प्रकारचे धंदेवाले लोक उदा. सुतार, लोहार, धोबी, गवंडी इ. सर्व प्रकारचे व्यापारी इ. सर्व लोक निघून त्याच दिवशी शृंगवेरपुरास पोचले आहेत. (पालख्या, मेणे वगैरेचा उल्लेख नाही) **या प्रमाणे एकाच दिवसांत गेले आहेत; मानसांत चार दिवस का ?** वा. रा. आधी रस्ते चांगले तयार करविले आहेत व पालख्या मेणे वगैरेंचा उल्लेख नाही. म्हणून ते शक्य झाले. **(क)** येथे **रस्ते आधी का करविले नाहीत ?** याचे उत्तर 'सेवाधर्मः परमगहनो योगिनामप्यगम्यः' हेच आहे. राम वनांत गेले (शृंगवेरपुरापर्यंत) त्या वेळी रस्ते तयार करविले नव्हते; त्यांचा रथ तशाही स्थितीत गंगेपर्यंत जाऊन परत आलाच. मग भरत सैन्यासह जात असता रस्ते मुद्दाम तयार करविणे सेवकधर्माला शोभण्यासारखे झाले असते काय ? अर्थात नाही.

**दो. (१) 'पय अहार, फल अशन...' – 'रामदर्शना व्रतादिक करुं लागति नर नारि ॥ जणूं कोक कोकी कमल दीन विहीन तमारि** (८६) असे रामवियोगाच्या दुसऱ्या दिवसापासूनच सुरू झाले होते; ते अजून, रामदर्शन होणार अशी खात्री झाल्यावर सुद्धा चालूच आहे हे येथे दाखविले. दो. ८६ चा अर्थच येथे अधिक स्पष्ट केला आहे. कोककोकींची उपमा (चक्रचक्रिसम) येथेही या प्रयाण वर्णनातच (१८७।१) आहे; व सूर्यास्तानंतर कमले कोमजतात तसे सर्व लोक सुकून कृश झाले आहेत हे कौसल्येच्या मुखाने सांगितले आहेच. चित्रकूटाहून परत आल्यानंतरच्या वर्णनातसुद्धा असा उल्लेख करण्यास कवि विसरले नाहीत – **'रामदर्शना सर्वजन करिति नेम उपवास । त्यागिति भूषण भोग - सुख जगवी अवधी - आस'** (३२२).

**(२) वि. ल. टे. - भक्तिमार्गातील साधकाच्या चरित्राचा आदर्शच** येथे क्रमशः दाखविला जात आहे. **'असे सकल रघुपतिसंपती'** हा पाया; रामप्राप्तीत आड येणाऱ्या व्यक्तींचा व गृह धनादिकांचा त्याग; नंतर तमारिविहीन दीन चक्रवाक चक्रवाकी प्रमाणे मनाची तळमळ; नंतर करी-करिणी प्रमाणे रामरूपवारि प्राप्त करण्यासाठी प्रेमाने, आर्तीने क्रिया, साधन; व्रत (ब्रह्मचर्यादि) यम नियम, उपवास, फलाहार, दुग्धाहार, एकभुक्त, नक्तभोजन इत्यादी प्रकारे सत्वशुद्धि व शरीरशुद्धी;

येथपर्यंतचा क्रम सांगितला गेला. अयोध्यावासी लोकांना हे १४ वर्षे करावे लागले तेव्हा राम हृदयसिंहासनारूढ झाले. हे सर्व करीत असता प्रभूला जे आवडते ते करणे, जे प्रभूला रुचत नाही ते न करणे, रक्षण करतील असा दृढ विश्वास, भरतासारखा कार्पण्यभाव व अत्यंत नम्रता या गोष्टी पाहिजेतच व सेवक धर्माचे पालन लोकनिंदेची पर्वा न करता करणे जरूर आहे; इतके सर्व येथपर्यंत दाखविले गेले.

***श्रीमानस-गूढार्थ चंद्रिका अयोध्या कांड अध्याय १८ वा समाप्त.***



## अध्याय १९ वा

*हिं.* *। सई तीर बसि चले बिहाने । सृंगबेरपुर सब निअराने ॥१॥*
*। समाचार सब सुने निषादा । हृदयँ बिचार करइ सबिषादा ॥२॥*
*। कारन कवन भरतु बन जाहीं । है कछु कपट भाउ मन माहीं ॥३॥*
*। जौं पैं जियँ न होति कुटिलाई । तौ कत लीन्ह संग कटकाई ॥४॥*
*। जानहिं सानुज रामहि मारी । करउँ अकंटक राजु सुखारी ॥५॥*

*म.* *। वसुनि सई - तटिं उदयिं निघाले । शृंगवेरपुर - समीप आले ॥१॥*
*। समाचार सब मिळे निषादा । हृदयिं विचार करी सविषादा ॥२॥*
*। कारण कवण भरत वनिं जाती । कांहिं कपट वसतें तरि छातीं ॥३॥*
*। कपट-भाव जर मनात नसता । तर कां कटका सवें आणता ॥४॥*
*। मनिं कीं सानुज राम वधावे । सुखें अकंटक राज्य करावें ॥५॥*

**अर्थ** - (तिसऱ्या दिवशी) सई नदीच्या तीरावर वस्ती केली व उजाडतांच निघून (सर्व) शृंगवेरपुराजवळ आले.॥१॥ हा सर्व समाचार निषादराजाला कळला तेव्हा तो विषादयुक्त होऊन विचार करू लागला की - ॥२॥ भरत वनात जात आहेत याचे कारण काय असावे बरे ? मनात काहीतरी कपट असले पाहिजे ॥३॥ मनात कपटभाव नसता तर एवढे सैन्य बरोबर कशाला आणले असते ?॥४॥ (तेव्हा) त्यांच्या मनात असावे की अनुजासहित रामाचा वध करावा आणि सुखाने निष्कंटक असे (शत्रुरहित) राज्य करावे.॥५॥

**टीका.** (१) निषादांचा राजा असूनसुद्धा त्याचे हेर आहेत; व ते किती कर्तव्य तत्पर व सावध आहेत हे पाहण्यासारखे आहे. अजून कोणी गंगेच्या किनाऱ्याजवळ सुद्धा आले नाहीत. शृंगवेरपुर दुरून दिसू लागले इतक्या अंतरावर आहेत सर्व; तोच कोण येत आहे, कोठे जाण्यास कसा येत आहे इत्यादी खबर त्याला हेरांकडून मिळाली. खबर मिळाल्यावर त्यास असे नाही वाटले की सम्राटाचे फार मोठे सैन्य आहे तेव्हा आपण आधीच जाऊन भेटावे. रामसखा व एक राजा या संयुक्त संबंधामुळे त्यास विषाद झाला, वाईट वाटले की भरतासारख्या रामबंधूने अशा रीतीने का बरे वनात यावे ? निषादराजाला जो संशय आला तो कोणाही राजनीतिकुशल व्यवहारदक्ष राजालाच काय साध्या माणसालासुद्धा आला असता. वा. रा. भरद्वाज मुनींनासुद्धा असाच संशय आला

आणि त्यांतही रामकार्यात ! शरीर तर बोलून चालून क्षणभंगूर (पळभंगु) - ।।३।। त्यांतही मी एक नीच रामसेवक आणि भरत राजा व रामबंधु ! असे मरण मोठ्या भाग्यानेच मिळत असते !। ।४।।

**शब्दार्थ - सँजोइल =** सुसज्ज; ठाटा = ठाट, थाट = तयारी, सिद्धता; लोह लेना = लढाई करणे; हथवाँसहु = हथवाँस सुद्धा. हथवाँस = सुकाणूचा दांडा, = क्षेपणी, हा काढण्या - घालण्यासारखा असतो. दुसरा अर्थ नाव चालविण्याचा बांबू असा आहे; पण ते गंगातीरी विपुल असतात वनात; म्हणून हा अर्थ येथे नाही. हथवाँसना = हाती घेणे, ताब्यात घेणे. सुकाणुदांडा नसला म्हणजे नाव चालविता येत नाही.

**टीका.** (१) येथपासून पुढे या प्रकरणात नावाड्यांच्या बोलभाषेतील बरेच शब्द हिंदीत वापरलेले आहेत; व ते साहित्यिकांस 'अप्रयुक्त दोष' वाटतात. परंतु हे दोष नसून नाट्यकाव्यभूषण आहेत. **(क)** भरताला व त्याच्या सैन्याला गंगानदी उतरून द्यावयाची नाही; म्हणजे युद्धाची वेळ येणारच; युद्ध करून जिवात जीव असेपर्यंत लढून मरावयाचे व रामसेवा करावयाची असा निश्चय निषादराजाने केला. लोकांना लढाईचे कारण सांगितले पाहिजे म्हणून मनात आलेले विचार प्रथम सर्वांना सांगितले व कार्य साधण्याच्या दृष्टीने सर्वांना विनंतीवजा हुकूम दिले. **(ख) बुडवा तरणिं -** तरणि = नाव, जहाज. खाजगी नावा, होड्या इ. सर्व ताब्यात घेऊन त्यांचे सुकाणुदांडे काढून घेऊन त्या व सुकाणू नसलेल्या सर्व नावा बुडवून टाकण्याचा हुकूम दिला. **(ग) घ्या घाटां अडवून - घाट** = पायउतार; पायी पाण्यातून पलीकडे जाण्याच्या वाटा अडवून धरा; वेळ पडल्यास युद्ध करा पण कोणाला गंगेच्या जलात पाय टाकू देऊ नका. नावा नसल्या तरी हत्तीवरून पाण्यांतून जातील हे जाणून हा हुकूम दिला.

**चौ. १-४ (१) व्हा सुसज्ज सब अडवा घाटां -** या पुनरुक्तीने दाखविले की निषादराज अधीर होऊन ज्यांना त्यांना सांगत सुटला. त्वरेने सर्व करा हे सुचवित आहे. **(क)** वीरांचा उत्साह स्फूर्ति वाढविण्यासाठी या युद्धात मरण येणे किती भाग्याचे आहे हे सांगितले. शरीर म्हणजे नाश पावणारे व नाश करणारे. पाण्यात बुडून, व्याघ्रसिंहाच्या भक्ष्यस्थानी पडून, आंथरूणात रोगाने तळमळत मरणे म्हणजे सद्गति नाही. युद्धात लढताना मरण आले तर स्वर्ग मिळतो. या लढाईत तर एक नाही चार अति दुर्लभ गोष्टी साधणार आहेत. धर्मयुद्धात मरण, गंगातीरावर

मरण, रामकार्यात मरण, रघुवंशातील एका श्रेष्ठ राजाच्या हातून मरण आणि रामचंद्रांच्या भावाच्या हातून मरण ! अशा या पांच प्रकारांनी मरण कोणाला लाभणे शक्य आहे का याचा विचार करा. 'क्रोशान्तरे मृता येच जान्हव्याः द्विजसत्तमाः !।। मानवा देवताः सन्ति इतरे मानवा भुनि' (प. पु. मा. पी. मधून) **(ख)** म. भा. शान्तिपर्व अ. २९७ मध्ये कोणाच्या हातून मरण आले असता कशी, कोणती गति मिळते याचे सविस्तर वर्णन आहे. येथे विस्ताराची आवश्यकता नाही. आपल्यापेक्षा श्रेष्ठाच्या हातून मरण उत्तम गतिदायक; कनिष्ठांकडून आल्यास अधमगतिदायक; पशु, पक्षी, अग्नि, विष, बुडून, फास घेऊन, चोरांच्या, पापी लोकांच्या हातून इ. प्रकारे मरण येणे दुर्गतिदायक असते.

(२) **हा जातीचा निषाद,** वनांत राहणारा (सुशिक्षित म्हणविणारांच्या दृष्टीने) अशिक्षित अडाणी असून याला जे शास्त्रज्ञान व जी श्रद्धा आहे तशी आजच्या सुशिक्षितात तरी कितीजणांस असेल ! **(क) मी जन नीच** - मी एक नीच रामसेवक आहे. एवढा सर्वस्वाचा त्याग करण्यास तयार झालेला, असा शास्त्रज्ञानी, राजनीतिकुशल, सात्त्विक, श्रद्धासंपन्न, राजा, रामसखा, रामभक्त असून स्वतः 'एक नीच दास' असे आपल्या सेवकांच्या समोर म्हणाला ! हे कार्पण्य, ही लीनता प्रज्ञानानंदासारख्या संन्याशांच्या, ज्ञानी, वेदान्ती, हरिदास, हरिभक्त, ब्रह्मनिष्ठ इ. म्हणविणारांच्या ठिकाणी तरी पाहण्यास सापडतात काय ? **(ख)** आपण संख्येने फार थोडे, शस्त्रास्त्रे, लहान तेव्हा मरण येणार हे ठरलेलेच आहे असे त्यांस वाटले व लोकांना हेच सांगत आहे की मरण्याची तयारी करावी. उत्तमोत्तम परम दुर्लभ गति मिळवा; पुन्हा असा दुर्लभ योग येणे शक्य नाही.

*हिं.* ***। स्वामिकाज करिहउँ रन रारी । जस धवलिहउँ भुवन दस चारी ।।५।।***
***। तजउँ मान रघुनाथ निहोरें । दुहूँ हाथ मुद मोदक मोरें ।।६।।***
***। साधु समाज न जाकर लेखा । राम भगत महुँ जासु न रेखा ।।७।।***
***। जायँ जिअत जग सो महिभारू । जननी जौबन बिटप कुठारू ।।८।।***

*दो.* ***। बिगत बिषाद निषादपति सबहि बढ़ाइ उछाहु ।।***
***।। सुमिरि राम मागेउ तुरत तरकस धनुष सनाहु ।।१९०।।***

*म.* ***। स्वामिकाजिं रण घोर करीनहि । चौदा भुवन यशें धवळीन हि ।।५।।***
***। प्राणां अर्पिन रघुनाथास्तव । मुद-मोदक मम दो हातां तंव ।।६।।***
***। ज्याची साधुसमाजिं न गणना । स्थान रामभक्तांत ज्यास ना ।।७।।***

*। वृथा जगे जगिं तो भूभार हि । जननी - यौवन - विटप - कुठारहि ॥८॥*
दो. *। विगत - विषाद निषादपति लोकिं भरुनि उत्साह ॥*
*॥ स्मरुनि राम मागे त्वरें तूण धनू सन्नाह ॥१९०॥*

**अर्थ** - स्वामिकार्यात घनघोर युद्ध करीन व माझ्या धवल यशाने चौदा भुवने भरीनच.॥५॥ रघुनाथाच्या हितासाठी प्राण समर्पण करीन व माझ्या दोन्ही हातांत आनंदरूपी मोदक येतील (दुहेरी आनंद मिळेल).॥६॥ साधु समाजात ज्याची गणना नाही व रामभक्तात ज्याला स्थान नाही - ॥७॥ तो या जगात वृथा, भूमिभार होऊनच जगतो व तो आपल्या जननीच्या यौवनरूपी वृक्षाला तोडण्यास कुऱ्हाड (परशू) च होय.॥८॥ विषादरहित होऊन निषादराजाने आपल्या सर्व लोकांत उत्साह भरला व रामस्मरण करून भाता, धनुष्य व चिलखत (इत्यादी) त्वरेने आणण्यास सांगितले (मागविले).॥दो.१९०॥

**टीका. - चौ. ५-६ (१) स्वामिकाजिं रण घोर करीन हि** - गुह रामचंद्रांचा पगारी सेवक नाही; राम तर त्याला सखा मानतात; पण तो स्वतःस रामसेवक समजतो. **स्वामिकार्य** = स्वामिहित. **'परहित-साधनिं त्यजि देहाला । सदा प्रशंसिति संत तयाला** ॥१।८४।२॥ गुह तर रामहितार्थ देहत्याग करणार, मग त्याचे यश चौदा भुवनांत पसरेल यांत नवल काय ? संत ज्याची प्रशंसा करतील त्याची गणना संता मध्ये झालीच. **(क) मुदमोदक मम दो हातां तंव - 'हतो वा प्राप्स्यसि स्वर्गं जित्वा वा भोक्ष्यसे महीम्'** (भ.गी.) असा या चरणाचा अर्थ करावासे वाटेल; पण गुहाला जय मिळण्याची आशा मुळीच नाही म्हणून **हे वचन येथे लागू पडत नाही.** स्वामिकार्यात मेल्याचे एक फळ मिळणार, व हे स्वामी साक्षात भगवान असल्यामुळे आणखी एक फळ मिळणार. भगवान त्याला आपला समजून त्याच्यावर प्रेम करणार; उदा. लंकेत लढाईत मेलेली वानरे. 'श्रुणु सुरपति **अमचे** रिस **वानर । निशिचरहत पडले रणभूवर ॥ तिहीं त्यक्त मजसाठीं प्राणां'** (६।११४।१-२). असे राम म्हणाले आहेत. ज्याला भगवंतांनी आपला म्हटला व ज्याचे यश, चरित्र भगवंतांनी गाइले तो भगवद्भक्त भागवत ठरलाच; म्हणजे रामभक्तांत त्याला स्थान मिळालेच. रामभक्त म्हणून गणना झालीच.

**चौ. ७-८ (१) ज्याची साधुसमाजिं न गणना... ज्यास ना** - वर जे दोन मुदमोदक म्हणून सुचविले तेच येथे स्पष्ट केले आहे. या दोन गोष्टींतील एकसुद्धा जर साधली नाही तर काय हे पुढील चौपाईत सांगतात. गुह म्हणतो की या

दोन्ही गोष्टी तुम्हाला व मला या लढाईने सहज साधणार आहेत, म्हणून मरणाची भीती मुळीच बाळगू नका. **(क) जननीयौवन बिटप कुठार हि** - नऊ महिने उदरात धारण करणे व प्रसूति वेदना यांनी जननीच्या तारुण्याची खरोखर हानि होते. ज्यांना फार मुले होतात त्या स्त्रिया लवकर म्हाताऱ्या दिसू लागतात. पण रघुपतिभक्त पुत्र झाला किंवा पुत्राची संत वर्गात प्रशंसा होऊ लागली म्हणजे मातेला सद्‌गति वा कीर्ति मिळाल्याने त्या हानीचे काही वाटत नाही. पण पुत्र रघुपतिभक्त झाला नाही किंवा संतांनी प्रशंसा करण्यासारखे महत्कार्य त्याच्याकडून घडले नाही; तर मात्र तो व्यर्थ जन्माला आला; एवढेच नव्हे तर जननी यौवन वृक्षाला तोडणारा तो परशूच ठरतो. **'पुत्रवती युवती जगिं तीच किं । रघुपतिभक्त जिचा सुत होत किं ॥ न तरि वांझ बरि विते वृथा ते । रामविमुख सुत मानि हितातें'** (७५।१-२) असे सुमित्रा म्हणालीच आहे. अशा प्रकारे तो मातेच्या निंदेला कारण होतो; पशुसुद्धा यापेक्षा बरे.

**दो. (१) बिगतबिषाद निषादपति** - भरत आल्याचे कळले तेव्हा सविषाद झाला होता. आता स्वकर्तव्याचा निर्णय होऊन त्याचे मिळणारे अद्‌भुत फळ निश्चित झाल्याने विषाद गेला व विषादाचे रूपांतर दास्यभक्तिमूलक वीररसांत झाले. कार्यारंभी गणेशादिकांचे स्मरण न करता रामस्मरणच केले. रामकार्य रामस्मरणाने सुरू केले. रघुवीराचे स्मरण केले नाही. जो **'आनंदसिंधुसुखराशी'** (= राम) त्याचेच स्मरण केल्यावर शोक व दुःखाचा प्रसंग येईलच कसा ! भरत रामसीताचरण स्मरण करून निघालेले आहेत. सीता क्लेशहारिणी आहे.

**ल. टे.** - भरत व निषादराज हे दोघेही आपणास रामसेवक मानतात. दोघेही **'करी स्वामिहित सेवक तोही'** या भावनेवर दृढ आहेत. दोघेही रामस्मरण करून कार्याला लागले आहेत. दोघेही स्वतःस नीचहीन दीन समजतात; दोघेही सहज रामस्नेही आहेत; एक रामसखा व एक रामबंधु ! भरताला गुहाबद्दल काहीच माहीत नाही; पण गुह भरताला रामद्रोही मानून आपल्या सर्व शक्तीसह युद्धाला सिद्ध झाला आहे. दोघेही प्रभूला प्राणप्रिय ! असे असता यांचे युद्ध प्रभु कसे होऊ देतील ? पण ते घडण्यास थोडा अवकाश आहे. निषादपतीची प्रजा कशी स्वामिभक्त व रामभक्त आहे हे दिसले म्हणजे हा चित्रपट एकाएकी निराळे रूप धारण करणार आहे. **वा. रा. हेच वर्णन यापुढे अगदीं नीरस वाटते.**

हिं. *। बेगहु भाइहु सजहु सँजेऊ । सुनि रजाइ कदराइ न कोऊ ॥१॥*
*। भलेहिं नाथ सब कहहिं सहरषा । एकहिं एक बढ़ावइ करषा ॥२॥*
*। चले निषाद जोहारि जोहारी । सूर सकल रन रुचइ रारी ॥३॥*
*। सुमिरि राम पद पंकज पनहीं । भाथीं बाँधि चढ़ाइन्हि धनहीं ॥४॥*
*। अँगरी पहिरि कूँडि सिर धरहीं । फरसा बाँस सेल सम करहीं ॥५॥*
*। एक कुसल अति ओड़न खाँड़े । कूदहिं गगन मनहुँ छिति छाँड़े ॥६॥*
*। निज निज साजु समाजु बनाई । गुह राउतहि जोहारे जाई ॥७॥*

म. *। बंधु ! शीघ्र साजां सजवावे । आज्ञा ऐकुनि कुणि न डरावें ॥१॥*
*। भलें नाथ ! हर्षे सब म्हणती । एकमेकिं आवेश चढवती ॥२॥*
*। जाति निषादा नमुनि चहुंकडे । शूर सकल रणिं युद्ध आवडे ॥३॥*
*। स्मरुनि राम-पद-पद्म उपानह । भात्या कसिति धनुकल्या ज्यां-सह ॥४॥*
*। कवच देहिं शिरिं टोप घालती । भाले बरच्या परशु घासती ॥५॥*
*। कुणि असिफरी-निपुण जे असती । जणुं महि सोडुनि गगनीं उडती ॥६॥*
*। निज निज टोळी साजा सजवुनि । गुहराजा जोहारिति जाउनि ॥७॥*

**अर्थ** - (गुह म्हणतात) बंधुंनो ! झटपट तयारी करून सज्ज व्हा; व माझी आज्ञा ऐकून भिऊ नका.॥ ठीक आहे महाराज ! असे सर्व हर्षाने म्हणाले व एकमेकांना आवेश चढवू लागले. ॥२॥ निषादराजाला नमन करून (जोहारून) ते जिकडे तिकडे (तयारी करण्यासाठी) गेले ! सगळे शूर असून त्यांना रणभूमीत लढण्याची हौस आहे.॥३॥ रामचरणकमलांच्या जोड्यांचे स्मरण करून त्यांनी भात्या (लहान भाते) कसल्या व धनुकल्या ज्यां (ज्या = धनुष्याची दोरी) सह करू लागले (दोऱ्या चढवल्या).॥४॥ अंगावर कवचे (अँगरी) घातली व डोक्यावर टोप (कूँडि) घातले; व भाले, बरच्या, परशु (बाण तरवारी इ. शस्त्रे) घासून साफसूफ करू लागले.॥५॥ जे फरी (छोटी ढाल - ओड़न) व तलवार खेळण्यात कुशल होते ते जणू जमीन सोडून आकाशात उडू लागले.॥६॥ (या प्रमाणे) आपापली टोळी व सामानसुमान सज्ज करून ते (क्रमाने) जाऊन गुह राजाला जोहारू लागले.॥७॥

**टीका. चौ. १-३ (१) बंधु ! शीघ्र साजां सजवावे** - भाव हा की अगदी क्षणाचाही विलंब करू नका. आपली तयारी होण्याच्या आधी जर का भरत सैन्यासह आले व नावा ताब्यात घेऊन ते पलीकडे गेले, तर आपण भरतास

मदत केली व फितूर झालो असा आरोप आपल्यावर येईल व आपण स्वामिकार्याचा विघात करणारे, रामद्रोही ठरू व पश्चात्ताप करण्याची पाळी येईल; म्हणून अगदी त्वरेने सज्ज व्हा व सांगितल्याप्रमाणे नावाची व्यवस्था लाऊन जाऊन घाट रोखून धरा. **(क) एकमेकिं आवेश चढवती** - पाहूं या ! आज आहे खरी परीक्षेची वेळ; कोण खाल्लेल्या अन्नाला जागतो पाहूं. अरे ! तूं कसला रे भित्रा ! मी होय, तुझ्या आधी स्वर्गाला जातो की नाही पहा. इ. इ. प्रकारे बोलून आवेश चढविला.

**चौ. ४ - (१) स्मरूनि रामपदपद्म - उपानह** - पनहीं = जोडे, पायतणे - रामाचे किंवा रामचरणांचे स्मरण न करता रामचंद्रांच्या पायांतील जोड्यांचे स्मरण केले. (उपानह = जोडे.) भाव हा की आम्ही रामाच्या पायांजवळ तर कोठले, पण त्यांच्या जोड्यांच्या जवळ उभे राहण्याच्या सुद्धा लायकीचे नसून सहजासहजी हा रामसेवेचा दुर्लभ योग आला आहे ! ही रामकृपा नाही तर काय ? येथे सर्व निषादांची दीनता व रामप्रेम याचे दर्शन होते. हे सर्व रामपादुकांना शरण जात आहेत, तसेच भरतसुद्धा - 'राम उपानह सुशरण मजला' (२३४।२) असे म्हणाले आहेत; त्या वेळी ते जाणतात की निषादराज रामसखा आहेत व भरत स्वतःस रामसेवक मानतात. रामसखा रामाप्रमाणेच पूज्य, मान्य; गुहाने रामस्मरण केले; गुहाच्या सेवकांनी रामउपानह स्मरण केले व भरत रामउपानहास शरण गेले !

**चौ. ५-६** (१) यांत अँगरी, कूँडि वगैरे वापरलेले शब्द निषादांच्या भाषेतील आहेत. मानस नाट्य महाकाव्य असल्याने हे त्यांचे नित्याचे शब्द वापरल्यानेच काव्यसौंदर्य वाढले आहे. जसे नाटकांतले पात्र असेल तशीच भाषा पाहिजे. रारी = युद्ध, अँगरी = कवच, चिलखत; कूँडि = टोप, युद्धांतील शिरस्त्राण, फरसा = परशु; बाँस = भाला; सेल = बरची; ओड़न = लहान ढाल, फरी; भाथी = लहान भाता; धनही = धनुकली; लहान धनुष्य. **मराठीत लहान भाता याला एक शब्द नाही 'भाती' हा नवा बनवून वापरावा लागला. (क)** येथे दाखविले की यांची शस्त्रे म्हणजे पोरांच्या खेळातील लहान लहान हत्यारे ! पण शौर्य, धैर्य, आवेश, उत्साह एवढा आहे की कराल कोदंडादि विशाल शस्त्रे धारण करणाऱ्या सम्राटाच्या सैन्याशी लढण्यास उतावीळ झाले आहेत; व हे ते डोळे मिटून करीत नसून सर्वजण मरणार हे जाणूनच करीत आहेत.

*हिं. । देखि सुभट सब लायक जाने । लै लै नाम सकल सनमाने ॥८॥*

*दो. । भाइहु लावहु धोख जनि आजु काज बड़ मोहि ॥*

*॥ सुनि सरोष बोले सुभट बीर अधीर न होहि ॥१९१॥*

*हिं. । राम प्रताप नाथ बल तोरे । करहिं कटकु बिनु भट बिनु घोरे ॥१॥*

*। जीवत पाउ न पाछें धरहीं । रुंड मुंडमय मेदिनि करहीं ॥२॥*

*म. । बघत सुभट सब लायक जाणे । सन्मानी सकलां नांवानें ॥८॥*

*दो. । बंधु ! काज मम आज अति घालुं नका धोक्यांत ॥*

*॥ 'वीर अधीर न व्हा' सकल आवेशें म्हणतात ॥१९१॥*

*म. । रामप्रताप तवबल आजीं । कटक अभट-घोटक करूं आजीं ॥१॥*

*। प्राणदेहिं तों फिरू न चरणीं । रुंड-मुंड-मय करूं मेदिनी ॥२॥*

**अर्थ** - त्या सर्व सुभटानां पाहता लायक आहेत हे गुहाने जाणले व प्रत्येकाचे नाव घेऊन सगळ्यांचा सन्मान केला.॥८॥ (व निषादराज म्हणाला) बंधूंनो आज माझे फारच मोठे कार्य आहे; (तरी मला धोक्यात मात्र घालू नका. (तेव्हा) ते सर्व आवेशाने म्हणाले की, वीर ! आपण अधीर होऊ नये ! ॥दो. १९१ ॥ रामप्रताप व तुझे बळ यांच्या जोरावर आज आम्ही युद्धांत (आजी) सर्व सैन्य भटविहीन (अभट) व घोड्यांवाचून (घोटक = घोडा, अश्व, अश्वहीन = अघोटक) करून टाकतो.॥१॥ कुडींत प्राण आहे तोपर्यंत पाय मागे घेणार नाही व मेदिनी (धरणी) धडे व मुंडे यांनी भरून टाकतो. (समजलात) ॥२॥

**टीका. - चौ. ८ व दो. (१) बघत सुभट... सन्मानी सकलां नावानें** - सगळे वीर युद्धाची तयारी करून, आपापली शस्त्रे वगैरे घेऊन टोळ्या टोळ्यांनी येऊन कार्याला जाण्यापूर्वी राजाला सलामी देत आहेत. बंधु, भाई ! या संबोधनाने आपुलकी दिसते. सगळ्यांचा त्यांच्या त्यांच्या नावाने सन्मान केला. यावरून ठरते की हे योद्धे थोडे असले पाहिजेत; अन्यथा सगळ्यांची नावे माहीत असणे शक्य नाही. लढाईला जाण्यापूर्वी राजाने आपल्या निवडक वीरांशी कसे वागावे याचे उत्तम दिग्दर्शन येथे या निषादराजाच्या चरित्रातसुद्धा केले. **(क) घालुं नका धोक्यांत** - भाव हा की दगा देऊ नका. ते आणि आपण यांत सर्वच बाजूंनी विषमता आहे. ते सागरासारखे अफाट सैन्य पाहून धीर सोडू नका. कचरू नका. हे रामकार्य आहे हे विसरू नका. **जिवावर उदार झालेल्या, धर्मासाठी, निःस्वार्थ बुद्धीने लढणारांना धर्म व स्वामिनिष्ठा यांचे बळ असते. 'यतो धर्मः ततो**

**जयः'** हे लक्षात ठेवा व शत्रूंना गंगेत पाय टाकू देऊ नका म्हणजे झाले. आपण सर्व मेल्यावर दोष आपल्याकडे नाही. 'मला धोक्यात घालू नका' हे शब्द या जिवावर उदार झालेल्या स्वामिनिष्ठ रामभक्तांस, महावीरांस, चांगलेच झोंबले. ते म्हणाले : **(ख) वीर अधीर न व्हा** ! - सरकार ! आपण वीर असून आपलाच धीर सुटलेला दिसतो. तरी धीर धरा व आमच्या पाठीशी रहा व आम्ही थोडे असलो तरी कसे कौतुक करतो ते पहा.

**चौ. १-२ (१) रामप्रताप** - भाव हा की कार्य रामाचे आहे. रामप्रतापच सर्व काही करणार आहे. आम्ही नुसती सजीव बाहुली आहोत. रामप्रताप साह्याला असल्यावर त्रिभुवनातले सैन्य असले समोर तरी ते काय करणार ? (क) पुढे सुंदर काण्डापासून दिसून येईल की जे रामप्रतापाचे स्मरण ठेऊन कार्याला गेले त्यांना अत्यंत विषम परिस्थितीतसुद्धा सुयश मिळाले; व जे स्वतःच्या बळावरच कार्याला लागले त्या सर्वांना थपडा बसल्या. यास हनुमंतापासून लक्ष्मणसुद्धा कोणी अपवाद नाही. हे निषादवीर आपल्या स्वतःच्या बळाचा मुळीच उच्चार करीत नाहीत. रामप्रताप व आपल्या स्वामींचे बळ यांचाच त्यांना भरवसा आहे. हेच खऱ्या लीनतेचे व स्वामिनिष्ठतेचे द्योतक आहे व हा सिद्धांतही आहे. सेवकांना सैन्याला जे यश मिळते ते त्यांच्या स्वामींच्या पुण्याईच्या बळावरच मिळते व शेवटी यशापयशाचा मालक तोच ठरतो. सैन्याचा जय अपजय म्हणजे राजाचाच जय अपजय !

(२) **अभटघोटक** - अ-भट-घोटक. = भट व **घोटक = अश्व,** हीन. घोट, घोटक तुरग अश्व (अमरे.) रथ, हत्ती, वगैरे सर्व प्रकारचे सैन्य असले तरी सर्वांत मोठी संख्या घोडेस्वारांची आहे. एकलक्ष घोडेस्वार सैनिक असल्याचा उल्लेख वा. रा. आहे; म्हणून येथे योद्धे = भट व घोडे = घोटक यांचा उल्लेख केला व त्याने सर्व सैन्यच सुचविले. **(क) मेदिनी =** पृथ्वी, मही - हा सामान्य अर्थ असला तरी मेदिनी = मेदमयी, मेदमज्जामांसरक्त यांनी व्यापलेली. भगवान विष्णूंनी मधुकैटभांचा वध केला तेव्हा त्यांच्या मेदमज्जामांसादिकाने पृथ्वी भरून गेली म्हणून तिला मेदिनी नाव पडले. हे निषाद म्हणतात की आम्ही मेदमज्जामांसरक्ताच्या चिखलाने जमीन, रणभूमी, भरून टाकून मेदिनी हे नाव यथार्थ करतो. राम भगवान आहेत व रामप्रतापच हे करणार आहे हे यांना माहीत आहे. **(ख) वा.रा.** पांचशे नावा, प्रत्येकीच्या रक्षणास शंभर नावाडी

व त्यांच्या रक्षणास सर्व निषादांचे सैन्य ठेवून गुह भरतास भेटण्यास गेल्याचा उल्लेख सर्ग ८४ मध्ये आहे.

*हिं.* *। दीख निषदनाथ भल टोलू । कहेउ बजाऊ जुझाऊ ढोलू ॥३॥*
*। एतना कहत छींक भइ बाँए । कहेउ सगुनिअन्ह खेत सुहाए ॥४॥*
*। बूढु एकु कह सगुन बिचारी । भरतहि मिलिअ न होइहि रारी ॥५॥*
*। रामहि भरतु मनावन जाहीं । सगुन कहइ अस बिग्रहु नाहीं ॥६॥*

*म.* *। भव्य बघुनि गुह भट-समुदाया । आज्ञा दे रणढोल पिटाया ॥३॥*
*। तोंच वामदिशिं कोणि शिंकला । म्हणति शकुनपटु समर जिंकला ॥४॥*
*। शकुन-विचारें जरठ म्हणे कीं । भेटा भरता युद्ध नव्हे कीं ॥५॥*
*। भरत जाति रामा विनवाया । शकुन सांगती विग्रह वाया ॥६॥*

**अर्थ** - गुहाने तो वीरांचा भव्य समुदाय पाहिला व रणढोल पिटण्याची आज्ञा दिली ॥३॥ इतक्यात डाव्या बाजूला कोणी तरी शिंकला; तेव्हा शकुन जाणणारे (तरुण) म्हणाले की युद्धात आपला जय झालाच (म्हणून समजा) ॥४॥ (पण) शकुनाचा विचार करून एक म्हातारा म्हणाला की युद्धच होत नाही; तुम्ही जाऊन भरतास भेटा ॥५॥ भरत रामाला विनवण्यासाठी जात आहेत व युद्धाचे कारण नाही (वैरभाव नाही) असे हा शकुन सांगतो ॥६॥

**टीका. चौ. ३ - (१) रणढोल** - इतर ठिकाणी दुंदुभी, निशाण वगैरे शब्द वापरले आहेत. या निषादांचे भाते, धनुष्ये वगैरे ज्याप्रमाणे लहान आहेत त्याप्रमाणे, (रणदुंदुभी नसून) रणढोल आहेत. यावरून ठरले की गुप्त हल्ला करण्याचा बेत गुहाचा नाही. धर्मयुद्ध करण्याची इच्छा आहे.

**चौ. ४-६** - (१) आता युद्धाची नौबत झडू लागणार तोच रामप्रभूंनी ऐनवेळी मदत केली; व सगळा प्रवाहच एकदम बदलून टाकला. भक्तांना अडचणीत अनपेक्षित रीतीने साह्य कसे करतात याची अनेक उदाहरणे मानसांत आहेत.. **'भक्तांस अडचणीत अकल्पित साह्य' प्रस्तावना. पृ ५१८ पहा.** भक्तिहीनांना अशी मदत न मिळता त्यांचा मोह वाढत जाऊन विनाश होतो याची उदाहरणेही प्रत्येक सोपानांत आहेत. **(क)** शिंकणे, अंगावर पाल पडणे, पालीचा शब्द, सरडा अंगावर चढणे, पिंगळ्याचा शब्द इ. शकुनांचे एक शास्त्रच आहे. शकुन जाणून त्यांचा अर्थ विचारपूर्वक लावल्यास पुष्कळ अनर्थ चुकविता येतात. येथे शिंका शकुनाचा उल्लेख आहे. पूर्वेची अशुभ, अग्नेयीची शोक, दुःख सूचक,

दक्षिणेची अरिष्ट करणारी, नैऋत्येची शुभ, पश्चिमेची मिष्टान्न दायक, वायव्येची धनदायक, उत्तरेची कलहकारक, ईशान्येची शुभदायक, स्वतःच्या शिंकेचे मोठे भय, ऊर्ध्व झाली तर शुभ, मध्ये महाभय, आसनावर, शयनावर, दान देताना, भोजन करताना, **डाव्या बाजूस व पृष्ठभागी शिंक झाल्यास शुभदायक समजावी.**

(२) येथे डाव्या बाजूस शिंक झाली तिचे फळ शुभदायक असते. 'शुभदायक' चा **अर्थ ठरविण्यात अनुभव व चातुर्य पाहिजे** हे येथे दाखविले आहे. तरुण व लढण्याची रग असणाऱ्या शकुनशास्त्रज्ञांनी अर्थ केला की लढाईत जय मिळणे हेच शुभ. पण एक म्हातारा अधिक विचारी होता. त्याने विचार केला की रामसखा व रामबंधु यांत युद्ध होणे हेच मुळी अशुभ आहे. कोणाचाही जय झाला तरी ही लढाई होणेच अशुभ. शकुनाचे फळ शुभ-कल्याणकारक आहे, तेव्हा अशुभ असणारे युद्ध होत नाही. व शुभ होणार यावरून भरत रामाशी विग्रह, वैर करण्यास जात नाही हेही ठरले. भरत व राम यांत शुभदायक, कल्याणकारक म्हणजे मैत्री, प्रेम; त्याअर्थी प्रेमाला वश होऊन भरत जात असला पाहिजे, म्हणजेच रामाचे वनवासाचे दुःख दूर करण्यासाठीच जात आहे. मित्र दुःख दूर करणे हा मित्रधर्म आहे. म्हणजे रामचंद्रांना विनवून घरी नेण्याच्या हेतूने भरत जात आहे.

**(२) ल. टे.** येथे हे हेतुपूर्वक दाखविले आहे की शकुनशास्त्रे खरी आहेत. पण शकुनाचा अर्थ शास्त्र माहीत असूनसुद्धा, अदूर दृष्टीने, विकारवश होऊन लावला गेला तर अनुमान कसे चुकते व निर्विकार चित्ताने, देशकाल परिस्थिती व व्यवहार यांची योग्य सांगड घालून विचारपूर्वक शकुनाचा अर्थ लावला तर फार व्यापक ज्ञान होते; हे लक्षात ठेऊन शकुन शास्त्राचा अभ्यास व उपयोग करावा म्हणजे पुष्कळ अनर्थ टळतील. हा उपदेश देण्यचा कवींचा हेतु नसता तर फक्त म्हाताऱ्याच्या म्हणण्याचा उल्लेख केला असता तरी भागले असते. अविचाराने अर्थ लावल्यास शास्त्र खोटे म्हणण्याची प्रवृत्ती वाढेल हे दाखवावयाचे आहे म्हणून दोन भिन्न मतांचा उल्लेख केला. शिंका शकुनाचे हे एकच उदाहरण मानसांत आहे. लोकशिक्षणाचे धडे देताना किती सावधपणे दिले पाहिजेत हे शकुन व इतर अनेक गोष्टींच्या वर्णनात दाखविले आहे.

**(४) शकुन सांगतो** - भाव हा की पूर्वी ज्यांनी शकुनाचा अर्थ सांगितला ते शकुनाचे फळ नसून त्यांनी आपले स्वतःचे मत सांगितले.

हिं. *। सुनि गुह कहइ नीक कह बूढा । सहसा करि पछिताहिं बिमूढा ॥७॥*
*। भरत सुभाउ सीलु बिनु बूझें । बडि हित हानि जाति बिनु जूझें ॥८॥*
दो. *। गहहु घाट भट समिटि सब लेउँ मरम मिलि जाइ ॥*
*॥ बूझि मित्र अरि मध्य गति तस तब करिहउँ आइ ॥१९२॥*
हिं. *। लखब सनेहु सुभायँ सुहाएँ । बैरु प्रीति नहिं दुरइँ दुराएँ ॥१॥*
म. ***। तैं गुह म्हणजे वृद्ध-वच बरवें । सहसा करुनि मूढ पस्तावे ॥७॥***
***। भरत-भाव-शीला नाकळता । अति हितहानी नेणुनि लढतां ॥८॥***
दो. ***। धरा घाट भट! मिळुनि सब भेटूं जाणूं मर्म ॥***
***॥ बघुनि मित्र-अरि-मध्य-गति करूं तसे मग कर्म ॥१९२॥***
म. ***। स्नेह सुशीलें ये आकळतां । प्रीति वैर ना लपति लपवतां ॥१॥***

**अर्थ** - (तें वृद्ध वचन ऐकले) तेव्हा गुह म्हणाला की वृद्धाचे म्हणणे चांगले-योग्य आहे; सहसा (अविचाराने, साहसाने) करून मूढ पश्चात्ताप पावतो. ॥७॥ भरताच्या मनातील भाव व त्यांचे शील यांचे आकलन न करतां (न जाणतां) अज्ञानाने लढणे म्हणजे अति हानि आहे. ॥८॥ सगळे वीर मिळून घाट अडवून, रोखून ठेवा, मी भेट घेऊन सर्व ओळखतो; आणि मित्र शत्रु की उदासीन आहे हे पाहून मग जे काय करणे ते करू ॥दो. १९२॥ चांगल्या शीलावरून स्नेह जाणता येतो; कारण की प्रीति व वैर लपवून लपत नाहीत. ॥१॥

**टीका. चौ. ७ - (१) गुह म्हणे वृद्ध वच बरवे** - निषादराज गुह सुद्धा चांगला शकुन-मर्मज्ञ आहे. **'होति शकुन शुभ ऐकुनी चिंतुनि वदे निषाद ॥ शोकनाश होइल हरुष परि परिणामिं विषाद'** (२३४) पण वीररसाच्या उत्साहात प्रथम त्याने शकुनाचा विचार केला नाही. म्हाताऱ्याने सांगितल्यावर विचार केला तेव्हा ठरले की म्हातारा म्हणाला तेच बरोबर आहे. **(क) सहसा करुनि मूढ पस्तावे - 'सहसा विदधीत न क्रियामविवेकः - परमापदां पदम् ॥ वृणते हि विमृश्यकारिणं गुणलुब्धाः स्वयमेव संपदः'** सहसा अविवेकाने, अविचाराने, घाईघाईने निषादराजांच्या उतावळेपणास वाटेवर आणण्यास रामप्रेरणेने शिंक कारण झाली. पण यांच्या गुरुजींना वाटेवर आणण्यासाठी आकाशवाणीने कान पिळले - **'सहसा करुनी मग पस्तावति । ते ना बुध, बुध वेदहि सांगति ॥ श्रवुनि देववच लक्ष्मण लाजति ॥** (२३१।४-५). परंतु लक्ष्मणाच्या संशयाचे व क्रोधाचे कारण प्रभु रामचंद्रांची लीला आहे. ते कारण येथे नव्हते.

**चौ. १ - (१) स्नेह सुशीलें ये आकळतां... लपवतां** - हे म्हणणे निरपवाद सिद्धान्त नाही; सर्वसाधारण समाजांत हे लागू पडते. **'वचनें वेषें कीं कळे मनमलीन नर नारि ॥ शूर्पणखा मृग पूतना दशमुख, आदिक भारि '** (दोहा. ४-८) सतीचे कपट लक्ष्मणास, कुबडीची वैरभावना कैकयीला, कैकयीची दशरथांस, कपटमुनीची प्रतापभानूस नाहीच कळली; मात्र या व्यक्ती परीक्षा पाहण्याच्या दृष्टीने वागलेल्या नाहीत.

*हिं.* ***अस कहि भेंट सँजोवन लागे । कंदमूल फल खग मृग मागे ॥२।***
***। मीन पीन पाठीन पुराने । भरि भरि भार कहारन्ह आने ॥३॥***
***। मिलन साजु सजि मिलन सिधाए । मंगल मूल सगुन सुभ पाए ॥४॥***
***। देखि दूरि ते कहि निज नामू । कीन्ह मुनीसहि दंड प्रनामू ॥५॥***
***। जानि रामप्रिय दीन्हि असीसा । भरतहि कहेउ बुझाइ मुनीसा ॥६॥***

*म.* ***। वस्तु भेटीच्या मग सजुं लागति । कंदमूल फळ खग मृग मागति ॥२॥***
***। मीन पीन पाठीन पुरातन । पाट्या-भर-भर आणिति बहुजन ॥३॥***
***। भेट जमवुनी भेटुं निघाले । मंगल-मूल शकुन शुभ झाले ॥४॥***
***। बघुन दुरून नाम निज सांगुन ॥ कृत मुनिवरा दण्डवत् प्रणमन ॥५॥***
***। देति अशीस् रामप्रिय जाणुनि । मुनि भरतास कथिति समजाउनि ॥६॥***

**अर्थ** - मग भेट नेण्याच्या वस्तू जमवू लागले. कंदमूल फलादि व पशुपक्षी मागितले- (आणण्यास सांगितले)॥२॥ पाठीन जातीचे मोठे (पीन=लठ्ठ) व जुने पुराणे (खारवलेले) मासे इ. पदार्थ पाट्या भरभरून पुष्कळजण (सेवक) घेऊन आले. ॥३॥ या प्रमाणे भेट जमवून निषादराज (भरतास) भेटण्यासाठी निघाले व त्यांना मंगलकारक शुभ शकुन झाले. ॥४॥ दुरून दृष्टीस पडतांच आपले नाव वगैरे सांगून त्याने मुनिश्रेष्ठ वसिष्ठांस दण्डवत नमस्कार घातला ॥५॥ रामप्रिय आहे हे जाणून मुनींनी आशीर्वाद दिला व त्याच्या विषयी भरतांस (रामसखा, रामसेवाप्रिय आहे इ.) समजावून सांगितले ॥६॥

**टीका - चौ. २-४ - (१)** निषादराज रघुनाथांस भेटण्यास गेला तेव्हा फक्त कंदमूळ फळे घेऊन गेला व भरतांस भेटण्यास जात असता मांसमीन पशुपक्षीही का नेले अशी शंका व्यवहारशून्य लोकांस येते; **'जसा देव तसं पूजन समुचित'** (२१३।७) भरत राजा आहे व सर्व सैन्यासह आलेला आहे म्हणून सर्व प्रकारचे जिन्नस भेटीस नेणेच निषादराजा या नात्याने उचित आहे. **वा. रामायणांत परीक्षा**

**घेण्यासाठी जात नसतासुद्धा 'इत्युक्त्वोपायनं गृह्य मत्स्यमांस मधुनि च ॥ अभिचक्राय भरतं निषादाधिपतिर्गुहः ॥'** (८४।१०) व भेटीची परवानगी मिळाल्यावर गुहाने सांगितले आहे की **'अस्ति मूलं फलं चैव निषादैः - समुपाहृतम्॥ आर्द्रमांसं च शुष्कं च वन्यं चोच्चावचं महत् ॥ आशंसे स्वाशिता सेना वत्स्यतीमां विभावरीम् ॥'** सर्व सेनेला पुरेशा या जिनसा शिल्लक आहेत. तरी सर्व सेनेने आज पोटभर खाऊन पिऊन येथे रात्रभर रहावे; मग सकाळी तुम्ही जाऊ शकता. येथेसुद्धा दो. १९६ वरून दिसते की गुहाने सर्वांच्या स्वागताची तयारी करविली.

(२) **ल. ठे..** वैर किंवा प्रीति यांची परीक्षा पाहण्याचे साधन म्हणून हे भेटीचे पदार्थ घेतलेले नाहीत; हे वा. रा. मधील वरील अवतरणांवरूनही सहज ठरते. भेटीचा स्वीकार करण्याच्या पद्धतीवरून परीक्षा होईल असे मानणे व्यवहाराशी विसंगत व व्यवहार शून्य पुस्तकी लोकांच्या कल्पनेचा खेळ आहे. कोणालाही नेलेली भेट ती व्यक्ती आपल्या हातानी लगेच ग्रहण करते असे मुळीच नाही. काय भेट आणली आहे इकडे पुष्कळांचे लक्षही जात नाही. महाराजाच्या दर्शनास निषादांच्या राजाने जातांना निषादांची जी मुख्य संपत्ती तिचे नमुने नेले इतकेच.

**चौ. ५-६ - (१) नाम निज सांगुन - नांव, गांव व जात या गोष्टी सांगितल्या 'गांव, जात गुह नांवहि सांगत' (चौ. ८)** असा येथील अर्थ पुढे स्पष्ट केला आहे. **(क) देति अशीस् रामप्रिय जाणुनि - गुह रामप्रिय आहे हे वसिष्ठांस कसे कळले?** त्रिकालज्ञ असल्यामुळे कळले हे उत्तर देणे म्हणजे सरळ समर्पक उत्तर देता येत नाही असे कबूल करणे आहे. **'सेवा बहुत निषादे केली । शृंगवेरीं ती रजनी गेली ॥ रामसखा मग नाव मागवति'** (१५१। १,३) रामसखा निषाद शृंगवेरपुरास आहे व त्याने पुष्कळ रामसेवा केली इतकी माहिती सुमंत्राकडून राण्यांना कळली होती. ती ३६।३७ दिवसांत वसिष्ठांस सहज कळणारच. शिवाय राम चित्रकूटला राहिले आहेत ही बातमी निषादराज गुहाकडून वसिष्ठांस मिळाली हे पूर्वी (१८७।७) टीकेत दाखविले आहे. येथे गुहाने आपले नाव, गांव व जात (निषाद) हे सांगितले व त्या नावांचा व पूर्वीच्या माहितीचा मेळ घालून कोणीही ओळखले असते की रामसखा, निषादराज गुह तो हाच. ही सर्व माहिती वसिष्ठांनी भरतास सांगितली. यावरून ठरते की भरत वसिष्ठांच्या जवळपासच रथांत आहेत. हा 'रामसखा' आहे एवढे कानी पडतांच जे घडले त्यानेच भरताच्या

मनातील भावनेची व स्वभावाची परीक्षा सहज आपोआपच झाली; त्या कंदमूलफल खगमृगमांस मीनांकडे कोणी पाहिलेसुद्धा नाही.

हिं. *। रामसखा सुनि संदनु त्यागा । चले उतरि उमगत अनुरागा ॥७॥*
*। गाऊँ जाति गुह नाउँ सुनाई । कीन्ह जोहारु माथ महि लाई ॥८॥*
दो. *। करत दण्डवत देखि तेहि भरत लीन्ह उर लाइ ॥*
*॥ मनहुँ लखन सन भेट भइ प्रेमु न हृदयँ समाइ ॥१९३॥*
म. *। त्यजि रथ 'रामसखा' हें ऐकत । प्रेमभरे, उतरुनि, गत चालत ॥७॥*
*। गांव जात गुह नांवहि सांगत । जोहारी मस्तक महिं लागत ॥८॥*
दो. *। करत दंडवत बघुनि त्या भरत घेति हृदयसि ॥*
*॥ लक्ष्मण-भेटचि होइ जणुं, मन न पुरे प्रेमासि ॥१९३॥*

**अर्थ** - 'रामसखा' इतके ऐकतांच भरतांनी रथाचा त्याग केला; व रथांतून उतरून प्रेमभराने (निषादास भेटण्यासाठी) चालू लागले ॥७॥ त्याने गांव, जात (निषाद) व गुह हे आपले नांव सांगून जमिनीला डोके लाऊन जोहार (नमस्कार) केला ॥८॥ तो दंडवत घालीत आहे असे पाहून भरतानी त्यास उठवून हृदयाशी धरला; तेव्हा असे वाटले त्यांना की जणू लक्ष्मणाचीच भेट झाली; व प्रेमाला हृदय (मन) पुरेनासे झाले.(प्रेम हृदयांत मावेना; अश्रू; रोमांच इ. आले) ॥दो. १९३॥

**टीका. - चौ. ७-८** (१) **'रामसखा' हे ऐकत** - रामसखा रामासारखाच पूज्य आदरणीय, या भावनेने भरत रथांतून उतरले व रामाला भेटण्यास जसे जितक्या प्रेमाने चालत गेले असते तसेच भरत चालले. त्यांची जात, उच्चनीच इ. कोणताही विचार मनांत आला नाही. 'रामसखा' हा एकच विचार ! पावलोपावली प्रेमाला पूर येत चालला. (क) **गांव, जात, गुह नांवही सांगत** - गुहाला वाटले की आपली जात, नीच धंदा इ. यांना माहीत नसेल म्हणून हे इतक्या प्रेमाने आतुरतेने भेटण्यासाठी येत आहेत. पाठीमागून आपल्यावर दोष येऊ नये म्हणून त्याने आपली जात = निषाद, गांवाचे नांव व आपले नांव गुह इ. सर्व सांगितले. (ख) **जोहारी मस्तक महिं लागत** - राजाला प्रजेने नमन करण्याची जी पद्धती आहे त्याप्रमाणे जमिनीपर्यंत मस्तक नमवून जोहार केला; पण ते अगाध प्रेम पाहून रामभक्त जाणून, रामसमान मानून दण्डवत नमस्कार करू लागला. **'भेट समर्पूनि करी दंडवत । प्रेमे प्रभुसि राहि अति निरखत'** (८८।३) असे नमन रामचंद्रांस केले आहे. (ग) भेट घेऊन निघाल्याचा उल्लेख केला पण

भेट समर्पण केल्याचा येथे उल्लेख नाही; तरी ती न्यूनता वरील चौपाई (८८।३) च्या आधारे पूर्ण करावयाची आहे. कंदमूल फळे वसिष्ठांपुढे ठेवून त्यांना दंडवत घातले असेही मानणे जरूर आहे.

**दो. - (१) करत दंडवत बघुनि त्या** - रामसखा असल्याने त्याने दण्डवत करणे बरे नाही असे वाटून तो दण्डवत करीत असतांच त्यास धरला, व उठवून हृदयाशी धरून कवटाळला. 'करत दण्डवत मुनि उरिं धरिती' (१०६।७) टी पहावी. **(क) लक्ष्मण भेटच होइ जणुं** - गुहाची उंची, बांधा, वर्ण, रूप, लावण्य लक्ष्मणासारखेच असावे असे यावरून व १९६।६ वरून ठरते. लक्ष्मणास भेटत असता जे सुख होत असे ते तसेच गुह भेटतांना झाले. राण्यांनासुद्धा गुह लक्ष्मणासारखाच वाटला. त्या कांही त्यास अशा भेटल्या नाहीत.

*हिं* *। भेटत भरतु ताहि अति प्रीती । लोग सिहाहिं प्रेम कै रीती ॥१॥*
*। धन्य-धन्य धुनि मंगलमूला । 'सुर सराहि तेहि बरिसहिं फूला ॥२॥*
*। लोक बेद सब भाँतिहिं नीचा । जासु छाँह धुइ लेइअ सिंचा ॥३॥*
*। तेहि भरि अंक राम लघु भ्राता । मिलत पुलक परिपूरित गाता ॥४॥*
*। राम राम कहि जे जमुहाहीं । तिन्हहि न पाप पुंज समुहाहीं ॥५॥*
*। यह तों राम लाइ उर लीन्हा । कुल समेत जगु पावन कीन्हा ॥६॥*

*म.* *। भरत तया सुप्रीतिं भेटती । प्रेमरीति जन सेर्षा स्तवती ॥१॥*
*। धन्यवाद नभिं मंगल मूलहि । त्या स्तवुनी सुर वर्षति फूल हि ॥२॥*
*। लोकिं बेदिं जो नीच सर्वपरिं । छायास्पर्शे स्नान वदति तरि ॥३॥*
*। रामबंधु लघु त्या कवटाळित । भेटत, पुलकिं गात्र परिपूरित ॥४॥*
*। राम वदत जे जांभइ देती । पापपुंज त्यांपुढे न येती ॥५॥*
*। या तर रामें हृदयिं कवळला । कुलसमेत जग-पावन केला. ॥६॥*

**अर्थ** - भरत त्याला इतक्या अत्यंत प्रीतीने भेटले की त्या प्रेमाच्या रीतीची लोक ईर्षेने प्रशंसा करू लागले. ॥१॥ आकाशांतूनही मंगलमूल असणारा धन्य, धन्य असा ध्वनि (धन्यवाद) ऐकू येऊ लागला व देव त्याची प्रशंसा करून पुष्पवृष्टी करू लागले. ॥२॥ (देव म्हणाले) जो लोकांत व वेदांत सर्व प्रकारे नीच म्हणून ठरलेला व ज्याच्या छायेचा स्पर्श झाला तर स्नान (करण्यास) सांगितले आहे. ॥३॥ त्याला रामचंद्रांचे धाकटेबंधु कवटाळून भेटत आहेत व त्यांचे सर्वशरीर रोमांचांनी फुलून गेले आहे ! ॥४॥ 'राम' 'राम' म्हणत जे जांभई देतात

त्यांच्यासमोर (सुद्धा) पापपुंज (पापसमुदाय) येत नाहीत. ।।५।। (मग) याला तर रामचंद्रांनी हृदयाशी कवळून कुळासहित जगपावन केला आहे ! ।।६।।

**टीका. - चौ. १ - (१) प्रेमरीति जन सेर्षा स्तवती** - जन = लोक, भरताबरोबर अयोध्येतून आलेले स्त्रीपुरुषादि सर्व अशा प्रेमाने भरताची भेट होण्याचे आम्ही अयोध्यावासी असून आमच्या भाग्यांत नाही.आम्ही रामदर्शनासाठी, सर्वांचा त्याग करून व्रतनेमादि पालन करीत जात असता आमच्या नशिबी हे सुख नाही. हा अस्पृश्य, हिंसक, मत्स्यमांसभक्षक, आचारहीन असून भरत यास अशा अलौकिक प्रेमाने भेटत आहेत! याने काय पुण्य केले आहे कोणास ठाऊक ! **'जानत प्रीति रीति रघुराई** (१६४) **'श्री रघुबीर की यह बानि'** (२१५) ही विनय पत्रिकेतील पदे पहावी म्हणजे राम कोणावर प्रेम करतात हे कळेल.

**चौ. २-४ - (१) 'धन्यवाद नभिं मंगल मूल हि'** पासून 'भेटत पुलकिं गात्र परिपूरित' पर्यंत, तीन चौपायांत ब्रह्मादिक देवांनी केलेली याची स्तुती आहे आणि चौ. ६ मध्ये आहे. बाकी १९५।२ पर्यंत देवांनी रामनाम महिमा वर्णिला आहे. **(क) लोकिं वेदिं जो नीच सर्वपरिं 'हिंसारत निषाद तामस वपु, पशुसमान वनचारी' (वि.प. १६६।३) 'परम अधम । निषाद पामर' (वि. प. २१५।२)** सर्व प्रकारे नीच कसा हे या अवतरणांत तुलसीदासांनीच सांगितले आहे. त्याची सावली अंगावर पडली तर स्नान करावे लागते; मग शरीर किती अपवित्र असेल!

**चौ. ६ - (१) या तर रामें हृदयिं कवळिला** - जेव्हा निषादराज रघुनाथास भेटण्यास आला तेव्हा तेथील वर्णनांत हृदयाशी धरल्याचा उल्लेख न करितां येथे त्या उल्लेखाचे महत्त्व जास्त म्हणून येथे केला. मानसांत अपवादरहित असा नियम आढळतो की जेथे कोठे रामचंद्रांनी कोणास जवळ बसविला आहे तेथे त्यापूर्वी त्याला हृदयाशी धरून कवटाळला आहे. मात्र ज्याला हृदयाशी धरला त्याला **जवळ बसविला** आहे असे नाही. **प्रस्तावनेत 'भेटणे, हृदयाशी धरणे, बसविणे' (पृ. ५५७ पहा.) (क) कुलसमेत जगपावन केला - जगपावन** = जगांत पावन हा **एक अर्थ.** जगाला पावन करणारा हा दुसरा अर्थ, कारण की याच्या चरित्राच्या श्रवण पठनाने व नामस्मरणाने लोक पावन होतील. महाभगवद्भक्त असल्याने हा अर्थ अगदी योग्य आहे. जग = देह, पावन केला. इतका पावन केला की ही देववाणी ऐकल्यानंतर वसिष्ठसुद्धा त्यास कडकडून भेटले आहेत पुढे. 'जगदेतत्तवार्पितम्' (भाग. १०।१४।४०) यांत जगत् = देह हाच अर्थ आहे; श्रीधरी पहा. जो देह

अत्यंत अपावन होता तो परम पावन केला हा **तिसरा अर्थ.**

**वि. ल. टे.** - ज्या नावाड्याने मोठ्या युक्तीने प्रभूला आडवून पाय धुतले, त्याचीसुद्धा स्तुती करून देवांनी पुष्पवृष्टी केली आहे. तोही गुहाच्याच जातीचा, पहा त्याचा महिमा कवींनी एवढा वर्णन केला नाही; व रामभेटीत गुहाच्या भाग्याचे एवढे वर्णन केले नाही, पण भरत-निषादराज भेटीच्या वर्णनांत गोस्वामी खूपच रंगले आहेत व भरताचा महिमा रामापेक्षा अधिक 'रामदास रामाहून मोठे' हे येथे ध्वनित केले आहे. हा सिद्धान्त भरतचरित्रात अनेक वेळा गूढ व प्रगट रीतीने दाखविला आहे. भरतनिषादराज भेट म्हणजे दोन 'बालकसुतसम दास अमानी' भक्तांची भेट आहे. 'बालकसुतसम दास अमानी' भक्त 'प्रौढतनयसम ज्ञानी' भक्तांपेक्षा प्रभूला फार प्रिय वाटतात. त्यांच्या वर्णनात गोस्वामी जेवढे रंगलेले दिसतात तेवढे ज्ञानी भक्तांच्या, प्रौढतनयसम भक्तांच्या वर्णनांत रंगलेले दिसत नाहीत. नावाडी, निषादराज, यमुनातीरवासी, वनवासी लोक, जटायु, सुतीक्ष्ण, नारद, शबरी, बिभीषण, हनुमान, भुशुंडी व सर्वात प्रमुख भरत यांची वर्णने पहावी आणि भरद्वाज, अत्री, वाल्मीकी, अगस्त्य, शरभंग यांची वर्णने पहावीत म्हणजे वरील वैशिष्ट्य ध्यानांत येईल. **याचे कारण इतकेच आहे की गोस्वामी स्वतः 'बालकसुत सम दास अमानी' भक्त आहेत.**

*हिं.* *। करमनास जलु सुरसरि परई । तेहि को कहहु सीस नहिं धरई ॥७॥*
*। उलटा नामु जपत जगु जाना । बालमीकि भए ब्रह्म समाना ॥८॥*

*दो.* *। स्वपच सबर खस जमन जड पावँर कोल किरात ॥*
*॥ रामु कहत पावन परम होत भुवन बिख्यात ॥१९४॥*

*म.* *। कर्मनाशि जल सुरसरिं पडतें । तया मस्तकीं कोण न धरतें ॥७॥*
*। जपतां उलटें नाम वाल्मिकी । बने ब्रह्मसम विदित लोकिं कीं ॥८॥*

*दो.* *। श्वपच शबर खस, यवन जड पामर कोळि किरात ॥*
*॥ राम वदत पावन परम होति भुवनिं विख्यात ॥१९४॥*

**अर्थ** - कर्मनाशीं नदीचे जल गंगेत पडल्यावर त्याला कोण नाहीं मस्तकावर धारण करीत? ॥७॥ उलटें (राम) नाम जपल्याने वाल्मीकी ब्रह्मसमान झाले हे सर्व जगांत (लोकांत) प्रसिद्ध आहे. ॥८॥ चांडाल, शबर (भिल्ल) खस, यवन, कोळी, किरात इत्यादि जड-मूढ नीच (पामर) लोकसुद्धा राम नामाच्या उच्चाराने परम पावन व लोकांत विख्यात होतात. ॥१९४॥

**टीका. - चौ. ७ - (१) कर्मनाशिजल सुरसरिं पडतें** - कर्मनाशि = कर्मनाशा नदी; हिच्यांत स्नान केले तर सर्व शुभकर्माचा नाश होतो. (१।६।८ पहा.) हिचे जल इतके अपवित्र असून गंगेत पडले म्हणजे संत सुद्धा ते वंद्य मानतात. पण जेवढे जळ गंगेत पडेल तेवढेच वंद्य होते; व त्या जळाला गंगाजलापर्यंत जावे लागते. येथे रामरूपी गंगा स्वतःच गुहाजवळ आली व त्याला कुळासकट पवित्र करून टाकला ! मग भरत (व वसिष्ठ पुढे) याला इतक्या प्रेमाने भेटतील यांत नवल काय? असे देव म्हणाले. **'जाणुनि गंगाजलकृत वारुणि । पान करिति ना संत तया कुणि ॥ गंगे मिळतां पावन'** (१।७०।१-२) - **तस्मि स्तज्जने भेदाऽभावात्' (ना.भ.४१)**

**ल. ठे. - येथे गोस्वामींनी स्पृश्यास्पृश्यता विषयक आपले मत स्पष्ट सांगितलेले आहे** की ज्यास अशा प्रकारे परमात्मा सगुण साकार रूपाने प्रत्यक्ष भेटले व भेटताना लोकांनी पाहिले त्याची अस्पृश्यता नष्ट झाली एवढेच नव्हे तर तो इतर स्पृश्य-समजल्या जाणाऱ्यांनासुद्धा पावन करतो. येथे हेही लक्षांत ठेवले पाहिजे की मला कोणी अस्पृश्य मानू नये असे त्याला कधीं वाटले नाही, उलट तो आपल्या जातीचे नाव न विचारता स्वतःहोऊन सांगतो; तो स्पृश्य समाजात स्वतः कधी मिसळला नाही. त्याने सहभोजन, मंदिरप्रवेश, इत्यादींचा समान हक्क कधी मागितला नाही. तो आपणास नीचच समजतो व सांगतोही आहे. मी रामसखा आहे असे तो कधी म्हणाला नाही. व राम, भरत, वसिष्ठ हे वनांत त्यास भेटले असले तरी उत्तरकाण्डांत अयोध्येत गेल्यावर त्याला स्वतंत्र जागा उतरण्यास दिली आहे व रामसुद्धा त्यास स्पर्श करून भेटलेले नाहीत; उलट स्वधर्माचे अनुसरण करण्याचा उपदेश त्यालाच मुद्दाम केला आहे. (७।२०।१.२ सटीक पहा.)

**चौ. ८ - (१) जपतो उलटे नाम वाल्मिकी** - **वाल्मीकी जन्माने ब्राह्मण होता याला आणखी आधार - 'परस्परं समालोच्य दुर्वृत्तोऽयं द्विजाधमः ॥७८॥ उपेक्ष्य एव सद्वृत्तै स्तथापि शरणं गतः ॥ रक्षणीय प्रयत्नेन मोक्षमार्गोपदेशतः ॥७९॥ इत्युक्त्वा राम ते नाम व्यतयस्ताक्षरपूर्वकम् ॥ एकाग्र मनसाऽत्रैव मरेति जप सर्वदा ॥८०॥ यत्प्रभावादहं राम ब्रह्मर्षित्वमवाप्तवान् ॥६४॥** (अ.रा. २।६) या आधाराने ठरते की **ब्रह्मसम** = ब्रह्मर्षि, झाला, ब्रह्मनिष्ठ ऋषि झाला. ब्रह्म = वेद, त्यांच्यासारखा झाला. 'वेदः प्राचेतसादासीत्साक्षाद्रामायणात्मना' रामायणरूपाने वेदच त्यांच्या मुखांतून प्रगट

झाले. **'अहं पुरा किरातेषु किरातैः सह वर्धितः ॥ जन्ममात्रद्विजत्वं मे शूद्राचार रतः सदा'** (अ.रा. २।६।६५) ही सर्व हकीगत वाल्मीकींनी रामचंद्रांस सांगितली आहे.

**दो. (१) श्वपच** = चाण्डाल. द्वापरयुगांत **वाल्मीकि नांवाचा एक चाण्डाल** होता त्याने प्रसाद सेवन केल्यावर युधिष्ठिराचा यज्ञ पूर्ण झाला (भक्तमाल, मा.पी.) प. पु. सृष्टिखंड अ. ४७ मध्ये मूकचाण्डालाची कथा आहे पण त्यांत रामनामाचा काहीच संबंध नसून ती कथा पितृभक्तीचा प्रभाव दाखविणारी आहे; म्हणून **येथे अग्राह्य आहे. (क) शबर** - प. पु. पाताल खंडात शबर नावाच्या पुल्कस जातीच्या मनुष्याची कथा आहे, रौरवनरकांत त्याला नेण्यासाठी यमदूत अंतकाळसमयी आले असता एका भगवद्भक्तास त्याची दया आली; त्याने शाळिग्रामाचे तुलसीदलमिश्रित चरणामृत (तीर्थ) त्याच्या मुखात घातले व कानात रामनामाचा उच्चार केला व तो शालिग्राम त्याच्या हृदयावर ठेऊन म्हणाला की 'यमयातना देणाऱ्या यमदूतांनी येथून चालते व्हावे; शालिग्राम स्पर्शाने याची पातके भस्म होवोत. त्याबरोबर एक मनोहर विमान येऊन तो स्वर्गात गेला. तेथे पुष्कळ भोग भोगून काशीपुरीत ब्राह्मण जन्मास गेला व अंती परमपदास गेला. **ही कथासुद्धा केवळ रामनाम प्रभावाची नाही.** येथे शबर हे विशेषनाम घेणेच चांगले; कारण पुढे किरात = भिल्ल - शबर जातीचा उल्लेख आहेच. हा 'पुल्कस जातीचा' नाव शबर. दुसरी शबराची कथा शोधण्यास या लेखकास वेळ मिळाला नाही. **(ख) खस** - हल्लीसुद्धा या जातीचे लोक गढवाल व नेपाळ या भागात आहेत त्यांस खासिया म्हणतात. हे त्या खस नावाच्या भक्ताच्या वंशांतले. या खसाची कथा महाभारतात व सत्योपाख्यान रामायणात आहे (मा.पी.) भागवतांत या नावाचा उल्लेख आहे. 'आभीरकंकायवनः खसादयः' (भाग) **(ग) यवन** - हल्ली ज्यांस मुसलमान म्हणतात ते हे नव्हेत. म्लेच्छ यवन या जाती वैदिक धर्मीयांतून पतित भ्रष्ट झालेल्यांपैकी होत. या द्वापर युगाच्याही पूर्वी होत्या. वराहपुराणात एका यवनाची कथा आहे. अंतसमयी त्याच्या मुखांतून रामनाम चुकून निघाले व त्याने तो मुक्त झाला. (मा.पी.) कवितावली उ. कांड पद ७६ पहावे. त्यांत याच यवनाचा उल्लेख आहे. 'दैवात् सूकरशावकेन निहतो म्लेच्छो जराजर्जरो हा रामेण हतोऽस्मि भूमिपतितो जल्पंस्तनुं त्यक्तवान्' राम ही एक वनांतील पशूंची जात आहे. त्या पशूचे म्हणून त्याने नाव उच्चारले पण शब्द तोच असल्याने मुक्त झाला. **(घ) जड =** मूढ, मूर्ख, अज्ञानी, निरक्षर;

अशांचासुद्धा रामनामोच्चाराने उद्धार होतो. 'त्वन्नामस्मरणान् मूढः सर्वशास्त्रविवर्जितः । सर्व पापाब्धिमुत्तीर्य सगच्छेत् परमं पदम्' (प. पु. पा. ३७।५०). **(ड) कोळि किरात** - याचे वर्णन यमुनातीरयात्रावर्णनात व चित्रकूटवर्णनात पूर्वी आले आहे. किरात = भिल्ल, शबर; शबरी = भिल्लीण. **सूचना** - वर दिलेल्या प. पु. कथा स्वतः या लेखकाने पाहिल्या आहेत.

**(२) पावन परम होति** - भगवद्भक्त नसलेल्या इतर जपी, तपी, संन्यासी, वेदपाठी अग्निहोत्री विप्रांपेक्षा सुद्धा अधिक पावन होतात; कारण की हे बाकीचे पावन असले तरी तेवढ्याने जन्ममरणाच्या चक्रांतून सुटू शकत नाहीत; पण रामनामाने परम पावन झालेले त्या चक्रांतून कायमचे सुटून इतरांससुद्धा सोडवू शकतात. **(क) होति भुवनिं विरव्यात** - महाभारत पुराणे इत्यादी ऋषीप्रणीत ग्रंथांत अशांची नावे झळकतात; पण इतर जे अभक्त ते कितीही पुण्यवान - पावन झाले तरी कोट्यवधि जन्मतात व मरतात कोणास नावसुद्धा कळत नाही.

***हिं.*** ***। नहिं अचिरिजु जुग जुग चलि आई । केहि न दीन्हि रघुबीर बड़ाई ॥१॥***
***। राम नाम महिमा सुर कहहीं । सुनि सुनि अवधलोग सुखु लहहीं ॥२॥***
***। रामसखहि मिलि भरत सप्रेमा । पूँछी कुसल सुमंगल खेमा ॥३॥***
***। देखि भरत कर सीलु सनेहू । भा निषाद तेहि समय बिदेहू ॥४॥***

***म.*** ***। हें युगिं युगिं चाले विस्मय ना । देति महति रघुवीर न कवणा ॥१॥***
***। राम नाम - महिमा सुर वानति । श्रवुनि अयोध्याजन सुख पावति ॥२॥***
***। रामसख्या भेटुनि सुप्रेमां । कुशल सुमंगल पुसिलें क्षेमा ॥३॥***
***। भरत - शील - सुस्नेहा पाही । होई तदा निषाद विदेही ॥४॥***

**अर्थ** - यांत आश्चर्य काही नाही; कारण की हे युगायुगाचे ठायी चालत आले आहे. रघुवीरांनी मोठेपणा कोणाला नाही दिला ? ॥१॥ (याप्रमाणे) रामनामाचा महिमा देवांनी वर्णन केला व तो ऐकून अयोध्येतील लोकांना सुख झाले. ॥२॥ भरत रामसख्याला अति प्रेमाने भेटले व त्याला क्षेम कुशल व सुमंगल समाचार विचारला.॥३॥ भरताचे शील व सुस्नेह पाहून निषादराजा विदेही झाला - देहभान विसरला.॥४॥.

**टीका. चौ. १ - (१) हें युगिं युगिं चाले - हें =** रामनाम प्रभावाने परम पावन होऊन भुवन विख्यात होणे. प्रत्येक युगात हे घडत आले आहे. कृतयुगात यवन प्रल्हाद आदि, त्रेतायुगात शबरी, कोळी, किरात, बिभीषणादि; द्वापरांत

गोपी, कुब्जा, धोबी इत्यादी. कलियुगांत रैदास, चोखामेळा, रोहिदास, रसखान पठाण इ. इ. रामनामाने परम, पावन झाले व यांची चरित्रे पवित्र भाविक ब्राह्मण सुद्धा प्रेमाने गात असतात. **(क) बिस्मय ना** - हा निषादराज असा परमपावन झाला यांत आश्चर्य करण्यासारखे काही नाही; कारण प्रत्येक युगांत हे घडत आले आहे. **(ख) देति महति रघुवीर न कवणा** - भाव हा की रघुवीर जात, कुल, गोत्र, वय, विद्या, रूप, धन, सत्ता, संपत्ती इ. कशाचाही विचार करीत नाहीत. जो कोणीही रामनामाने परम पावन होईल त्याला महती, मोठेपणा मिळवून देऊन भुवन-विख्यात करतात. **'महती दासां सदा देतसां'** (३।१३।१३). असे अगस्ति म्हणालेच आहेत. **(ग) रघुवीर** शब्दाने येथे मुख्यतः कृपावीरता व दानवीरता सुचविली आहे. ती शिंक व ते म्हाताऱ्याचे उत्तर हे रामकृपेचेच फळ; भरतासारख्याने भेटणे व देवांनी उघड उघड प्रशंसा करणे हा मोठेपणा दिला व पुढे यामुळेच वसिष्ठही कडकडून भेटणार आहेत. हे दानवीरतेचे फळ ! रघुवीर शब्दाने देवांनी आणखी हे सुचविले की ज्यांच्या 'राम' या नावाने पूर्वी अनेक तरले ते राम म्हणजेच हे रघुवीर, भरताग्रज. भरद्वाज व पार्वती यांच्या शंकांचे हे उत्तर आहे; व अयोध्येतील लोकांना हे नेत्रांजन आहे की राम मनुष्य आहेत असे समजू नका.

**चौ. २ - (१) रामनाम महिमा सुर वदती** - येथे देवांच्या भाषणाचा व त्यांनी वर्णिलेल्या रामनामप्रभावाचा उपसंहार आहे. 'राम वदत जे जांभइ देती' असा याचा उपक्रम केलेला आहे. **(क) अयोध्याजन सुख पावति** - रघुवीर व राम (नाम) यांचे जे ऐक्य देवांनी दाखविले, त्यामुळे राम रघुनाथ परमात्मा आहेत हे सर्व लोकांनी जाणले; त्यांचे आपल्यावर प्रेम आहे व दर्शन भाषणाचा लाभ आपल्याला मिळाला आहे व आता मिळणार आहे हे आपलेही महद्भाग्य ! इ. विचारांनी आनंद, सुख होणे स्वाभाविक आहे.

**चौ. ३ - (१) कुशल सुमंगल पुसिलें क्षेमा** - कुशल, मंगल व क्षेम हे शब्दकोषांत समानार्थक म्हणून दिलेले असले तरी त्यांत सूक्ष्म भेद आहे. कुशल = शरीरादिकांचे आरोग्य, खुशाली म्हणून ज्याला व्यवहारात म्हणतात ते. क्षेम = प्राप्तस्य रक्षणे क्षेम. धन - संपत्ति, सत्ता, ऐश्वर्य, सुखादि जे पूर्वी होते ते कमी न होणे. सुमंगल = जे मिळालेले नाही, मिळावे असे वाटते किंवा वाटत होते, त्याची प्राप्ति होणे, कल्याण होणे; यालाच योग असे भगवद्गीतेत व

भागवतात म्हटले आहे. **अप्राप्त प्रापणं योगः 'योगक्षेमंवहाम्यहम्'** 'कल्याणां मंगलं शुभम्' (अमरे) सुमंगल = अति, फार, कल्याण. या तीन प्रश्नांची तीन उत्तरे गुह पुढे देणार आहे. रघुनाथाने नुसते कुशल विचारले असता एकच उत्तर देऊन नवीन काय मिळाले ते सांगितले आहे. (८८।५)

**चौ. ४ (१) भरत शील सुस्नेहा पाही - विदेही - 'स्नेह सुशीलें ये आकळतां'** असे म्हणून शत्रुमित्रमध्य गति ओळखण्यासाठी गुह आला होता. 'रामसखा' इतके ऐकताच रथांतून उतरून, सर्व मोठेपणा ऐश्वर्यादि विसरून पायी चालत भेटण्यास येणे व अस्पृश्य आहे हे कळूनसुद्धा उचलून घेणे याने शील दिसले व रामस्नेह आहे की नाही हे पाहण्यास आला होता तर अस्पृश्य रामसख्यावरच इतका स्नेह दिसला की अयोध्यावासी 'सेर्षा स्तवती'. निषादपति हृदयांत राजनीति भरून आला होता परीक्षा पाहण्यासाठी पण सहज चारीमुंड्या चीत, लज्जित होऊन भरतस्नेहरसांत इतका विरघळला की देहभानच विसरला, विदेही झाला. रामभरतभेटीत दोघांचीही अशीच दशा झाली आहे. (२४१).

हिं. ***। सकुच सनेहु मोद मन बाढ़ा । भरतहि चितवत एक टक ठाढ़ा ॥५॥***
***। धीर धीरजु पद बंदि बहोरी । बिनय सप्रेम करत कर जोरी ॥५॥***
***। कुसल मूल पद पंकज पेखी । मैं तिहुँ काल कुसल निज लेखी ॥७॥***
***। अब प्रभु परम अनुग्रह तोरें । सहित कोटिकुल मंगल मोरें ॥८॥***

म. ***। लाज स्नेह मोद - भर आला । भरता टकमक बघत राहिला ॥५॥***
***। धीर धरुन मग वंदि पदांनां । प्रेमें विनवी जुळुनि करांना ॥६॥***
***। कुशल-मूल पद-पंकज दिसले । मी त्रिकाळीं मम कुशल लेखलें ॥७॥***
***। प्रभु ! परमानुग्रहे अतां तव । सहित कोटि कुल मंगल मम तंव ॥८॥***

**अर्थ** - लज्जा, स्नेह व आनंद यांना हृदयात पूर आला आहे व (गुह) टक लाऊन भरताकडे बघत राहिला आहे.॥५॥ मग (काही वेळाने) धीर धरून भरताच्या चरणांना वंदन केले व हात जोडून प्रेमाने विनंती करू लागला.॥६॥ सर्व कुशलाचे मूळ (श्रीराम) पद कमलांचे दर्शन झाले तेव्हापासून मी समजतो की माझे त्रिकाळी कुशल आहे.॥७॥ आणि प्रभु ! अता तर तुझ्या (तव, तोरे) परम अनुग्रहाने कोटि कुळांसहित मंगल झाले.॥८॥

**टीका. चौ. ५ (१) लज्जा, स्नेह, मोद - भर आला** - भर = पूर. लज्जा, संकोच; याला पूर येण्याचे कारण - भरतासारख्या सुशील, रामस्नेहमूर्ती

रामभक्ताविषयी नाना संशय व कुतर्क मनात आणून ते गावाला सांगितले. इतका उतावळेपणा केला की सर्व लोकांना लढाईला तयार केले इ. प्रकारे केलेल्या आपल्या कृतीबद्दल लाज वाटू लागली. शिंक झाली नसती व त्या म्हाताऱ्याने मला जागा केला नसता तर केवढा अनर्थ ओढवला असता ? पण प्रभूंनीच कृपा केली. येथपर्यंत लज्जा व पश्चात्ताप यांचा पूर येताच त्यांचे रूपांतर रामस्नेहात झाले. प्रभूचा कृपाळूपणा, दीनदयाळूपणा व मातेप्रमाणे आपल्या अजाण बालकांचे संरक्षण करण्याची दक्षता इत्यादींच्या स्मरणाने प्रेमाने हृदय भरून आले. प्रभूंची माझ्यावर किती कृपा ही ! किती लक्ष माझ्यासारख्या दीन, हीन, नीच दासाकडे ! असे वाटून परमानंद झाला (मोदाला पूर आला) व प्रभूची मूर्ति हृदयांत उभी राहिली; तो डोळ्यांपुढे उभी असलेली प्रेममूर्ति व प्रभु यांत काहीच फरक न दिसल्याने प्रभुभावनेनेच भरताच्या मुखाकडे बघत स्तब्ध राहिला. भगवंतास भेटला तेव्हा असेच झाले आहे. 'भेट समर्पुनि करी दंडवत । प्रेमें प्रभुसि राहि अति निरखत' (८८।३). प्रेमाला व आनंदाला पूर येऊन बघत राहिला; यावरून अश्रू, रोमांच आल्याचे सुचविले.

(२) **शंका** - आपल्या चुकीबद्दल जर इतका पश्चात्ताप व लज्जा वाटली तर सर्व सांगून क्षमा मागणे हे सरळ स्वभावाचे कर्तव्य का केले नाही ? **समाधान** - गुह इतका प्रेमविव्हळ झाला आहे की भरताच्या मुखाकडे बघण्यात तो मागले सर्व विसरून गेला. वृत्तीवर येण्यास बराच यत्न करावा लागला. भरताचा स्नेह व त्याचे प्रश्न हेच मनात पुनः पुन्हा पुढे येत आहे. व एकदा जो ओघ बदलला तो बदलला. **वा. रा.** भेटीला गेल्याबरोबरच गुहाने आपला संशय प्रगट केला आहे. **'इयं ते महती सेना शंकां जनयतीव मे'** (२।८५।७) पण तेथे रथांतून उतरून चालत जाणे वगैरे हृदयाला उचंबळविणारे प्रेमाचे साम्राज्य नसून केवळ राजनैतिक वातावरण आहे !

**चौ. ६ (१) धीर धरुनि मग वंदि पदांला** - विचारलेल्या प्रश्नांचे उत्तर देण्यास मन व वाणी यांत शक्ती नाही; पण उत्तर न देणे किंवा फार विलंब करणे म्हणजे अपमान करणे आहे; असे बुद्धीला वाटल्याने; मन बलात्काराने आवरले, धीर धरला; तरी शल्य निघेना म्हणून प्रभुभावनेनेच वंदन केले व हात जोडले.

**चौ. ७ (१) कुशलमूल पदपंकज दिसले** - कुशलमूल असणारे पदपंकज रामाचेच

आहेत. 'नाथ ! कुशल पदपंकज दिसतां' (८८।५) असे गुह रामचंद्रासच म्हणाला आहे. हेच खुणेचे शब्द येथे आहेत; आणि सर्व कुशलाचे मूळ राम नाहीत असे कोण म्हणेल. भगवंताच्या दर्शनापासून गेलेल्या काळात कुशल आहे; आज त्यांच्याच कृपेने कुशल आहे; व पुढेही प्रभुकृपेनेच कुशल असेल अशी खात्री आहे. (त्याला नुकताच अनुभव आला आहे, आजच थोड्या वेळापूर्वीच, की प्रभूंनी कृपा केली नसती तर कल्पनातीत अकुशल एव्हाना केव्हाच झाले असते !).

**चौ. ८ - (१) प्रभु ! परमानुग्रहें अतां तव - मंगल मम** - भरताच्या पहिल्या प्रश्नाचे उत्तर वरील चौ. (७) मध्ये दिले. पहिला प्रश्न कुशल, दुसरा सुमंगल व तिसरा क्षेम. दुसऱ्या प्रश्नाचे उत्तर या चौपाईत आहे. येथे भरताला गुह 'प्रभु !' म्हणून संबोधित आहे, हे तो प्रभुभावाने भरताकडे बघत होता त्यातील अवशिष्ट चिन्ह आहे. **(क)** रामानुग्रहाने त्याचे तिन्ही काळी कुशल झाले; पण भरताच्या परम अनुग्रहाने कोटिकुळांसहित मंगल झाले. निषादराजाला राम भेटले तेव्हा देवांनी धन्यवाद दिला नाही; पुष्पवृष्टी केली नाही व त्याच्या भाग्याची प्रशंसाही केली नाही. **या सर्व गोष्टी नवीन लाभल्या आहेत.** 'कुलसमेत जग पावन केला' असे देवांनीच आता म्हटले म्हणजे हे नवीनच प्राप्त झाले. यावरून 'मंगल' चा पूर्वी केलेला अर्थ योग्य की अयोग्य ते वाचकांनी ठरवावे. 'रामदास रामाहुनि मोठे' हा सिद्धांत भरताच्या बाबतीत येथे स्पष्ट दाखविला गेला.

***हिं.दो.*** ***। समुझि मोरि करतूति कुलु प्रभु महिमा जियँ जोइ ॥***
***॥ जो न भजइ रघुबीर पद जग बिधि बंचित सोइ ॥१९५॥***
***हिं.*** ***। कपटी कायर कुमति कुजाती । लोक बेद बाहेर सब भाँती ॥१॥***
***। राम कीन्ह आपन जबही तें । भयउँ भुवन भूषन तबही तें ॥२॥***
**म.दो.** ***। मम करणी कुल समजुनी प्रभु - महिमा जाणून ॥***
***। जो न भजे रघुवीर पद तो विधिवंचित पूर्ण ॥१९५॥***
**म.** ***। कपटी कातर कुमति कुजाती । लोकीं वेदिं बाह्य सब रीतीं ॥१॥***
***। रामें अपला जेव्हा गणलों । तैंहुनि भुवनभूषण चि झालो ॥२॥***

**अर्थ** - माझी करणी व कुल यांचा विचार करून आणि प्रभूचा महिमा ध्यानात घेऊन (जाणून) जो रघुवीर चरणांना भजणार नाही, त्याला विधीने पक्का फसवला असे समजावे.॥दो.१९५॥ मी कपटी, कातर (भ्याड) दुर्बुद्धि व नीच जातीचा असून, आणि सर्व प्रकारे लोकबहिष्कृत व वेदबहिष्कृत

असून.।।१।। ज्या वेळी रामचंद्रांनी मला आपला म्हटला तेव्हा पासून (तैंहुनि) मी भुवनभूषण बनलो ( हा रामाचा महिमा !) ।।२।।

**टीका. दो. - (१) मम करणी कुल समजुनी** - माझी करणी तर अशी की 'पाप करत दिन रात जात कीं' हिंसाप्रिय, निंद्य. कुळ तर असे की छायेचा स्पर्श झाला तरी इतरांना स्नान करावे लागते. **(क) प्रभु महिमा जाणून** - 'शिव विरंचि सुर ज्यांचे सेवक' 'जन्म जन्म मुनि झिजति साधनीं । अंतीं राम न येत आननीं । नामबळें ज्या शंकर काशीं । दे सकलां सम गति अविनाशी ।। इ. असे राम आहेत; व असे मी आणि राम यांच्यांत जमीन अस्मानापेक्षा जास्त अंतर असून ते मला हृदयाशीं धरून भेटले; त्यांच्या कृपेने रामबंधु भेटले; देवांनीसुद्धा धन्य म्हटले इ. गोष्टींचा विचार करून जे अशा निर्हेतुक कृपासिंधु रघुवीराला भजणार नाहीत ते परम अभागीच म्हटले पाहिजेत. माझे उदाहरण लक्षात घेऊन तरी सर्वांनी रघुवीरास भजावे. मी कसा आहे ते स्पष्ट सांगतो ऐका :

**चौ. १-२ (१) कपटी कातर कुमति कुजाती - सब रीती** - यांतील विशेषणे सहेतुक असून आपण भरताशी कपट केले ही भावना यांत डोकावत आहे; पण भरताला उघड उघड सांगण्यास धीर होत नाही. हीच कातरता - हाच भ्याडपणा. कपट केले याचे कारण कुमति, दुर्बुद्धि, मंदमति, सुविचार करण्याची शक्तीच नाही बुद्धीच्या ठिकाणी व याचे कारण कुजाति - नीच जातीत जन्म; स्वभावताच बुद्धि सदोष ! आणि यामुळे सर्व प्रकारे लोकवेद बहिष्कृत आहोत ते योग्यच आहे. पण या दोषांकडे प्रभूंनी मुळीच पाहिले नाही. **(क) भुवन भूषण चि झालो** - हे भरताच्या **तिसऱ्या म्हणजे क्षेम प्रश्नाचे उत्तर आहे.** रामचंद्रांनी आपला म्हटला तेव्हापासूनच भूषणत्व प्राप्त झालेले आहे; व ते अद्याप कायम आहे हे तुम्ही मला इतक्या प्रेमाने व आदराने भेटलात यावरून सिद्ध होते. पूर्वी प्राप्त झालेल्याचे रक्षण म्हणजे क्षेम. जे रामभेटीत मिळाले ते अद्याप सुरक्षित आहे. **(ख)** हे उत्तर दुसऱ्याच्या उत्तरानंतर पाठोपाठ न देता मध्ये एक दोहा व एक चौपाई घालून नंतर देण्यांत महत्त्वाचा हेतू आहे. भुवनभूषण झाल्यानंतर सुद्धा भरतासारख्या रामभक्तांची निंदा, त्याच्याविषयी संशय, वैरभाव इत्यादी उत्पन्न होऊनसुद्धा भुवनभूषणत्व कमी झाले नाही त्या अर्थी माझ्या क्षेमाची काळजी रघुवीर वहात आहेत हे निश्चित ठरले. असे कृपाळु सर्व समर्थ संरक्षक असल्यावर योग ( = मंगल) व क्षेम यांची चिंता करण्याचे कारणच नाही हे

दाखविले. 'योगक्षेमं वहाम्यहम्' (भ.गी.) 'निर्योगक्षेम आत्मनाम्' (भ. गी.) होऊन रहावे हे ध्वनित केले.

*हिं.* *। देखि प्रीति सुनि बिनय सुहाई । मिलेउ बहोरि भरत लघु भाई ॥३॥*
*। कहि निषाद निज नाम सुबानीं । सादर सकल जोहारीं रानीं ॥४॥*
*। जानि लखन सम देहिं असीसा । जिअहु सुखी सय लाख बरीसा ॥५॥*
*। निरखि निषादु नगर नर नारी । भए सुखी जनु लखनु निहारी ॥६॥*
*। कहहिं लहेउ एहिं जीवन लाहू । भेंटेउ रामभद्र भरि बाहू ॥७॥*

*म.* *। प्रीति बघुनि ऐकुनि शुभ विनती । भरत-बंधु लघु तया भेटती ॥३॥*
*। नाम निषाद सुवचनीं सांगत । राण्यानां सादर जोहारत ॥४॥*
*। आशिस देति गणुनि सम लक्ष्मण । सुखी जीव ! शतलक्ष शरद्गण ॥५॥*
*। पुरनरनारी गुहा न्यहाळुनि । सुखी होति जणुं लक्ष्मण पाहुनि ॥६॥*
*। म्हणति लब्ध या जीवनलाहू । रामभद्र भेटति निज बाहूं ॥७॥*

**अर्थ** - प्रीति पाहून व शुभ विनंती ऐकून भरताचे (च) धाकटे बंधु शत्रुघ्न त्याला भेटले.॥३॥ निषादाने सुंदर शब्दांनी आपले नाव सांगितले व सगळ्या राण्यांना आदराने जोहार केला.॥४॥ राण्यांनी त्याला लक्ष्मणासारखा जाणून आशीर्वाद दिला की शंभर लक्ष वर्षे (शरद्गण) सुखात रहा - जगा.॥५॥ अयोध्येतील स्त्रीपुरुषांनी गुहाला न्यहाळून पाहिला व त्यांना जणू काय लक्ष्मणास पाहिल्यासारखे सुख झाले.॥६॥ व ते सर्व लोक म्हणू लागले की याला जीवनाचा (खरा) लाभ मिळाला; (कारण) रामभद्र याला आपल्या बाहूंनी - बाहूत धरून - भेटले.॥७॥

**टीका. चौ. ३-५ (१) भरतबंधु लघु भेटती** - प्रथम रामकृपा झाली व रामानी याला आलिंगन दिले; त्यामुळे परम भागवतोत्तम भरतांनी त्यांस आलिंगन दिले; व त्यानंतर आता भागवत-सेवक (भगवद्भक्त-सेवक) शत्रुघ्न भेटले. **'कृपा करिति रघुराज जयावर । सर्वहि करिती कृपा तयावर ॥ हा सिद्धान्त येथे ध्वनित केला.** भरत ज्या भावनेने भेटले त्याच प्रेम व आदरयुक्त भावनेने शत्रुघ्न भेटले हे 'भरतबंधु लघु' या शब्दांनी सुचविले. भरताचाच धाकटा भाऊ ! **(क) गणुनि सम लक्ष्मण** - लक्ष्मणा सारखाच, रामाचा धाकटा भाऊ, समजून पुत्रवात्सल्याने मातांनी त्याच्याकडे पाहिले व आशीर्वाद दिले. त्यांना तो दिसण्यात लक्ष्मणासारखाच वाटला. **शत लक्ष शरद्गण** = शंभर वर्षे, जग याचा अर्थ दीर्घायुषी हो इतकाच

घ्यावयाचा. शतलक्ष = कोटि; '**जगा जगत्पति** कोटी वत्सर (२।५।५) असे वृद्ध दशरथांना सचिवांनी जसे म्हटले आहे तसेच हे.

**चौ. ६-७ (१) पुरनरनारी गुहा न्यहाळुनि** - नरनारींनी त्याच्याकडे नीट निरखून पाहिले; कारण त्यांना शंका आली की लक्ष्मणच तर नाहीना आला ? याने कवींनी सुचविले की गुह रामसखा दिसण्यात हुबेहुब लक्ष्मणासारखाच आहे. **(क) रामभद्र** - हा शब्द मानसांत फक्त येथेच (भावगर्भित) वापरला आहे. **राम** = 'आनंदसिंधु सुखराशी' 'सब लोकां दायक विश्राम' (१।१९७।५-६) **भद्र =** श्वःश्रेयसं शिवं भद्रं कल्याणं मंगलं शुभम्' (अमरे) भद्र = कल्याण, मंगल, शुभ - जणू काय सुखानंद - विश्राम व शुभमंगल या दोन बाहूनींच रघुवीराने याला आलिंगन दिले. सुखानंदविश्राम व शुभमंगल या दोन बाहूंनी ज्याला प्रेमाने मिठी मारली त्याला या जगात काही मिळण्याचे किंवा मिळविण्यासारखे राहिलेच नाही. हा लाभ आपल्याला कधी मिळेल का अशी लालसा लोकांच्या मनांत उत्पन्न झाली. **'राम सदा सेवकरुचि राखिति'** (२१९।७) या सिद्धान्ताप्रमाणे ही लालसा लवकरच पूर्ण होणार आहे.

***हिं.*** ***। सुनि निषादु निज भाग बड़ाई । प्रमुदित मन लइ चलेउ लेवाई ॥८॥***
***दो.*** ***। सनकारे सेवक सकल चले स्वामि रुख पाइ ॥***
***॥ घर तरु तर सर बाग बन बास बनाएहि जाइ ॥१९६॥***
***म.*** ***। निज भाग्यस्तुति निषाद ऐकुनि । प्रमुदित चित्तें जाई घेउनि ॥८॥***
***दो.*** ***। खुणवि सेवकां, सकल गत स्वामि-हेतु जाणून ॥***
***॥ गृहिं तरुतळिं सर बाग वनिं वास रचिति जाऊन ॥१९६॥***

**अर्थ** - आपल्या भाग्याची प्रशंसा निषादराजाने ऐकून घेतली; व अति प्रसन्न मनाने (भरताला सैन्यासह) घेऊन (आपल्या पुराकडे) निघाला.॥८॥ त्याने आपल्या सेवकांना खुणेने सुचना दिली व ते सगळे आपल्या स्वामीचा हेतु जाणून गेले. त्यांनी जाऊन घरात, झाडांच्या खाली, तलावांच्या काठी, बागांत व वनांत वसतिस्थाने तयार केली.॥ दो. १९६॥

**टीका. (१) घरांत** - राण्यांसाठी व स्त्रियांसाठी, साफसूफ करून चटया वगैरे घालून तयारी करून ठेवली. **वृक्षांखाली** जागा सपाट व साफसूफ करून, पाणी शिंपून मुनींच्या व विप्रांसाठी; **तलावांच्या काठी** सैन्यासाठी, बागांत इतर प्रजेसाठी व **वनांत** हत्ती घोडे वगैरेंसाठी जागा तयार करून ठेवल्या. **(क) वा.**

**रा.** - गुहभरत भेट सैन्य गंगातटी घेऊन पोचल्यावर झाली आहे; व भेट होते तोच थोड्या वेळाने सूर्यास्त झाला आहे; पण तेथे अयोध्येहून एका दिवसात आले आहेत; तेथे चौथ्या दिवशी आले. येथे गुहभरत भेट शृंगवेरपुरापासून दूर काही अंतरावर झाली हे पुढील चौपाईवरूनही कळेल -

*हिं.* ***। सृंगबेरपुर भरत दीख जब । भे सनेहँ सब अंग सिथिल तब ॥१॥***
***। सोहत दिएँ निषादहि लागू । जनु तनु धरें बिनय अनुरागू ॥२॥***
***। एहि बिधि भरतु सेन सब संगा । दिखि जाइ जग पावनि गंगा ॥३॥***
***। राम-घाट कहँ कीन्ह प्रनामू । भा मनु मगनु मिले जनु रामू ॥४॥***

*म.* ***। शृंगवेरपुर भरता दिसतां । ये सर्वांगी स्नेह-शिथिलता ॥१॥***
***। शोभति जात निषादाधारीं । जणुं अनुराग-विनय वपुधारी ॥२॥***
***। असे भरत सब सेना संगें । जाति बघति जगपावन गंगे ॥३॥***
***। करिति राम घाटाला प्रणमन । रामभेट जणुं होइ मग्न मन ॥४॥***

**अर्थ** - शृंगवेरपुर दृष्टीस पडताच भरताचे सर्व अवयव (अंगें) स्नेहाने शिथिल झाले.॥१॥ भरत निषादाच्या आधाराने (त्याच्या खांद्यावर हात ठेऊन) जात असता ते दोघे असे शोभत आहेत की जणू अनुराग (प्रेम) व विनय (नम्रता, लीनता) च देह धारी बनून (असे) जात आहेत.॥२॥ याप्रमाणे भरत सर्व सेनेसह गेले व जगाला पावन करणाऱ्या गंगेचे त्यांस दर्शन झाले.॥३॥ भरतानी राम घाटाला प्रणाम केला व मन (रामस्नेहात) इतके मग्न झाले की जणू रामभेटच झाली.॥४॥

**टीका. चौ. १ - (१) शृंगवेरपुर भरता दिसतां** - येथे रामचंद्रांनी एक महत्त्वाचा मुक्काम केला असल्याने त्या दिवसाची श्रवण केलेली हकीगत आठवू लागली. राम कुठे उतरले, कुठे स्नान केले, कुठे कसे झोपले; प्रभूंची चरणचिन्हे, काही अवशिष्ट स्मृति इ. दिसेल का ? आहे का माझ्या भाग्यात ? इ. विचारांनी रामलक्ष्मण व सीता यांच्या संबंधी प्रेमास जोराने धक्के दिले व त्यामुळे हातपाय इत्यादी अवयवांतील शक्ती नाहीशी होऊन ते शिथिल झाले, लुळ्यासारखे झाले. हातपाय गळले म्हणतात ते असेच.

**चौ. २-३ (१) शोभति जात निषादाधारीं** - पायांत शक्ती नसल्यामुळे गुहाच्या निषादाच्या खांद्यावर हात ठेऊन त्याच्या आधाराने चालू लागले. **(क)** गुहास भेटण्यासाठी रथांतून उतरले ते पुन्हा रथांत बसले नाहीत हे ठरले. **(ख)**

**अनुरागविनय वपुधारी** अनुरागाची - रामस्नेहाची मूर्ति भरत व विनयाची मूर्ति, मूर्तिमंत विनय, निषाद गुह - अनुरागाने विनयाचा आधार घेतला आहे. या उत्प्रेक्षेने दाखविले आहे की **भगवत्प्रेमाला विनयाचा आधार नसेल तर ते रामदर्शनास जाऊ शकत नाही.** म्हणजेच भगवत्प्रेम असून कसलाही अहंकार असेल व प्रेमाच्या इतकीच लीनता नसेल तर रामदर्शन होणार नाही; **फार काय भक्तिभागीरथीचे दर्शन घेता येणार नाही. अहाहा ! किती सुंदर उत्प्रेक्षा !** उत्प्रेक्षा केली नसती तर ठरले असते की भरताच्या ठिकाणी विनय व गुहाच्या ठिकाणी रामानुराग नाही. भाव हा आहे की यावेळी भरताच्या ठिकाणी अनुरागाचे व गुहाच्या ठिकाणी विनयाचे प्राबल्य आहे. 'साक्षात् रामप्रेममूर्ति ही' (१८४।४) असे म्हटले तेथे उत्प्रेक्षा नाही. केवळ चेतनोक्ति आहे. **(ग) जगपावन** - जगाला = जंगम प्राण्यानां पावन करू शकणारी हे जरी खरे असले, तरी संतभक्त यास अपवाद आहेत; तेच 'तीर्थीकुर्वन्ति तीर्थानि' (ना.भ.) तीर्थांना पावन करणारे असतात.

**चौ. ४ - (१) करिति रामघाटाला प्रणमन - रामघाट** - रामचंद्रांनी ज्या ठिकाणी स्नान संध्या केली ती गंगेच्या काठची जागा. या उल्लेखावरून हे ठरले की भरतानी निषाद राजाला याविषयी माहिती विचारली; आणि निषादराजाने त्या जागेला या पूर्वीच रामघाट हे नाव दिले होते. त्या जागेला भरताने दण्डवत नमस्कार केला. **(क)** प्रेममग्न मन होण्याची दोन कारणे आहेत. रामप्रभूचे पाय ज्या जागेला लागले जेथे त्यांनी स्नानादि केले त्या जागेचे दर्शन होऊन तेथेच गंगाजळात स्नान करण्याचे भाग्य लाभले याबद्दल आनंद झाला; पण त्याबरोबरच वाईट वाटून पश्चाताप झाला की प्रभूला माझ्यामुळे नुसत्या मातीत बसावे लागले ! वा. रा. सर्ग ८५ मध्ये या वेळेच्या भरताच्या प्रेमविव्हळ दशेचे फारच बहारीचे वर्णन आहे. जवळ जवळ मूर्छा येण्यापर्यंत दशा झाली आहे व अंतर्दाह हे मुख्य कारण सांगितले आहे.

*हिं. । करहिं प्रनाम नगर नर नारी । मुदित ब्रह्ममय बारि निहारी ॥५॥*
*। करि मज्जनु मागहिं कर जोरी । रामचंद्र पद प्रीति न थोरी ॥६॥*
*। भरत कहेउ सुरसरि तव रेनू । सकल सुखद सेवक सुरधेनू ॥७॥*
*। जोरि पानि वर मागउँ एहू । सीय राम पद सहज सनेहू ॥८॥*
*दो. । एहि बिधि मज्जनु भरतु करि गुर अनुसासन पाइ.॥*
*॥ मातु नहानीं जानि सब डेरा चले लेवाइ ॥१९७॥*

म. *। करिती प्रणमन पुर नर नारी । सुखी ब्रह्ममय बघुनी वारी ॥५॥*
*। स्नान करुनि कर जोडुनि मागति । रामचंद्रचरणीं प्रेमा अति ॥६॥*
*। भरत वदति सुरसरि तव रेणू । सकल सुखद सेवक सुरधेनू ॥७॥*
*। जोडुन कर वर हाच मागतो । सितारामपदिं स्नेह सहज तो ॥८॥*

दो. *। असें स्नान करुनी भरत गुर्वाज्ञा घेतात ॥*
*॥ माता स्नाता बघुनि सब तंबूंसह जातात ॥१९७॥*

**अर्थ** - नगरांतील स्त्रिया व पुरुष गंगेला प्रणाम करू लागले व ब्रह्ममय (ब्रह्मद्रवरूप) वारि पाहून सुखी होऊ लागले.॥५॥ स्नान करून (गंगेला) हात जोडून मागतात की आमचे रामचंद्रांच्या पायी पुष्कळ (अति) प्रेम असूं दे (प्रेमा = प्रेम).॥६॥ भरत म्हणाले की हे सुरसरिते तुझा रेणु (जलकण, जलबिंदु) सर्वांना सुखदायक व सेवकांची तर कामधेनुच आहे.॥७॥ (म्हणून) मी हात जोडून इतकाच वर मागतो की ज्याला सहज स्नेह म्हणतात तो सीतारामांच्या चरणी मला दे.॥८॥ या प्रमाणे स्नान केल्यावर भरतांनी गुरुजींची आज्ञा घेतली व सर्व मातांची स्नाने उरकली आहेत असे पाहून (जाणून) सर्व तंबू वगैरे (बरोबर घेऊन) सह गेले.॥दो.१९७॥

**टीका. चौ. ५-६ (१) ब्रह्ममय वारि =** वारि रूपाने अवतरलेले ब्रह्मच. **'ब्रह्म जो व्यापक वेद कहैं...'** सोइ भयो द्रवरूप सही' (कवि. ७।१४६) वेद ज्याला सर्व व्यापक ब्रह्म म्हणतात तेच द्रवरूप झाले हे खरे. असे गोस्वामी कवितावलीत म्हणतात. पुरजनांना ब्रह्ममय वारी पाहून आनंद झाला पण भरत रामघाटाला पाहून प्रेममग्न झाले ! **(क)** लोकांनी गंगेजवळ **अति प्रेमा =** अति स्नेह, मागितला व केवळ रामचंद्र चरणी मागितला. भरत सीतारामचरणी सहज स्नेह मागत आहेत. उद्‌भवस्थितिसंहारकारिणी सर्व श्रेयस्करी सीता आहे. तिला दिली पुरजनांनी सोडून मग अति - पुष्कळ - स्नेह तरी मिळणार कसा ? या गंगेनेच सीतेची स्तुती केली आहे; मग सीतेला सोडून नुसत्या रामपदी स्नेह मागितला तो गंगा देईल कशी ? **(ख) अति स्नेह (प्रेम) व सहज स्नेह यांत फरक काय ? 'सजल मूल नसती ज्या सरिता । सुकुनि जाति त्या वर्षा सरतां'** (५।२३।६) पाऊस धो धो पडत असतो तोपर्यंत **'क्षुद्र नद्या भरूनी फोंफावति'** (४।१४।५) अति मोठा पूर येतो; पण पावसाळा संपला की कोरड्या ठणठणीत ! कारण त्यांचा पाण्याचा पुरवठा सहज नाही. गंगायमुना कधी कोरड्या पडत नाहीत; त्यांना पाण्याचा

पुरवठा सहज आहे. असाच भेद अति स्नेह व सहज स्नेह यांत आहे.

**चौ. ७-८ (१) सकल सुखद सेवक सुरधेनू** - 'प्रणत काम सुरधेनु कल्पतरु' (७।३५।२) राम आहेत; तसेच 'सेवत सुलभ सकल सुखदायक' (७।३५।३; १।१४६।२) आहेतच. आणि 'ब्रह्म राम चिन्मय अविनाशी' आहेतच. यावरून ठरले की **'सुरसरितारेणु'** (कण, जलबिंदु) व राम तत्त्वतः एकच आहेत. येथे 'ब्रह्ममयवारि' याची यथार्थता दाखविली. **(क) रेणू** = रेणु = जलकणिका 'भगवद्गीता किंचिदधीता । **गंगाजल** लव - **कणिका** पीता ।। सकृदपि यस्य मुरारि समर्चा तस्य यमः किं कुरुते चर्चाम् ।। (च.पं.)

**दो. - (१) असे स्नान करूनी भरत...' असे** = अशा तऱ्हेने. भरत सर्वांच्या आधी गंगातीरी आले पण प्रेममग्न झाल्यामुळे त्यांचे स्नान सर्वांच्या शेवटी उरकले ! **(क)** गुरुजींची आज्ञा घेणे, मातांची स्नाने झाली की नाही पाहणे व तंबू वगैरे सामान बरोबर घेऊन जाणे या सर्व गोष्टींनी भरताची कर्तव्य परायणता व दक्षता दिसते. प्रेमविव्हळ झाले तरी कर्तव्यविस्मृति व बेसावधपणा मुळीच नाही ! याचे कारण **'असे सकल रघुपति संपत्ती'** व **'करी स्वामिहित सेवक तोहि'** या दोन सूत्रांची विस्मृति झाली तर रामसेवक म्हणण्यास जागाच राहणार नाही. सर्व माता राममाता आहेत, व वसिष्ठ रामगुरु आहेत; त्यांची काळजी घेणे व मानसन्मान राखणे म्हणजे स्वामिहित करणे नाही काय? सेवक तंबू वगैरे सामानसुमान घेऊन भरताबरोबर गेले.

*हिं.* ***। जहँ तहँ लोगन्ह डेरा कीन्हा । भरत सोधु सबही कर लीन्हा ॥१॥***
***। गुर सेवा करि आयसु पाई । राम-मातु पहिं गे दोउ भाई ॥२॥***
***। चरन चाँपि कहि कहि मृदु बानी । जननीं सकल भरत सनमानी ॥३॥***
***। भाइहि सौंपि मातु सेवकाई । आपु निषादहि लीन्ह बोलाई ॥४॥***

*म.* ***। जिथे तिथें जन तंबू देती । भरत शोध सर्वांचा घेती ॥१॥***
***। कृत गुरु-सेवा, आज्ञा घेती । बंधु राममातेप्रति येती ॥२॥***
***। चेपुनि पाय वदुनि मृदु वाणी । जननिंस सकल भरत सन्मानी ॥३॥***
***। जननी-सेवा भावा सोंपवि । निषादास मग आपण बोलवि ॥४॥***

**अर्थ** - लोकांनी जिथे तिथे तंबू ठोकले; व भरताने सर्वांची चौकशी केली ।।१।। गुरुसेवा करुन त्यांची आज्ञा घेतली व दोघे बंधू राममातेकडे आले. ।।२।। (दोघांनी) पाय चेपले व भरताने गोड शब्दांनी सर्व जननींचा सन्मान

केला. ॥३॥ जननीची सेवा भावाकडे (शत्रुघ्नाकडे) सोपवून भरताने निषादराजाला बोलावून घेतला. ॥४॥

**टीका - चौ. १-२ - (१) जिथें तिथें जन तंबू देती** - भरताच्या बरोबर तंबू वगैरे आल्याचा उल्लेख करून येथे लोकांनी तंबू ठोकल्याचा उल्लेख केला व सुचविले की सरकारी तंबूसुद्धा राजसेवकांनी ठोकले. **(क) भरत शोध सर्वांचा घेती** - लोकांची उतरण्याची वगैरे सोय नीट झाली की नाही याची चौकशी केली. रामचंद्रांचे म्हणून सांगितलेले निरोप भरतास कळले नव्हते तरी राजाधिराज रामचंद्रांची प्रजा आहे या भावनेने भरताने हे केले. **(ख) कृत गुरु-सेवा - सूचना** हिंदीत 'गुर' चे जागी काही प्रतीत 'सुर' पाठ आहे; व पुष्कळ प्रतीत 'गुर' (गुरु) पाठ आहे. 'गुरु' पाठ अधिक योग्य व भरताच्या चरित्राशी अधिक सुसंगत असल्याने या अनुवादांत गुरु (गुर) पाठ घेतला आहे.

**चौ. ३-४ - (१) चेपुनि पाय... सन्मानी** - दोघां भावांनी कौसल्यादि मातांची सेवा केली व जिचा भरताने त्याग केला आहे तिची सेवा शत्रुघ्नावर सोपविली. कौसल्यादि माता एका तंबूत आहेत व कैकयीचा तंबू निराळा आहे असे येथे ठरले. निषादाला बोलावून घेऊन भरत आता रामशयन दर्शनास जाणार. फार रसाळ आहे.

*हिं.* ***। चले सखा कर सों कर जोरें । सिथिल सरीरु सनेह न थोरें ॥५॥***
***। पूँछत सखहि सो ठाउँ देखाऊ । नेकु नयन मन जरनि जुडाऊ ॥६॥***
***। जहँ सिय राम लखन निसि सोए । कहत भरे जल लोचन कोए ॥७॥***
***। भरत वचन सुनि भयउ विषादू । तुरत तहाँ लइ गयउ निषादू ॥८॥***
दो. ***। जहँ सिंसुपा पुनीत तर रघुवर किय विश्रामु ॥***
***॥ अति सनेहँ सादर भरत कीन्हेउ दंड प्रनामु ॥१९८॥***

*म.* ***। जाती घालुनि मित्र-करी कर । स्नेह न थोडा, शिथिल कलेवर ॥५॥***
***। मित्र! मला तें स्थान दाखवा । जरा नयन-मन- जळजळ निववा ॥६॥***
***। सिता-रामलक्ष्मण जिथं निजले । वदतां नेत्र-कोनिं जल भरलें ॥७॥***
***। भरत-वचन ऐकुन, सविषादू । नेई तेथें त्वरित निषादू ॥८॥***
दो. ***। रघुवर शुचि शिंशपाताळिं जिथें करिति विश्राम ॥***
***॥ स्नेहे अति सादर भरत करि दंडवत् प्रणाम ॥१९८॥***

**अर्थ** - मित्राच्या हातांत हात घालून चालले आहेत; व अति स्नेहाने (व

थोडा) शरीर (कलेवर) शिथिल पडले आहे. ।।५।। मित्रा! मला ते स्थान दाखवा व डोळ्यांची व मनाची जळजळ (आग, दाह) जरा निववा (कमी करा) ।।६।। सीताराम व लक्ष्मण जेथे झोपले होते असे बोलतां बोलतांच डोळ्यांच्या कोपऱ्यांत पाणी आले (भरले) ।।७।। भरताचे भाषण ऐकून निषादाला विषाद वाटला व तो त्वरेने तेथे घेऊन गेला. ।।८।। जिथे पावन शिंशपावृक्षाच्या खाली रघुवरांनी (रामचंद्रांनी) विश्राम केला होता (झोपले होते) (ते दुरून पाहातांच) भरताने अति स्नेहाने व आदराने दंडवत नमस्कार केला ।।दो. १९८।।

**टीका. चौ. ५-६ - (१) जाती घालुनि मित्रकरीं कर - वा. रा.** सर्ग ८६,८७ व ८८ मुद्दाम पहावे. तेथे सर्व माता, मंत्री व पुरवासी आणि भरत शत्रुघ्न एकदमच रामशय्या पाहण्यास गेले आहेत; जाण्यापूर्वी सर्व हकीगत ऐकतांना भरत मूर्छित झाले आहेत व त्यांची दशा पाहून शत्रुघ्न बेशुद्ध झाले आहेत; पण नंतर जाताना मित्राच्या हातांत हात घालून गेल्याचे वर्णन (सर्ग ८८) नाही. येथे प्रथम एकटे भरत गुहा बरोबर निघाले आहेत. शय्या दर्शनास जाण्याचा विचार मनात आला मात्र आणि भरताचे हातपाय गळले ! तो प्रश्न अजून विचारावयाचा आहे! **(क) मित्र मला ते स्थान दाखवा -** येथील प्रश्नावरून ठरते की लक्ष्मण पाहरा देत जागत बसले होते वगैरे हकीगत भरतांस कळलेली नाही. यांत गुहाची दक्षता दिसून येते. न विचारता सांगून भरतास आणखी शोकाकुल करणे बरे नव्हे म्हणून मानसांतील गुहाने सांगितले नाही. **वा. रा. गुह असा दक्ष नाही. १. मित्र मला ते स्थान दाखवा'** याच्या पुढे **'सितारामलक्ष्मण जिथे निजले'** हा चरण पाहिजे होता; पण तसे न होता **'जरा नयनमनजळजळ निववा'** हे शब्द पुढे आले. या व्यथित भाषणाने हे दिसते की 'ते स्थान' हे शब्द व त्याच्या शी संबंधित घटना यांचा विचार मनांत येतांच अति स्नेहाने वाणी व्याकुळ झाली. प्रथम शरीर शिथिल झाले हे स्पष्ट सांगितले आहे; पण बुद्धीत शैथिल्य येऊन वाणीही शिथिल झाली हे शब्दांनी न सांगता वाणीत उत्पन्न झालेली असंबद्धताच प्रत्यक्ष दाखविली. हे **नाट्यकाव्याचे सौंदर्य आहे;** हा दूरान्वयदोष नसून काव्यभूषण व भावप्रदर्शन आहे. **(ख) जरा नयन मम जळजळ निववा - भाव हा की 'ना दिसतां रघुनाथ पद उर-जळजळ ना जाइ' (१८२).** ही (६ वी) चौपाई श्रवण केल्याने गुहाला कोणत्या स्थानाचा बोध झाला असेल? तो तर बुचकळ्यांतच पडला असेल की यांना कोणते स्थान दाखवू? 'ते स्थान' म्हणजे कोणते स्थान?

त्याने आश्चर्यचकित मुद्रेने भरताच्या मुखाकडे जिज्ञासेने पाहिले असेल तेव्हा भरतास आपली चूक कळली व ते स्थान म्हणजे कोणते ते सांगतात.

**चौ. ७-८ - (१) 'सिताराम.... नेत्रकोनिं जल भरलें** - सीतारामलक्ष्मण दर्शनाशिवाय डोळ्यांचा व हृदयाचा दाह शमणार नाहीच; पण आज त्यांच्या शय्यांचे दर्शन होणार म्हणून प्रेमाश्रु आले आहेत व त्यांत आनंदाचे मिश्रण आहे. कोए = कोने, कोपरे. **(क) भरत वचन ऐकुन सविषादू ... निषादू** - त्या भाषणांतील असंबद्धतेवरून प्रथम कळले की भरत फार व्याकुळ झाले आहेत; व त्यामुळे तो निषाद असून सुद्धा त्याला विषाद वाटला व चिंता उत्पन्न झाली की, ती तृणशय्या पाहिल्यावर यांचे काय होईल! पण विलंब करणेसुद्धा धोक्याचेच वाटले म्हणून घाई घाईने तिकडे घेऊन गेला.

**दो. (१) रघुवर शुचि शिंशपातळिं** - रघुकुलश्रेष्ठ ! आणि शिंशपावृक्षाच्या खाली ! या दोन कल्पनांचा संयोग भरताच्या हृदयाला विदीर्ण करील की काय अशी चिंता गुहाला लागली. तृणपर्णशय्येवर सीतारामांस झोपलेली पाहून माझे रानटी कुलिश कठोर हृदय पाझरले, मग ती शय्या पाहून यांच्या लोण्यापेक्षा मऊ व गंगेपेक्षा निर्मळ हृदयाचे काय होईल कोणास ठाऊक ! **(क) शुचि शिंशपा** - (शिंशपावृक्ष) शिसवीचे झाड काही वड पिंपळ उंबर इत्यादि वृक्षांसारखे सहज पवित्र नाही; पण रामचंद्रांनी तिथे रात्रभर निवास केल्यामुळे ते पवित्र झाले आहे. ज्या वृक्षांखाली राम घटकाभर विश्रांतीला थांबले त्या वृक्षांची प्रशंसा कल्पवृक्षांनी व देवांनी केली (११३।७ पहा); मग येथे तर राम रात्रभर राहिले; फलाहार केला, जटा बनविल्या! तेव्हा या वृक्षाचे पावित्र्य किती हे कसे सांगणार! **(ख) भरत करि दंडवत् प्रणाम** - हा नमस्कार शय्या दुरून दिसल्याबरोबर घातला; असा अर्थ घेणे भाग आहे; कारण प्रदक्षिणा व नमस्कार यांचा उल्लेख आता पुढे आहेच.

*हिं.* *। कुस साँथरी निहारि सुहाई । कीन्ह प्रनामु प्रदच्छिन जाई ॥१॥*
*। चरन रेख रज आँखिन्ह लाई । बनइ न कहत प्रीति अधिकाई ॥२॥*
*। कनक बिंदु दुइ चारिक देखे । राखे सीस सीय सम लेखे ॥३॥*
*। सजल बिलोचन हृदयँ गलानी । कहत सखा सन वचन सुबानी ॥४॥*

*म.* *। सुंदर कुश-शयनास पाहिलें । प्रदक्षिणा घालुनि मग नमिलें ॥१॥*
*। चरण-रेख-रज नेत्रां लावत । प्रीति - अधिकता नाहीं वदवत ॥२॥*

***। दोनचार कांचनकण दिसले । ठेविति शिरिं, सीतेसम गणले ॥३॥***
***। सजल विलोचन हृदयीं ग्लानी । मित्रा वदले वचन सुवाणीं ॥४॥***

**अर्थ** - (जवळ जाऊन) ती सुंदर कुश (व किसलय) शय्या पाहिली व तिला प्रदक्षिणा घालून (साष्टांग) नमस्कार केला. ॥१॥ तेथील रामचंद्रांच्या चरणचिन्हांची धूळ डोळ्यांस लावताना प्रीति इतकी अधिक झाली वाढली की तिचे वर्णन करवत नाही. ॥२॥ सोन्याचे दोनचार कण (टिकल्या) दिसले; (ते घेऊन) मस्तकावर ठेवले व त्यांना सीतेसारखे मानले. ॥३॥ डोळे पाण्याने भरले व हृदयास ग्लानि आली आहे; (अशा दशेत) सुंदर वाणीने मित्रास म्हणाले ॥४॥

**टीका. - चौ. १-२ - (१) 'सुंदर कुश - शयनास - ' 'करि तयार गुह शयना तोवर । कुश-किसलयमय, मृदुल मनोहर'** (८९।७) यावरील टीका पहावी म्हणजे कुशशय्या सुंदर कशी झाली या शंकेचे निरसन होईल. ही शय्या तयार केल्यास आज ४४ दिवस होऊन गेले; तरी शय्या आहे व सुंदर आहे व रामचंद्रांची मातीत उमटलेली पावले अजून ओळखण्याइतकी सुरक्षित आहेत. यावरून ठरते की गुहाने कडक बंदोबस्त ठेऊन त्या शय्येचे वगैरे संरक्षण अत्यंत दक्षतेने व आदराने आजपर्यंत केले आहे ! गंगा तटी, उघड्यावर, धूळ व वारा यांनी केव्हाच सर्व अस्ताव्यस्त होऊन जावयाचे, व काळजीपूर्वक संरक्षण केले तरी अशा सुस्थितीत राहणे अशक्य असून ती चिन्हे सुद्धा राहिली आहेत त्या अर्थी **यांत प्रभुप्रतापाचा बराच अंश आहे हे मानावेच लागेल. ल.ठे. भक्तिमार्गात उपास्यदेवतेच्या व सद्गुरूच्या अवशेषांबद्दल किती प्रेम व आदर पाहिजे याचे हे प्रात्यक्षिक आहे !** याचे नांव प्रेमभक्ति, पराभक्ति ! **(क) चरणरेखरज नेत्रां लावत - 'हर्षति निरखत राम-पदांकां । जणूं लाभला परीस रंका ॥ रज शिरिं हृदया नयनां लावति । रघुवरभेटीसम सुख पावति ॥२३८।३-४॥** येथे नुसत्या नेत्रांचा उल्लेख असला तरी वरील अवतरणात वर्णन केल्याप्रमाणे 'शिरीं हृदया नयनां लावती' असाच अर्थ घेणे जरूर आहे; कारण ते वर्णन भरताचेच आहे. रघुवरभेटीसारखे सुखही क्षणमात्र झालेच.

**चौ. ३-४ - (१) दोनचार कांचन कण दिसले - गणले** - कांचनकण = सोन्याच्या बारीक टिकल्या, कुंकवावर व हळदीवर लावण्याची पद्धति महाराष्ट्रातही होती व अजूनही कुठे कुठे तुरळक आहे. त्या टिकल्या तिथे गळून पडल्या होत्या असे ठरते. **हा उल्लेख** याच प्रकरणात **वा.रा. व अ.रा. यांतही आहेच.**

**(क) हृदयीं ग्लानी** - ९०।५ पासून ९९।७ पर्यंत गुहाने जे विचार प्रगट केले आहेत त्यांत अशी भर घालावी - अशा सीतेला हे असले दुःख सहन करण्याची पाळी केवळ माझ्यामुळे आली इत्यादी भरताच्या भावना. या ग्लानीचा थोडा नमुना पुढील चौपायांत व दोह्यात आहे.

*हिं.* ***। श्रीहत सीय बिरहँ दुतिहीना । जथा अवध नरनारि मलीना ॥५॥***
***। पिता जनक देउँ पटतर केही । करतल भोगु जोगु जग जेही ॥६॥***
***। ससुर भानुकुल भानु भुआलू । जेहि सिहात अमरावतिपालू ॥७॥***
***। प्राननाथु रघुनाथ गोसाईं । जो बड होत सो राम बडाईं ॥८॥***
*दो.* ***। पति देवता सुतीय मनि सीय साँथरी देखि ॥***
***॥ बिहरत हृदउ न हहरि हर पबि तें कठिन बिसेषि ॥१९९॥***
*म.* ***। श्रीहत सिताविरहिं दुतिहीनही । जशीं नगरनरनारि मलीन हि ॥५॥***
***। पिता जनक तुलना कोणाशीं । करतलिं भोग योग जगिं ज्यांसी ॥६॥***
***। श्वशुर भानुकुलभानु भूपती । अमरावतिपति हेवा करती ॥७॥***
***। प्राणनाथ तों प्रभु रघुनंदन । राममहतिनें बड्यां बडेपण ॥८॥***
*दो.* ***। पतिव्रता-स्त्री शिरोमणि सीता-शेज बघून ॥***
***॥ हृदय न कंपुनि फुटत हर ! कठिण फार पविहून ॥१९९॥***

**अर्थ** - जसे अयोध्येतील पुरुष स्त्रिया दीन मलीन दिसत आहेत तसेच हे कांचन - कण सीतेच्या विरहाने शोभाहीन (श्रीहत) व तेजोहीन झाले आहेत. ॥५॥ जिचे वडील (पिता) जनकराज असे आहेत की त्यांच्या तुलनेस कोणी नाही व जगांतील सर्व भोग व योग त्यांच्या मुठीत आहेत. ॥६॥ ज्यांचा हेवा अमरावतिपति - इंद्र - करतात असे भानुकुल भानु भूपती जिचे श्वशुर (सासर) ॥७॥ व तिचे प्राणनाथ (पति) प्रभु रघुनंदन (रघुनाथ) असे आहेत की मोठ्यांना जो मोठेपणा मिळतो तो त्यांच्याच-रामाच्याच-महतीने ॥८॥ त्या पतिव्रता स्त्री शिरोमणि सीतेची (ही) तृणपर्णशय्या पाहून हर ! हर ! हे माझे हृदय कंप सुटून फुटले नाही ! फुटत नाही, त्या अर्थी ते वज्रापेक्षा फार कठीण असलेच पाहिजे ॥दो. १९९॥

**टीका - चौ. ५ - (१) श्रीहत सिताविरहिं दुतिहीनहि - दुति =** द्युति, तेज. ते सोन्याचे कण माती लागून मळकट व निस्तेज झाले आहेत. भरतास वाटत आहे की सीतेचा व यांचा वियोग झाल्यामुळे ते मनांत दुःखी, शरीराने मलीन

व उदासमुख झाले आहेत, जसे अयोध्येतील लोक झाले आहेत राम विरहाने. सीतेच्या कांकणावर, वस्त्रांवर वगैरे असतां त्यांना जी शोभा व तेज असतील ती आज दिसणे शक्यच नाही. 'सुंदर सुंदरतेला करते' अशी सीता आहे. सीतेच्या पायांतील नूपुरांनी केलेली विनंती (५८|६) पहावी. **(क) सूचना - पाठभेद - मा.पी.** व मानसांक यांत 'मलीना' ऐवजी 'विलीना' पाठ आहे. पण त्याचा अर्थ ओढून ताणून कसातरी करावा लागतो; व मा. पी. संपादक (पृ. ७६१) म्हणतात की "फक्त एका पोथी शिवाय बाकी सर्व पोथ्यांत 'मलीना' पाठ आहे." म्हणून व 'मलीना' च अयोध्येतील लोकांच्या विरहदशावर्णनांत वापरलेला आहे. **'तन कृस मन दुख** बदन मलीना' (७६|८) व 'बिलीना' शब्द मानसांत कुठेच वापरलेला नाही. म्हणून 'मलीना' पाठच अनुवादाकरतां घेतला आहे. मा.पी. मध्ये 'बिलीना' पाठ घेऊन अर्थ 'मलिन पड गए' असाच दिला आहे!

**चौ. ६-८** - (१) पिताजनक **तुलना कोणासी'** वगैरे दोन चौपायांतील विषय पूर्वी याच भावनेने ९८|६-७ मध्ये व ९८|१-४ मध्ये सविस्तर वर्णिलेला पहावा. **(क) राममहतिने** बड्या बडेपण - **'पूजनीय जे प्रिय अति जितके । मान्य रामनात्यानें तितके'** (७४|७) टीका पहावी. भाव हा की ज्यांच्या महतीच्या, प्रभावाच्या एका अत्यल्प लवलेशाने मोठ्याचा मोठेपणा, प्रभाव इ. असतात असे जे परमात्मा तेच राम आणि ते सीतेचे प्राणनाथ आहेत.

**दो. (१) पतिव्रता स्त्री शिरोमणि** - भाव हा की अशी सर्व प्रकारे परम ऐश्वर्यात व सुखांत वाढलेली सीता, ते सर्व ऐश्वर्य, ते सर्व भोग व ती सर्व अलौकिक अशी नात्याची माणसे सोडून या तृणपर्णशय्येवर सुखाने झोपली; यानेच तिचे पतिव्रता शिरोमणित्व सिद्ध होते. मी मात्र रामलघुबंधु असून ही शय्या पाहण्यास जिवंत राहिलो आहे ! सीतेच्या या वनवास दुःखाचे कारण मीच आहे, व ही शय्या मी उघड्या डोळ्यांनी बघत आहे, व माझ्या हृदयाचा थरकाप होऊन त्याचे तुकडे होत नाहीत! त्या अर्थी माझे हृदय वज्रापेक्षा अत्यंत कठोर आहे यांत शंका नाही. याप्रमाणे भरत आत्मग्लानिवश होऊन बोलत आहेत.

*हिं.* *। लालन जोगु लखन लघु लोने । भे न भाइ अस अहहिं न होने ॥१॥*
*। पुरजन प्रिय पितु मातु दुलारे । सिय रघुबीरहि प्रान पिआरे ॥२॥*
*। मृदु मूरति सुकुमार सुभाऊ । तात बाउ तन लाग न काऊ ॥३॥*
*। ते बन सहहिं बिपति सब भाँति । निदरे कोटि कुलिस एहिं छाती ॥४॥*

म. *। लालन-योग्य चारु लघु लक्ष्मण । असा त्रिकाळिं न बंधु सुलक्षण ॥१॥*
*। प्रिय पुरजनां लाडका पितरां । प्राणप्रिय सीता-रघुवीरां ॥२॥*
*। कोमल मूर्ती मृदू स्वभावहि । देहा महित गरम हवा नहिं ॥३॥*
*। ते विपत्ति अवघ्या वनिं साहति । कोटि कुलिश या हृदया लाजति ॥४॥*

**अर्थ** - लक्ष्मणा सारखा सुंदर, लाड करण्यासारखा लहान व सुलक्षण भाऊ भूत भविष्य व वर्तमान या तिन्ही काळांत नाही ॥१॥ पुरजनानां प्रिय, आईबापांचा लाडका आणि सीता व रघुवीर यांना तर प्राणासारखा प्रिय ॥२॥ शरीर (मूर्ती) नाजुक व स्वभाव सुद्धा कोवळा ! ज्याच्या देहाला गरम हवा कधीच माहीत नाही. ॥३॥ त्याला (आज) वनांत सगळ्यांच विपत्ति सोसाव्या लागत आहेत; (पण) माझ्या हृदयाला कोटि कुलिशें सुद्धा लाजत असतील. (कारण एवढे सर्व ऐकून सुद्धा अद्याप याचे तुकडे झाले नाहीत) ॥४॥

**टीका. चौ. १** - (१) सीताराम तृणशय्येवर झोपल्याचे ऐकले व ती शय्या दिसली. लक्ष्मण झोपल्याचे कळले नाही व शय्यासुद्धा कोठेच दिसली नाही; यावरून सर्व जाणले व त्यामुळे हृदयास दुःसह दुःख व ग्लानि झाल्यामुळे प्रथम आता लक्ष्मणाविषयीच गुहाला सांगू लागले. (क) **लालनयोग्य लघु** - लाड करण्यासारखा लहान लक्ष्मण. भरतापेक्षां काही तासांनी मोठे असतील इतकेच. विश्वामित्रांबरोबर घोर वनांतून मुनिबालकांप्रमाणे थंडीच्या दिवसांत अनवाणी पायी चालत जाऊन घोर निशाचर सैन्याचा फडशा उडविला, भृगुपति सारख्या परम विकराल क्षत्रिय कुलद्रोही, विश्वविजयी संक्रुद्ध वीराचा नुसत्या वाग्युद्धांत पराभव करून त्यास अगदी तेजोहत केला व या सर्व गोष्टी १५ वे वर्ष लागण्याच्या सुमारास केल्या इ. सर्व भरतास माहीत असता, व भरत अवघे एक दिवसाने मोठे व सावत्र भाऊ असता त्यास लक्ष्मण ५।७ वर्षांच्या बालकासारखा लहान. लाड करण्यासारखा वाटत आहे ! '**ज्येष्ठो भ्राता पितुः समः' हे वाक्यही भरतांच्या या वात्सल्यभावनेला लाजेल** ! मातांच्या ठिकाणीसुद्धा इतके वात्सल्य आज दिसेल असे वाटत नाही. भ्रातृवात्सल्याची अलौकिक परमावधि झालेली दिसते. (ख) **लालन योग्य का** ? सुंदर, लहान व गुणवान आहे; शरीराने नाजुक, स्वभावानेही कोमल, पुरजनांना प्रिय व आईबापांचा लाडका असा असल्याने दुःख कष्ट भीति यांचे प्रसंगच कधी त्याच्यावर आले नाहीत. मनाचा अगदी हळवा ! त्यामुळे दुःख कष्ट मनानेसुद्धा सहन करण्यासारखा

नाही त्याच्या रूपाला व एकेक सुंदर गुणाला दृष्ट लागायला वेळ नाही! इ. प्रकारे मनांत विचार चालले आहेत. या प्रत्येक चौपाइतील शब्द कार्यकारणपरंपरेने संबद्ध आहेत; पण त्या सर्वांचे विश्लेषण करू लागल्यास विस्तार किती होईल कोणास ठाऊक !

**चौ. २-३** (१) **प्राणप्रिय सीता रघुवीरां** - सीता व रघुवीर त्याला प्राणांपेक्षा जास्त जपतील. रघुवीर आपल्या सर्वप्रकारच्या वीरतेचा उपयोग त्याच्यासाठी करतील व क्लेशहारिणी सीता त्याचे सर्व क्लेशनिवारण करण्याचा प्रयत्न जीव तोडून करील हे खरे असले तरी ऊन पाऊस, थंडी, वारा, व्याघ्रसिंहाच्या गर्जना इत्यादि नैसर्गिक विपत्ती शरीराची मृदुता व संकोची स्वभाव या गोष्टींत बदल कसा करता येणार? (क) **देहा माहित गरम हवा नाही** - गंगेच्या काठी पुनीत शिंशपा वृक्षाखालीसुद्धा सध्या भरतांसच ग्रीष्म्याच्या उन्हाळ्याचे चटके बसत आहेत; त्यामुळे हा उल्लेख केला गेला इतकेच. उन्हाच्या कवडशांत जरा चुकून खेळला तर घामाघूम होत असे. आतां डोंगरांतील, काटक माणसालासुद्धा चटके देणारी हवा = वारा कसा सहन होईल! **'सदा स्वभाव बंधू तव कोमल'** (६।६१।३) असे रघुवीरानेसुद्धा म्हटले आहे व विप्ररूपाने भेटण्यास आलेल्या, डोंगरांतच राहण्याची सवय असलेल्या, हनुमंताने रामलक्ष्मणांविषयी, त्यांना ओळखण्यापूर्वीच म्हटले आहे की **'कठिण भूमि कोमलपदगामी ।' 'मृदुल मनोहर सुंदर जरि वपु । सहतां दुःसह वनिं वातातपु'** (४।१।८-९)

**चौ. ४** - (१) **कोटि कुलिश या हृदया लाजति** - रघुवीरविहीन रघुवीरनिवास दृष्टीस पडल्यावर हृदय फुटले नाही म्हणून रामसीता लक्ष्मण यांच्या वनवास दुःखाचा विचार अयोध्येतील दरबारांत करताना म्हटले की **'किती वदू मी हृदय कठिणता । कुलिशा लाजवि मिळवि महत्ता'** (१७९।८) नंतर सीतेची तृणशय्या प्रत्यक्ष पाहूनसुद्धा फुटले नाही तेव्हा म्हटले की **'कठिण फार पविहून'** (१९९) नुसत्या विचारानेच होणाऱ्या परिणामापेक्षा ते दृश्य प्रत्यक्ष पाहिल्यावर सहजच विशेष जास्त परिणाम होणे स्वाभाविक असते; पण तसा झाला नाही म्हणून पवीहून फारच कठीण म्हटले व येथे, लक्ष्मण कोमल असून रात्री जरा आडवासुद्धा झाला नाही हे जाणले, तृणशय्यासुद्धा दिसली नाही; तेव्हा त्यापेक्षा अधिक दुःख होणे मनुष्य स्वभावानुसार जरूर होते; पण तसे झाले नाही म्हणून 'फार कठीण पविहून' पेक्षा कितीतरी जास्त कठीण आहे हृदय हे ठरले म्हणून येथे म्हटले की

'कोटिकुलिश या हृदया लाजति' **परिस्थितिसापेक्ष किती सुंदर समन्वय साधला आहे!** प्रत्येक ठिकाणी 'कुलिशाहून कठोर' इतकेच म्हटले असते तर ते शोभले असते का? **यांतच कवीच्या मनुष्यस्वभावज्ञानाची व वर्ण्यविषयांशी व त्या व्यक्तीच्या भावनांशी तादात्म्य पावण्याची साक्ष पटते.** अशी उदाहरणे जागो जागी आहेत.

***हिं.*** ***। राम जनमि जगु कीन्ह उजागर । रूप सील सुख सब गुन सागर ॥५॥***
***। पुरजन परिजन गुर पितु माता । राम सुभाउ सबहि सुखदाता ॥६॥***
***। बैरिउ राम बडाई करहीं । बोलनि मिलनि बिनय मन हरहीं ॥७॥***
***। सारद कोटि कोटि सत सेषा । करि न सकहिं प्रभु गुन गन लेखा ॥८॥***

***दो.*** ***। सुखस्वरूप रघुबंसमनि मंगल मोद निधान ॥***
***॥ ते सोवत कुस डासि महि बिधिगति अति बलवान ॥२००॥***

***म.*** ***। रामें जन्मुनि कृत जग भास्वर । रूप - शील - सुख - सबगुण - सागर ॥५॥***
***। पुरजन परिजन गुरु पितृ माता । रामस्वभाव सब-सुख-दाता ॥६॥***
***। वैरीही रामाला स्तवती । 'भाषण - भेट - विनयिं मन हरती' ॥७॥***
***। कोटी शारदा अनंत शेषां । न वर्णवि प्रभु-गुण-गण-लेशा ॥८॥***

***दो.*** ***। सुखस्वरूप रघुवंशमणि मंगल - मोद - निधान ।***
***॥ ते कुशशय्ये झोपती विधिगति अति बलवान ॥२००॥***

**अर्थ** - रामचंद्रांनी जन्माला येऊन जग प्रकाशमय केले; ते रूपशील सुख व सर्व सद्‌गुण यांचे सागर आहेत ॥५॥ अयोध्यावासी प्रजा, परिवार, कुलगुरू, पिता व माता या सर्वांना सुख देणारा रामाचा स्वभाव आहे. ॥६॥ (रघुकुळाचे) वैरीसुद्धा रामाची महती गातात की राम बोलणे, भेटणे व नम्रता यांनी मन हरण करतात. ॥७॥ कोटि शारदा व अगणित (शतकोटी) शेष यांनासुद्धा प्रभूच्या गुणसमुदायाच्या लेशाचेसुद्धा वर्णन करतां येत नाही (तेथे मी काय किती सांगणार!) ॥८॥ सुखस्वरूप, रघुवंशशिरोमणि मंगल (कल्याण) व आनंद यांचे निधान असून ते कुशपर्णशय्येवर झोपतात ! तेव्हा दैवगति अति बलवान आहे (असेच म्हणणे भाग आहे.) ॥दो. २००॥

**टीका. - चौ. ५ - (१) रामें जन्मुनि कृत जग भास्वर - भास्वर** = प्रकाशमय. रूपशील सुख व सद्‌गुण यांचा प्रकाश सर्वत्र पाडला; म्हणजेच राम रूपशीलसुख सद्‌गुण सागर आहेत अशी कीर्ती जगात पसरली. **'भवत्सुतां पुसणें किं अवश्यक। पुरुषसिंह जे जगत्प्रकाशक ॥ ज्यांच्या यशाप्रतापा पुढतीं। शशि मलीन, रवि शीतल**

**गमती'** (१।२९२ - १-२) अशी अनेक वचने मानसांत आहेत. **(क) ल. ठे.** - येथे 'जन्मुनि' म्हटले असले तरि **'न वर्णवे प्रभु गुण- गणलेशा'** याने सुचविले आहे की राम परमात्मा आहेत. येथे जन्मुनि म्हणण्यात मुख्य भाव हा आहे की मी मात्र जन्मून रामचंद्रास वनवास दुःख देणारा झालो. **'मम जन्मच रघुनाथवनास्तव'** (१८२।८)

**चौ. ६. (१) पुरजन परिजन... सुखदाता** - यांतील प्रथम चरणाने विविध नात्यांचा बोध होतो. कोणीही नातेवाईक असो त्याला सुख देणे हा रामाचा स्वभाव आहे; ते कार्य त्यांच्याकडून सहज घडते. **उपदेश - सुख पाहिजे - असेल तर रामाशी कोणतेतरी नाते जोडून** त्या नात्याप्रमाणे वागा. म्हणजे सुख मिळेल. रामाचे व्हा म्हणजे सुख सहज मिळेल. **'ताव द्रागादयः स्तेनास्तावत्कारागृहं गृहं । तावन् मोहोंघ्रिनिगडो यावत् कृष्ण न ते जनः'** (भाग. १०।१४।३६) असे ब्रह्मदेवाने म्हटले आहे. ध्वनि हा आहे की भरत म्हणतात मी मात्र या सर्वांना दुःखदाता (झालो) जन्माला आलो.

**चौ. ७ - (१) वैरीही रामाला स्तवती** - या चरणाचे दोन दृष्टीनी अर्थ करणे जरूर आहे. एक भरताचे वचन या दृष्टीने व दुसरा संपूर्ण रामचरित्र अवलोकन केले त्यांच्या दृष्टीने. **१. भरतवचन यादृष्टीने** - वैरी = रघुकुळाचे वैरी, खरदूषण मारीचादि शत्रूंनी केलेली प्रशंसा अद्याप अस्तित्वांत नाही, भरतांस माहीत नाही, दशरथांच्या वचनाने, हाच अर्थ सिद्ध होतो. - **'सेवक सचिव सकल पुरवासी । जे आम्हां अरि मित्र उदासी ॥ प्रिय मज राम तसे सर्वांप्रत ॥'** (२।३।२-३) जे आमचे अरि आहेत त्यांना ही राम प्रिय आहेत. भरताचा हाच भाव आहे. रामाला वैरी मानणारे इतर कोणी नाहीत. ध्वनि हा आहे की एका या देहाच्या जननीशिवाय रामाला वैरी मानणारी व्यक्ती नाही. मी तिचाच मुलगा ! म्हणून मी रामवैरी - रामविरोधी - रामद्रोही बनलो. हे पुढे (२०१।६) स्पष्ट सांगणार आहेत. **२. दुसऱ्या दृष्टीने अर्थ** - रामशत्रुंनीही रामाची प्रशंसा केली आहे. **'ते नररूप चराचर ईश्वर'** पासून **'जरि नर तरि अति तात ! शूरते । वैर तयांसि न पडेल पुरतें'** पर्यंत (३।२५। ३-८) पहा. ही मारीचाने प्रशंसा केली आहे. नाककान कापले गेल्यावर शूर्पणखा रावणसभेत सांगते - **'पुरुषसिंह वनिं मृगये अटती' पासून 'शोभाधाम राम तो नामां' पर्यंत (३।२२।३ -८) पहा. हा कुणि नृपबालक नरभूषण ॥ ऐका ! जन्मामधेंहि नाहीं । कुठे पाहिली सुंदरता ही'**

(३।१९।२,४) खर - दूषण म्हणाले. **'निघति दूत वर्णित गुणगाथा ॥ वदत रामयश लंके आले'** (रावणाचे हेर ५।५३।१-२) मंदोदरीने अनेक वेळा रामप्रशंसा केली आहे. रावणपुत्र प्रहस्ताने केलेली (६।९।५ - ९० पहा) कुंभकर्णाने रावणाजवळ केलेली ६।६३।२ -५ पहा. **'धन्वी सकल लोक विख्याता'** असे स्वतः रावण म्हणाला आहे. **(क) भाषण - भेट - विनथिं मन हरती** - असे रघुकुळाचे शत्रु रामाविषयी म्हणतात. म्हणजेच ते रामाला प्रिय मानतात (२।३।२-३ दशरथवचन पहा) कैकेयी रघुकुळांतील सर्वांत आवडती राणी ! तिला मात्र राम शत्रु वाटले. रामाचे बोलणे, भेटणे विनय इत्यादींनी तिचे हृदय मात्र पालटू शकले नाही !

**चौ. ८ - (१) कोटिशारदा अनंत शेषां - लेशा - 'अयुत शारदा शेष मिळोनी । कल्प कोटी जरि बघति गणोनी ॥... आपल्या गुणगाथा । सरति न वदतां श्रुणु रघुनाथा' (१।३४२।२-३)** असे जनकराजा म्हणाले आहेत. अशी पुष्कळ वचने आहेत, पण एक पुरे.

**दो. (१) ते कुशशय्ये झोपती विधिगति अति बलवान' - 'सिताराम ते तृणशयना वरि । श्रांत वसनविण बघवत ना तरि' 'कर्म प्रधान वदति सत्य जन'** (९१।३,८) असे निषादराजच म्हणाला आहे. वा. रा. स. ८८ त भरतानेच **'न नूनं दैवतं किंचित् कालेन बलवत्तरम्' यत्र दाशरथी रामो भूमामेमशेत सः'** (११) असे शय्यादर्शनानंतर म्हटले आहे. या प्रमाणे कोणी कर्म म्हटले, कुठे काळ म्हटले तर, येथे भरत बिधि = दैव (ब्रह्मदेव) म्हणाले. दैवगति अति विचित्र व बलवान यांत शंका नाही. **'ऐका तात । तुम्हां मुनि म्हणती । राम चराचर नायक असती ॥ शुभ वा अशुभ कर्म - अनुसारें ॥ ईश देइ फल हृदय विचारें ॥ कर्म करी जो त्या फळ मिळती । निगम नीति अशि, सगळे वदती ॥ एक कोणि अपराध करि भोगी दुजा फळास ?॥** ७७।६-८ व ७७). असे दशरथ म्हणाले; त्यावर राम म्हणाले की 'अति विचित्र भगवंत गति जगीं कळे कोणास ?'॥७७॥ २।७७।६ दो. ७७ पर्यंतची टीका पहावी म्हणजे कर्म कोणाचे, दैव कोणाचे इ. स्पष्ट होईल. राम म्हणाले 'भगवंतगति' यावरून विधि = भगवान असा गूढार्थ निघतो; कारण येथे **'बिधिगति अति बलवान'** म्हटले आहे. **भगवन्ताला कर्म, कर्मभोग नाही.** 'क्लेश-कर्म बिपाकाशगैरपरिमृष्टः पुरुषविशेष ईश्वरः' (पा. यो. १।२४) अविद्यादि पंच क्लेश, कर्म, कर्माचे फळ, व वासना यांचा तिन्ही काळांतही ज्याच्याशी संबंध नाही असा जो पुरुष विशेष तो ईश्वर.

*हिं. । राम सुना दुखु कान न काऊ । जीवनतरु जिमि जोगवइ राऊ ॥१॥*
*। पलक नयन फनि मनि जेहि भाँती । जोगवहिं जननि सकल दिन राती ॥२॥*
*। ते अब फिरत बिपिन पदचारी । कंद मूल फल मूल अहारी ॥३॥*
*। धिग कैकई अमंगल मूला । भइसि प्रान प्रियतम प्रतिकूला ॥४॥*
*। मैं धिग धिग अघ उदधि अभागी । सबु उतपातु भयउ जेहि लागी ॥५॥*
*। कुल कलंकु करि सृजेउ बिधाताँ । साइँदोह मोहि कीन्ह कुमाताँ ॥६॥*
*म. । राम कानिं कधिं दुःख न पडलें । जीवनतरु - सम राजा जपले ॥१॥*
*। अक्षां पक्ष्म मणिस फणि जेवीं । जपति जननि सब दिननिशिं तेवीं ॥२॥*
*। ते वनिं अतां फिरति पदचारी । कंद-मूल-फल - फूलाहारी ॥३॥*
*। धिक् कैकयी अमंगल-मूला । प्राणप्रियतमिं जी प्रतिकूला ॥४॥*
*। धिग् धिग् मी अघसिंधु अभागीं । हे उत्पात सर्व ज्यालागीं ॥५॥*
*। कुल-कलंक मज सृजी विधाता । स्वामी द्रोही करी कुमाता ॥६॥*

**अर्थ** - रामचंद्रांनी दुःख कधी कानांनी ऐकले सुद्धा नव्हते; जीवनतरुला जपावे तसे महाराजा त्यांना जपत असत.॥१॥ डोळ्याच्या पापण्या बुबुळांना व सर्प जसे मण्याला जपतात तशा सर्व माता ज्यांना दिवसरात्र जपत होत्या ते आता वनात पायांनी हिंडत आहेत; आणि कंदमूलफल-फुले यांचा आहार करीत आहेत.॥२-३॥ अमंगल मूल असलेल्या कैकयीला धिक्कार असो; कारण प्राणांना सर्वांपेक्षा प्रिय (प्रियतम) असलेल्या रामास ती प्रतिकूल झाली.॥४॥ ज्याच्यासाठी - ज्याच्यामुळे हे सर्व उत्पात घडले त्या पापसिंधु अभाग्याला मला धिक्कार, धिक्कार असो.॥५॥ विधात्याने मला कुलकलंक जन्मास घातला व कुमातेने मला स्वामीद्रोही केला.॥६॥

**टीका. चौ. १ - (१) रामकानिं कधिं दुःख न पडलें** - दुःख म्हणजे काय हे कधी ज्यांना ऐकूनसुद्धा माहीत नव्हते त्यांना आज सर्व दुःखे सोसावी लागत आहेत. 'राम कारुणिक मृदू स्वभावें । प्रथम दृष्ट दुख कानिं न ठावें' (४०।३) **(क) जीवनतरु =** संजीवन वृक्ष. कोणी टीकाकार म्हणतात की ज्याच्यावर जीवन अवलंबून असते, व जो उपटला असता मरण येते असा एक वृक्ष. याची कथा महाभारतात आहे असे ते म्हणतात पण कोणत्या पर्वात हेसुद्धा सांगितले नाही. परंतु उपटून टाकलेला वृक्षही मरतोच; तसे रामचंद्रांचे झालेले नाही. 'जिवनमुळीसम जपत राहिलें' (५९।६) असे सीतेविषयी कौसल्येने म्हटले आहे. तेथे ही वरच्या

सारखाच अर्थ वर टीकाकारांनी का घेऊ नये ? संजीवनमुळी सीता जवळ नाही व संजीवनवृक्ष राम जवळ नाही असे ठरले तेव्हा दशरथांस मरण आले. हा अर्थ किती सुसंगत व सुंदर आहे ! निदान सीता परत आली तरी प्राण जगतील असे दशरथांस वाटत होतेच. भारतात कथा आहे इत्यादी टीकाकारांचे म्हणणे केवळ जाणून बुजून केलेली धूळफेकच असली पाहिजे. तशा प्रकारचा वृक्ष असल्यास व त्यास जीवनतरू हे नाव असल्यास येथे दिलेली उपमा सदोष ठरेल; पण मानसांत एकही सदोष, असमर्पक उपमा नाही अशी पक्की खात्री या बुद्धीची झालेली आहे. **(ख)** पुढील चौपाईत 'जननी' जपत असत असे म्हटले आहे; त्याप्रमाणे येथे **जनक किंवा पिता न म्हणता 'राजा' 'राऊ' कां म्हटले ?** भाव हा आहे की ज्यांची जपणूक दशरथांसारखा चक्रवर्ती महाराजा करीत होता, त्यांना कशाची तरी कमतरता कधी असणेच शक्य नव्हते. दुःख त्यांच्या कानांवर कसे जाऊ दिले जाणार? दुःख कानांवरसुद्धा नसल्याचे कारण या दुसऱ्या चरणाने व पुढील चौपाईने सुचविले आहे. सर्व प्रकारचे सुख होते हेही सुचविले गेलेच. पिता ऐश्वर्यसंपन्न व पुत्रांवर फार प्रेम करणारा असला तरच माता पुत्राचे संगोपन उत्तम प्रकारे करून त्याचे सर्व लाड पुरवू शकतील. म्हणून दशरथ राजांचा उल्लेख येथे मातांच्या पूर्वी केला आहे. अशी रचना पाहिली म्हणजे काव्यप्रतिभा व व्यवहाराचे सूक्ष्म ज्ञान यांच्या प्रीतीसंगमाची प्रशंसा करावी तेवढी थोडी असे वाटते.

**चौ. २ (१) अक्षां पक्ष्म मणिस फणि जेवीं - अक्ष** = डोळा, **पक्ष्म** = पापण्या. दोन दृष्टांत होऊन पुढे दिन निशिं म्हटले येथे यथासंख्य अलंकार आहे. पापण्या डोळ्यांना दिवसा = जागृतीत जशा जपू शकतात तशा रात्री = झोपेत जपू शकत नाहीत. म्हणून दुसरा फणिमणि दृष्टान्त दिला. हाच दृष्टान्त रात्री झोपेत जपण्याविषयी पूर्वी दिला आहे. **'सह सुंदर वधु सासू निजती । शिरमणि जणुं उरिं फणी लपवती'** (१।३५८।४) झोपेतसुद्धा किडा, मुंगी इत्यादी कशाही पासून दुःख होऊ नये म्हणून जननी आपल्या अगदी कुशीत घेऊन झोपत असत; व जागेपणी पापण्या डोळ्यांना जशा जपतात तशा सर्व माता जपत असत. **(क)** दोन दृष्टान्तांत **आणखीही महत्त्वाचा भेद आहे -** पापण्या डोळ्यांना जपतात त्या केवळ कर्तव्य म्हणून जपतात. डोळ्यांच्या सुखाने सुखी व दुःखाने त्या दुःखी होत नाहीत. त्यांचे डोळ्यांवर प्राणांसारखे प्रेम नसते. डोळा फुटला तरी

पापण्यांना दुःख होत नाही, डोळ्यांना कमी दिसू लागले तरी पापण्यांना वाईट वाटत नाही. पण सर्पाला मणि प्राणासारखा प्रिय असतो, त्याच्या विरहाने सर्प अत्यंत दुःखी, दीन, म्लान, शोकाकुल व निस्तेज होऊन जीवित त्याला मरणापेक्षाही कष्टतर व दुःसह वाटते. तशी दशा जननीची झाली आहे हे ध्वनित केले. जसे दशरथाचे मरण 'संजीवनतरु' दृष्टान्ताने सुचविले तशी मातांची दुर्दशा फणिमणि दृष्टान्ताने सुचविली. कैकयी आता 'माता' नसून 'कुमाता' आहे हे लक्षात असेलच. **(ख)** रामजननी एकच असून सर्व राण्यांना 'जननी' म्हणून सुचविले की त्या सर्वच ३५० वा ७०० राण्यांना राम आपला स्वतःचाच मुलगा वाटतो; सावत्रपणाची भावना कोणाच्याही चित्तांत नाही.

**चौ. ३ (१) फूलाहारी** - फूल + आहारी, कंदमूल फल पत्र अंकुर यांचा आहार म्हणून उल्लेख पुढे व पूर्वीही केलेला आहे. पण आहारात फुलांचा उल्लेख फक्त येथेच केलेला आहे. फुलांचा आहार किंवा भोजनात उपयोग फारसा कोणास माहीतही नसेल - भाव हा आहे की **'अशन कंदफलमूल ॥ तीं किं सदा प्रतिदिन मिळति सर्व समयिं अनुकूल'** (६२ रघुनाथ वचन आहे) असे असल्याने कंदमूलफळे मिळणार नाहीत त्या वेळी फुले खाऊनसुद्धा रहावे लागत असेल ? अगस्त्याची फुले, शेवग्याची फुले, केळफुले, आंब्यांचा, अशोकाचा मोहोर, चिंचेची फुले, शेवळे इत्यादी अनेक फुले नुसती किंवा भाजी करून खाण्यासारखी आहेत.

**चौ. ४-५ (१) अमंगलमूला** असे कैकयीला म्हटले ते पूर्व संदर्भाला धरूनच आहे. मूळ धरण्यास व वाढण्यास भूमी - जमीन लागते. कैकयीची 'कुमति'च विपत्तिरूपी अमंगलाला मूळ धरण्यास उपयोगी पडली आहे. **'बीज विपत् वर्षा ऋतु किंकरि (दासी कुबडी) कैकयिकुमतिच बने भूमि बरि ॥ पडत कपटजळ अंकुर फुटतो । वर युग दल, फल अंतिं दुःख तों'** (२।२३।५-६ टी.प.) यामुळेच येथे कैकयीचा भरताने धिक्कार केला. **(क) प्राणप्रियतमिं जी प्रतिकूला** - प्राणप्रियतम = प्राणांना सुद्धा इतर सर्वांपेक्षा अधिक प्रिय हा एक अर्थ होतो; व प्राणांसारखे सर्वांहून अधिक प्रिय हा दुसरा अर्थ होतो. **'जीवजंतुजगिं कोण असा ही । प्राणप्रिय रघुनाथ न ज्या ही ॥ तुज ते राम शत्रु अति गमले । कोण सत्य तूं वद मज काळे'** (१६२।६-७) असे भरत कैकयीसच म्हणाले आहेत. तोच भाव येथे आहे. फरक इतकाच की सर्व जीवजंतूंना राम प्राणप्रिय आहेत; पुरजन परिजन गुरु माता यांना प्राणप्रिय तर आहेत व दशरथ राजांस प्राणप्रियतम (प्राणांपेक्षा

प्रिय) होते. **'घडि घडि राव बदति सचिवा गा ! । प्रियतम - सुत - संदेशां सांगा ॥'** प्राणप्रियतमचा संबंध भरताशी जोडण्याचा मोह सहज होण्यासारखा आहे; पण हे भाषण भरताचे आहे व पुढील चौपाईतच भरत स्वतःस रामद्रोही म्हणतात व पूर्वीही असेच त्यांनी म्हटले आहे. ज्याचा द्रोह विरोध करावयाचा तो प्राणप्रियतम कसा होऊ शकेल ? भाव हा आहे की दशरथराजांच्या मरणास हीच कारण झाली. तिला अमंगल मूल म्हटलेच आहे. **या मुळांतून भरत राज्य हा वृक्ष वाढला;** त्याला रामवनवास ही एक शाखा फुटली, लक्ष्मण वनवास ही दुसरी व सीतावनवास ही तिसरी शाखा फुटली; इतरांचे दुःख व शोक वगैरे लहान लहान फांद्या फुटल्या, दशरथ मरण ही फुले आली. असा हा अमंगलमूलवृक्ष वाढला व भरताला अघसिंधुपणा अभागीपणा येणे, स्वामीद्रोही ठरणे इ. फळे लागली ! भरताने स्वतःचा धिक्कार केला. या वेळी कैकयी व इतर प्रजाजन बरोबर असते तर योग्य ठरले असते काय ?

**चौ. ६ (१) कुलकलंक मज सृजी विधाता** - येथे विधाता, कैकयी व भरत या तिघांना भरताने दोषी ठरविले. विधाता सामान्य कारण, कैकयी विशेष कारण व भरत निमित्त कारण. कैकयीला भरत पुत्र नसता तर भरत निमित्त कारण झाले नसते. तिच्या बुद्धीत एकाएकी विशेष बदल झाला नसता तर सामान्य कारण जो विधाता तो काही करू शकला नसता; म्हणूनच भरत म्हणतात की कुळाला कलंक लावण्यासाठीच विधात्याने मला कैकयीसुत उत्पन्न केला. अघसिंधु असेन म्हणूनच कैकयीशिवाय दुसरी जननी मला उदरांत धारण करण्यासारखी विधात्याला आढळली नाही ! आणि नंतरसुद्धा हे अमंगलमूळ धरण्यापूर्वी मी मेलो नाही; याचे कारण अभागी, अन्यथा कुमातेने मला स्वामिद्रोही बनविण्याचा केलेला प्रयत्न सफल झाला नसताच मी परम भाग्यवंत ठरलो असतो; पण अघसिंधु भाग्यवंत ठरणे अशक्य आहे; म्हणजे शेवटी सर्वांचे कारण स्वतःसच ठरविले.

*हिं.* *। सुनि सप्रेम समुझाव निषादू । नाथ करिअ कत बादि बिषादू ॥७॥*
*। राम तुम्हहि प्रिय तुम्ह प्रिय रामहि । यह निरजोसु दोसु बिधि बामहि ॥८॥*
*छं.* *। बिधि बाम की करनी कठिन जेहिं मातु कीन्ही बावरी ।*
*॥ तेहि राति पुनि पुनि करहिं प्रभु सादर सरहना रावरी ॥*
*। तुलसी न तुम्ह सो राम प्रीतमु कहत हौं सौहें किएँ ।*

*॥ परिनाम मंगल जानि अपने आनिए धीरजु हिएँ ॥१॥*

सो. *। अंतरजामी रामु सकुच सप्रेम कृपायतन ॥*

*॥ चलिअ करिअ बिश्रामु यह बिचारि दृढ़ आनि मन ॥२०१॥*

म. *। तैं प्रेमें समजावि निषादू । नाथ ! करां कां वृथा विषादू ॥७॥*

*। तुम्हि रामा प्रिय तुम्हांस रामहि । हा सारांश दोषि विधि वामहि ॥८॥*

छंद. *। कीं वाम विधिची कठिण करणी जननिला करि बावळी ।*

*॥ त्या रात्रिं घडि घडि आदरें प्रभु करिति कीं स्तुति आपुली ॥*

*। प्रियतम न तुलसी कोणि अपणांहून रामा शपथ कीं ।*

*॥ परिणामिं मंगल जाणुनी मनिं धैर्य धरणें नाथ ! कीं ॥१॥*

सो. *। अंतर्यामी राम प्रेम - भीड - करुणायतन ॥*

*॥ चला करा विश्राम या विचारिंदृढ करुनि मन ॥२०१॥*

**अर्थ** - तेव्हा (तैं - भरताचे भाषण ऐकल्यावर) निषादराज प्रेमाने समजूत घालू लागला - (व म्हणाला की) नाथ ! विनाकारण (वृथा) विषाद (शोक) का बरं करतां !॥७॥ तुम्ही रामचंद्रांस प्रिय आहात व राम तुम्हाला प्रिय आहेत. (ही = आणि) सगळ्यांचे सार निष्कर्ष (निरजोसु) एवढाच की वाम विधि दोषी आहे.॥८॥ (कारण) वामविधीची करणी अशी कठीण आहे की त्याने जननीला बावळी केली. (कारण) त्या रात्री प्रभु रामचंद्र आदराने तुमची वारंवार प्रशंसा करीत होते. तुलसीदास म्हणतात की, तो म्हणाला आपल्या सारखा अत्यंत प्रिय रामचंद्रांस कोणी नाही हे मी शपथपूर्वक सांगतो. शेवटी मंगल होईल हे जाणून नाथ ! तुम्ही आपल्या मनात धीर धरावा.॥छंद॥ राम अंतर्यामी असून प्रेम संकोच व करुणा यांचे माहेरघर आहेत या विचाराने मन दृढ करून चला पाहू व घ्या विश्रांति (झोप).॥सो. २०१॥ (निरजोसु - निष्कर्ष).

**टीका. - चौ. ७-८ (१) समजावि निषादू** - अशिक्षित, नीच, हिंसक असलेला, रामबंधु भरताची समजूत घालतो आहे ! कसा योग येतो पहा ! ज्यांनी प्रेरणा देऊन लक्ष्मणाच्या मुखाने उपदेश करून याला आधीच विषादरहित व रामस्वरूप मर्मज्ञ करून ठेवला व कैकयीला दोष देणे योग्य नाही हे शिकविले तेच **'प्रेरक हृदिं रघुवंश विभूषण'** निषादाच्या मुखाने भरताची समजूत घालीत आहेत. **(क) विधि वाम - 'निज कृत कर्मभोग ते भ्राता' व 'अशा विचारें रोष नसावा । वृथा दोष कोणा ना द्यावा'** हे तो लक्ष्मण मुखाने शिकला आहे. **'कर्म प्रधान**

**वदति सत्य जन'** (९१।८) असा निष्कर्ष त्याने सीतारामवनवास दुःखाचा काढला आहे. म्हणून येथे सुद्धा विधि = प्रारब्ध (कर्म), दैव हाच त्याचा अभिप्रेत असलेला अर्थ आहे. वाम = प्रतिकूल; प्रतिकूल दैवच दोषी आहे; बाकी कोणाचाच दोष नाही; हा निष्कर्ष त्याने काढला व भरतांस सांगितला.

छंद. (१) **कीं वाम विधिची कठिण करणी** - दैव प्रतिकूल झाले म्हणजे त्या योगे अशा घटना घडतात की त्यांत बदल करणे कोणाच्या हाती नसते; म्हणूनच कैकयीची बुद्धि एकाएकी पालटली. त्यापूर्वी त्यांनी कधी रामाचा द्वेष केला होता का ? राम कधी त्यांस अप्रिय वाटले होते काय ? याचा आपण विचार करा म्हणजे खात्री होईल की तुमच्या आईचा यांत काही दोष नाही. आणि आईचा दोष नाही म्हणजे तुमचा तर मुळीच नाही. आपल्यासारखा रामप्रेमी पुत्र जिला झाला ती रामद्रोही कशी असू शकेल ?

(२) **त्या रात्रिं प्रभु आदरें आपली (तुमची) स्तुति करिति - त्या रात्रिं म्हणजे** कोणत्या हे येथे संदिग्ध आहे. शृंगवेरपुरास राम तृणशय्येवर पडले; लक्ष्मण पाय चेपू लागले व थोड्याच वेळात सीतारामांस गाढ झोप लागली आहे; व नंतर निषादलक्ष्मण संवाद सुरू झाला आहे; म्हणून शृंगवेरपुरची रात्र येथे घेता येत नाही. **'पहा भरत रघुवर मनिं काहीं । प्रेमपात्र तव सम कुणि नाहीं ॥ सिताराम लक्ष्मण सुप्रीती । वर्णित तुम्हां रात्र सरली ती ॥** (२०८।३-४) असे ज्या रात्री विषयी भरद्वाज पुढे भरतास सांगतात ती रात्र, म्हणजे **राम, सीता लक्ष्मण व निषादराज यांनी ज्या रात्री भरद्वाजाश्रमात वस्ती केली ती रात्र;** वनवासाची चौथी रात्र. **(क) आदरें** - तोंड देखली नव्हे. रोमांच अश्रु इत्यादी त्या वेळी वारंवार येत होते. सर्व रात्र तुमच्या प्रेमाच्या व गुणांच्या वर्णनांतच पडल्या पडल्या केव्हाच सरली.

(३) **प्रियतम न तुलसी कोणि अपणांहून रामा, शपथ कीं** - हे सांगितले गुहानेच. पण कवींनी आपले नाव तदाकार झाल्यामुळे मधे गोवले. **'प्रियतम न तुलसी'** यांतील तुलसी = तुळशीचे झाड, तुलसीवृक्ष असा अर्थ घेता येतो; तुळससुद्धा प्रभूंना तुमच्या इतकी प्रिय नाही; असा एक भाव एका टीकाकारांनी (मा.पी.) काढला आहे. तो चांगला आहे. **(क) परिणामिं मंगल जाणुनी** - कैकयीसारखी रामप्रिय महाराणी असून तिला निमित्त् करून दुर्दैवाने ज्या अर्थी सर्व निष्पाप, महापुण्यवान लक्षावधि रामभक्त नरनारींना दुःखात लोटली आहेत,

त्या अर्थी याचा परिणाम शेवटी फारच गोड होणार हे ठरलेलेच. म्हणून जे परिणामी चांगले तेच चांगले; हे सर्व जाणून धीर धरावा. **'प्रेमें बाळ ! न कातर होई । परिणामी मुद जाणुनि हृदईं'** (७०।८) असे प्रभूंनी लक्ष्मणांस सांगितले आहे. कौसल्यासुद्धा म्हणते की रामसीतालक्ष्मण वनात गेल्याचा परिणाम वाईट होणार नसून चांगलाच होणार आहे. (२८२ पहा.)

**सो. - (१) अंतर्यामी राम** - राम सर्वांच्या हृदयांतच असल्याने तुमच्या हृदयांत सुद्धा ते आहेतच व तुमचे हृदय रामप्रेमाने परिपूर्ण आहे हे ते जाणतातच व ते बाह्य कृतीकडे बघत नाहीत; तुम्ही व तुमची माता अगदी निर्दोष आहात हे प्रभु जाणतात. त्यांच्या सेवकाच्या ठिकाणी प्रारब्ध कर्मानुसार काही दोष असला तरी सुद्धा ते त्या दोषाकडे बघत नाहीत इतके प्रभु भिडस्त, संकोची स्वभावाचे आहेत आणि उलट सेवकावर अपार प्रेम व दया करतात. तुम्ही तर कधीच काहीही दोष केलेला नाही आणि तुमच्यावर त्यांचे अगाध प्रेम आहे मग तुमच्यावर प्रभु पूर्ण कृपा करतील यांत नवल काय व त्याविषयी शंका कशाला ? या अशा विचाराने मन अगदी घट्ट करून आता तळावर चलावे व विश्रांति घ्यावी.

*हिं.* ***। सखा बचन सुनि उर धरि धीरा । बास चले सुमिरत रघुबीरा ॥१॥***
***। यह सुधि पाइ नगर नर नारी । चले बिलोकन आरत भारी ॥२॥***
***। परदखिना करि करहिं प्रनामा । देहिं कैकइहि खोरि निकामा ॥३॥***
***। भरि भरि बारि बिलोचन लेहीं । बाम बिधातहि दूषन देहीं ॥४॥***
***। एक सराहहिं भरत सनेहू । कोउ कह नृपति निबाहेउ नेहू ॥५॥***
***। निंदहि आपु सराहि निषादहि । को कहि सकइ बिमोह बिषादहि ॥६॥***

*म.* ***। श्रवुनि सखा-वच धरुनी धीरा । निघती स्मरत वासि रघुवीरा ॥१॥***
***। हें कळताच नगर-नरनारी । निघति बघाया आतुर भारी ॥२॥***
***। प्रदक्षिणा मग नमना करिती । कैकइला अति दोष लाविती ॥३॥***
***। नेत्र अश्रुंनी भरून येती । वाम विधात्या दूषण देती ॥४॥***
***। भरतस्नेहा कोणि वानती । स्नेह निभाविति नृप, कुणि म्हणती ॥५॥***
***। निंदिति अपणां स्तविति निषादा । कोण वदेल विमोह-विषादा ॥६॥***

**अर्थ** - मित्राचे वचन ऐकून भरतांनी धीर धरला व रघुवीराचे स्मरण करीत तळावर (वस्तीच्या जागी) चालले.॥१॥ ही हकीगत कळताच अयोध्यावासी स्त्री

पुरुष मंडळी आतुरतेने बघण्यासाठी चालली.॥२॥ लोक प्रदक्षिणा घालून नमस्कार करू लागले व कैकयीला मनमुराद (अति) दोष देऊ लागले.॥३॥ त्यांचे डोळे अश्रूंनी भरून येऊ लागले व ते वाम विधात्याला दोष देऊ लागले.॥४॥ कोणी भरताचा स्नेह वाखाणू लागले तर कोणी म्हणू लागले की महाराजांनी आपल्या स्नेहाचा निर्वाह केला (शेवटास नेला).॥५॥ सर्वच लोक आपली निंदा व निषादाची प्रशंसा करू लागले; (त्या वेळच्या) त्या वियोगाचे व विषादाचे वर्णन कोण करू शकेल ? ॥६॥

**टीका. चौ. १-२ (१) श्रवुनि सखावच... रघुवीरा** - रामसखा आहे व त्याने शपथपूर्वक प्रेमाने सांगितले; त्याअर्थी खरे असले पाहिजे असा विचार केला तेव्हा धीर आला व निषादाने वर्णन केलेल्या 'करुणायतन' या रघुवीराच्या गुणाचे स्मरण करीत परतले. **(क) हे कळतांच** - भरत निषादाबरोबर रामशय्या दर्शनासाठी गेले व ती शय्या शिंशपा वृक्षाखाली आहे हे ज्यांना ज्यांना जसजसे कळत गेले तसतसे ते लोक तिकडे जाऊ लागले. भरत दर्शन घेऊन परतले त्या वेळी लोक निघाले असा अर्थ नाही. दोघांचे वर्णन एकाच वेळी करणे शक्य नसल्याने प्रथम सुरू झाले ते पूर्ण करून नंतर हे वर्णन सुरू केले. भरत तिथे असतानाच पुष्कळ लोक तेथे पोचले असतील.

**चौ. ३-४ (१) प्रदक्षिणा - नमना करिती - लाविती** - ती शय्या, तिच्यावर कोण कसे झोपले होते व त्याचे कारण, हे विचार प्रत्येकाच्या हृदयात येणारच व मनुष्य स्वभावानुसार पहिला जोराचा हल्ला कैकईवर होणारच. कोणी अधिक विचारवंत असतील त्यांनी तो उमाळा जिरल्यावर वाम विधात्याला दोष दिला.

**चौ. ५-६ (१) भरतस्नेहा कोणि बानती** - दैवाला दोष देऊन झाल्यावर कोणी भरताची प्रशंसा करू लागले की त्यांच्यामुळे आम्हाला हा दर्शनाचा लाभ मिळाला. धन्य भरत ! असे साम्राज्य सहज चालून आले असता आईच्या इच्छेला धुडकाऊन लाऊन, त्याचा सहज त्याग केला व बंधु प्रेमाने बेहोष होऊन अशा रीतीने उलट आपलीच निंदा करीत आहेत ! **(क)** कोणाला दशरथांच्या मरणाची आठवण होऊन, म्हणू लागले की सत्य रक्षणासाठी रामाचा त्याग राजांनी केला आणि रामविरहाने देहाचा त्याग केला. या प्रमाणे सत्यप्रेम व रामप्रेम या दोहोंचाही उत्तम निर्वाह केला. **(ख) निंदिति अपणां स्तविति निषादा** - आम्ही रामाच्या प्रेमाला अपात्र ठरलो; म्हणून तर रघुनाथ आम्हाला झोपलेल्या स्थितीतच सोडून

निघून गेले व लक्ष्मणाला बरोबर घेऊन गेले. भरतसुद्धा आम्हा कोणाला कळू न देता निषादाला बरोबर घेऊन शय्यादर्शनाला निघून आले ! राम आणि भरत स्वतः येऊन निषादास कडकडून भेटले ! धन्य त्याचे भाग्य ! आम्ही दोघांच्याही प्रेमाला आचवलो ! अभागीच आम्ही ! इ.

हिं. *। एहि बिधि राति लोगु सबु जागा । भा भिनुसार गुदारा लागा ॥७॥*
*। गुरहि सुनावँ चढ़ाइ सुहाई । नई नाव सब मातु चढ़ाई ॥८॥*
*। दंड चारि महँ भा सबु पारा । उतरि भरत तब सबहि सँभारा ॥९॥*

दो. *। प्रातक्रिया करि मातु पद बंदि गुरहि सिरु नाइ*
*॥ आगें किए निषाद गन दीन्हेउ कटकु चलाइ ॥२०२॥*

म. *। लोक अशापरिं रात्रीं जागति । उदयीं नावा चालू लागति ॥७॥*
*। चढविति गुरुसि सुनावें शोभन । नव्या हि नौकामध्यें मातृगण ॥८॥*
*। चार घडिंत गत सब तीराला । उतरुनि भरत घेति शोधाला ॥९॥*

दो. *। नित्य कर्म कृत मातृपदिं नमुनि गुरुसि वंदून ॥*
*॥ ठेउनि पुढें निषादगण कटक दिलें धाडून ॥२०२॥*

**अर्थ** - या प्रमाणे लोक रात्रभर जागले; व उजाडल्या बरोबर नावा चालू झाल्या (इकडून तिकडे जाऊ येऊ लागल्या.)॥७॥ भरतानी सुंदर मोठ्या नौकेत गुरुजींना चढविले आणि (हि) नव्या नौकांत सर्व मातांना चढविल्या.॥८॥ चार घटकांत सर्व पलीकडील तीराला गेले; व भरताने (नावेतून) उतरून सर्वांचा शोध घेतला.॥९॥ नंतर (सकाळचे) नित्यकर्म उरकून मातांना वंदन केले व गुरुजींना वंदन करून निषादांच्या टोळ्यांना पुढे ठेऊन सैन्य धाडून दिले.॥२०२॥

**टीका. चौ.** ८-९ (१) **गुरुसि सुनावें शोभन - सुनाव =** मोठी नाव, त्यांच्याबरोबर सर्व अग्नि व अग्निहोत्राचे सर्व सामान असल्यामुळे मोठ्या नावेत त्यांना सामान व अग्नीसह बसविले. अरुन्धती ज्याप्रमाणे अयोध्येतून निघताना वसिष्ठांबरोबरच होत्या तशा नावेतही बसल्या असे मानणे जरूर आहे. अयोध्येतून निघताना सर्वांच्या पुढे अरुन्धतीसहित वसिष्ठांचा रथ होता. सुंदर नावेत प्रथम चढविण्याने आदर व प्रेम दिसून येतात. **(क) मातानां नव्या नौकांत** चढविण्यांत हेतु हा आहे : नव्या नौकांत पाणी आंत मुळीच झिरपत नाही. त्या बुळबुळीत झालेल्या नसतात, स्वच्छ असतात व जी कुजट घाण जुन्या नौकांत येते ती येत नाही. **(ख) उतरुनि भरत घेति शोधाला -** भरत सर्वांच्या शेवटी गेले नावेतून

हे सुचविले. शृंगवेरपुरास आल्यावर जसा सर्वांचा शोध घेतला तसाच गंगापार आल्यावर घेतला. प्रत्येक मुक्कामाला गेल्यावर व निघताना आता असेच करणार हे सुचवून ठेवले.

**दो. (१) नित्यकर्म कृत** - स्नानसंध्यादि प्रातःकाळचे कर्म या तीराला आल्यावरच सर्वांनी केले; कारण उजाडल्याबरोबर नावात बसण्यास प्रारंभ झाला. लोक जसजसे उतरले तसतसे आपापले कर्म करू लागले. पाचशेच्या वर नावा असल्याचा उल्लेख वा. रा. आहे. एवढ्या असल्या तरी अनेक खेपा कराव्या लागणारच. यमुना एकाच खेपेत उतरल्याचा उल्लेख पुढे आहे; तसा येथे नाही, म्हणून अनेक खेपा कराव्या लागल्या हे ठरते. निघाल्यापासून चौथी रात्र शृंगवेरपुरास काढली व **पाचव्या दिवशी सकाळीच निघाले. (क)** सैन्याच्या पुढे निषादांच्या टोळ्या पाठविल्या कारण की आता अरण्यातील रस्ता आहे. रथ सुखाने जाण्यासारखा रस्ता सर्वत्र असेलच असे नाही. मार्गदर्शक निषाद झाले.

**ल. ठे. - या दोह्याच्या अंगभूत नऊ चौपाया आहेत.** नियमापेक्षा जास्त आहेत. याने सुचविले आहे की **नऊ खेपांत सर्व लोक सैन्यासह पलीकडे गेले.** नवव्या खेपेला भरत सर्वांच्या शेवटी गेले. काळ किती लागला हे नवव्या चौपाईत स्पष्ट सांगितले; भरतांचा उल्लेख शेवटी करून ते शेवटी गेले हे सुचविले व चौपायांच्या संख्येने खेपांची संख्या सुचविली. **(क)** पहिल्या खेपेत अरुंधतीवसिष्ठ व विप्र गेले. दुसऱ्या खेपेत सर्व माता व परिवार दास दासी इ. गेले. तिसऱ्या खेपेस इतर सर्व स्त्रिया गेल्या असतील; व या प्रमाणे गटागटाने मंडळी पार गेली. हत्ती, घोडे व रथ गंगेतील पाण उतारावरून चालत नेले असतील व बरेचसे सैन्य सर्वांच्या आधीच नावाचा उपयोग न करता गेले असेल. जवळच कंबरभर पाण्यातून चालत जाण्यासारखा उतार असल्याचा कवितावली पदाचा (२।६) उल्लेख नावाडी प्रकरणांत टीकेत केलेला आठवत असेलच. शेवटच्या खेपेत सचिव, अभिषेकाची तीर्थपात्रे, इतर सर्व सामान व भरत व त्यांचे काही नोकर ही मंडळी गेली असतील.

*हिं.* *। कियउ निषादनाथु अगुआई । मातु पालकीं सकल चलाई ॥१॥*
*। साथ बोलाइ भाइ लघु दीन्हा । बिप्रन्ह सहित गवन गुर कीन्हा ॥२॥*
*। आपु सुरसरिहि कीन्ह प्रनामू । सुमिरे लखन सहित सिय रामू ॥३॥*
*। गवने भरत पयादेहिं पाए । कोतल संग जाहिं डोरिआए ॥४॥*

म. *। करिति निषादनाथ पथदर्शन । मातृपालख्या दिधल्या धाडून ॥१॥*
*। धाडिति लघुबंधुला बरोबर । गमन करिति विप्रांसह गुरुवर ॥२॥*
*। स्वतां नमन सुरसरिला करती । लक्ष्मण-सीतारामां स्मरती ॥३॥*
*। पायीं चालत भरत चालले । कोतवाल संगें चालवले ॥४॥*

**अर्थ** - निषादनाथाला पुढे मार्गदर्शक (वाटाड्या) ठेऊन मातांच्या सर्व पालख्या (मेणे डोल्या) पाठवून दिल्या.॥१॥ धाकट्या भावाला (शत्रुघ्नाला) बरोबर धाडला तेव्हा विप्रांसह गुरुवर वसिष्ठांनी गमन केले.॥२॥ मग स्वतः भरताने देवनदीला नमस्कार केला व लक्ष्मण स्मरण आणि सीताराम या चरणांचे स्मरण केले.॥३॥ भरत पायी चालतच निघाले आणि त्यांच्याबरोबर कोतवाल (शोभेचे घोडे) चालविले (नेले) गेले.॥४॥

**टीका. - येथील यात्राक्रम** - सर्वांच्या पुढे निषादगण मार्गदर्शक; त्यांच्या मागे सर्व सैन्य; सैन्याच्या मागे निषाद राज व त्यांच्या मागे सर्व माता पालख्यांतून. मातांच्या मागे शत्रूघ्न व त्यांच्या मागे वसिष्ठ व विप्र; त्यांच्या मागे सर्व अयोध्यावासी लोक व सर्वांच्या मागे भरत पायी चालत निघाले व शोभेचे घोडे घेऊन जाणारे सेवक त्यांच्याबरोबर चालत निघाले. **(क)** अयोध्येतून निघताना माता भरताच्या पुढेच म्हणजे जवळच होत्या. आता माता आणि भरत यांच्यात इतके अंतर राहिले की भरत चालत आहेत हे मातांना दिसणे अशक्य झाले. प्रवास दाट अरण्यांतून करावयाचा असल्याने मातांना सैन्याच्या मागे व निषादराज व शत्रुघ्न मागे पुढे अशी व्यवस्था केली. शत्रुघ्नाला त्रास होऊ नये म्हणून माता व गुरु यांची सेवा करण्याच्या निमित्ताने रथांत पुढे पाठविला. **(ख) कोतवाल** (हिं. कोतवाल) शोभेचे घोडे, राजाच्या वगैरे स्वारीबरोबर शृंगारून, लगाम हातात धरून सेवक चालत असतात; वाटल्यास राजे राजपुत्र त्यांवर बसतात. हे घोडे बरोबर ठेवण्यात राजनीति व सेवक धर्म यांची सांगड घातली आहे. आपले सेवक धर्माचे **ध्येय साधण्यासाठी योजलेली ही सुंदर युक्ति आहे.** जरी कदाचित कौसल्यासुमित्रादि मातांना भरत चालत असलेले दिसले तरी घोडे पाहून वाटावे की कंटाळा आला असेल म्हणून जरा उतरले असतील. या ठिकाणापासून रामसीता व लक्ष्मण पायी अनवाणी चालत गेले असल्याने भरताचा निश्चय पायी अनवाणी चालत जाण्याचा आहे; व अयोध्येतून निघताना जसा प्रसंग आला तसा येऊ नये म्हणून ही युक्ती योजली. ही पूर्ण यशस्वी झाली आहे.

(२) **लक्ष्मण-सीतारामां स्मरती** - लक्ष्मणाचे स्मरण आधी करण्याने 'रामदास रामाहुनि मोठे' हे दाखविले. पुढे दिसेल की या रामसेवामूर्ति परम भागवतानेच भगवंतांचे लक्ष भरताकडे वेधले आहे; नाही तर राम आपल्या आनंदांत मग्न व भरत छडीसारखे जमिनीवर पडलेले ही दशा किती वेळ राहिली असती कोणास ठाऊक !

दो. १८७ ची टीका पहा. तेथे लक्ष्मणाचे स्मरण केले नाही आणि सीताराम चरणांचे स्मरण केले आहे, म्हणून लक्ष्मणाचे स्मरण केले व सीतारामचरणांचे स्मरण केले असाच अर्थ घेणे सुसंगत आहे. लक्ष्मण सारी रात्र न झोपता, पहारा देत बसतात वगैरे येथे जाणल्याचा परिणाम हा की त्यांचे स्मरण आधी करणे आवश्यक वाटले.

***। पायीं पायिं राम तर गेले । आम्हांस्तव रथ हय गज केले ॥६॥***

***। उचित मला जाणे की मस्तकिं । सेवक-धर्म कठोर समस्तिं किं ॥७॥***

***। परिसुनि मृदु वच बघुनि भरतगति । ग्लानि करिति सगळे सेवक अति ॥८॥***

**अर्थ** - सुसेवकांनी वारंवार विनविले की नाथ ! आपण घोड्यावर स्वार व्हावं की॥५॥ (भरत म्हणाले) राम तर पायी पायीच चालत गेले आणि रथ, घोडे, हत्ती आमच्या साठीच (निर्माण) केले आहेत !॥६॥ मला तर मस्तकाने (डोक्याने) चालत जाणेच उचित होते (ज्या मार्गाने राम गेले त्या धुळीला पाय लावणे योग्य नाही; तिला मस्तकाने नमन करणेच योग्य आहे); असा सेवकधर्म समस्त (सगळ्या) धर्मात कठोर आहे !॥७॥ हे मृदुवचन ऐकून व भरताची ती (प्रेमविव्हळ) दशा (गति) पाहून ते सगळे सेवक अतिशय ग्लानि करू लागले.॥८॥

**टीका. चौ. ५-६ (१) सुसेवक - 'करी स्वामिहित सेंवक तोही'** स्वामी भरत चालले तर त्यांस त्रास होईल हे जाणून सेवकांनी एकदा विनंती केली; तेव्हा भरत म्हणाले असतील की ठीक आहे, तुम्ही चला पुढे, मी आलोच. त्यांना वाटले चालत असतील हौशीने; पुन्हा काही वेळाने त्यांनी विनंती करावी व यांनी म्हणावे जरा पाय मोकळे करतो. याप्रमाणे तीनचार वेळा झाले तेव्हा भरतांस वाटले की आता स्पष्ट सांगितल्याशिवाय इलाज नाही. **स्वामींस सुख देण्याचा प्रयत्न वारंवार करणे हें चांगल्या सेवकाचे (सु-सेवकाचे) लक्षण आहे.**

**(क) पायीं पायिं राम तर गेले** - राम याच मार्गाने पायी अनवाणी चालत गेले तेव्हा ब्रह्मदेवाने वाहने निर्माण केली नव्हती असे वाटते ! व आम्ही चक्रवर्ती

महाराज ! फार मोठे ! म्हणून त्याने आमच्याचसाठी, आज हे हत्ती घोडे वगैरे मुद्दाम निर्माण करून तुमच्याबरोबर निरोपासह पाठविलेले असावेत. राम सीता व लक्ष्मण यांना पायी चालत जाताना पाहून वनांतील कोळीभिल्ल सुद्धा म्हणाले आहेत की - **'पथिं जाणें अनवाणीं यांना । रचि विरंचि जगिं वृथाचि यानां'** (२।११९।६) मग भरत जे म्हणाले ते अगदी योग्यच आहे.

**चौ. ७-८ (१) उचित मला जाणें कीं मस्तकिं** - प्रभु चालत गेले तेव्हा त्यांच्या चरणकमलांचा स्पर्श ज्या धुळीला झाला ती वाऱ्याने सर्वत्र उडालेली असणार. ती धूळ माझ्यासारख्या सेवकाने पायांखाली तुडवीत जाणे हा काय सेवकधर्म आहे ? त्या धुळीला मस्तकावर धारण करणे सेवक धर्म असल्याने डोक्याने चालत जाणेच योग्य ठरते ! पण काय करणार ! विधात्याने हे शरीर तसे बनवलेले नाही. त्यामुळे नाईलाजाने चालावे लागत आहे. यांत सेवकधर्माचा विनाश होत आहेच ! पण काय करू ? पंख दिले असते तर काही हरकत नव्हती; तरीपण प्रभुचरण धुळीला केव्हा तरी पाय लागलेच असते. कारण ती आजूबाजूच्या वृक्षांवर उडालेली असणारच व त्यांवर केव्हातरी बसावे लागणारच ! **(क) ल.टे.** तुलसीदास महाराज चित्रकूटला चालत गेले त्यावेळी त्यांच्या हृदयाची जी भावना होती व त्यांना जो पश्चात्ताप होत होता तोच येथे भरतमुखाने बाहेर पडत आहे. प्रभो ! काय ही भावना ! प्रज्ञानानंदांच्या या हृदयांत यातील लेशमात्र तरी आहे काय ? अनवाणी पायी जाणे सुद्धा घडत नाही ! या दण्डकारण्यातून प्रभु चालतच गेले ना ! पण 'प्रभु मैं तेरो जैसो तैसो'

**(२) ग्लानि करिति सगळे सेवक अति** - आम्ही पादत्राणे घालून चालत आहोत नी राम भरतसेवक म्हणवतो ! धिक्कार धिक्कार आमच्य दास्यभावाला ! भरतांना शिरावर चालत जाणे योग्य ! मग आम्ही आता कसे जावे ? देहत्याग करून प्राणांनीच गेलो तरच योग्य होणार ! पण प्राण कुठे निघताहेत या देहांतून ! इ. प्रकारे स्वतःस दोष देत पश्चात्तापाने व्याकुळ होऊ लागले.

***हिं.दो.*** *। भरत तीसरे पहर कहँ कीन्ह प्रबेसु प्रयाग ॥*
*॥ कहत राम सिय राम सिय उमगि उमगि अनुराग ॥२०३॥*

***हिं.*** *। झलका झलकत पायन्ह कैसें । पंकज कोस ओस कन जैसें ॥१॥*
*। भरत पयादेहिं आए आजू । भयउ दुखित सुनि सकल समाजू ॥२॥*
*। खबरि लीन्ह सब लोग नहाए । कीन्ह प्रनामु त्रिबेनिहिं आए ॥३॥*

*। सबिधि सितासित नीर नहाने । दिए दान महिसुर सनमाने ॥४॥*

म.दो. *। तिसरे प्रहरीं भरत मग प्रयागांत शिरतात ॥*

*॥ राम राम सीता ! वदत भारी प्रेम - भरांत ॥२०३॥*

म. *। फोड झळकती पायीं कैसे । पंकज कोषीं दवकण जैसे ॥१॥*

*। आले भरत किं पायीं आजीं । श्रवत विषादहि सकल समाजीं ॥२॥*

*। झालीं स्नानें शोधीं कळलें । तैं येउनी त्रिवेणिस नमलें ॥३॥*

*। सबिधि सितासित नीरीं स्नाती । दान मान विप्रानां देती ॥४॥*

**अर्थ** - मग तिसरे प्रहरी भरत प्रयागात शिरले (प्रवेश केला) व भारी प्रेमाचे भरते येऊन राम राम ! सीता राम ! इ. प्रकारे उच्चार करीत आहेत.॥दो.-२०३॥ कमळाच्या कोषांत दवाचे बिंदु जसे झळकावे तसे भरताच्या पायांवर फोड झळकत आहेत.॥१॥ 'आज भरत पायी पायीच आले की' हे ऐकताच सर्व समाजात विषाद पसरला (सर्वांना फार वाईट वाटले) ॥२॥ (भरतानी येऊन) शोध घेता कळले की सर्वांची स्नाने उरकली आहेत; तेव्हा भरत त्रिवेणीस आले व नमस्कार केला.॥३॥ मग श्वेतश्यामजलांत यथाविधि स्नान केले (स्नाती, स्ना = स्नान करणे) व विप्रांनां सन्मानपूर्वक दाने दिली.॥४॥

**टीका. दो. (१) मग =** सर्व लोक येऊन पोचल्यानंतर या अर्थाचा शब्द, मुळात नाही पण पुढील चौपायांनी सुचविला असल्याने अनुवादात स्पष्ट केला. सर्व लोक रथादि वाहनांतून आल्यामुळे बरेच आधी प्रयागास आले. भरत प्रेमाकुळ होऊन राम, राम सीता राम, सीताराम असा घोष करीतच चालत आले हे येथे सुचविले आहे.

**चौ. १ - (१) पायीं फोड झळकती -** सूर्योदयानंतर १-२ घटकानी गंगापार आले नंतर स्नानसंध्यादि नित्यकर्म करून सर्वांना विशिष्ट पद्धतीने पुढे पाठविले. म्हणजे सूर्योदयानंतर तीन तासांनी भरत निघाले असतील. रामवनवासाचा हा ४७ वा दिवस आहे. राम वैशाख शुद्ध पंचमीला अयोध्येतून निघाले. म्हणजे आज ज्येष्ठ कृष्ण सप्तमी अष्टमी असेल. ज्येष्ठांतील कडक उन्हाळा भर उन्हाचे निघाले, पायात काही नाही, आणि २५।२६ मैल पांच तासांत आले ! पायांना फोड आल्याचे वर्णन केले नसते तरच आश्चर्य ! भरताची पावले लाल कमळासारखी व त्यांवर पांढरे शुभ्र अनेक फोड; त्यामुळे ते कमळांतील दवाच्या थेंबांसारखे चमकत आहेत.

**चौ. २ - (१) आले भरत किं पायीं** - जे सेवक शोभेच्या घोड्यांना हातात धरून नेत होते ते भरतांच्या जरा पुढे गेल्यामुळे त्यांच्याकडूनच ही बातमी कळली. मग 'आले भरत किं पायीं आज' हे सर्वतोमुखी भराभर पसरत गेले. सर्वांना फार वाईट वाटले. पहिल्या दिवशी येत होते पण कौसल्या मातानी रथांत बसविले. **आज** शेवटी आलेच पायी चालत ! धन्य भरत ! राम चालत गेले; म्हणून भरत चालत आले; आणि आम्ही मात्र रथांत, घोड्यांवर, पालख्यांत बसून आलो ! आमचे प्रेमच नाही रामावर ! असेही म्हणू लागले.

**चौ. ३ - (१) झालीं स्नानें शोधीं कळलें** - सुचविले की सर्व लोक पुष्कळच आधी आले. त्रिवेणीला जाऊन, स्नान करून, परत प्रयागांत येऊन स्थिर स्थावर झाले - आहेत. भरत एवढे दमलेले तरी आल्याबरोबर सर्वांचा शोध घेण्यास विसरले नाहीत.! **(क) येउनी त्रिवेणिस नमलें** - पायांना फोड आलेले, उन्हाळा म्हणतो मी, आणि तिसरा प्रहर असूनसुद्धा प्रयागापासून त्रिवेणीपर्यंत, विस्तवा सारखी तापलेली रेती तुडवीत जाणे व परत दुसऱ्या टोकाला असलेल्या भरद्वाजाश्रमांत जाणे हे आज कोणते परमहंस, संन्यासी, साधु संत, हरिभक्त इ. करू शकतील ? पायांत पायतणे घालून जाण्याचासुद्धा धीर होणार नाही! मात्र कोणी भक्तीच्या गप्पाखाली तर कोणी वेदान्ताच्या वचनांखाली आपली असमर्थता लपवतील ! भरत रामाला प्राणप्रियतम झाले ते उगाच नाही झाले !

**चौ. ४ - (१) सविधि सितासित नीरीं स्नाती - सित =** श्वेत + असित = श्याम, सितासित = श्वेत व श्याम. गंगाजलाचा वर्ण श्वेत लक्ष्मणाच्या शरीरासारखा व यमुनेच्या जलाचा वर्ण श्याम, रामचंद्रांच्या शरीराच्या वर्णासारखा आहे. जिथे या दोन प्रवाहांचा संगम होतो तेथे - त्रिवेणीसंगमांत यथाविधि स्नान केले. संकल्प सांगण्यास ब्राह्मण, प्रयागांतले पंडे, तयार होतेच. राम स्नान केले त्या वेळी यांना दक्षणा मिळाली नव्हती. **ल.टे.** भरताने शिवपूजन व तीर्थदेवार्चन केल्याचा उल्लेख नाही. रामचंद्रांनी **'मोदें - स्नान करुनि शिवपूजन। केलें सविधि तीर्थ देवार्चन'** (१०६।६).

*हिं.* *। देखत स्यामल धवल हलोरे । पुलकि सरीर भरत कर जोरे ॥५॥*
*। सकल कामप्रद तीरथराऊ । बेद बिदित जग प्रगट प्रभाऊ ॥६॥*
*। मागउँ भीख त्यागि निज धरमू । आरत काह न करइ कुकरमू ॥७॥*
*। अस जियँ जानि सुजान सुदानी । सफल करहिं जग जाचक बानी ॥८॥*

*म. । बघतां श्यामल - धवल तरंगां । भरत बद्धकर पुलकहि अंगां ।।५।।*
*। सकल कामदा सुतीर्थ-रावा ! । वेदीं जगिं विश्रुत प्रभावा ।।६।।*
*। भीक मागुं सोडुनी स्वधर्मा । आर्त कोणत्या करि न कुकर्मा ।।७।।*
*। हें जाणुनी सुजाण सुदानी । सफल करिति जगिं याचकवाणी ।।८।।*

**अर्थ** - श्यामल व धवल (शुभ्र, श्वेत, सित) तरंगानां पाहतांच भरताने हात जोडले व अंगावर रोमांचही आले.।।५।। (व विनवितात की) हे सुतीर्थराजा ! तुम्ही सर्व कामदायक (कामना पुरविणारे) आहात (असा) तुमचा प्रभाव (महिमा) वेदांमध्ये व लोकांमध्येही प्रसिद्ध आहे.।।६।। मी स्वधर्माचा त्याग करून भीक मागत आहे; पण आर्त कोणते कुकर्म करीत नाही ! (आर्त झालेल्या माणसाला वाटेल ते कुकर्म करावेसे वाटते).।।७।। हे जाणून जे सुजाण उत्तम दाते असतात ते या जगात (लोकांत) याचकाची वाणी (याचना) सफल करतात (मागितलेले देतात).।।८।।

**टीका. चौ. ५ -** (१) श्यामवर्णाचे तरंग पाहतांच रामचंद्रांची व धवलवर्णाचे तरंग पाहताच लक्ष्मणाची आठवण आली; त्यांचे दर्शन झाल्यासारखे वाटले; व प्रेमाला भरती आली. **(क) सकल कामद =** सकल कामप्रद. अर्थ, धर्म, काम, मोक्ष व भगवद्भक्ति (प्रेम) याही सर्व गोष्टी देणारा. **'चारी पदार्थ - पूर्ण भंडारु'** (१०५।४) चारी पुरुषार्थ तीर्थराजा देऊ शकतो हे याने ठरले. **'चामर यामुन गांग तरंग'** (१०५।८) गंगा यमुनांचे तरंग या तीर्थराजाच्या चवऱ्या आहेत. व गंगेजवळ अयोध्यावासी लोकांनी व भरताने शृंगवेरपुरास अति प्रेम व सहज स्नेह मागितला आहे. (१९७।६-८ पहा) जे ज्याच्या जवळ नाही ते कोणी मागेल कसे ? **'देहि रघुबीरपद प्रीति निर्भर मातु'** अशी याचना तु.दासांनी गंगेजवळ केली आहे. (वि.प. १८). राजाची एक चवरी जे देऊ शकते ते राजा सहज देऊ शकेल म्हणूनच **'सेविति सुकृती साधु शुचि पावति सब मन काम'** (१०५) असे पूर्वी रामचंद्रांनीच वर्णन केले. **(क)** भरताने येथे सुचविले की माझ्या मनात जी कामना आहे ती तुम्ही पुरवू शकता (१०५ पहा.) हे वेदांमध्ये व लोकांमध्ये प्रसिद्ध आहे.

**चौ. ७ (१) भीक मागुं सोडुनी स्वधर्मा -** ही भीक मागणे म्हणजे 'हे वरदान न आन' (दो. २.४) द्या, या प्रमाणे वर मागणेच आहे. भीक मागितली म्हणजे वर मागितला नाही असे म्हणून पळवाट काढता येत नाही. **(क)** भरत

अनन्यगतिक रामभक्त असून त्यांनी शृंगवेरपुरास गंगेजवळ सहजस्नेह मागितला. तेथे स्वधर्म त्यागाचा उल्लेख नाही. त्यापूर्वी शंकरांजवळ ऐहिक याचना सुद्धा केली आहे. **'प्रार्थुनि मनिं मागतात शंभुसि । कुशल मातृपितृ परिजन बंधुसि'** (२।१५७।८) या प्रमाणे रामस्नेह याचना व लौकिक याचना केली तरी स्वधर्मत्यागाचा दोष लागला नाही; मग **येथेच असा उल्लेख का ? याचे उत्तर दोन अक्षरांच्या 'राऊ'** (राजा) **या शब्दाने सुचवून ठेवले आहे. (क)** तीर्थांचा राजा प्रयागतीर्थराज आहे. भरत क्षत्रिय चक्रवर्ति राजपुत्र आहे. एका राजाने राजपुत्राने दुसऱ्या राजाजवळ कशाचीही याचना करणे हा क्षत्रिय धर्माचा, राजधर्माचा त्याग आहे. गंगा, शंकर, देव, देवी, गुरु, विप्र यांच्याजवळ क्षत्रियाने, राजाने याचना करणे हा अधर्म नाही. **क्षत्रियाने क्षत्रियाजवळ, राजाजवळ याचना करणे म्हणजे भीक मागणे आहे, अधर्म आहे हे सुचविले आहे.** यामुळे तेज व ईश्वरभाव या दोन सहज क्षत्रिय गुणांचा ऱ्हास होतो. **'शौर्य तेजो धृतिर्दाक्ष्यं युद्धेचाप्यपलायनम् ॥ दानमीश्वरभावश्च क्षात्रं कर्म स्वभावजम्'** (भ.गी.) **ल.ठे.** देव जोडे तरि करावा अधर्म" हे पुन्हा सुचविले.

**(२) आर्त कोणत्या करि न कुकर्मा -** वसिष्ठानींही स्वतःविषयी जवळजवळ असेच म्हटले आहे. 'आर्त कधीं न विचारें वदतो। डाव जुगाऱ्या अपला दिसतो' (२५८।१) भरताच्या म्हणण्यांतील भाव हा की आर्त वाटेल तें कुकर्म करूं शकतो; पण आर्तिहरण हे तुमचे सुप्रसिद्ध ब्रीद आहे; त्याच्याकडे पाहून माझ्या आर्तीचे शमन करावे. **(क) आर्त कधी न विचारे वदतो'** हे वसिष्ठांचे वचन येथे लावले म्हणजे कसा उलटा चमत्कार होतो पहा- भरत आर्त आहेत म्हणून 'भीक मागु सांडुनी स्वधर्मा' असे जे ते म्हणाले ते वचन अक्षरशः सत्य मानता येत नाही; म्हणजेच तीर्थराजाजवळ रामप्रेमाची याचना करण्यांत क्षत्रिय धर्माचा त्याग होत नाही. हानि झाली धर्माची हे म्हणणे आर्तजनित अविचाराचे आहे. तीर्थराज म्हणजे कोणी प्रत्यक्ष मनुष्य राजा, क्षत्रिय नव्हे. **मानवराजाजवळ मागूनसुद्धा जर रामप्रेम मिळत असेल तर ते मागणेसुद्धा अधर्म - कुकर्म नाही.** 'आर्ताचे मनिं विवेक नसतो' (२६९।४) भरताला निमित्त करून येथे क्षत्रियधर्माचे दिग्दर्शन मात्र साधले आहे.

**चौ. ८ - (१) 'हे जाणुनी सुजाण सुदानी' -** याचकाला 'नाही' असे न म्हणणे हा दात्याचा स्वभाव असतो. याचक मूर्ख, अधर्मी, शत्रु, मित्र इ. विचार

दाता करीत नाही; मग तुम्ही तर अंतर्ज्ञानी (सुजाण) व सुदाते आहांत; तेव्हा मी मागतो ते तुम्ही द्यालच. 'शतेषु जायते शूरः सहस्रेषु च पंडितः ।। वक्ता शतसहस्रेषु **दाता भवति वा न वा'** शेंकडो मनुष्यांत एखादा शूर निघतो. हजारोंत एखादा पंडित, लाखोत एखादा वक्ता निघतो - असतो; पण दाता असेल वा नसेल ! आतां भरत मागतात :

***हिं. दो.*** ***। अरथ न धरम न काम रुचि गति न चहउँ निरबान।।***
***।। जनम जनम रति राम पद यह बरदानु न आन ।।२०४।।***

***हिं.*** ***। जानहुँ रामु कुटिल करि मोही । लोग कहउ गुरु साहिब द्रोही ।।१।।***
***। सीताराम चरन रति मोरें । अनुदिन बढउ अनुग्रह तोरें ।।२।।***
***। जलदु जनम भरि सुरति बिसारउ । जाचत जलु पवि पाहन डारउ ।।३।।***
***। चातकु रटनि घटें घटि जाई । बढें प्रमु सब भाँति भलाई ।।४।।***
***। कनकहिं बान चढइ जिमि दाहें । तिमि प्रियतम पद नेम निबाहें ।।५।।***

***म.दा.*** ***। अर्थ न धर्म न काम रुचि नको गतिहि निर्वाण ।।***
***।। जन्म जन्म रति रामपदिं हें वरदान न आन ।।२०४।।***

***म.*** ***। मला कुटिल जरि राम समजले । स्वामि-गुरुद्रोही जग वदलें ।।१।।***
***। सीताराम चरण-रति अनुपम । तुझ्या कृपें वाढो अनुहिन मम ।।२।।***
***। न करो स्मरणा जलद जन्मभर । जल याचत पवि वर्षो प्रस्तर ।।३।।***
***। चातक - घोष घटे तर दूषण । प्रेम वाढतां सर्व भलेपण ।।४।।***
***। कनक-तेज जस वाढे दाहें । प्रियतमचरणनेग निवर्हि ।।५।।***

**अर्थ -** मला अर्थाची ना धर्माची ना कामाची आवड ! (रुची); इतर कोणतीही गति किंवा निर्वाण - मोक्षसुद्धा नको आहे. जन्मोजन्मीं (सीता) रामपदरति हें वरदान द्या दुसरे काऽही नको. ।।दो. २०४।। स्वतः राम जरि मला कुटिल समजले व सर्व जगाने जरि स्वामिद्रोही व गुरुद्रोही म्हटले. ।।१।। तरि तुझ्या कृपेने दिवसेंदिवस माझी सीताराम चरणरति अनुपम वाढो. ।।२।। (मेघाला) जलदाला जन्मांत चातकाची आठवण न होवो; व जल मागत असता वज्र व पाषाण (विजा व गारा) यांचा वर्षाव करो. ।।३।। पण चातकाचा घोष जर घटला तर त्याची अकीर्ति होईल (चातक या नांवाला कलंक लागेल) प्रेम वाढण्यांतच (त्याचा) सर्व भलेपणा आहे. तापविल्याने जसे सोन्याचे तेज वाढते तशीच प्रियतम चरणांच्या (प्रेम) नेमाच्या निर्वाहाने (सेवकाची पात्रता वाढते) ।।५।।

**टीका. - ल. ठे.** - येथून पुढील ५।७ ओळींत एकांगी अनन्यभक्तीचे - प्रेमाचे थोडक्यात, अत्यंत मुद्देसूद वर्णन आहे.

**दोहा. (१) अर्थ न धर्म न काम रुचि** - अर्थाची रुचि नाही, धर्माची रुचि नाही व कामाचीही रुचि नाही. यांतील काही मागण्याची इच्छा तर नाहीच, पण या कोणत्याही विषयांत मन मुळीच रमत नाही. याने विषयविराग - **अपर वैराग्य सुचविले. (क) नको गति - गूढ गती जे जाणू पाहति । नाम जिभेने जपतां जाणति'** (१।२२।३ टी. पहा.) अष्टमहासिद्धि व त्रिकालज्ञता, सर्वज्ञता, आकाशगमन इत्यादि गूढ गति नकोत; सलोकता समीपता, सरूपता इत्यादि गति नकोत व **'नकोहि निर्वाण'** - सायुज्य - कैवल्य मोक्षसुद्धा नको. **(ख)** 'अर्थ धर्म काम नकोत' असे म्हटले असते तर अर्थ झाला असता कीं सम्राट पुत्राला या सर्व गोष्टी परमोत्तम प्राप्त झालेल्याच आहेत, व त्यांत समाधान आहे म्हणून मागत नाही; म्हणून असलेल्या या त्रिवर्गाची रुचिं नाही असे म्हटले व नसलेल्या सिद्धि वगैरे नकोत म्हटले. **याने परमविराग सुचविला.** ३।१५।८ (पहा) **(ग) जन्मजन्म रति रामपदिं** - कोणताच मोक्ष नको म्हटले म्हणजे जन्म घ्यावा लागणारच; म्हणून म्हणतात की एक नव्हे हजारो जन्म येऊ देत, पण प्रत्येक जन्मांत रामपद रति = सीतारामचरणरति (पुढील चौ. २ पहा) द्या म्हणजे झाले, आणि इतर काही देऊ नका. या जन्मात इतर सर्व पदार्थ भरपूर दिले आहेत त्याचे कटू फळ आज भोगीत आहे.

**चौ. १-२ (१) मला कुटिल जरि राम समजले** - रामपदीं परमप्रेम कशासाठी? रामचंद्रांनी प्रसन्न होऊन तुमच्यावर प्रेम करावे एवढ्याचसाटी पाहिजे ना? **या प्रश्नाचे येथे उत्तर आहे.** राम प्रसन्न होवोत न होवोत. मी मातेला सामील व वनवासाचे मूळ आहे असे समजोत; त्यात माझी काही हानि नाही; **रामाकडून मला कोणत्याही मोबदल्याची अपेक्षा नाही. त्यांच्यावर नित्य अधिकाधिक प्रेम करणे हा माझा सहज स्वभाव झाला पाहिजे. (क) स्वामि गुरुद्रोही जग वदले** - रामपदरति प्राप्त करण्याने लोक मान्यता, प्रतिष्ठा मिळावी ही इच्छा तर नाहीच पण सर्व जगाने मला रामद्रोही, गुरुजनद्रोही इत्यादी वाटेल ती नावे ठेवली तरी चालेल. या दोन गोष्टींना आता दोन दृष्टान्त देतात -

**चौ. ३-४ - (१) न करो स्मरणा जलद जन्मभर** - राम जलद आहेत व भरत चातक होऊ पहात आहेत. मेघाने जन्मांतसुद्धा चातकाची मुळीच आठवण

केली नाही तरी चातकाचे मेघावरील प्रेम मुळीच कमी होत नाही. तसेच सीताराम माझे स्मरण मुळीच न करोत, माझा त्यांना पूर्ण विसर पडला तरी हरकत नाही. **(क)** चातक मेघाजवळ स्वातीजल मागत असतो पण न दिले त्याने तरी चातकाचे प्रेम कमी होत नाही. तसेच रूप बिंदुजल मिळाले तरी ठीक न मिळाले तरी ठीक. माझे सीतारामपद प्रेममात्र वाढले पाहिजे. **'रामसितालक्ष्मण मम नांवा । श्रवुनि न जाती त्यजुनि किं ठावा ॥८॥ मातृमतीं मज मानुनी थोडें जें करितील ॥ (दो २३३) 'त्यागिति जरि मन मलिन समजुनी । जरि सन्मानिति सेवक गणुनी ॥ राम-उपानह सुशरण मजला । स्वामि राम शुभ दोष जनाला ॥ चातक मीन जगीं यश भाजन । प्रेम नेम निज नव पटु पावन'** (२३४।१-३) **असे भरत पुढे पुन्हा म्हणाले आहेत.**

**(२) जल याचत पवि वर्षो प्रस्तर** - प्रस्तर - पत्थर, पाषाण; पवि - वज्र, मेघ जणूं काय चातकावर रागावून, जल मुळीच न देतां, विजा पाडतो; कित्येक वेळा मोठमोठ्या पाषाणांसारख्या गारांचा मारा करतो. त्याप्रमाणे माझा राग येऊन रामानीं माझ्यावर वज्रासारखे बाण मारले; किंवा लोकनिंदारूपी पाषाणांची वृष्टी केली तरी चातकाप्रमाणे माझे सीतारामपद प्रेम सतत वाढतच गेले पाहिजे, अशी कृपा माझ्यावर करा. राम जलद (मेघ) व भरत चातक असा संबंध जन्मोजन्मी असावा. **(क) चातक घोष घटे तर दूषण** - चातक जसा पिऊ पिऊ करीत सतत मेघाचे स्मरण करीत असतो, तसे रामसेवकाने सतत रामस्मरण केले पाहिजे. तसे न करील तर ते दूषण ठरेल. **'म्हणे हनु प्रभू ! तीच विपत्ती। स्मरण भजन तव यदा न घडती'** (५।३२।३) चातकाप्रमाणे सतत रामस्मरण, भजन करावे; ते क्षणभर चुकल्यास माझ्याकडून मोठा दोष घडला, मोठी विपत्ती कोसळली असे मला वाटले पाहिजे. **'तद्विस्मरणे परम व्याकुलता'** (ना.भ.) हे सूत्र सुचविले. **(ख) प्रेम वाढतां सर्व भलेपण** - चातकाचे प्रेम वाढत जाण्यातच त्यास जसा सर्वप्रकारे भलेपणा वाटतो; तसे इतर अनेक आपत्ती लोकनिंदा, अपकीर्ति, स्वर्गादि- लोकहानि इत्यादि घडले व रामप्रेम वाढले तर, त्या आपत्ती कोसळण्यांतच भलेपणा आहे. त्यांत माझे कल्याण आहे असे मला वाटले पाहिजे. **'लोकहानौ चिंता न कार्या निविदितात्मलोकवेदत्वात'** **(ना.भ ६१)** या सूत्राचाच भाव येथे आहे. याप्रमाणे एका दृष्टान्ताचे स्पष्टीकरण झाले.

**चौ. ५ - (१) कनकतेज जस वाढे दाहे - 'दग्धं दग्धं पुनरपि पुनः काञ्चनं**

**कान्तवर्णम्'** (सु.र.) अग्नींत सोने जो जो तापवावे तो तो ते अधिकाधिक शुद्ध व तेजस्वी होत जाते. तसाच रामविरह दावानल व लोकनिंन्दारूपी भट्टीतील आग, यानी माझे हृदय अधिकाधिक शुद्ध व सीतारामचरणरति अधिकाधिक सतेज होत जावे व तसे होण्यास **'प्रियतम चरणनेम निर्वाह** - सीतारामचरण प्रेमाचा जो नेम आहे त्याचा निर्वाह सतत झाला पाहिजे. तो नेम सतत निभावला - टिकला पाहिजे. या प्रेम नेमाचा निर्वाह कसा करावयाचा हे **'असे सकल रघुपति संपत्ती'** पासून **'रामराम सीता भारी प्रेमभरांत उच्चारीत'** प्रयागास चालत येणे, फोड आले असता पायी जाऊन त्रिवेणीस्नान करणे, श्यामल धवल तरंगांस पाहतांच प्रेमात मग्न होणे, ज्याच्या त्याच्या जवळ प्रेमाची याचना निर्लज्ज होऊन करणे; रामवनवासाचा दोष स्वतःवर घेणे इत्यादि गोष्टींनी दाखवीत आले आहेत आणि या काण्डाच्या समाप्तीपर्यंत व पुढे लंका व उत्तर कांडात पण दिसेलच. **या सर्व गोष्टी 'प्रियतमपदनेम' यांत अंतर्भूत होतात.** हा प्रियतमपदनेम शेवटपर्यंत टिकेल व प्रेम वाढत जाईल इतका वर कृपाकरून द्या; दुसरे काही नको. **'प्रतिजन्मी, प्रभुपदकमल - स्नेह न घटो कदाहि'** (७।४९) असे वसिष्ठ गुरुंनी रामाजवळ मागितले आहे. **(क)** अशा भक्तांचे भगवंतावर कितीही अगाध, प्रेम असले तरी ते त्याला नसल्यासारखेच वाटत असते; याचे कारण इतकेच की प्रियतम व प्रेम या दोनच गोष्टी राहिलेल्या असतात; तिसरा, जो प्रेम करणारा तो, त्या प्रेमांत विरघळून गेलेला असतो. तीन उरत नाहीत. मी प्रेम करणारा असा कोणी तिसरा असला तर प्रेम आहे व किती आहे हे त्याला कळणार; तोच प्रेमरूप झाल्यावर प्रेम आहे हे त्याला कसे कळणार ! डोळ्याला डोळा कसा दिसणार ! भगवत्प्रेम भगवद्रूपच असल्याने ते अनंत अपार असणारच ! मग पुरे झाले वाटेल कसे? सान्त, परिच्छिन्न असेल तेथे म्हणता येईल की झाले, मिळाले सगळे !' **'त्रि-भंग पूर्वकम् नित्यदास नित्यकान्ताभजनात्मकं वा प्रेमैव कार्य, प्रेमैव कार्यम्'** **(ना. भ. ६६)** त्रिपुटी - भंग करून नित्यदास भजनात्मक प्रेमच भरताचे आहे व तेच ते मागत आहेत.

*हिं.* । *भरत बचन सुनि माझ त्रिबेनी । भइ मृदु बानि सुमंगल देनी ॥६॥*
*। तात भरत तुम्ह सब बिधि साधू । राम चरन अनुराग अगाधू ॥७॥*
*। बाहि गलानि करहू मन माहीं । तुम्ह सम रामहि कोउ प्रिय नाहीं ॥८॥*

*हिं. दो.* । *तनु पुलकेउ हियँ हरष सुनि बेनि बचन अनुकूल ॥*

*॥ भरत धन्य कहि धन्य सुर हरषित बरषहिं फूल ॥२०५॥*

म. *। श्रवुनि भरतवच, मधे त्रिवेणी । होइ सुमंगलदा मृदु वाणी ॥६॥*

*। तात भरत तुम्ही सबविधिं साधू । रामचरण - अनुराग अगाधू ॥७॥*

*। करतां ग्लानी मनीं व्यर्थ ही । प्रिय रामा कुणि तुम्हांसम नहीं ॥८॥*

म.द *। श्रवुनि हर्ष हृदिं पुलक तनुं वेणिवचन अनुकूल ॥*

*॥ भरत धन्य म्हणतात सुर हर्षित वर्षति फूल ॥२०५॥*

**अर्थ -** भरताचे भाषण ऐकून त्रिवेणीच्या मध्यभागी सुमंगलदायक मृदु वाणी झाली. ॥६॥ तात ! भरत ! तुम्ही सर्व प्रकारे साधु आहांत श्रीरामचरणांच्या ठायी तुमचे अगाध प्रेम आहे. ॥७॥ तुम्ही आपल्या मनात ही ग्लानी निष्कारण व्यर्थ करीत आहांत; (कारण) रामचंद्रांस तुमच्यासारखे प्रिय कोणी सुद्धा नाही. ॥८॥त्रिवेणीचे अनुकूल वचन ऐकून भरताच्या हृदयांत हर्ष झाला व तनु पुलकित झाली व देवांनी धन्य भरत धन्य भरत असे म्हणत हर्षाने फुलांची वृष्टी केली. ॥ दो. २०५॥

**टीका. चौ. ६ - (१) श्रवुनि भरतवच, मधे त्रिवेणी -** त्रिवेणीसंगमांत मधे सरस्वती गुप्त आहे; तीच बोलली. सीतेने गंगेला प्रार्थना केली तेव्हा **'झाली विमल जलीं वरवाणी'** (१०३।४) येथे, त्रिवेणीच्या जलांत वाणी झाली असे न म्हणतां मधे त्रिवेणी' (माझ त्रिवेनी) असे म्हटले. वाणी = सरस्वती हा अर्थ आहेच. त्रिवेणीच्या मधे असलेली जी वाणी तिची वाणी झाली; पण ऐकणारांना ती त्रिवेणीचीच वाणी वाटली. **(क) सुमंगलदा =** सुमंगलदायक - जे नव्हते, जे मागितले ते देणारी; असा अर्थ येथे आहे. **'कुशल सुमंगल पुसिले क्षेमा'** (१९५।३) **'सुमंगल'** टीका पहा. येथे त्रिवेणीने प्रत्यक्ष दिले नसले तरि आपलेच गुप्त धन जो आपणांस मिळवून देतो तो कल्याणकर्ता, कल्याणदाताच असतो व वाटतोही. तसेच रामप्रेमधन भरतांजवळ पुष्कळ असून मुळीच नाही असे वाटत होते, त्याची त्यांस जाणीव करून दिली.

**चौ. ७ - (१) सबविधिं =** सर्वप्रकारे; देहाने, मनाने, वाणीने, सर्वकाळी, सर्व अवस्थांत सर्व ठिकाणी. **(क) रामचरण - अनुराग अगाधू -** भरताचे रामप्रेम इतके अगाध आहे की - वसिष्ठ, रामसखा, सर्वदेव, लक्ष्मण, व जनकराजा अशांना सुद्धा त्याचा ठाव लागला नाही. रामचरणिं अनुराग हे साधूंचे मुख्य लक्षण आहे म्हणून त्यांचा स्वतंत्र उल्लेख केला. हे लक्षण नसेल तर बाकीच्या

सर्व लक्षणांची किंमत शून्य !

**चौ. ८ - (१) करतां ग्लानी मनीं व्यर्थ ही - 'ग्लानी तात ! वृथा करतां अति'** (२६ - ३।५) असे राम भरतांस पुढे म्हणत आहेत. यावरून ठरते की जरी येथे त्रिवेणीने सांगितले तरी भरताची ग्लानी नष्ट झाली नाही. ही ग्लानी म्हणजे माझा जन्मच रामवचनास्तव इ.इ. वाटणे व रामप्रेम नाही असे वाटून शोक विषाद करीत स्वतःस दोष देणे. **(क) 'प्रिय रामा कुणि तुम्हासम नही' 'मला कुटिल जरि राम समजले'** वगैरे वचनांवर हे उत्तर आहे. भाव हा की राम तुम्हाला कुटिल वगैरे काही समजत, मानीत नाहीत. त्यांचे तुमच्यावर जितके प्रेम आहे तितके इतर कोणावरही नाही. तुम्ही दोघेही एकमेकास प्राणप्रिय आहात. कौसल्येने हेच सांगितले; निषादराजाने हेच सांगितले, येथे त्रिवेणीतील वाणीने तेच सांगितले तरी पुन्हा अनेकांनी अनेक वेळा सांगण्याची वेळ येतच आहे. सहज प्रेमाची रीत ही अशी आहे !

**दो. - (१) त्रिवेणीचे वचन ऐकून हर्ष झाला** - विषाद गेला. गेला म्हणजे क्षणभर बाजूला सरला आहे. अगदी थोड्याच वेळाने पुन्हा प्रवेश करणार आहे भरतहृदयांत. **(क)** 'स्वामि गुरूद्रोही जग वदले' याचे उत्तर त्रिवेणीने देण्याची आवश्यकता नव्हती. कारण तीर्थराजाजवळ फक्त सीतारामचरण रति च मागितली होती. तथापि शंका राहू नये म्हणून देवांनी धन्य धन्य म्हणून पुष्पवृष्टी केली. **(ख) ती पुष्पवृष्टी करण्यांतसुद्धा देवांचा गुप्त स्वार्थी हेतु आहेच.** भरताची भेट झाल्याशिवाय राम चित्रकूट सोडून दण्डकारण्यांत जात नाहीत हे देवांना माहीत आहे; व तेथे पंचवटीत राम गेल्याशिवाय देवांचे स्वार्थसाधनाचे कार्य सुरू होत नाही. भरत असेच विषाद करीत बसले तर रामभेट लांबणीवर पडणार. रामभरत भेट शक्य तेवढी लवकर व्हावी हा देवांचा हेतु आहे; पण रामभरत भेट होण्याने आपला स्वार्थ समूळ बुडणार अशी शंका येताच रामभरत भेटच होऊ न देण्याचा हेच देव आटोकाट प्रयत्न करणार आहेत.

***श्री मानस गूढार्थ चंद्रिका अयोध्याकाण्ड अध्याय १९ वा समाप्त.***



# अध्याय २० वा

हिं. *। प्रमुदित तीरथराज निवासी । बैखानस बटु गृही उदासी ॥२॥*
*। कहहिं परसपर मिलि दस पाँचा । भरत सनेहु सीलु सुचि साँचा ॥३॥*
*। सुनत राम गुन ग्राम सुहाए । भरद्वाज मुनिवर पहिं आए ॥४॥*
*। दंड प्रनामु करत मुनि देखे । मूरतिमंत भाग्य निज लेखे ॥५॥*
*। धाइ उठाइ लाइ उर लीन्हे । दीन्हि असीस कृतारथ कीन्हे ॥६॥*

म. *। प्रमुदित होती तीर्थपति - वासी । वैखानस बटु गृही उदासी ॥२॥*
*। मिळुनी म्हणती दहा पंधरा । भरत-शील नी स्नेह शुचि खरा ॥३॥*
*। श्रवत भरत शुभ राम - गुणांसीं । आले भरद्वाज - मुनिपाशीं ॥४॥*
*। करत दंडवत मुनिवर बघती । मूर्तिमंत निज भाग्य समजती ॥५॥*
*। धाउनि हृदयी धरले उठवुनि । केले कृतार्थ आशिस देउनि ॥६॥*

**अर्थ** - तीर्थराजांत (प्रयांगात) निवास करणारे वानप्रस्थ ब्रह्मचारी, गृहस्थ व संन्यासी इ. सर्व प्रमुदित झाले (व) ॥१॥ दहापंधरा (थोडेथोडे) लोक एकत्र जमून म्हणू लागले की भरताचे शील व स्नेह पवित्र व सत्य आहेत. ॥२॥ रामचंद्रांचे शुभ (कल्याणकारक) गुण श्रवण करीत भरत भरद्वाज मुनींकडे आले ॥३॥ भरत दंडवत करीत असलेले मुनिश्रेष्ठांनी पाहिले व हे आपले मूर्तिमंत भाग्यच आहे असे त्यांस वाटले. ॥४॥ व धावत जाऊन त्यांस उठवून हृदयाशी धरले आणि आशीर्वाद देऊन कृतार्थ केले. ॥५॥

**टीका. चौ. १-३ - (१) प्रमुदित होति तीर्थपतिवासी** - ती त्रिवेणीत झालेली देववाणी आजूबाजूला असणाऱ्या चारी वर्णांच्या व आश्रमांच्या लोकांच्या कानी गेली व ती भराभर प्रयागांत पसरली. यामुळे भरताचे पवित्र आचरण आणि शुद्ध व खरे प्रेम यांविषयी लोकांची खात्री होऊन लोक भरताची प्रशंसा करू लागले. भाव हा की त्या तीर्थपति वाणीने व देवांनी केलेल्या प्रशंसेने भरताविषयी शंका येण्यास जागा राहिली नाही व सैन्य वगैरे पाहून ज्यांना शंका आली होती त्यांच्या शंकांचा निरास आपोआप झाला. **(क) श्रवत शुभ रामगुणांसी** - भरत विप्रांना दाने वगैरे देऊन निघाले ते भरद्वाजांच्या आश्रमाकडे चालले. वाटेत लोकांच्या मुखाने चाललेले रामगुणवर्णन त्यांच्या कानावर पडत होते.

**चौ. ४ - (१) करत दंडवत मुनिवर बघती** - राम भरद्वाजांकडे गेले त्या

वर्णनाशी तुलना करण्यासारखी आहे. **'प्रभू भरद्वाजाप्रति येती । करत दंडवत मुनि उरिं धरिती ॥७॥ मुनिमनिं मोद, न जरा सांगवत । ब्रह्मानंदराशि जणुं पावत ॥८॥ लोचन-गोचर सुकृत फळ 'करि विधि जणु आणून'** (१०६) राम = ब्रह्मानंदराशि = ब्रह्मानंदमूर्ती व सुकृताचे दृश्य फळ वाटले. भरत = मूर्तिमंत निज भाग्य वाटले. भाव हा की रामदर्शनाने जे अपूर्व भाग्य निर्माण झाले त्याचे फळच भरताच्या रूपाने मूर्तिमंत होऊन पुढे लोळण घेत आहे असे दिसले. 'रामदास (भरत) रामाहुनि मोठे' हे पुन्हा दाखविले. **'सकल साधनां सुफल सुशोभन । लक्ष्मण राम नि सीता दर्शन ॥ त्या फलांस फल दर्शन तुमचे । सवें प्रयागा सुभाग्य अमचे ॥** (२१०।४-५) या चौपायांत येथील 'मूर्तिमंत निजभाग्य' याचाच अर्थ स्पष्ट केला आहे. एकट्याचेच भाग्य नव्हे तर तीर्थराजासुद्धा सर्वतीर्थराजनिवासी लोकांचे व भरद्वाजांसह भरद्वाजाश्रमांतील सर्व लोकांचे व प्राण्यांचे. येथे हे दाखविले की **भगवंताचे प्रत्यक्ष दर्शन साधनादिकांनी कदाचित होऊ शकेल पण भरतासारख्या परमोत्तम अलौकिक रामभक्ताचे दर्शन साधनादिकांनी होणार नाही; ते भगवत्कृपेनेच होऊ शकेल. 'महत्संगस्तु दुर्लभोऽगम्योऽ मोघश्च'** (ना. भ. ३९) व अशा महापुरुषांची संगती **'लभ्यतेऽपि तत्कृपयैव' (ना.भ. ४०) -**

**चौ. ५ - (१) धाउनि धरले हृदयीं उठवुनि** - रामचंद्रांना जसा पुरता दंडवत नमस्कार करून दिला नाही तसाच भरतांसही नाही करू दिला. जितक्या उत्सुकतेने भगवंतास हृदयाशीं धरले त्यापेक्षा अधिक उत्सुकतेने भरतांस उठवून हृदयासी धरले हे धावण्याने सिद्ध झाले. रामचंद्रांना आशीर्वाद दिला तर भरतांस आशीर्वाद देऊन कृतार्थ केले. भाव हा की त्यांना जो पाहिजे होता तोच आशीर्वाद दिला. ॥ सीतारामचरणरति निर्मल । रामकृपा करितीलही अविरत ॥ असा आशीर्वाद दिला. भरद्वाजांचा आशीर्वाद खोटा होणार नाही हे जाणून भरतांस वाटले की मी कृतार्थ - कृतकृत्य - झालो. सीतेने **'बहुत कृपा रघुनायक करतील'** असा आशीर्वाद हनुमंतास दिल्यावर हनुमान म्हणाले **'मी माते कृतकृत्यचि आता । आशिष तव अमोघ विख्याता'** (५।१७। ३,६). तीर्थराजाने असा वर दिला नाही. तुमच्या ठिकाणी भक्ती आहेच असे सांगितले.

***हिं.*** ***। आसनु दीन्ह नाइ सिरु बैठे । चहत सकुच गृहँ जनु भजि पैठे ॥६॥***
***। मुनि पूँछब कछु यह बड सोचू । बोले रिषि लखि सीलु सँकोचू ॥७॥***
***। सुनहु भरत हम सब सुधि पाई । बिधि करतब पर किछु न बसाई ॥८॥***

*हिं. दो. । तुम्ह गलानि जियँ जनि करहु समुझि मातु करतूति ॥*
*॥ तात कैकइहि दोसु नहिं गई गिरा मति धूति ॥२०६॥*
*म. । आसन दिले नमुनि शिर बसती । जणुं संकोच गृहीं घुसु बघती ॥६॥*
*। अति चिंता काहीं पुसतिल मुनि । वदति शील संकोचा लक्षुनि ॥७॥*
*। भरत अम्हां सब वृत्त मिळाले । विधि - करणीशि इलाज न चाले ॥८॥*
*दो. । तुम्ही ग्लानि मनिं नका करू मायकरणि चिंतून ॥*
*॥ तात ! न कैकइ दोषि, गत गिरा मतिस फिरवून ॥२०६॥*

**अर्थ** - मुनींनी आसन दिले व भरत त्यांस नमन करून आसनावर बसले; (आसनावर बसले म्हणण्यापेक्षा) संकोच रूपी घरांतच जणू (घाबरून) घुसू बघत आहेत, (असे म्हणणे चांगले. अत्यंत खजिल झाले असून अत्यंत संकोच वाटत आहे). ॥६॥ मनांत अतिशय चिंता आहे की मुनि काही तरी विचारतील. भरताचे ते शील व तो संकोच मुनींच्या लक्षांत आला तेव्हा मुनि म्हणाले - ॥७॥ भरत ! आम्हांला सगळी बातमी कळली आहे; पण दैवाच्या करणीपुढे कोणाचा काही उपाय चालत नाही. ॥८॥ तात ! मातेची करणी मनांत आणून तुम्ही मुळीच ग्लानि करू नका. त्यांत कैकईचा काहीच दोष नाही (कैकयी दोषी नाही) कारण, सरस्वती (गिरा) बुद्धी फिरवून गेली. ॥दो. २०६॥

**टीका. - चौ. ६-७ - (१) जणुं संकोचगृहीं घुसुं बघती** - मान अगदी खाली घालुन सर्वांग संकोचित करून बसले. त्या बसण्यावर कवि उत्प्रेक्षा करतात की संकोचरूपी घरांत घाईघाईने चटकन शिरून लपून बसावे म्हणजे मुनि काही विचारणार नाहीत व काही सांगावे लागणार नाही. असे वाटले. **(क) वा. रा.** सर्ग ९०।९-१३ मध्ये भरद्वाजांनी बरेच प्रश्न केले आहेत व म्हणाले आहेत की राज्य करीत असतां इकडे येण्यांत हेतु काय? **'एतदाचक्ष्व मे सर्वं नहि मे शुध्यते मनः ॥ कच्चिन्न तस्याऽपापस्य पापं कर्तुमिहेच्छसि ॥ अकंटकं भोक्तुमना राज्यं तस्यानुजस्य च ॥** (१०, १३) 'तुझ्या विषयी माझे मन शुद्ध नाही; निष्पाप (अपाप) अशा रामाचे व त्यांच्या अनुजाचे काही वाईट करून अकंटक राज्य भोगावे या हेतूने तर नाही ना जात?' हे मुख्य महत्वाचे प्रश्न आहेत, बाकीच्यांत रामगुणांचे वर्णन आहे. मानसांतील भरद्वाजांसारखेच वाल्मिकींचे भरद्वाज त्रिकालज्ञ, सर्वज्ञ आहेत. त्यांनीही मानसांतील भरद्वाजांप्रमाणेच सिद्धींच्या मदतीने ससैन्य भरताचा उत्तम सत्कार केला आहे ! मानसांतील भरद्वाजांनी असले कुजके

प्रश्न मुळीच विचारले नाहीत हे त्यांच्या सर्वज्ञतेस व त्रिकालज्ञतेस शोभण्यासारखेच आहे. (ख) **अति चिंता काहीं पुसतिल मुनि - । वदति -'** यांतील मुनि शब्द 'वदति' बरोबर ही घ्यावयाचा आहे.

**दो. (१) गत गिरा मतिस फिरवून** - जेथे ही अघटित घटना घडली तेथे गिरेने कैकयीचा बुद्धिभेद केल्याचा उल्लेख नाही. मंथरेचा बुद्धिभेद केल्याचा उल्लेख स्पष्ट आहे. **'गिरा फिरवुनि जाइ मतीस' (दो. १२ पहा.)** कैकयी **'सुरमायावश वैरिणिसि सुहृद् - प्रतीती मानि' (दो. १६)** सरस्वतीने कुबडीचा बुद्धिभेद केला नसता तर सुरमायेलासुद्धा काही करता आले नसते; म्हणजे परंपरेने सरस्वतीच कैकयीच्या बुद्धिभेदाचे कारण आहे.

*हिं. । यहउ कहत भल कहिहि न कोऊ । लोकु बेदु बुध संमत दोऊ ॥१॥*
*। तात तुम्हार बिमल जसु गाई । पाइहि लोकउ बेदु बडाई ॥२॥*
*। लोक बेद संमत सबु कहई । जेहि पितु देइ राजु सो लहई ॥३॥*
*। राउ सत्यब्रत तुम्हहि बोलाई । देत राजु सुखु धरमु बडाई ॥४॥*
*। राम गवनु बन अनरथ मूला । जो सुनि सकल बिस्व भइ सूला ॥५॥*
*। सो भावी बस रानि अयानी । करि कुचालि अंतहुँ पछितानी ॥६॥*
*म. । हे ही भले म्हणे ना कोणी । लोक-वेदबुध-संमत दोनी ॥१॥*
*। तुमचे तात विमल यश गातिल । महती लोक हि वेद पावतिल ॥२॥*
*। श्रुति-जन-संमत, म्हणति सकल तो । राज्य करी ज्या पिता अर्पितो ॥३॥*
*। नृप सत्यव्रत तुम्हा आणते । राज्य धर्म सुख महति अर्पिते ॥४॥*
*। राम-गमन वनिं अनर्थमूल हि । तेणें सकल जगाला शूल हि ॥५॥*
*। तें भावीवश राणि अडाणी । करि कुचाळी अनुतापा मानी ॥६॥*

**अर्थ** - हे म्हणणे (गिरा मतीस फिरवी हे) सुद्धा चांगले आहे असे कोणी (= अज्ञानी लोक) म्हणणार नाहीत. पण दोन्ही विचार लोकसंमत आणि वेद बुध संमत आहेत (एक लोक संमत व एक वेदबुधसंमत) ॥१॥ तात ! तुमच्या निर्मल यशाचे गान करतील व लोक आणि वेदसुद्धा महत्त्व पावतील. ॥२॥ वेद व लोक यांना हे संमत आहे आणि सर्वच म्हणतात की पिता ज्याला राज्य अर्पण करतो तो (च) राज्य करतो, (त्याने करावे) ॥३॥ दशरथ महाराज सत्यप्रतिज्ञ असल्यामुळे (ते असते तर) त्यांनी तुम्हाला आणले असते आणि तुम्हाला राज्य, धर्म, सुख व महती अर्पण करते. ॥४॥ रामवनगमन हे सर्व

अनर्थाचे मूळ आहे आणि त्यामुळे सर्व जगालाच शूल (पीडा) होत आहे हे खरे ॥५॥ पण ते प्रारब्ध बलानेच झाले आहे; व अज्ञानी राणीने दैववशात कुचाळी केली (खरी), पण तिला आता पश्चात्ताप (अनुताप) होत आहे. ॥६॥

**टीका. चौ. १ - (१) 'हे ही भले म्हणे ना कोणी - हे - 'गत गिरा मतिस फिरवून'** सरस्वती बुद्धिभेद करून गेली हे म्हणणे कोणी म्हणजे कांही लोक खरे मानणार नाहीत, म्हणजेच असे लोक, कैकयी तत्वतः दोषी नसता, तिला दोषी म्हणतीलच, पण त्याला काही उपाय नाही. हे लोकसंमत असणारच. परंतु वेद व बुध (= ज्ञानीभक्त) मात्र असेच म्हणणार की कैकयी दोषी नाही आणि गिरा बुद्धिभेद करून गेली. **बुध =** ज्ञानीभक्त; रामभक्त असून रामपरमात्मा आहेत हे (महात्म्य ज्ञान) ज्ञान ज्यांचे लुप्त झालेले नाही ते. (२।१२७।७) - **'सुख बुधांस जड जाती मोहुनि'** ची विस्तृत टीका पहावी. **'तत्रापि न माहात्म्यज्ञान - विस्मृत्यपवादः' (ना.भ. २२)** पुन्हां भाव हा की अज्ञानी बहुजन समाजाच्या म्हणण्यास व मतास अशा बाबतीत किंमत देणे योग्य नाही. घुबडानी सूर्याला निस्तेज म्हणण्यासारखेच हे लोकमत असते. अशा मताला सत्य मानून ग्लानि करणे योग्य नाही. याप्रमाणे या चौपाईचा संबंध मागल्या दोह्याशी आहे.

**चौ. २ - (१) तुमचे तात विमल यश गातिल** - लोकांनी कैकयीला दोष देणे लोकांच्या ज्ञानानुसार कदाचित क्षम्य ठरेल; पण तुम्हाला दोष देणे मात्र क्षम्य नाही. तुमचे यश अगदी विमल आहे. फार काय तुमच्या यशाचे गान जे लोक करतील ते मोठे होतील, त्यांची कीर्ति होईल. **(क) लोक =** स्वर्गादि लोक तुमची कीर्ति गातील एवढेच नव्हे तर वेद सुद्धा तुमचे यश गातील इतके ते निर्मल आहे. असे तुमचे यश असता तुम्ही ग्लानि करता हे आश्चर्य आहे !

**चौ. ३ (१) श्रुति जन संमत** - या चौपाईपासून २०८।१ पर्यंत, मागल्या चौपाईत केलेल्या विधानाची सत्यता पटवून देत आहेत. येथे हे सांगितले की पिता ज्याला राज्य देईल त्या पुत्राने राज्य करणे हा दोष नाही. वेदशास्त्रांना व लोकमताला पण हे मान्य आहे. **'वेदविदित संमत सर्वांसीं । पिता देइ तो करि राज्यासी'** (१७५।३) असे वसिष्ठांनी पूर्वीच सांगितले आहे. १७४।७-८ या चौपायांची टीका पहावी.

**चौ. ४ (१) नृप सत्यव्रत तुम्हां आणते - अर्पिते** - सत्यप्रतिज्ञ असल्यामुळे प्रतिज्ञा पालन करण्यासाठी दशरथांनी तुम्हाला आणवून राज्य दिले असते. यांत

त्यांना प्रतिज्ञा पूर्ण केल्यामुळे मोठेपणाच मिळाला असता; वचन सत्य केल्याने धर्मपालनाचे श्रेय त्यांना मिळाले असते व त्याबद्दल समाधान (सुख) वाटले असते. **(क)** पित्याची आज्ञा पालन केल्याने तुम्हालाही धर्मपालनाचे श्रेय मिळाले असते. जगात मोठेपणा मिळाला असता व प्रजेला सुखी करण्याने तुम्हाला सुख व पित्राज्ञा पालन केल्याचे समाधान झाले असते. या सर्वांचे उत्तर भरतानी अयोध्येच्या दरबारात दिले आहे.

**चौ. ५-६ (१) रामगमन वनिं... तें भावीवश** - यांत हे दाखविले की जास्तीत जास्त वाईट व सर्व जगाला दुःखदायक घटना म्हणजे रामवनवास व त्याचे प्रत्यक्ष कारण कैकयी असा हा संबंध दिसतो हे खरे; पण यांतसुद्धा कैकयीने जे केले ते तिच्या पूर्व स्वभावाला अनुसरून केले असे नाही. सगळ्यांच्या प्रारब्धांत जी पीडा भोगावयाची आहे ती भोगविण्यास दैवबलाने तिच्या बुद्धीत एकाएकी स्वभावाविरुद्ध फरक पडला. यांत तिचा काहीही दोष नाही. तिने जाणून बुजून केले असते तर आज तिला जो कल्पनातीत अनुताप - पश्चात्ताप होत आहे तो झाला नसता. **'तात न कैकयि दोषि'** (२०६) असे म्हटले ते वेद बुधमत दृष्टीने म्हटले व कैकयीच दोषी नाही तर तुम्ही मुळीच दोषी नाही हा त्यांतील भाव होता. येथे म्हटले की प्रारब्धबलाने तिच्याकडून दोष घडला; स्वभावतः घडला नाही. हे लोकमत दृष्टीने सांगितले व सुचविले की लोकांनीसुद्धा तिला दोषी मानणे योग्य नाही; पण लोकांनी कैकयीला निमित्त कारण समजून दोषी मानली तरी -

*हिं. । तहँउँ तुम्हार अलप अपराधू । कहै सो अधम अयान असाधू ॥७॥*
*। करतेहु राजु त तुम्हहि न दोषू । रामहि होत सुनत संतोषू ॥८॥*
*दो. । अब अति कीन्हेहु भरत भल तुम्हहि उचित मत एहु ॥*
*॥ सकल सुमंगल मूल जग रघुबर चरन सनेहु ॥२०७॥*
*हिं. । सो तुम्हार धनु जीवन प्राना । भूरिभाग को तुम्हहि समाना ॥१॥*
*। यह तुम्हार आचरजु न ताता । दसरथ सुअन राम प्रिय भ्राता ॥२॥*
*म. । तुमचा त्यांत अल्प अपराधू - । म्हणे अधम तो मूर्ख असाधू ॥७॥*
*। करत हि राज्य न दोष लागता । रामहि संतोषते ऐकतां ॥८॥*
*दो. । भलें फार कृत भरत हें योग्यचि मत तव ठायिं ।*
*॥ सकल सुमंगल मूल जगिं प्रेम च रघुवर - पायिं ॥२०७॥*

*म.* *। ते धन जीवन तुमचे प्राण हि । भूरिभाग्य सम तुम्हां किं आन हि ॥१॥*
*। तात ! यांत तव नवल न काहीं । दशरथ सुत, लघु राम-बंधुही ॥२॥*

**अर्थ** - (कैकईने जे केले) त्यांत तुम्ही थोडासाही अपराध केलात असे जो म्हणेल तो नीच, मूर्ख व दुष्ट (असाधु) आहे (असे ठरेल.)॥७॥ तुम्ही राज्य केले असतेत तरीही काही दोष घडला नसता; व ते ऐकून रामचंद्रांस सुद्धा संतोष झाला असता.॥८॥ (तथापि) भरत ! तुम्ही (केलेत ते) फार चांगले केलेत; तुमच्या ठिकाणी हे मत योग्यच आहे; (कारण) या जगात सकल सुमंगलाचे मूळ म्हणजे रघुवर चरणी प्रेमच, (स्नेहच)॥दो.२०७॥ ते तर तुमचे धन, जीवन आणि प्राण आहे. (म्हणून) तुमच्या सारखा अत्यंत भाग्यवान (जगात) दुसरा कोणीतरी आहे काय ? (कोणीही नाही) ॥१॥ पण तात ! यांत तुमचे काही नवल नाही. आश्चर्य नाही; कारण तुम्ही दशरथसुत व रामाचे धाकटे भाऊ आहात.॥२॥.

**टीका. - चौ. ७ (१) तुमचा त्यांत अल्प अपराधू म्हणे - असाधू** - मूर्ख, अडाणी कैकयीने प्रारब्ध वशात अकार्य केले असे मानल्यास ते एक वेळ क्षम्य होईल; पण कैकईला तुम्ही सामील होतात असे जे मानतील किंवा त्याबद्दल तुम्हाला थोडासुद्धा दोष देतील ते मूर्ख ठरणारच; पण ते नीच (अधम) आणि दुष्ट, दुर्जन (असाधु) आहेत असेही ठरेल व त्यांना नीच, दुष्टांची दुर्गति मिळेल. मूर्खपणा क्षम्य, उपेक्षणीय आहे, पण नीचता, दुष्टता अक्षम्य व दंडनीय आहेत. असाधु = दुर्जन, दुष्ट हाच अर्थ मानसांत सर्वत्र आहे. 'सुधा सुरा सम **साधु असाधू'** (१।५।६) 'साधु असाधु सदन शुक सारी' (१।७।१०) **(क)** येथे हे दाखविले की कैकयी मूर्ख ठरली तरी अधम, दुष्ट ठरत नाही. **दुष्टांना व अधमांना कधी पश्चात्ताप होत नाही.** मूर्खांना पश्चात्ताप करण्याची वेळ केव्हातरी येते. कैकयीला पश्चात्ताप होत आहे.

**चौ. ८ - (१) राम हि संतोषते ऐकतां** - 'श्रवुनि राम वैदेहि सुखावति । पंडित कोणि न अनुचित ठरवति' (१७५।५ टी.प.) असे वसिष्ठांनी सांगितले आहे.

**दो. - (१) भलें फार कृत भरत** - राज्य स्वीकारणे चांगलेच होते; पण स्वीकारले नाहीत हे फारच चांगले केलेत. पित्राज्ञापालनादि धर्म आहेत; पण रामप्रेमासाठी सर्वस्वाचा व लौकिक सर्व धर्माचा त्याग करणे हा परम धर्म

आहे, हा परम परमार्थ आहे. धर्माचरण सुमंगल आहे. पण त्याच्या मूळाशी रामचरणस्नेह असेल तरच ते योग्य. **रामपदप्रेम रूपी मूळ नाही ते सुमंगल निरुपयोगी, त्याज्यच. सकल सुमंगल मूल रघुवरचरणीं स्नेहच आहे.**

**चौ. १ - (१) तें धन जीवन तुमचे प्राणहि** - येथे जीवन = सर्वस्व. रामचंद्र **मुनिधन, जनसर्वस्व, शंभु असु'** (१।१९८।२) आहेत. यांत **धन, सर्वस्व व असु** = प्राण असा उल्लेख नाही. येथील चौपाईत **धन, जीवन व प्राण** असा उल्लेख आहे. यावरून जीवन = सर्वस्व हे मानसाधारे ठरले. धन व प्राण यांशिवाय जे काही इतर, माझे म्हणून वाटण्यासारखे असेल ते = सर्वस्व, असा अर्थ येथे आहे. माता, पिता, गुरु, विद्या, शास्त्र, धर्म, कर्म, पुण्य, यश, कीर्ति इत्यादी सर्व. राम मुनींचे धन आहे, भक्तांचे-सेवकांचे धनासह सर्वस्व आहेत व शंकरांचे प्राण आहेत. परंतु **भरतांस रामप्रेम धन आहे, रामप्रेमच सर्वस्व आहे व रामप्रेमच प्राण आहे.** याने ठरले की भरताचे रामप्रेम सर्व मुनि, सर्व इतर रामभक्त (सेवक) व शंकर यांच्या रामप्रेमापेक्षा श्रेष्ठ आहे. वरील तिन्ही वर्गात एकांगी चातकभक्त कोणी नाहीत. त्या सर्वांना एका प्रकारे राम प्रिय आहेत; भरतांस तिन्ही प्रकारांनी रामप्रेम प्रिय आहे. सर्वात श्रेष्ठ रामभक्त शंकर; पण त्यांनीसुद्धा 'मामभिरक्षय रघुकुलनायक' इ. (६।११५ स्तुति पहा) व 'भवतापभयाकुल पाहि जनं' (७।१४ स्तुति) इ. पुष्कळ मागितले आहे व 'तव नाम जपामि, नमामि, भजे'; जप, भजन, नमन इ. मी करतो असे म्हटले आहे. भवतापातून सोडवा किंवा मी भजन, नामजप, नमन तुम्हाला करीत असतो **असे शंकरांप्रमाणे भरताने मानसांत म्हटले असल्यास कोणी दाखवावे !** म्हणून 'जग जपि रामं', 'राम जपि ज्यांही' (२१८।८)

**चौ. २ - (१) तात यांत तव नवल न काहीं** - तुम्हीं दशरथपुत्र आहात; त्यांनी रामप्रेमाने प्राणत्याग केला; तुम्ही सहज मिळालेल्या साम्राज्याचा त्याग केलात; तेव्हा यांत काही आश्चर्य-नवल नाही. ज्यांच्या स्नेहाला वश होऊन राम येऊन पुत्ररूपाने प्रगट झाले (२०९) त्यांचेच तुम्ही पुत्र ! (मग तुमच्या ठिकाणी असा रामस्नेह असला तर त्यांत नवल नाही. **(क) लघु रामबंधु** - पित्याच्या वचनासाठी साम्राज्याचा त्याग केला व हर्षविषादरहित राम वनात गेले. तुम्ही पित्याने दिलेल्या साम्राज्याचा त्याग करून रघुनाथांस परत आणण्यास चालला आहात हे रामबंधूला शोभण्यासारखेच आहे; यांतही काही नवल नाही :

हिं. *। सुनहु भरत रघुबर मन माहीं। पेम पात्रु तुम सम कोउ नाहीं ॥३॥*
*। लखन राम सीतहि अति प्रीती। निसि सब तुम्हहि सराहत बीती ॥४॥*
*। जाना मरमु नहात प्रयागा। मगन होहिं तुम्हरें अनुरागा ॥५॥*
*। तुम्ह पर अस सनेह रघुबर कें। सुख जीवन जग जस जड़ नर कें ॥६॥*
*। यह न अधिक रघुबीर बड़ाई। प्रनत कुटुंब पाल रघुराई ॥७॥*

म. *। पहा भरत ! रघुवरमनिं काहीं। प्रेमपात्र कुणि तुम्हांसम नही ॥३॥*
*। सितारामें लक्ष्मण सुप्रीतीं। वर्णित तुम्हां रात्र सरली ती ॥४॥*
*। स्नानीं मर्म हि कळे प्रयागीं। मग्न होति तुमचे अनुरागीं ॥५॥*
*। प्रेम तुम्हांवर तस रामाचें। सुख जीवनिं जगिं जस मूर्खाचें ॥६॥*
*। ही रघुवीर - महत्ता ना अति। प्रणत - कुटुंबा पालक रघुपति ॥७॥*

**अर्थ** - हे पहा भरत ! रघुवरांच्या मनात तुमच्या सारखा प्रेमपात्र कोणी नाहीं.।।३।। सीताराम व लक्ष्मण यांनी अत्यंत प्रीतीने (= सुप्रीती) तुमचे वर्णन करीत करीत (या आश्रमांत होते) ती रात्र (केव्हाच) संपविली.।।४।। सकाळी प्रयागात (त्रिवेणीत) स्नान करताना सुद्धा (हि) (तेच) मर्म कळले; तुमच्या अनुरागात राम मग्न होत होते.।।५।। सुखमय जीवनावर जसे मूर्खाचे प्रेम असते तसे रामाचे तुमच्यावर प्रेम आहे.।।६।। (पण) यांत रघुवीराची अति महत्ता आहे असे नाही; कारण की रघुपति शरणागताच्या कुटुंबाचे पालक आहेत च (असतात).।।७।।

**टीका. - चौ. ३-४ (१) प्रेमपात्र** - ज्यांच्यात प्रेमरूपी रस साठवून ठेवावयाचा ते पात्र, स्थान. भाव हा की सीता व लक्ष्मण प्रेमपात्र नाहीत असे नाही; पण तुमच्यावर रामाचे जितके प्रेम आहे तितके सीता व लक्ष्मण यांच्यावर सुद्धा नाही. मग जगात असा आणखी कोण असू शकेल की तुमच्या इतके तरी रामाचे प्रेम ज्याच्यावर असेल ! हे आम्हाला कसे कळले ते सांगतो. **(क) सितारामलक्ष्मण सुप्रीतीं - सरली ती** - अहो सीताराम-लक्ष्मण येथे आले ते तुमच्या सारखेच दमून भागून, पायी चालत; आल्यावर सुद्धा विश्रांतीचे नाव नाही ! मग आडवे झाल्याबरोबर झोप लागावी की नाही ? पण नाव कशाला ? तुमच्या आठवणी क्रमाक्रमाने काढून तुमच्या प्रेमाचे व शीलादि गुणांचे वर्णन करकरून रात्र केव्हा संपवली ते कोणास कळले सुद्धा नाही. तुमच्या शिवाय दुसरा विषयच तिघांपैकी कोणीही काढला नाही. माझा भरत कधी भेटेल, तो

आता काय करीत असेल; त्याला ही बातमी कळली असेल का ? त्याला किती वाईट वाटेल ? काय करील कोणास ठाऊक ! त्याला झोप तरी येत असेल का ? सीतेने म्हणावे बातमी कळली असल्यास कसली झोप नी कसले खाणेपिणे ! लक्ष्मणाने म्हणावे त्यांना तर आपल्या तिघांशिवाय घर म्हणजे स्मशान वाटत असेल ! असे सगळी रात्र चालले होते; किती सांगावे ! आम्हाला यांत आश्चर्य नाही वाटले पण वाटू लागले की भरताचे दर्शन केव्हा होईल ?

**चौ. ५ - (१) स्नानीं मर्म हि कळे प्रयागीं** - राम भरद्वाजाश्रमांत गेल्यापासून तेथून निघेपर्यंतच्या मागील वर्णनात रात्रभर जागल्याचा व हा उल्लेख नाही; पण या दोन्ही उल्लेखांची आवश्यकता व औचित्य या भरतभेटवर्णनांत अधिक असल्याने तुलसी काव्य शैलीप्रमाणे येथे वर्णन केले. येथे **प्रयागी स्नान** म्हटले असले तरी भरद्वाजादि मुनि नित्य प्रातःकाळी त्रिवेणीतच स्नान करीत असत असा उल्लेख पूर्वीच केलेला आहे - **'सादर सब मज्जती त्रिवेणी' 'हर्षे प्रातः स्नाना सारति'** (१।४४।४,८). म्हणून ठरले की भरद्वाजादि मुनि व रामसीतालक्ष्मण, बरोबरच त्रिवेणीस्नानासाठी गेले होते. **(क)** श्यामलधवल तरंग दिसताच जसे भरत रामलक्ष्मणप्रेमात मग्न झाले व अंगावर रोमांच उठले; (२०४।५) तसेच श्यामल धवल तरंगांस पाहतांच भरतशत्रुघ्नांची आठवण येऊन सीतारामलक्ष्मण भरत प्रेमात मग्न होत होते व वारंवार अंगावर रोमांच उठत होते हे मुनींनी पाहिले. विशेषतः संकल्पाचा उच्चार करताना **भरतखंडे** हे शब्द उच्चारताना तर त्या श्यामल तरंगांकडे पाहून घळकन डोळ्यांतून अश्रू गळले. **(ख) मर्म** - गुणांचे वर्णन करण्यापेक्षा सुद्धा हे असे सहज घडणे पराकाष्ठेच्या प्रेमाचे लक्षण, मर्म आहे. नाव ऐकताच अश्रु व रोमांच येणे, व नीलवर्ण पाहताच भगवंताची आठवण होऊन वाचा बंद पडून तटस्थ होणे इ. अनुभव आम्हाला रामसेवक, रामभक्त म्हणविणारांना कधी येतात का ? **हेच तर आहे खऱ्या भगवत्प्रेमाचे मर्म की 'राम' शब्द ऐकताच किंवा उच्चारताच सात्विक भाव सहज प्रगट झाले पाहिजेत. 'पुलकित, हृदिं सीता रघुवीर । जीभ नाम जपि लोचनिं नीर'** (२।३२६।१) असे भरताचे होते. कथा श्रवणांत, कीर्तनांत, प्रवचनांत सात्विक भाव प्रगट होणे हे जरी भक्तीचे लक्षण असले तरी ते खालच्या दर्जाचे आहे. **खरा प्रेमळ भक्त ओळखण्याचे मर्म च येथे सांगून ठेवले आहे. ज्याने त्याने आपली स्थिती पडताळून पहावी.** 'चैतन्य महा प्रभु' चे चरित्र वाचून पहावे.

**चौ. ६ - (१) सुखजीवनिं जगिं जस मूर्खाचे प्रेम** - मूर्खाला, अविवेकी माणसाला देहसुखाशिवाय इतर सुखाची कल्पनाच नसते. त्याचे सर्व प्रेम देहावरच असते. देह सदा सुखी ठेवावा. त्याला जरासुद्धा दुःख होऊ नये हेच मूर्खाच्या जीवनातील ध्येय असते. तसेच रामाचे प्रेम तुमच्यावर आहे. स्वतःच्या सुखाची कल्पना सुद्धा त्यांच्या मनात येत नाही. भरताचे जीवन सुखी करावे, त्याला मुळीच दुःख होऊ नये असाच प्रयत्न राम करतात. **'सेविति बंधु सिता रघुवीरा । नर अविवेकी जसा शरीरा'** (१४२।२ टी.प.) लं.कां. ११६।८ **'ऐकुनि मृदुवच दीनदयाल'** पासून पुढील सहा ओळी पहाव्या.

**चौ. ७ - (१) ही रघुवीर... प्रणत कुटुंबा पालक रघुपति** - यांतील दुसऱ्या चरणाचे दोन अर्थ होऊ शकतात. **I रघुपति =** रघुवंशांतील राजे, शरणागताचेच रक्षण करतात असे नाही; त्याच्या सर्व कुटुंबाचेही पालन करतात. मग रघुवीर राम रघुकुळातील व विश्वातील अद्वितीय वीर, सहा प्रकारच्या वीरतेने सहज संपन्न असलेले, शरणागताचे पालन, त्याच्या सर्व दोषांकडे दुर्लक्ष करून करतील यांत काहीच नवल नाही. **(क) ही रघुवीर महत्ता ना अति** - तुमच्यासारख्या (भरतासारख्या) सर्वस्वाचा त्याग करून चातकाप्रमाणे अनन्यगतिक अलौकिक प्रेम करणाऱ्या शरणागतावर ते इतके व असे (चौ.६) प्रेम करतील तर त्यांचे मोठे महत्त्व आहे असे नाही; आश्चर्य नाही. **हा अर्थच या मंदमतीस योग्य वाटतो; कारण की** याने **रघुवीर व रघुपति यांनी उत्पन्न होणारा - पुनरुक्ति दोष सहज टळतो.** II रघुवीरप्रणत कुटुंबपालक आहेत; व ते **रघु-पति** म्हणजे रघुकुलपालक आहेत, म्हणून तुमच्यावर इतके प्रेम करतील तर नवल नाही, कारण तुम्ही रघुवंशांतील आहात. **हा अर्थ पक्षपात दोषयुक्त ठरतो;** भाऊ म्हणून तुमच्यावर जास्त प्रेम करतात असा त्याचा थोडक्यात अर्थ होतो; **म्हणून हा अर्थ** या अल्प बुद्धीस **अगदी त्याज्य वाटतो.**

## अनन्यगतिक प्रेमी भक्त व भगवान यांचा संबंध (कसा असतो ?)

(१) भरत रामावर अनुपम प्रेम करतात यांत नवल नाही असे एकदा म्हटले. (चौ.१-२) आणि राम भरतावर अनुपम प्रेम करतात म्हणजे काही विशेष महनीय करतात असे नाही, हे येथे (चौ. ७) म्हटले. एकांगी, पूर्ण निरपेक्ष, अनन्य प्रेम करणारा भक्त व भगवान यांचा परस्पर संबंध कसा असतो हे (या दोन वचनांनी) येथे फारच उत्तम प्रकारे दाखविले आहे.

I **भक्त** आपल्याला सदा भगवंताचा ऋणी समजतो. अधिकार, पात्रता नसता प्रभु निर्हेतुक कृपा आपल्यावर करतात हे जाणून तो सदा प्रभुकृतज्ञ राहतो व भगवंतावर आपले काहीच प्रेम नाही असे त्यास नेहमी वाटत असते.

II **भगवान** स्वतःस अशा भक्ताचे ऋणी समजतात; त्यांस वाटते की मी याला काही दिले नाही; हा काही मागत नाही. याला कशाचीही अपेक्षा नाही; पण माझ्यावर निर्हेतुक सहज स्नेह (प्रेम) करतो. माझ्या सेवेशिवाय इतर काही दिले तरी घेत नाही. **'दीयमानं न गृह्णन्ति विना मत्सेवनं जनाः'** (भाग) मी याच्यावर काहीच कृपा केली नाही, मला करता येत नाही, मग माझी सेवा तरी याला कशी सांगू ? व याच्या ऋणांतून मी मुक्त होऊ कसा ? असे म्हणत भगवान सदा भक्तकृतज्ञ व भक्ताच्या भक्तिऋणाच्या ओझ्याखाली वाकलेले असतात.

**III भगवान निर्हेतुक स्वामी व भक्त निर्हेतुक सेवक इतकाच त्यांचा संबंध असतो.** म्हणूनच नारद म्हणतात की **'तस्मिन तज्जने भेदाऽभावात्'** (ना.भ. ४१). 'भगवान व भगवत्सेवक यांत अभेद असतो.' राम स्वतःच म्हणाले आहेत की **'कपि ! मम जाणां स्वभाव तुम्हिं तर । कधिं मज-भरतामधिं तिळ अंतर ?'** (७।३६।७) माझ्यात व भरतांत कधी तिळमात्र अंतर आहे काय ? हाच सिद्धान्त श्रीमद्भागवतांत प्रल्हाद चरित्रांत सविस्तर दाखविला आहे.

**(क)** भगवान नृसिंहांनी प्रल्हादास वर मागण्यास सांगतांच प्रल्हाद म्हणाला - **'यस्त आशिष आशास्ते न स भृत्यः स वै वणिक् ॥४॥ आशासानो नवै भृत्यः स्वामिन्याशिष आत्मनः ॥ न स्वामी भृत्यतः स्वाम्यम इच्छत् यो राति चा शिषः ॥५॥ अहं त्वकामस्त्वद्भक्तः त्वंच स्वाम्यनपाश्रयः ॥ नान्यथेहावयोरर्थो राजसेवकयोरिव ॥६॥ यदि रासीश मे कामान् वरांस्त्वं वरदर्षभ ॥ कामानां हृद्यसंरोहं भवतस्तु नृणे वरम् ॥७॥** (भाग. ७।१०)

**अर्थ सार** - जो आपल्यापासून काही मागण्याची इच्छा करील तो सेवक नाही, बनिया आहे. वरांची आशा करणारा सेवक नव्हे; व सेवकावर आपले स्वामित्व गाजविण्यासाठी जो वर देण्याची इच्छा करतो तो स्वामी नव्हे. मी आपला निष्काम भक्त (सेवक) आहे व आपण माझे निष्काम स्वामी आहांत. राजा व राजसेवक यांचा संबंध जसा अर्थाची अपेक्षा करणारा असतो तसा आपला संबंध नाही व नसावा हे वरदायकांत श्रेष्ठ असणाऱ्या ईशा ! जर माझ्या कामना पुरविणारा वर आपण देऊच इच्छिता. दिल्याशिवाय राहवतच

नसेल, तर इतकाच वर मागतो की माझ्या हृदयांत कोणत्याच कामनेचा कधी उगम होऊ नये. प्रल्हादाने वर्णिलेला हा स्वामि सेवक = भगवान - भक्त, संबंध व येथे वर्णिलेला रामभरत संबंध यांत काही फरक आहे का पहावा. **'साधवो हृदयं मह्यं साधूनां हृदयं त्वहम् ॥ मदन्यत्ते न जानन्ति नाऽहं तेभ्यो मनागपि'** (भाग. ९।४।८)

*हिं. । तुम्ह तौ भरत मोर मत एहू । धरे देह जनु राम सनेहू ॥८॥*

*हिं.दो. । तुम्ह कहँ भरत कलंक यह हम सब कहुँ उपदेसु ॥*

*॥ राम भगति रस सिद्धि हित भा यह समउ गनेसु ॥२०८॥*

***म. । मम मत हेंच किं भरत ! तुम्हीं तर ! रामस्नेह चि जणूं देहधर ॥८॥***

***म.दो. । भरत तुम्हांस कलंक हा अम्हां जगा उपदेश ॥***

***॥ रामभक्तिरस - सिद्धि - हित हा शुभ समय गणेश ॥२०८॥***

**अर्थ** - भरत ! माझे हेच मत आहे की तुम्ही तर जणू देहधारी रामस्नेहच आहात.॥८॥ भरत ! तुम्हाला वाटते की हा (तुमच्याजवळ असलेला स्वयंसिद्ध भक्तिरस) कलंक आहे; पण आम्हाला व जगाला (सर्वांना - सब कहुँ) हा उपदेश आहे. रामभक्तिरूपी रस सिद्धिसाठी (रामभक्तिरूपी रस = पारा, पारद त्याच्या सिद्धिसाठी) हा शुभ समय ही शुभ वेळ म्हणजे श्रीगणेशा आहे. (आरंभ करण्यास सुमुहूर्त आहे).॥२०८॥

**टीका. - चौ. ८ - (१) मम मत हेंच ---- रामस्नेह चि जणूं देह धर'** आपण जणूं रामप्रेमाचा प्रत्यक्ष अवतारच आहात असे माझे ठाम मत आहे. **'साक्षात् रामप्रेममूर्ति ही'** (२८४।४) अयोध्यावासी लोक म्हणाले. जनकांचे मत २।२८९।६,८ पहा. भरद्वाजांस येथे म्हणावयाचे आहे की तुम्हाला रामभक्तिरस सिद्ध करावयाचा नसून तुम्ही स्वतःच रामभक्तिरस (सहज सिद्ध झालेले असे) आहात. **'हरिपदरति रस-'** (१।३७।१४) २०५।५ च्या टीकेत ना.भ.सू. ६६ चा आधार देऊन दाखविले आहे की प्रेमीभक्त भगवत्प्रेमाशी तदाकार होऊन राहतो; तो प्रेमरूपच होतो. भगवान व भगवत्प्रेम या दोन गोष्टीच उरतात व प्रेम करणारा उरत नाही; त्याची साक्ष येथे भरद्वाजांनी दिली आहे. भरद्वाज म्हणतात तुम्ही स्वतः रामप्रेमरूप असून आपणांस कुलकलंक समजता हे आमच्या दृष्टीने नवल आहे; तुमच्या दृष्टीने नसेल. 'कुल कलंक मज सृजी विधाता' (२०१।६).

**दो. (१) भरत तुम्हांस कलंक हा** - तुम्हाला वाटते की कलंक = दोष आहे;

पण आम्हाला वाटते (मम मत) की हा आम्हाला व जगाला उपदेश आहे. हा = तुमचा व्यवहार, तुम्ही ज्याला कलंक म्हणता तो, तुमच्याजवळ असलेला **रामभक्तिरूपी सिद्ध रस आहे.** रस = पारद, पारा; हा सिद्ध झाला = अग्निसिद्ध झाला, तरी त्याला कलंक हे नाव आहे, कलंक म्हणतात; तसे तुमचे म्हणणे आहे. तुमचा रामभक्तिरसरूपी पारा रामविरहानल व लोकनिंदारूपी भट्टीत पडूनसुद्धा उडून गेला नाही. 'कनकतेज जस वाढे दाहें । प्रियतम चरण नेम निर्वाहे' (२०५।५ टी.प.) सिद्ध पारदाला 'कलंक' हे नाव गोस्वामींच्याच दोहावलीत आहे. **'पारद** प्रगट प्रपंचमय **सिद्धिउँ नाउँ कलंक'** (दोहा. २६०) प्रपंचमय विषय सुख प्रत्यक्ष **पाऱ्याप्रमाणे** आहे; तो **सिद्ध झाला तरी त्याला कलंक हे नाव आहे.** (गी. प्रे. हनुमान प्रसाद पोद्दारकृत भाषांतर) **(क) अग्निसिद्ध पारदाचा प्रभाव** केवढा आहे पहा - **'दिनमेकं रसेंद्रस्य यो ददाति हुताशनम् ॥ द्रवन्ति तस्य पापानि कुर्वन्नपि न लिप्यते'** (यो. रत्नाकर पारद बंधन, श्लो. ३) पाऱ्याला एक दिवसभर अग्नी देऊन जो टिकवील, उडू देणार नाही, त्याची सर्व पापे लयाला जातात व त्याने आणखी केली तरी त्याला लागत नाहीत. अशा पारदाला अग्निसिद्धपारद किंवा बद्धरस म्हणतात. मूर्छन व मारण वगैरे पारदाच्या पुढील संस्कारांचे व रामभक्तिरसाचे पुष्कळ साम्य आहे पण ते विस्तार भयास्तव येथे देणे इष्ट वाटत नाही. **या क्रियांना रससिद्धि म्हणतात.**

(२) भरताजवळ रामभक्तिरूपी रस (पारद) स्वयंसिद्ध आहे, पण त्यांना तो कलंक वाटत आहे. भरद्वाज म्हणतात, आम्हाला रामभक्ति **रससिद्धि** प्राप्त करून घ्यावयाची आहे. रससिद्धीच्या प्रयोगास - कार्यास, प्रारंभ केव्हा, कसा, कुठे करावा ते पहा. 'शुभेहनि प्रकर्तव्यः आरम्भो रसशोधने ॥ एकान्ते धामनि शुभे पुराऽभ्यर्च्योहि भैरवः' (योग - रत्नाकर पारदस्वेदन श्लो. २) रसाच्या = पारदाच्या शोधनाला शुभदिवशी एकांतात पवित्र ठिकाणी भैरवाचे = शंकराचे पूजन करून प्रारंभ करावा. 'भैरवः पुंसि शंकरे' (अ. व्या. सु.) कोणते ही मोठे कार्य व कोणाचेही पूजन करावयाचे असले तरी आधी गणेश पूजन करावे लागते. म्हणून गोस्वामींनी दोह्यांत गणेश शब्द वापरला. या श्लोकावरून समय = शुभसमय, सुमुहूर्त हा अर्थ ठरला. म्हणून अनुवादांत 'शुभ समय' म्हटले आहे. **(क) कलंक** शब्दाचा आणखी एक समर्पक अर्थ आहे. **कं** - ब्रह्माणं, ब्रह्मदेवाला, **लंकयति** - हीनतां गमयति = हीनतेला नेणारा = कलंक. भरताची

सहजसिद्ध भक्ति पाहून ब्रह्मदेवाला सुद्धा मान खाली घालावी लागेल. शिवाय विचारवंतांनी व लोकांनी ब्रह्म देवाला (विधि, विधाता) दोष दिलाच आहे.

(३) **रामभक्तिरससिद्धिहित हा शुभ समय गणेश** - भरद्वाज म्हणतात की आमच्या भक्तिरूपी रसाचे शोधन करून तो सिद्ध होण्यासाठी = रससिद्धिसाठी कार्य सुरू करण्यास तुमचे येथे आगमन हा सुमूहुर्त (शुभ समय) ठरला. भरद्वाजाश्रम एकान्त, परमरम्य व परम पवित्र स्थान आहेच. **'भरद्वाज आश्रम अति पावन । परम रम्य -'** (१।४४।६). **(क) या एकंदर दोह्याचा भाव** हा आहे की भरत हे विशुद्ध रामभक्तीचे आचार्य गुरु असून भरद्वाजादिकांनी आज शुभमुहूर्तावर, रामभक्ति कशी करावी याचा उपदेश त्यांच्याकडून घेतला. जे कोणी भरताचे नामस्मरण व ध्यान करून भरतांनी आपल्या आचरणाने घालून दिलेले धडे गिरवतील त्यांनासुद्धा शुद्ध प्रेमभक्ति, पराभक्ति प्राप्त होईल. भरद्वाजांनी आज भरतांकडून रामभक्तिदीक्षाच घेतली - **'अम्हां जगा उपदेश' रामभक्तीचे मुख्य आचार्य भरत आहेत हे जगजाहीर केले.** म्हणूनच या कांण्डाच्या उपसंहारांत गोस्वामी म्हणतात : **'भरताचरण पुनीत परमही । मधुर मंजु मृदु - मंगल करही ॥५॥ पासून 'रामस्नेह सुधाकर सारहि ॥८॥** पर्यंत पहा व छंद पहा. **'भरतचरित युत नेम तुलसी सादर जे श्रवति ॥ सिता रामपदिं प्रेम होइ नक्कीं भवरस विरति'** (२।३२६)

(४) नारद भक्तिसूत्रांत वर्णिलेल्या पराभक्तीचे परमोच्च आदर्शभूत उदाहरण म्हणजे - मानसांतील भरत होत. नारदांनी गोपिकांना आदर्श मानून 'यथा व्रजगोपिकानाम्' (ना.भ. २१) म्हटले त्याप्रमाणे मानसांतील **तुलसी भक्तिसूत्रांत 'यथा भरतस्य'** असे म्हणणेच उचित आहे. **सूचना** - योग रत्नाकर पुस्तक कशा विचित्र पद्धतीने हाती आले व त्यामुळेच या दोह्याचा गूढार्थ समाधानकारक पद्धतीने लावता आला याचा अद्भूत इतिहास हस्तलिखित टीकेत भाग २७ पृ. १२४ तळाला वि. सू. यांत सविस्तर लिहिलेला आहे. (दो. २०८ च्या टीकेच्या शेवटी) येथे त्याची आवश्यकता नाही.

*हिं.* **।** ***नव बिधु बिमल तात जस तोरा । रघुबर किंकर कुमुद चकोरा ॥१॥***
***। उदित सदा अँथइही कबहूँ ना । घटिहि न जग नभ दिन दिन दूना ॥२॥***
***। कोक तिलोक प्रीति अति करही । प्रभु प्रताप रबि छबिहि न हरिही ॥३॥***
***। निसि दिन सुखद सदा सब काहू । ग्रसिहि न कैकइ करतबु राहू ॥४॥***

*। पूरन राम सुपेम पियूषा । गुर अवमान दोष नहिं दूषा ॥५॥*
*। राम भगत अब अमिअ अघाहूँ । कीन्हेहु सुलभ सुधा बसुधाहूँ ॥६॥*
म. *। तात ! विमल विधु नवीन यश तव । रघुवर-किंकर चकोर कैरव ॥१॥*
*। उदित सदा कधिं अस्तिं न जाइल । क्षय नहिं, जगनभिं वाढत राहिल ॥२॥*
*। लोक कोक सुप्रीती करतिल । प्रभुप्रताप रवि न छवि हरतिल ॥३॥*
*। निशिदिनि सुखद सदा सर्वांप्रति । ग्रासिल ना राहू कैकयिकृति ॥४॥*
*। पूर्ण राम - सुप्रेम - पियूषें । गुरु - अपमान अदूषित दोषे ॥५॥*
*। भक्त अता प्या अमृत पोटभर । केली सुलभ सुधे वसुधेवर ॥६॥*

**अर्थ** - तात ! (भरत) तुझे विमल यश हा (एक) नवीन (= अद्‌भुत) विमल चंद्र आहे; व रघुवराचे सेवक हे चकोर व कुमुदे (कैरवे) होत.॥१॥ हा सदासर्वदा उगवलेला राहील व कधीही अस्तास जाणार नाही; याला क्षय नाही, पण (दिवसेंदिवस) जगरूपी आकाशात याची वृद्धि होत राहील.॥२॥ लोक व स्वर्गादि लोकरूपी चक्रवाक (सुद्धा) याच्यावर अत्यंत प्रीति करतील; व प्रभूचा प्रतापरूपी भास्कर (सूर्य, रवि) याच्या कान्तीला (छबि) कधी नाहिशी करणार नाही.॥३॥ हा चंद्र सर्वांनाच सर्वदा रात्रंदिवस सुख देईल व कैकयीचा करणीरूपी राहू याला ग्रासणार नाही.॥४॥ हा शुद्ध रामप्रेमरूपी पीयूषाने (अमृताने) पूर्ण आहे, व गुरु अपमानरूपी दोषाने दूषित (कलंकित) झालेला नाही.॥५॥ (राम -) भक्त हो ! आता रामप्रेमरूपी अमृत पोटभर घ्या ! (भरताने) सुधेला या पृथ्वीवर (वसुधेवर) सुलभ सहज मिळण्यासारखी केली आहे.॥६॥

**टीका. - (१) तुमचें तात विमल यश गातिल । महती लोकहि वेद पावतिल'** (२०७।२) असे भरत विमल यशाचे बीजरूपाने वर्णन करून भरताचे रामप्रेम वर्णन केले; व नंतर रामाचे भरतप्रेम वर्णिले; पण भरद्वाज मुनिवर गुरु भरताच्या रामप्रेमावर इतके मुग्ध झाले आहेत की रामापेक्षा भरतच श्रेष्ठ वाटून भरताचीच अधिक स्तुति करण्याची सहज सात्विक स्फूर्ति अनावर झाली. **'मनिं गुरु अधिक तुम्हांहुनि जाणति । सर्वभाविं सेविति सन्मानति ॥** (१२९।८) या प्रमाणेच हे घडत आहे. **(क)** येथून पुढे २१०।१ पर्यंत **'भरत यश विमलबिधु'** चे वर्णन आहे. त्यांत लौकिक चंद्राच्या सर्व सद्‌गुणांचे अस्तित्व दाखविले असून जुन्या चंद्रांत असलेले दोष या नवीन चंद्रांत नाहीत व त्यांत नसलेले असामान्य सद्‌गुण यांत आहेत हे सांग रूपकाने दाखविले आहे.

**चौ. १ - (१) तात विमल विधु नवीन यश तव - विधु** = चंद्र - नवीन = नवा - अद्‌भुत, अलौकिक. जुना चंद्र विमल नाही; हा भरताचा विमल यश रूपी चंद्र अगदी विमल आहे; यांत कोणताही मल नाही. **(क) रघुवर - किंकर चकोर कैरव** - कैरव = कुमुद, चंद्रविकासी कमल. रघुवरसेवकांत दोन प्रकार आहेत असे येथे वाटेल पण तसे नाही. **'सज्जन कुमुद चकोर मन हितकर अति लाभास'** (१।३२ म) **'रामकथा शशि-किरण समाना। संत चकोर करिति यत्पाना'** (१।४७।७). या चौपाईरूपी कमलीनीचे फूल, कमल, वरील १।३२ म. दोहा आहे. याने ठरले की **कुमुद - कैरवे = संत** सज्जन, साधु, बुध; व **चकोर** म्हणजे **त्यांचे मन.** या सांधेजुळणीने हेही सिद्ध झाले की रामकथा व भरतकथा (कथेतच यश वर्णितात) दोन्ही सारख्याच, म्हणूनच विदेही जनक पुढे म्हणतात की **'भरतकथा भवबंधविमोचनि'** (२८८।३). चकोर शब्दाने चित्ताची प्रसन्नता व कुमुद-कैरव शब्दाने शरीराची व वाणीची प्रसन्नता दाखविली. भाव हा की चकोर जसे चंद्रावर लुब्ध होतात तसे संतांचे मन तुमच्या अद्‌भुत यशावर लुब्ध होईल व कुमुदे जशी चंद्राच्या किरणांचा स्पर्श झाला म्हणजे प्रफुल्लित व सुशोभित होतात तसे संतांचे शरीर व वाणी तुमच्या यशचंद्राच्या योगाने प्रफुल्लीत (रोमांचित) व प्रसन्न होतील. **(१।३२ म. ची टीका मुद्दाम पहावी).**

**चौ. ३ (१) लोक कोक** - लोक = या जगांतील बहुतेक लोक व स्वर्गादि लोक. आतां - **भरत विमल यश विमल विधु व चंद्र यांची तुलना.**

| भरतविमल यश - विमलविधु | अनु- क्रम | चंद्र |
|---|---|---|
| यशचंद्रमा नवीन आहे | १ | पुरातन लौकिक आहे. |
| विमल आहे | २ | मलिन आहे, 'दिन मलीन' व अवगुणी |
| रामभक्तांचे चित्त चकोर व भक्त कुमुदे | ३ | चकोर व कुमुदे यांना विशेष सुखद |
| सदा उदित व अस्त कधीच नाही | ४ | सदा उदित नसतो, अस्तास जातो. |
| क्षय नाही. कधी कमी होत नाही | ५ | क्षयी आहे. |
| सतत दिवसेंदिवस वाढणारा आहे | ६ | शुक्ल पक्षांतच वाढत जातो. |
| जगरूपी आकाशात (हृदयांत, | ७ | भौतिक आकाशात फार |

| | | |
|---|---|---|
| अगदी जवळ राहू शकतो.) | - | दूर असतो. |
| लोकरूपी चक्रवाक अति प्रीति करतात. | ८ | चक्रवाकांना दुःखद, त्यांचा द्वेष करतो. |
| रामप्रताप रवीच्या तेजात सुद्धा | ९ | सूर्याच्या तेजात तेज लुप्त होते, |
| छबि = कान्ति कायम राहते. | - | निस्तेज होते. |
| रात्रंदिवस, सर्वांनाच सुखदायक | १० | फक्त रात्री सुखद; व सर्वांना नाही. विरहीजनांस दुःखद. |
| कैकयीकरणी राहु ग्रासू शकत नाही. | ११ | राहु संधि साधून ग्रासतो |
| रामप्रेमरूपी अमृताने सदा पूर्ण | १२ | चंद्रामृत शुक्ल व कृष्णपक्षांत वाढते व घटते. |
| गुरु अपमान दोष रहित | १३ | गुरुद्रोही व त्यामुळे कलंकित |
| राम प्रेमामृत पानाने संत खरे अमर होतात. | १४ | चंद्रामृत पानाने चकोर अमर होत नाहीत. |
| राम जसे स्वतः प्रगट झाले तसा हा यशविधु स्वयंसिद्ध आहे. | १५ | क्षीर सागरातून काढावा लागला. |
| बंधु रामप्रताप यश | १६ | बंधु बिष, बहीण वारुणी. |
| आतृप्तिपर्यंत पान केले तरी सरत नाही. | १७ | अमृत पोटभर मिळत नाही. |
| कीर्तिविधु अनुपम आहे. | १८ | इतर ग्रहांना चंद्र आहेत, |
| रामप्रेमसुधा सुलभ | | कृत्रिम चंद्र आहेत |
| वसुधेवर | १९ | अमृत = सुधा पृथ्वीवर सुलभ नाही |
| रामाचे भरतावरी व भक्तांवरील | २० | मृगांक आहे, पण ते लांछन आहे. |
| प्रेमरूपी मृग यांत आहे. ते परम भूषण आहे. | २१ | चंद्राच्या अवगुणांचे वर्णन १।२३७ ते २३८।२ पर्यंत व ३।२८।६ |
| या नवीन चंद्रांत अवगुण नाही. | | 'रावणशशि राहू' च्या टीकेत १६ अवगुण पहावे. |

**ल.टे. (१) पूर्ण रामसुप्रेम पियूषें** - सुप्रेम = परम प्रेम, अति प्रेम. **'सा**

**त्वस्मिन् परमप्रेमरूपा'** (ना.भ. २) **'अमृत स्वरूपा च'** (ना.भ. ३) 'पीयूषममृतं सुधा' (अमरे).

**चौ. ६ - (१) केली सुलभ सुधे वसुधेवर - 'कानिं सुधा दिसतें गरळ'** (२८१) सुधा स्वर्गात असते; व तिचे पान करणाऱ्या सुरानां अमर म्हणतात. पण त्यांनासुद्धा **'क्षीणे पुण्ये मर्त्य लोकं विशन्ति'** असे करावेच लागते. **'स्वर्गहि अल्प अंतिं दुखदाई'** (७।४४।१) अमरांचा व स्वर्गातील सुधेचा सुद्धा नाश होतोच. पण भरत यश चंद्राने या पृथ्वीवर आणलेली. रामसुप्रेम सुधा जे कोणी आकंठ पान करतील ते खरे अमर, नित्यमुक्त होतील. **'यल्लब्ध्वा पुमान् सिद्धोभवति, अमृतो भवति, तृप्तो भवति** (ना. भ. ४) **'अतां प्या पोटभर'** याने तृप्ती सांगितलीच आहे. या काण्डाच्या उपसंहारांत गोस्वामीजी म्हणतात - **'श्रीरामसीता प्रेमपीयुष - मय न जन्मत भरत कीं'... कलिकालिं तुलसी सम शठां कुणि राम सम्मुख करत कीं'** (३२६।छंद पहा) यांत भरतालाच श्रीरामसीताप्रेम पीयूषमय म्हटले; व येथे भरतयशचंद्र 'रामप्रेमपीयूषपूर्ण' म्हटला. म्हणजे भरत = भरतविमल यश = सीताराम प्रेमामृत = राम प्रेममूर्ति = रामस्नेह देहधर. **'सितारामपदिं प्रेम होइ नक्किं भवरस विरति'** (२।३२६) ही भरत चरित्राची फलश्रुति सांगितली आहे.

हिं. ***। भूप भगीरथ सुरसरि आनी । सुमिरत सकल सुमंगल खानी ॥७॥***
***। दसरथ गुन गन बरनि न जाहीं । अधिकु कहाँ जेहि सम जग नाहीं ॥८॥***

हिं.दो. ***। जासु सनेह सकोच बस राम प्रगट भए आइ ॥***
***॥ जे हर हिय नयननि कबहुँ निरखे नहीं अघाइ ॥२०९॥***

म. ***। भूप भगीरथ गंगे आणी - । स्मरतां सकल सुमंगल - खाणी ॥७॥***
***। दशरथ गुणगण - वर्णन न घडे । त्यांसम जगिं नहि अधिक कुणिकडे ॥८॥***

म.दो. ***। यत्प्रेमा - संकोच - वश प्रगट राम येऊन ॥***
***॥ मननेत्रीं ज्यां बघत हर कधिं ना तृप्त अजून ॥२०९॥***

**अर्थ -** स्मरण केल्यानेच सकल सुमंगल देणारी गंगा (सुरनदी) राजा भगीरथाने आणली. (तर त्यांची कीर्ति अमर झाली.)॥७॥ दशरथांच्या गुणसमुदायांचे (तर) वर्णन करणेच अशक्य (कारण) त्यांच्या सारखा सुद्धा कोणी जगात नाही मग अधिक कोठून असणार !॥८॥ (कारण) त्यांच्या प्रेमाला व संकोचाला वश होऊन ते राम येऊन प्रगट झाले (घरांत पुत्ररूपाने) की ज्यांच्याकडे मनाच्या

नेत्रांनी (हृदयांत) सतत बघत राहून सुद्धा हर (शंकर, महादेव) अजून कधी तृप्त झाले नाहीत.।।दो.२०९।।

**टीका. चौ. ७-८ (१) ल. टे.** - भरद्वाज येथे दाखवीत आहेत की रघुवंशांत एकापेक्षा एक पराक्रमी व कीर्तिमान (राजे) पुरुष झाले, पण त्या सर्वात प्रत्यक्ष रामापेक्षासुद्धा भरत श्रेष्ठ आहेत व भरतापेक्षा श्रेष्ठ पुरुष रघुवंशांत होणार नाही. **(क) भगीरथाने** घोर तपश्चर्या करून जी गंगा आणली ती रामचरणांपासून जन्मलेली. दशरथांनी काही तपश्चर्या न करताच प्रत्यक्ष रामालाच स्वतःच्या इच्छेने, दशरथांनी प्रार्थना केली नसता (मानसांत केलेली नाही. वा.रा. आहे.) दशरथांच्या घरी येऊन प्रगट होणे भाग पाडले. राम प्रगट झाले तरी राम सुप्रेमरूपी अमृत प्रगट करण्यास त्यांना भरतपयोधीचा आश्रय करावा लागला. **'प्रेम अमृत मंदर विरह भरत पयोधि गंभीर ॥ काढि मथुनि सुरसाधुहित कृपासिंधु रघुबीर'** (२।२३८). **'भरत भाव भूताळीं नसता जर । कोण करत चर अचर, अचर चर'** (२३८।८). **(ख)** भगीरथाने आणलेली गंगा देश व काल यानी मर्यादित आहे. दशरथांच्या प्रेमाने प्रगट झालेले राम रघुवर सुद्धा देशकाल परिस्थितिने मर्यादितच; म्हणून तर वनांत गेल्यावर दशरथ राम विरहाने मरण पावले. जे रूप प्रगट झाले तेही सदासर्वकाळ पृथ्वीतलावर प्रगट राहणारे नाही. अवतारसमाप्ति करावीच लागली. पण भरताचा विमलयशचंद्रमा व त्यांतील रामप्रेमामृत सर्वत्र, सर्वकाळ, सर्वांना अगदी सुलभ आहे व भविष्यकाळी सदा राहणार आहे. **'रामदास रामाहुनि मोठे'** हा सिद्धान्त स्पष्ट करून दाखविला.

**दो. (१) यत्प्रेमा संकोच वश - 'सुखसंदोह मोहपर ज्ञानगिरा गोऽतीत ॥ दम्पति परमप्रेमवश** करि शिशुचरित पुनीत' (१।१९९). 'ते प्रगट कृपालु दीनदयालू कौसल्याहितकारी' (१।१९२ छं. १) 'नामहि शुभद जयाचें, श्रवणीं । **तो प्रभु आला** माझे भवनीं' (१।१९३।५) असे रामजन्म वार्ता कळल्यावर दशरथ म्हणाले आहेत. वसिष्ठांनी दशरथांस सांगितले आहे की - 'श्रुणु नृप ज्यास विमुख पस्तावली । यद्भजनाविण ताप न नाशति ।। **झाला तुमचा सुत तो स्वामी - । राम पुनीत प्रेम - अनुगामी** ।। (२।४।७-८) पवित्र प्रेमालाच वश होणारा तो स्वामी राम तुमचा पुत्र झाला आहे. दशरथांच्या व कौसल्येच्या प्रेमाला वश होऊन राम स्वेच्छेने पुत्ररूपाने प्रगट झाले इतके ठरविण्यास इतकी मानस वचने पुरेशी आहेत. दशरथांनी किंवा कौसल्येने अशी प्रार्थना कधी केलेली नाही की

प्रभूंनी येऊन आमच्या घरी प्रगट व्हावे. मनात वाटले असेल कदाचित पण संकोचामुळे बोलून दाखविले नाही. राम येथेच प्रगट होण्यास मुख्य कारण म्हणजे असे दम्पति परमप्रेम (१९९ पहा) व असे दुसरे स्थान पृथ्वीवर त्यांना दिसले नाही; हाच भाव **'त्यांसम जगिं नहि अधिक कुणिकडे'** (चौ.८) यांत आधीच सुचविला आहे. प्रभूला प्रगट होणे जरूर होते व यापेक्षा श्रेष्ठ किंवा असे दुसरे स्थानच जगात आढळले नाही. स्वतःचे कार्य साधण्यासाठी स्वतःच प्रगट झाले.

(२) **मनोनेत्री ज्यां बघत हर... अझून - हर** = सर्व विश्वाचा संहार करणारे व भक्तांची सर्व पापे व ताप, अज्ञान हरण करणारे, असे शंकर, महेश्वर असून त्यांनासुद्धा राम प्रभूंचे रूप चर्मचक्षूंनी बघणे अति दुर्लभ असल्यामुळे, दुधाची तहान ताकावर भागवून ते रूप हृदयांत मानसचक्षूंनीच पहावे लागते. त्यावर सुद्धा ते इतके मुग्ध आहेत की कित्येक युगे सदा सर्वकाळ त्या ध्यानात मग्न राहूनसुद्धा त्यांची तृप्ति अजून होत नाही; कारण, 'मानस ध्यान व प्रत्यक्ष दर्शन । यांत महदंतर ॥' त्यांना भाषण, स्पर्श, दर्शन इ. लाभ मिळत नाही. म्हणून तर बालरूपाच्या दर्शनस्पर्शाच्या लाभासाठी ज्योतिषी बनून दशरथांच्या प्रासादात जाऊन दिवसा ढवळ्या चोरी केली ! (१।१९६।३ टी.प.) बालकेलि करणाऱ्या प्रभूच्या दर्शनासाठी कावळा बनले. (७।८८ व १।१९९।११ टी.प.) पहा -

*॥ दशरथांचें भाग्य पहा । न प्रार्थितां राम गृहा । आले, यद्दर्शन महा । दुर्लभ महेशासि ॥१॥*

*। राम कडे खांदी खेळविला । निज हातें भरविला । नित्य वंदी दशरथाला । तोच प्रभु ॥२॥*

*। दशरथ बचन मानुंनी । मुनिवेषा घेउनी । कष्ट सोशी काननीं । तो च प्रभु ॥३॥*

*॥ परि ते राम भगवान । मोडून पित्राज्ञा, भरतवचन । पाळावया अधीर आपण । झाले स्वये ॥४॥*

*। म्हणती सांगा शीघ्र भरत । म्हणाल तें करतों त्वरित । भगवंत मोठे कीं भरत भक्त । श्रोतीं ठरवावें ॥५॥ (प्रज्ञा.)*

म्हणूनच भरद्वाज भरतांस सांगतात :

*हिं. । कीरति बिधु तुम्ह कीन्ह अनूपा । जहँ बस राम प्रेम मृगरूपा ॥१॥*

*। तात गलानि करहु जियँ जाएँ । डरहु दरिद्रहि पारसु पाएँ ॥२॥*
*। सुनहु भरत हम झूठ न कहहीं । उदासीन तापस बन रहहीं ॥३॥*
*। सब साधन कर सुफल सुहावा । लखन राम सिय दरसनु पावा ॥४॥*
*। तेहि फल कर फलु दरस तुम्हारा । सहित पयाग सुभाग हमारा ॥५॥*
*। भरत धन्य तुम्ह जसु जगु जयऊ । कहि अस प्रेम मगन मुनि भयऊ ॥६॥*

म. *। तुम्हीं कीर्तिविधु अनुपम केला । रामप्रेम जियें मृग वसला ॥१॥*
*। तात वृथा ग्लानी मनिं करतां । करिं परीस दारिद्र्या डरतां ॥२॥*
*। आम्हीं भरत असत्य न वदतों । उदासीन तापस वनिं वसतों ॥३॥*
*। सकल साधना सुफल सुशोभन । लक्ष्मण राम नि सीता दर्शन ॥४॥*
*। त्या फळास फळ दर्शन तुमचें । सवें प्रयागा सुभाग्य अमचें ॥५॥*
*। भरत धन्य ! जग यशें जिंकलें । वदुनी प्रेममग्न मुनि झाले ॥६॥*

**अर्थ** - (भरत !) तुम्ही असा उपमारहित कीर्तिचंद्र (उदित) केलात कीं ज्यांत (तुमच्यावरील व भक्तांवरील) रामाचे प्रेमरूपी मृग राहिला आहे.॥१॥ तात ! तुम्हीं आपल्या मनात वृथा (जाएँ) ग्लानि करीत आहांत; परीस मुठींत असून तुम्ही दारिद्र्याला घाबरत आहात (दारिद्र आहे असे वाटून घाबरता).॥२॥ भरत ! आम्ही खोटे नाही सांगत; (कारण) आम्ही उदासीन वृत्तीने वनात राहणारे तपस्वी आहोत.॥३॥ सर्व साधनांचे उत्तम - सुंदर - फल म्हणजे लक्ष्मण राम व सीता यांचे दर्शन लाभले.॥४॥ व त्या फळाचे फळ तुमचे दर्शन लाभले हे प्रयागासह आमचे अति भाग्य होय.॥५॥ भरत तुम्ही धन्य आहात ! तुम्ही आपल्या यशाने जगाला जिंकलेत असे म्हणून मुनि प्रेममग्न झाले.॥६॥

**टीका. - चौ. १ - (१) तुम्हीं कीर्ति विधु अनुपम केला - वसला - 'तात ! विमल विधु नवीन यश तव'** असा उपक्रम केला आहे; त्याचाच येथे उपसंहार केला. यश = कीर्ति हा पर्याय सुचविला; व आतापर्यंत जी अलौकिकता दाखविली तिचे सार अनुपम = उपमा रहित (अनूप = अनूपा हिं) या शब्दाने सांगितले. **(क) रामप्रेम जिथें मृग बसला** - चंद्रबिंबांत मृगाचे चिन्ह आहे म्हणून त्याला मृगांक, मृगलांछन (लांछन = चिन्ह) म्हणतात. तसा या कीर्तिचंद्रांत रामप्रेम हा मृग राहिला आहे. पूर्वी रामप्रेम = रामावरील प्रेम = अमृत म्हणून वर्णन केले आहे. म्हणून येथे **रामप्रेम =** रामाचे भक्तांवरील प्रेम व रामाचे भरतावरील प्रेम असा अर्थ घेणे जरूर आहे. अन्यथा पुनरुक्ती दोष येईल व ज्याला अमृत

म्हटले त्यालाच मृग म्हटले असे ठरेल. भाव हा आहे की तुमच्या या विमल कीर्तीमुळेच राम तुमच्यावर अनुपम प्रेम करतात **व जे कोणी तुमचे यश गातील त्यांच्यावरही राम प्रेम करतील.**

**चौ. २ - (१) करिं परीस दारिद्र्या डरतां - परीस** = स्पर्शमणि -रामसुप्रेम, **दारिद्र्य** - कैकयीची करणी व तिचा पुत्र म्हणून कलंक. ज्याच्याजवळ परीस असेल त्याच्याजवळ दारिद्र्य राहू शकणार नाही. तसेच तुमच्या ठिकाणी असे अलौकिक रामप्रेम, रामस्नेह असून तुम्ही कैकयीच्या करणीच्या संबंधाने ग्लानि करता ती निष्कारण करता. रामसुप्रेम परिसाच्या स्पर्शाने सर्व दूषणेरूपी हीन धातु भूषणे झाली आहेत.

**चौ. ३ (१) आम्ही भरत असत्य न वदतों** - भरद्वाजांनी भरताची जी स्तुति केली ती केवळ त्याला वाईट वाटू नये व त्याचे दुःख कमी व्हावे या हेतूने पण खोटीच केली असे भरतास वाटण्याचा संभव जाणून हे सांगत आहेत; व पुढे जो सत्य सिद्धांत सांगावयाचा आहे तो भरतास मान्य व्हावा म्हणून ही पूर्वतयारी आहे. आम्हाला असत्य सांगून काही लाभ नाही किंवा काही हानि चुकवावयाची नाही. आम्ही उदासीन म्हणजे शत्रूमित्र भावनाहीन आणि विषयांत उदासीन आहोत. तपस्वी असल्याने सत्य हे आमचे भांडवल आहे; आणि वनांत रहात असल्याने जगाशी संबंध नाही, स्वतंत्र आहोत, पराधीन नाही. यामुळे आम्हाला कोणाची मिथ्या निंदा किंवा स्तुति करण्याचे काहीच कारण नाही. **येथे तपस्व्यांना उपदेश आहे की सत्यनिष्ठा हा सर्व तपाचा पाया पाहिजे; उदासीनता** = वैराग्य व सुखदुःख, लाभहानि, शत्रुमित्र यांत समताबुद्धि **ही त्यावरील इमारत** पाहिजे **व ही एकांत, पवित्र स्थळीं उभारली पाहिजे** तरच तपाचे फळ पदरांत पडेल.

**चौ. ४-५ (१) सकल साधनां सुफल... दर्शन - 'आज सुफल - तप तीर्थे त्यागहि... राम तुम्हां अवलोकत आजहि'** (१०७।५-६ टी.प.) तेथे रामभरद्वाज भेटीत 'राम' दर्शन म्हणून म्हटले त्याचा अर्थ लक्ष्मण-राम सीतादर्शन, असे या येथील चौपाईने ठरले. तेथे भरद्वाजांनी **'स्नेह सहज पदसरोजिं व्हावा'** (१,७।८) असा वर मागितला होता. रामदर्शनाचे काही तरी फळ मिळणारच. **'यदपि सखे तव इच्छा नाहीं। जगिं दर्शन मम अमोघ, पाही'** (५।४९।६) असे प्रभुच म्हणाले आहेत. भरद्वाजांनी प्रभुजवळ सहजस्नेह मागितला होता; पण तो त्या वेळी मिळाला नाही, असे त्यांना आता भरताचे सहज प्रेम पाहिल्यावर वाटले. **(क)**

रामदर्शनाचे फळ भरताचे दर्शन हे मिळाले, म्हणून म्हणतात की **'त्या फलास फल दर्शन तुमचे** व भरतदर्शनाचे फळ रामसुप्रेम, सहज स्नेह, आता भरत देतील; कारण हे देण्याचा मुख्य अधिकार संतांचा आहे. भगवान कधीच देत नाहीत असे नाही; पण फार क्वचित. **'मुख्यतस्तु महत्कृपयैव, भगवत्कृपा लेशाद्वा'** (ना. भ. ३८) भगवान कृपा करून ज्ञानीभक्ताची (महापुरुषाची) - गुरुची भेट करून देतात व गुरुकृपेनेच भक्तिलाभ होतो हा साधारण नियम, तसेच येथे झाले - हे भरद्वाजांनी सांगितले.

(२) **सवें प्रयागा सुभाग्य अमचें** - तीर्थराजाला सुद्धां पावन करणारे तुमचे दर्शन आहे, असे असता तुम्ही ग्लानि का करता ? भरताने ग्लानि करण्याचे सोडून द्यावे एवढ्यासाठी त्याचे खरे खरे महत्त्व वाखाणीत आहेत. जसे प्रयाग तीर्थाचे भाग्य तसे प्रयागवासी लोकांचेही हे भाग्यच की भरताचे दर्शन झाले.

**चौ. ६ - (१) भरत धन्य ! जग यशें जिंकलें - प्रेममग्न मुनि झाले** - भरताच्या प्रेमाचे वर्णन करता करता ते क्षणोक्षणी कसे वाढत गेले हे या वेळेपर्यंत स्पष्ट दिसत आले; पण प्रेम अनिर्वचनीय आहे. **'अनिर्वचनीय प्रेमस्वरूपम्' 'मूकास्वादनवत्'** (ना. भ. ५१, ५२) ते अनिर्वचनीय असले तरी अनुभवरूप आहे. मुनिराज त्या प्रेमाच्या अनुभवांत मग्न झाले. **'गुणरहितं, कामनारहितं, प्रतिक्षणवर्धमानं, अविच्छिन्नं सूक्ष्मतरम् अनुभवरूपम्'** (ना. भ. ५४) मुनि प्रेमरसांत बुडले. शरीर तटस्थ झाले, कदाचित नेत्रांतून अश्रुधाराही वाहू लागल्या असतील. ज्या प्रेमाची दीक्षा जगद्गुरु भरताकडून घेतली तिची परिपूर्णता एकाच बैठकीत झाली. भरद्वाजांना वृत्तीवर येण्यास काही काळ लागणारच. तोपर्यंत त्या भाषणाचा झालेला परिणाम कवि सांगतात.

*हिं. । सुनि मुनि बचन सभासद हरषे । साधु सराहि सुमन सुर बरषे ॥७॥*
*। धन्य धन्य धुनि गगन प्रयागा । सुनि सुनि भरतु मगन अनुरागा ॥८॥*
*दो. । पुलक गात हियँ राम सिय सजल सरोरुह नैन ॥*
*॥ करि प्रनामु मुनि मंडलिहि बोले गदगद बैन ॥२१०॥*
*म. । ऐकुनि वचन सभासद हर्षति । साधु ! साधु ! सुर सुमनें वर्षति ॥७॥*
*। 'धन्य धन्य' वाक् नभीं प्रयागीं । ऐकुनि भरत बुडति अनुरागीं ॥८॥*
*म.दो. । सिताराम हृदिं तनुं पुलक नेत्र - सरोरुहिं पाणि ॥*
*॥ नमन करुनि मुनि-मंडळा वदले गदगद वाणि ॥२१०॥*

**अर्थ** - (भरद्वाजांचे) भाषण ऐकून सर्व सभासदांना हर्ष झाला. 'शाबास शाबास' 'छान छान' म्हणत देवांनी पुष्पवृष्टी केली. ॥७॥ आकाशांत व प्रयागात (सुरू झालेली) भरत धन्य, मुनिधन्य अशी वाणी ऐकून भरत प्रेमात मग्न झाले.॥८॥ सीताराम हृदयात आहेत, अंगावर रोमांच आहेत व नेत्रकमलात पाणी भरले आहे; अशा दशेत सर्व मुनी मंडळास नमस्कार करून भरत सद्गदित होऊन बोलू लागले ॥२१०॥

**टीका. चौ. ७-८ - (१) सभासद हर्षति ... वर्षति - हे सभासद कोण** असा प्रश्न सहज उठण्यासारखा आहे. **'वैखानस बटु गृही उदासी'** (२०६।१) जे १०।१० १५।१५ जमून आपसांत भरताच्या गुणांची प्रशंसा करीत होते ते भरताच्या पाठोपाठ भरद्वाजाश्रमांत आले; शिवाय भरद्वाजाश्रमांतील शेकडो शिष्य व मुनिसमाज वगैरे मिळून हे सभासद होत. भरताचे सैन्य व अयोध्यावासी यांनी आधीच स्नाने वगैरे करून प्रयागांतच दुसरीकडे तळ दिलेला आहे. वा.रा. सारखी ही भेट इन मीन **तीन** व्यक्तींची नाही. शत्रुघ्न, वसिष्ठ वगैरे येथे कोणी नाहीत. **(क) सभासद हर्षति** - 'सवें प्रयागा सुभाग्य आमचे' असे जे भरद्वाज म्हणाले त्याला जणू सभासदांनी सहर्ष मान्यताच दिली. मुनींची प्रेममग्नदशा, त्यांनी वर्णिलेली भरताची महती व स्वतःच्या भाग्याचा विचार ही लोकांच्या हर्षाची कारणे आहेत.

(२) **धन्य धन्य रव नभीं प्रयागीं** - आकाशांत देवांनी व प्रयागांत म्हणजे त्या सभेत लोकांनी धन्य भरत ! धन्य मुनिवर !; धन्य भरत धन्य मुनिवर ! असे प्रशंसोद्गार काढले. हे ऐकून भरत रामप्रेमांत मग्न झाले. मात्र मुनींच्या इतके मग्न झाले नाहीत. या धन्यवादाने मुनिराजही वृत्तीवर आले असतीलच.

**दो.** - (१) मन रामप्रेमांत बुडू बघत आहे, पण ग्लानि कशामुळे होत आहे व तिला औषध काय हे सांगावयाचे आहे म्हणून बोलणे भाग आहे; पण कंठ सद्गदित झालेला आहे. **'कण्ठावरोध रोमाञ्चाश्रुभिः परस्पर लपमानाः पावयन्ति कुलानि पृथिवींच (ना. भ. ६८)** अशीच दशा भरतांची झाली आहे व ते आतां लपमान = बोलते होत आहेत.

*हिं. । मुनि समाजु अरु तीरथराजू । साँचिहुँ सपथ अघाइ अकाजू ॥१॥*
*। ऐहिं थल जौं किछु कहिअ बनाई । एहि सम अधिक न अघ अधमाई ॥२॥*
*। तुम्ह सर्वग्य कहउँ सतिभाऊ । उर अंतरजामी रघुराऊ ॥३॥*

*। मोहि न मातु करतब कर सोचू । नहिं दुखु जियँ जगु जानि हि पोचू ॥४॥*
*। नाहिन डरु बिगरिहि परलोकू । पितहु मरन कर मोहि न सोकू ॥५॥*
म. *। तीर्थराज नी मुनीसमाज । सत्यहि शपथ अतीव अकाज ॥१॥*
*। येथे काहीं बनवुन वदतां । त्यासम अधिक न पाप, अधमता ॥२॥*
*। तुम्हिं सर्वज्ञ वदें सद्भावें । अंतर्यामि रघुवरा ठावें ॥३॥*
*। मातृकृतीचा मज न दुखोटा । दुःख न मनिं, मानिल जग खोटा ॥४॥*
*। भय न, नाश जरि परलोकाचा । मज न शोक ही पितृमरणाचा ॥५॥*

**अर्थ** - मुनिसमाज आणि तीर्थराज येथें असतां खरी शपथ घेणेंसुद्धा अति अकार्य आहे. ॥१॥ या ठिकाणी मी जर काही बनवून सांगेन तर त्याच्या सारखे किंवा त्याहून अधिक पाप व नीचपणा नाही ॥२॥ मी सद्भावनेनेच सांगतो; आपण सर्वज्ञ आहात व अंतर्यामी रघुवरांसही सर्व कळतेच ॥३॥ मातेच्या करणीचा मला शोक नाही की जग मला खोटा (वाईट - नीच) म्हणेल याचे दुःख मनांत नाही. ॥४॥ परलोकाचा जरी नाश झाला (मला मिळाला नाही) तरी त्याचे भय नाही व पित्याच्या मरणाचा शोकही मला नाही. ॥५॥

**टीका. - चौ. १ (१) तीर्थराज नी मुनीसमाज .... अकाज** - आधीं असत्य भाषण कोणाजवळही करणे हिमालयासारखे पाप आहे; त्यांतही येथे मुनिसमाज आहे एवढेच नव्हे तर तीर्थराजही आहे. अशा मुनींसमोर किंवा तीर्थराजात खरी शपथ घेणेसुद्धा अत्यंत अकल्याण करणारे आहे; मग असत्य बोलल्याचा काय परिणाम होईल ! **तीर्थक्षेत्रांत वा संतसाधूंच्या समोर खरी शपथसुद्धा घेऊ नये व घेणे अनर्थकारक आहे. हा उपदेश येथे केला आहे.** इतर ठिकाणी खरी शपथ घेणे आवश्यक वाटल्यास घेण्यास हरकत नाही. बोलणाराविषयी श्रोत्याला संशय, अविश्वास वाटण्याची शक्यता असेल तेव्हा, तेथे, खरी शपथ घेणे चुकीचे नाही. बोलणाराच्या मनांत काय आहे हे जाणणारा श्रोता आहे असा ज्याचा विश्वास असेल त्याला शपथ घेण्याचे कारण नाही; व अशा श्रोत्याच्यासमोर शपथ घेणे म्हणजे त्याला काही कळत नाही असे प्रगट करण्यासारखे आहे. म्हणून संत, तीर्थ व ईश्वर यांच्यासमोर शपथ घेणे म्हणजे त्यांच्यावर श्रद्धा विश्वास नसल्याचे द्योतक आहे व हे अकल्याणकारक आहे. येथे संत व तीर्थराजही आहेत. म्हणून 'अत्यंत (अतीव) अकाज' म्हटले.

**चौ. २ - (१) बनवुन वदतां** - बनवून सांगणे म्हणजे खोटे असून खरे

वाटेल अशाप्रकारे सांगणे. **'बनवुनि सत्य असत्या वदतें । ते प्रिय अपणां, मी कडु माते ॥ तोंडपुजेपण मीही करीन किं '** (२।१६।३-४) बनवून सांगणे म्हणजे काय व लोक कशासाठी तसे करतात याचे एक उदाहरण या कुबडीच्या वचनांत आहे. कुबडीने सांगितले तसे बनवून सांगणे तर असत्य भाषणापेक्षांही फार मोठे पाप आहे व त्याचे फळ नर्कप्राप्ती आणि या लोकांत अति अधम, नीच ठरल्याने अकीर्ती. **(क) ल. टे.** मुनींनी म्हटले की आम्ही असत्य सांगत नाही व त्यास तीन कारणे उदासीन, तापस व वनिं वसतो ही दिली. भरतही हेच सुचवितात की मी सत्यच सांगणार आहे. आणि तीन नव्हे चार कारणे दिली आहेत : मुनिसमाज, तीर्थराज, मुनिवर सर्वज्ञ व रघुवर अंतर्यामी. शिवाय मुनि म्हणाले की आम्ही असत्य सांगत नाही. भरत म्हणतात की सत्य शपथ घेणेसुद्धा अति अहितकारक आहे. याप्रमाणे भरताची श्रेष्ठता दाखविली..

**(२) भरद्वाज वचने व भरताचे उत्तर (क)** मुनि - 'ग्लानि मनिं नका करूं मायकरणि चिंतून' (२०६) याचे उत्तर - 'मातृकृतीचा मज न दुखोटा.' **(ख)** 'हे ही भले म्हणे ना कोणी' (२०७।१) 'तुमचा त्यांत अल्प अपराधू । म्हणे अधम तो मूर्ख असाधू' - याचे उत्तर 'दुःख न मनिं, मानिल जग खोटा. **(ग)** मुनि - 'करतहि राज्य न दोषा लागता' (२०७।८) याचे उत्तर - 'भय न, नाश जरि परलोकाचा' - **(घ)** मुनि - 'नृप सत्यव्रत तुम्हा आणते'- (पण मरण पावले त्याला काय करणार !) (२०७।४) याचे उत्तर - 'मज न शोक ही पितृ मरणाचा.'

**चौ. ४-५ - (१)** भरताच्या म्हणण्यांतील भाव हा आहे की माझ्या ग्लानीचे कारण तुम्हाला वाटते त्यांतले एकही नाही. **(क)** मातेच्या कृतीमुळे लोकांनी माझी निंदा केली व जगात अकीर्ती झाली तरी त्याचे मला मुळीच दुःख वाटत नाही, वाटणार नाही. पितृवचन - भंग केल्यामुळे परलोकाची प्राप्ती न झाली व नर्कात पडावे लागले तरी त्याचे भय मला वाटत नाही; व पितृमरणामुळे मला मुळीच शोक नाही. का नाही शोक ते आता सांगतात -

हिं ***। सुकृत सुजस भरि भुअन सुहाए । लछिमन राम सरिस सुत पाए ॥६॥***
***। राम बिरहँ तजि तनु छनभंगू । भूप सोच कर कवन प्रसंगू ॥७॥***
***। राम लखन सिय बिनु पग पनही । करि मुनिबेष फिरहिं बन बनहीं ॥८॥***
दो. ***। अजिन बसन फल असन महि सयन डासि कुस पात ॥***
***॥ बसि तरु तर नित सहत हिम आतप बरषा बात ॥२११॥***

म. *। सुकृत सुयश सब भुवनिं शोभलें । सुत सम लक्ष्मण राम लाभले ॥६॥*
*। त्यक्त रामविरहीं तनु नश्वर । भूपति - शोका कुठला अवसर ॥७॥*
*। राम सिता लक्ष्मण अनवाणीं । पायिं फिरति मुनिवेषिं वनिं वनीं ॥८॥*

दो. *। अजिन वसन फल अशन, महिं शयन हि तृणपर्णांत ॥*
*॥ सहति वसुनि तरु तळिं सतत आतप वर्षा वात ॥२११॥*

**अर्थ** - त्यांचे सुकृत व सुयश सर्व भुवनांत शोभायमान झाले आहे; आणि लक्ष्मण व राम यांच्यासारखे पुत्र लाभले. ॥६॥ नश्वर (क्षणभंगुर, छनभंगु) तनुचा रामविरहांत त्याग केला. (असे असल्याने) भूपतींचा शोक करण्याचा प्रसंगच नाही (अवसर; कारण नाही). ॥७॥ राम लक्ष्मण सीता, पायी अनवाणी, मुनिवेषांत, वनावनांत हिंडत आहेत ॥८॥ मृगचर्म नेसायचीं, फळे खायची, व नुसत्या जमिनीवर पालापाचोळ्यांत व गवतांत झोपायचे; (अशा रीतीने) झाडांच्याखाली राहून सतत ऊन पाऊस थंडी वारा सहन करीत आहेत (सहन करावे लागत आहे.) ॥दो. २११।

**टीका. - चौ. ६ - ७ - (१) सुत सम लक्ष्मण राम लाभले.** रामलक्ष्मणसम सुत लाभले. येथे लक्ष्मणाचा उल्लेख प्रथम असला तरी तो हेतू पुरःसर नाही. चौ. ८ मध्ये रामाचा उल्लेख प्रथम आहेच. **(क)** येथे भरतांनी स्वतःचा किंवा शत्रुघ्नाचा उल्लेख केला नाही; कारण तसे करणे आत्मश्लाघा दर्शक झाले असते. शिवाय दशरथांचा पुत्र म्हणवून घेण्यास त्यांस लज्जा वाटत आहे; पित्याच्या मरणाला जो कारण झाला तो पुत्र कसला असे त्यास वाटत आहे. मरताना दशरथांनी रामलक्ष्मण व जानकी या तिघांचेही स्मरण केले होते. शत्रुघ्नाचेही नाव उच्चारले नव्हतेच; कारण तो भरतानुज म्हणून प्रसिद्ध ! मात्र भरत दशरथांस पिता मानीत नाहीत असे म्हणणे भरतवचनविरोधी आहे. 'मज न शोकही पितृमरणाचा' (चौ.५) असे त्यांनीच म्हटले आहे. **(ख) भूपति** - येथे 'पिता' शब्द न वापरतां 'भूपति' म्हणणे सहेतुक आहे. पिता या संबंधाने शोक करण्याचे जसे कारण नाही तसेच भूपति (भूप) या दृष्टीनेही शोकाचे कारण नाही. भूपति या नात्याने त्यांनी रामास वनवासास पाठवून व मला राज्य देण्याचे कबूल करून प्रतिज्ञा पालन करून सत्यसंघ म्हणून जगांत कीर्ती मिळविली; आणि पिता या नात्याने रामविरहाने देहत्याग केला.

**चौ. ८ व दोहा - (१) पायिं फिरति मुनिवेषिं वनि वनीं** - सीतेने मुनिवेष

केला नव्हता असे म्हणणारानी या चौपाईत तो पाहून घ्यावा. **(क) अजिन वसन - अजिन =** मृगचर्म, व्याघ्रचर्म असा सर्व साधारण अर्थ आहे; पण अंगावर पांघरण्यास, मुनि बहुधा मृगचर्मच वापरीत असत. **'जानवं चारु मृगाजिन माला'** (१।२६८।७) असे भृगुपतींच्या मुनिवेषाच्या वर्णनात आहे. **ल. टे.** ६।११।४ मध्ये मृगचर्म' आहे ते कोठले हे ठरविण्यास या दोह्यातील 'अजिन वसन' हे शब्द आधारभूत आहेत. **(ख)** वनि वनीं एका वनांतून दुसऱ्या वनांत तेथून तिसऱ्या वनांत याप्रमाणे हिंडावे लागत आहे.

*हिं.* ***। एहि दुखदाहँ दहइ दिन छाती । भूख न बासर नीद न राती ॥१॥***
***। एहि कुरोग कर औषधु नाहीं । सोधेउँ सकल बिश्व मन माहीं ॥२॥***
***। मातु कुमत बढई अघ मूला । तेहिं हमार हित कीन्ह बँसूला ॥३॥***
***। कलि कुकाठ कर कीन्ह कुजंत्रू । गाडि अवधि पढि कठिन कुमंत्रू ॥४॥***
***। मोहि लगि यहु कुठाटु तेहिं ठाटा । घालेसि सब जगु बारह बाटा ॥५॥***
***। मिटइ कुरोगु राम फिरि आएँ । बसइ अवध नहिं आन उपाएँ ॥६॥***

*म.* ***। दुःखदाह हा जाळि उर सदा । भूक न दिनिं निशिं निद्रा न कदा ॥१॥***
***। कुरोगास या औषध नाहीं । मनिं सोधलें सकल विश्वा ही ॥२॥***
***। मातृकुमत अघमूल सुतार । करि वाकस मम हिता तयार ॥३॥***
***। कलि कुकाष्ठ घे करुनि कुयंत्रा । गाडि म्हणुन कटु अवधि कुमंत्रा ॥४॥***
***। सजि मजसाठीं अशा कु-थाटा । नाशि जगा करि बारा वाटा ॥५॥***
***। राम परततां कुरोग नासे । अन्य उपायिं अयोध्या न वसे ॥६॥***

**अर्थ -** या दुःखाचा दाह सदा छाती जाळीत आहे. दिवसा कधीं भूक नाही व रात्री कधी झोप नाही ॥१॥ मी सगळे विश्व मनांत धुंडाळून (सोधून) पाहिले परंतु या कुरोगाला औषध नाही ॥२॥ मातेचे कुमत हा पापमूळ (अति पापी) सुतार होय व माझे हित त्याने वाकस बनविले. ॥३॥ कलि = कलहरूपी निंद्य काष्ठ (काष्ठ = सुकलेले लाकूड) घेऊन त्याने (एक) कुयंत्र बनविले व कटु (वाईट, दुष्ट) मंत्र म्हणून (१४ वर्षांच्या) अवधीने ते अयोध्येत गाडले (पुरून ठेवले) ॥४॥ माझ्यासाठी हा अशा प्रकारचा कुत्सित थाट (कुथाट) सजवला व सर्व जगाला बारा वाटा करून नष्ट केले ॥५॥ राम अयोध्येत परत आले म्हणजे (माझा) हा कुरोग नष्ट होईल व अन्य उपायांनी अयोध्या वसणार नाही ॥६॥

**टीका. - चौ. १-२ - (१) दुःख दाह हा** - रामलक्ष्मण व सीता वनांत हिंडत सर्व प्रकारची दुःखे सोशीत आहेत यामुळे होणाऱ्या दुःखाचा दाह आग रात्रंदिवस हृदयाला जाळीत आहे. हेच ग्लानीचे कारण आहे; इतर काही नाही. **(क) भूक न दिनिं - निशिं निद्रा न कदा** - यांतून, दिवसा भूक नाही म्हणजे रात्री लागते व खातात आणि रात्री झोप नाही म्हणजे दिवसा निजतात असा कुतर्कटी अर्थ करता आला असता; पण भरत गलेलठ्ठ व प्रसन्न दिसले असते तर! पण ते सुकून गेलेले व सदा खिन्न आहेत हे वनवासी भिल्ल स्त्रियांनीसुद्धा सहज ओळखले आहे. **तथापि अनुवादांत या कुतर्काला जागा ठेवली नाही.** 'भूक न दिनिं निशिं;' आणि 'दिनिं निशिं निद्रा न कदा' असा अन्वय करावा म्हणजे झाले. **(ख) कुरोगास या औषध नाही** - राम वनवासामुळे होणारे दुःख हा कुरोग भरतांस झाला आहे. हा कठीण, फार वाईट रोग आहे, कारण याला औषधच नाही. औषध रोग्याने घ्यावयाचे असते; पण रोग्याने औषध घेऊन बरा होणारा हा रोग नाही. हा बरा होण्यास एकच एक उपाय आहे. 'राम अयोध्येत परत येणे (चौ. ६) **(ग) मनिं सोधले सकल विश्वाही** माझ्या मनांत औषधासाठी मी सर्व विश्व धुंडाळून पाहिले पण मला काही औषध आढळले नाही. तुम्हाला काही माहीत असेल तर सांगा. द्या. **'दुःखें टळति रामपद बघतां'** हा उपाय ते सांगणार आहेत (चौ. ८) पण हे औषधसुद्धा लागू पडले नाही हे पुढे दिसते. मात्र शकुनावरून निषादराज जे भविष्य सांगणार आहेत ते अगदी बिनचूक ! **'शोकनाश होईल हरुष परि परिणामि विषाद'** (२३४)

**चौ. ३-५ - (१) मातृकुमत अधमूल सुतार** - येथपासून तीन चौपायांत अभिचार प्रयोगाचे रूपक कैकयीने केलेल्या कृतीवर केले आहे. **हे वर्णन** मारण प्रयोगाचे नसून **उच्चाटनाचे आहे.** एखाद्या व्यक्तीला किंवा वस्तीला निवासस्थानांतून मंत्रतंत्रयंत्र यांच्या बळावर हाकलून लावणे **याचे नाव उच्चाटन.** पुढे देवांनी अयोध्यावासी लोकांवर चित्रकूटास उच्चाटनाचा प्रयोग केलाच आहे. (२। ३०२। ३-५ पहा) येथे वर्णिलेल्या प्रयोगांत काष्ठाच्या यंत्राचा उल्लेख आहे, व कुयंत्र, कुमंत्र इत्यादि सर्वच वाईट, दुष्ट म्हणून वर्णिली आहेत; पण अभिचाराचे जारणमारणोच्चाटनादि कोणतेही प्रयोग वेदांतील मंत्रांनी किंवा रामनाममंत्रानीसुद्धा करता येतात. कोणताही मंत्र सिद्ध झाला म्हणजे कोणतेही अभिचार कर्म करता येते. मात्र प्रत्येक कर्माचे तंत्र व यंत्र निराळ्या प्रकारचे असते. यंत्र काष्ठाचेच

लागते असे नाही. भूर्जपत्रावर यंत्रादि लिहूनसुद्धा हे प्रयोग सिद्ध करता येतात असे रामार्चन चंद्रिकेत दिलेल्या माहितीवरून ठरते. येथे जास्त विस्ताराची आवश्यकता नाही. ज्यांना पाहिजे असेल त्यांनी रामार्चनचंद्रिका, मंत्रमहार्णव व यंत्रमहोदाधि हे ग्रंथ पहावे. मंत्र महार्णवांत पुष्कळ विस्तार आहे. **(क) एक गोष्ट मात्र निश्चित आहे** की ज्याच्यावर प्रयोग करावयाचा ती व्यक्ती जर ब्रह्मनिष्ठ असेल तर तो प्रयोग त्या व्यक्तीवर यशस्वी न होता करणारावर उलटतो. किंवा ज्याच्यावर केला असेल त्याने तो मंत्रादिशक्तीने उलटवला तर करणारावरच तो उलटतो; त्यालाच ते फळ भोगावे लागते. तसा कैकयीने केलेला हा प्रयोग तिच्यावर उलटला आहे. **वि. ल. ठे.** - हे प्रयोग आत्मसंरक्षणाशिवाय इतर कोणत्याही हेतून केले व कार्य जरी साधले तरी करणाराला शेवटी दुर्गती प्राप्त होते. 'मूठ मारणे' हा एक मारणाचाच प्रयोग आहे. असले प्रयोग करणारे मांत्रिक महाराष्ट्रात अनेक ठिकाणी आहेत. ब्राह्मणापासून चांभार मांगापर्यंतच्या विविध जातीत आहेत. पुरुषांतच आहेत असे नव्हे तर सर्व प्रकारच्या व विविध जातींच्या स्त्रियांतही आहेत.

## येथील प्रयोगाचे रूपक. (उच्चाटन प्रयोग)

येथे काष्ठयंत्र आहे. यांत लाकूड, सुतार, वाकस, कुयंत्र, कुमंत्र, यंत्र पुरण्याचे गाडण्याचे स्थान, उच्चाटनाची मुदत - अवधी व प्रयोग करणारी व्यक्ती यांचा संबंध आहे.

प्रयोग करणारी कैकयी, तिचे कुमत-दुष्ट विचार, हा सुतार, भरताला राज्य मिळवून देणे हे वाकस (लाकडाला पाहिजे तो आकार देण्याचे सुताराचे हत्यार). कलि = कलह - वैरभाव, मत्सर हे कुकाष्ठ, निंद्य लाकूड; बेहड्याचे लाकूड. राजाला वचनबद्ध करण्यासाठी मनात रचलेला जो कट ते कुयंत्र, 'तापसवेष विशेष उदासी रामवनवासी' हा कुमंत्र; १४ वर्षे अवधि - मुदत; कोपभवन हे यंत्र गाडण्याचे स्थान. राजाला क्रोधाने टोचून टोचून बोलणे व आपला हट्ट न सोडणे हे त्या यंत्राला गाडणे, पुरून ठेवणे. पुरताना पाहरीचे घाव मारून खणावे लागते, माती बाहेर काढावी लागते व मग पुन्हा दाबून बसवावी लागते. सत्य, धर्म, या विषयी राजाला बोलणे हे माती उकरून काढणे; राम आल्यावर प्रेमाचा आविर्भाव आणून सर्व निर्लज्जपणे सांगणे हे माती घालून दाबणे होय. या

प्रमाणे हा उच्चाटन प्रयोग केला गेला. व याला गुरू कोटी कुटिलमणि कुबडी झाली; पण तो उल्लेख येथे नाही. **(क) उच्चाटन फक्त रामाचेच करावयाचे होते,** हे त्याप्रकरणावरून स्पष्ट आहे. सर्व अयोध्येचे उच्चाटन करण्याचा कैकईचा हेतूच नव्हता. राजाला ठार मारावा हा हेतूही त्या कपटांत नव्हता. पण हे दोन्ही परिणाम मात्र झाल्याशिवाय राहिले नाहीत. अयोध्येचे उच्चाटन करण्याचा हेतू बाळगणे म्हणजे ओसाड अयोध्येचे राज्य पुत्राला देण्याची इच्छा करणे ठरले असते म्हणून तो हेतू मानता येत नाही.

**ल.ठे.** - भलत्याच व्यक्तीवर अभिचार प्रयोग केला तर करणाराचा स्वार्थ - मुख्य हेतू, न साधता इतके उलटेसुलटे होते की त्या प्रयोगकर्त्याला आपले जीवन शतशः मरणापेक्षा अधिक कष्टमय, दुःखशोकमय होते. समाजात असून समाजातून बहिष्कृत केल्यासारखे त्या व्यक्तीचे जीवन होते हे कैकयीच्या उदाहरणाने दाखवून **लोकास सावध करण्याच्या हेतूने कवींनी हे उच्चाटनाचे रूपक केले आहे.** कैकईला दुर्गती प्राप्त झाली नाही याचे कारण 'प्रणतकुटुंबपालक रघुपति' हेच आहे. राम, लक्ष्मण तिला भेटले आहेत. कैकयी कौसल्येप्रमाणेच मरणोत्तर स्वर्गात सौभाग्यवतीरूपाने दशरथांजवळ राहिली असल्याचे वर्णन वा.रा. आहे

**चौ. - ५ - (१) नाशि जगा करि बारा वाटा - बारा वाटा करणे** हा वाक्प्रचार मराठीत सुद्धा आहे. अर्थ हाकलून लावणे, छिन्नविछिन्न करणे, अस्ताव्यस्त करणे हाच आहे. अक्षरशः बारा वाटा मोजून दाखविण्याची आवश्यकता नाही. मा. पी.मध्ये बारावाटा कोणत्या हे सांगणारा अत्यंत अशुद्ध संस्कृत श्लोक कोणी टीकाकारांनी दिलेला आहे पण तो बनावट व अविश्वसनीय वाटतो म्हणून येथे दिला नाही.

**चौ. ६ - (१) राम परततां कुरोग नासे** - हा एकच उपाय भरतांचा कुरोग नष्ट करण्याचा आहे. येथे रघुवीर रघुपती न म्हणता राम = जो आनंदसिंधू सुखराशी. सुखधाम' (१।१९७। ५-६) असून त्यांस वनवास, दुःख क्लेश भोगावे लागत आहेत हे दाखविण्यासाठी 'राम' म्हटले. भाव हा की ऐश्वर्य माहात्म्यज्ञान असून राम दुःखाने भरत दुःखी आहेत; म्हणून रामदुःख दूर झाल्याशिवाय भरताचे दुःख नष्ट होणे शक्य नाही. राम वनांत मुनिवेषांत, मुनिव्रत आहाराचे पालन करीत आहेत तोपर्यंत त्यांचे (भरतांचे) दुःख कमी होणे शक्य नाही. ते अयोध्येत परत आले म्हणजेच ते दूर होईल. **(क) अन्य उपायिं अयोध्या न बसे** - राम

वनांत गेल्यापासून भरत चित्रकूटाला जाण्यास निघेपर्यंत अयोध्या काही अक्षरशः ओसाड पडली नव्हती. सुखाने वसत नव्हती, दुःख, शोक, दैन्य, संताप यांनी सर्व लोक जळत होते- इतकेच. त्यांना सुद्धा कुरोग झाला आहे; पण तो रामवियोग कुरोग आहे. **'रामवियोग - कुरोग मृतवत'** असे त्याचे निदान पूर्वीच केलेले आहे. त्यांचा रोग रामदुःखजनित नाही. चित्रकूटास रामसमीप नेहमी राहण्यास सापडले असते तर अयोध्यावासी लोकांचा कुरोग नष्ट झाला असता, पण भरत वनांत रामसन्निध राहिले असते तरी त्यांचा कुरोग बरा झाला नसता; **असा दोघांच्या कुरोगात फार मोठा फरक आहे.**

(२) **भरत पराभक्तीचे परमश्रेष्ठ उदाहरण आहे तर इतर लोक गौणीप्रेमभक्तीचे उदाहरण आहे. 'भक्ता एकान्ति नो मुख्याः' (ना. भ. ६७) 'गौणी त्रिधा गुणभेदात् आर्तादिभेदात् वा' (ना.भ. ५६) अन्य उपायिं अयोध्या न वसे.'** याचा अर्थ दशरथांनीच कैकईलाच सांगितला आहे. **'पुन्हा स्ववश... पुरि वसेल शोभन । राम सकलगुणनिधिचे शासन'** (२।३६।३).

**वि.ल.ठे. - १** या भरद्वाजभरत संवादांत **भरतांची महती व त्यांचे रामप्रेम यांचे जे शब्दचित्र** निर्माण केले आहे. त्याच्यासारखे एकांगी अनन्यभक्तीचे-प्रेमाचे चित्र इतर कोणत्याही ग्रंथात इतके सुंदर, चित्तवेधक, व श्रोत्या वक्त्यांच्या हृदयास तन्मय करणारे मिळणे अशक्य आहे. **गोपींचे कृष्णप्रेम सुद्धा यापुढे फिक्के पडते. चातकाचे एकांगी अनन्य प्रेम सुद्धा भरताच्या प्रेमप्रवाहात सहज वाहून जाते.** चातक एकांगी अनन्य प्रेमी असला तरी मेघाच्या दुःखाने दुःखी व मेघाच्या सुखाने सुखी होत नाही. भरताच्या भक्तीचे व प्रेमाचे सारसर्वस्व **'मातृकृतीचा मज न दुखोटा'** (२११।४) **पासून 'कुरोगास या औषध नाही'** (२१२।२) **पर्यंत व 'राम परतता कुरोग नासे'** (२१२।६) पर्यंत भरून ठेवले आहे. या वचनांवर जे थोडेसे लिहिले गेले त्यापेक्षा अधिक लिहिता येणे या क्षूद्र बुद्धीस तरी असंभाव्य वाटते. अमृताच्या स्वादाचे वर्णन कोणी करू शकत नाहीत असे असून या परमामृताचे वर्णन कोण करतील ते करोत ! ॥ **नभ नीलिमा काढोनि वसनां रंग वा देवोत ते । कीं कागदांची करुनि कुसुमें गंध ही घेवोत ते ॥ परमामृताचा स्वाद निशिदिन घेत या तूं मधुपसा । प्रज्ञा ! मना कर मत्त मग्न हि दिव्य सुरसीं तू कसा ॥ प्रज्ञा.॥**

(२) **हा भरद्वाज भरत - संवाद** म्हणजे भरताच्या उत्तरचरित्राचे (जे चित्रकूटास सर्वांना मंत्रमुग्ध करणार आहे त्याचे) बीज आहे. बीजाचा विस्तार म्हणजेच

जसा वृक्ष तसेच पुढील चरित्र आहे. शुभ वृक्ष जसजसा वाढत जातो तसतसे त्याचे सौंदर्य वगैरे वाढत जाते. तो सुंदर सुगंधि फुलांनी डवरला म्हणजे परम शोभायमान दिसतो. तसेच रामपदपादुका प्राप्तीच्या वेळी होणार आहे. नंतर अयोध्येत लंकेतील रामवचनांत, लंका भरतचरित्रांत, व उत्तर कांडात तो फळांनी लादलेला व पूर्वापेक्षाही लवलेला दिसेल.

**वि. सूचना - मानसांतील भरतचरित्राचा बोलपट** (सिनेमाचित्र), त्यांतील भावनांना आधुनिक कल्पनांची मुरड न घालता, किंचित विस्तार करून, तयार झाल्यास तो लोकांच्या हृदयाचा पालट करून त्यास नीति व मानवधर्माच्या मार्गावर आणू शकेल. त्यांत विदेही जनकांचे चरित्र व इतरांचे जे जसे आले आहे तसेच सामील होणारच.

भरद्वाजांनी रामचंद्रांचे जसे स्वागत केले तसेच पण अधिक उत्साहाने भरताचे केले. प्रभूंची यथाविधी पूजा केली; पण भरत तशी पूजा करून घेणार नाहीत हे उघड उघड दिसत असल्याने तशी पूजा केली नाही. पण भरतांकडून प्रेमदीक्षा घेऊन व तत्पूर्वी जी स्तुति प्रशंसा केली तीच मुख्य पूजा. **पूजेनंतर प्रेमसमाधिलाभ हा प्रसाद मिळाला.** पण भरताच्या परिवाराचे पूजन - सत्कारकरणे - राहिले आहे व गुरुपूजेतही महानैवेद्य समर्पण करणे राहिले आहे; म्हणून आता मुनिराज त्या दृष्टीने प्रयत्न करतील; पण भरताचा कुरोग कशाने बरा होईल याविषयी आपले मत आधी सांगतील -

*हिं. । भरत बचन सुनि मुनि सुखु पाई। सबहिं कीन्हि बहु भाँति बडाई ।।७।।*
*। तात करहु जनि सोचु बिसेषी । सब दुखु मिटिहि राम पग देखी ।।८।।*
*दो. । करि प्रबोधु मुनिबर कहेउ अतिथि पेमप्रिय होहु ।।*
*।। कंद मूल फल फूल हम देहिं लेहु करि छोहु ।।२१२।।*
*म. । श्रवुनि भरतवच मुनि सुख पावति । सकल हि नानापरीं प्रशंसति ।।७।।*
*। शोक विशेष न करणे ताता । दुःखे टळति रामपद दिसतां ।।८।।*
*दो. । सांत्वुनि मुनि वदले, अतिथि प्रेमप्रिय तुम्हीं व्हा हि ।।*
*।। कंदफूल फल देउं आम्हिं ते घ्या करुनि कृपा हि ।।२१२।।*

**अर्थ** - भरताचे भाषण श्रवण करून मुनि सुख पावले, आणि इतर सर्वांनी नाना परींनी भरताची प्रशंसा केली.।।७।। (भरद्वाज म्हणाले) ताता ! तुम्ही विशेष शोक करू नका. रामचंद्रांचे पाय दृष्टीस पडतांच सर्व दुःखे नाहिशी होतील.

॥८॥ (याप्रमाणे) भरताचे सांत्वन करून भरद्वाज मुनि म्हणाले की आपण आमच्या प्रेमाचे प्रिय अतिथि जरूर जरूर (हि) व्हावे (व्हा) व जे काही कंदफल फूल (फूल ना फुलाची पाकळी) आम्ही देऊ त्याचा कृपा करून स्वीकार करा (घ्या) च ॥दो. २१२॥

**टीका - चौ. ७-८ - (१) सकल हि प्रशंसति - सकल = सर्व सभासद. (क) शोक विशेष न करणे** - भाव हा की राम परत आल्याशिवाय तुमचा कुरोग नष्ट होणार नाही हे मान्य पण इतर कारणांनी तुम्ही जो शोक करतां तो करण्याचे काही कारण नाही. ही कारणे म्हणजे **'मम जन्मच रघुनाथवनास्तव' 'कुल कलंक मज सृजी बिधाता'** इत्यादि जी भरत मानतात ती शोकाची विशेष कारणे. सामान्य शोकाचे कारण दूर होण्यासारखे दिसत नाही हा मनांतील भाव आहे. राम परत फिरतील हे शक्य वाटत नाही. **(ख) दुःखे टळति रामपद दिसतां** - विशेष शोकामुळे जीं दुःखे होत आहेत तीं रामपददर्शन झाल्यावर नष्ट होतील. भरत सुद्धा असेच म्हणाले आहेत की **'ना दिसतां रघुनाथ पद उर जळजळ ना जाइ'** (१।२) सबदुख = सर्व दुःखे याचा अर्थ पहिल्या चरणाच्या संदर्भासह जसा वर केला तसाच करणे योग्य आहे अन्यथा 'शोक विशेष' याला काही अर्थच उरणार नाही. **'हर्षति निरखत रामपदांकां ।.... रघुवर भेटीसम सुख पावति' (२३८।३-४)** असे पुढे झाले असले तरी ते क्षणभरच! पादुका मिळाल्यावर जणू राम राजे झाल्यासारखे सुख झाले असले तरी रामवनवासामुळे भरतास होणारे दुःख नष्ट झालेले नाही हे पुढे याच काण्डात लंका कांडात (दो. ५८ - ६०।४) व उत्तरकाण्डारंभी दिसेल.

**दो. - (१) प्रेमप्रिय अतिथि** - भाव हा की तुमचे आतिथ्य तुमच्या योग्यतेप्रमाणे करण्याचे सामर्थ्य आमच्यांत नाही; कारण 'उदासीन, तापस, वनिं वसतो', पण तुम्ही प्रेमामुळे प्रिय वाटत असल्याकारणाने काहीतरी आतिथ्य केल्याशिवाय राहवत नाही, समाधान वाटणार नाही. आम्ही देऊन देणार ते काय? कंदमूल फल फूल ! या संपत्तीने तुमचा सत्कार करणे हा वेडेपणाच आहे आमचा ! पण प्रेम वेडे असते असे म्हणतातच. म्हणून जे काही फूल ना फुलाची पाकळी आम्ही देऊ त्याचा आमच्या प्रेमाखातर कृपा करून स्वीकार करावाच.

(२) येथे असे वाटण्याचा संभव आहे की हे मुनींचे म्हणणे केवळ विनय आहे, कारण त्यांनी तर असा सत्कार केला आहे की स्वर्गातील देवांच्या तोंडाला

सुद्धा पाणी सुटले ! तेव्हा भरताची परीक्षा घेण्यासाठी हे केले असेही कोणास वाटेल. पण असे वाटणे म्हणजे मानसांतील भरद्वाजांचे भाषण आम्ही ऐकले नसून वाल्मीकींचे भरद्वाजच आम्हांला दिसले व दिसत आहेत असे म्हणावे लागेल. सिद्धीकडून भरताचा सत्कार करविण्याची अंधुक कल्पना जरी येथे भरद्वाजांचे मनास शिवली असती तरी त्यांनी पुढे शिष्यांना कंदमुळे फळे आणण्याची जी आज्ञा दिली आहे ती दिली नसती व मुनींच्या मनांत जी चिंता उत्पन्न झाली आहे ती झाली नसती. आता भरत काय करतात ते प्रथम पाहू -

***हिं.*** ***। सुनि मुनि बचन भरत हियँ सोचू । भयउ कुअवसर कठिन सँकोचू ॥१॥***
***। जानि गरुइ गुर गिरा बहोरी । चरन बंदि बोले कर जोरी ॥२॥***
***। सिर धरि आयसु करिअ तुम्हारा । परम धरमु यह नाथ हमारा ॥३॥***
***म.*** ***। ऐकुनि भरता चिंता हृदयीं । पडे कठिण संकोच कु-समयीं ॥१॥***
***। पुन्हां गुरु-गिरा-गुरुता जाणुनि । करजोडुनि वदले पद वंदुनि ॥२॥***
***। पालन आज्ञा धरुनी माथां । परम धर्म हा अमचा नाथा ! ॥३॥***

**अर्थ** - (भरद्वाजांची विनंति) ऐकून भरताच्या मनांत चिंता उत्पन्न झाली की भलत्याच वेळी मोठा कठिण संकोच येऊन पडला ! (हो म्हणणे बरे नाही, नाही म्हणतां येत नाही) ॥१॥ पुन्हा (विचार करून पाहतां) गुरुजींच्या वचनाचे महत्त्व (गुरुता) जाणून पायांना वंदन करून हात जोडून भरत म्हणाले ॥२॥ नाथ ! आपली आज्ञा शिरसावंद्य मानून पालन करणे हा आमचा धर्म आहे. ॥३॥

**टीका. चौ. १ - (१) चिंता हृदयी पडे संकोच** - असे होण्याची मुख्य दोन कारणे आहेत. एवढ्या मोठ्या सैन्याचा व पुरजनादिकांचा सत्कार करण्यांत मुनींना फार कष्ट पडतील. क्षत्रियाने इतका भार 'उदासीन तापस वनवासी' मुनींवर घालणे पडू देणे हे क्षत्रियांस उचित नव्हे. हत्ती घोडे वगैरे तपोवनाची धुळधाण करतील असे वाटल्यामुळे एका बाजूने संकोच वाटला. पुरजनांत कोणी फलाहारी, दुधाहारी, नक्तभोजी असे विविध व्रतनेम करणारे लोक आहेत. तेही धर्मसंकटात पडतील; **यामुळे कठिण संकोच;** व हाच कुसमय. एरव्ही क्षत्रियांनी मुनींच्या अतिथ्याचा स्वीकार करणे हा अधर्म नसून तो मुनींचा प्रसाद म्हणून आदराने ग्राह्य आहे. ससैन्य विश्वामित्राला वसिष्ठांनी, व सहस्रार्जुनाला जमदग्नींनी अशीच विनंती केली तेव्हा त्यांना असाच व याच कारणाने संकोच

वाटला; पण दोघांनीही आतिथ्याचा स्वीकार केला. **(क)** राम लक्ष्मण सीता वनात खरोखरच 'कंदमूलफलफूलाहारी' असून, मुनि कंदमूलफल म्हणत असले तरी सर्व प्रकारचे भक्ष्य भोज्यादि पदार्थ व सर्व भोगसमृद्धि ते करणारच. तेव्हा सर्व लोकही धर्मसंकटांस पडतील म्हणूनही हा कुसमय आहे.

**चौ. २ - (१) गुरु-गिरा-गुरुता जाणुनि** - गिरा = वचन, भाषण; गुरुता = महत्त्व विचार केला की **विप्रकाम्या** (ब्राह्मणाची इच्छा) **पुरविण्याने व्रतभंगदोष लागत नाही.** भरद्वाजांसारख्या महातपस्वी मुनींचा अनादर करणे हाही क्षत्रिय धर्म नव्हे. **(क) वा. रा.** - भरताला चिंता संकोच वगैरे काही वाटले नाही. त्यांनी इतकेच म्हटले की आपण पाद्य अर्घ्यादिकाने आतिथ्य केलेच आहे. तेव्हा मुनि म्हणाले की तुमच्या सेनेला भोजन घालू इच्छितो; सर्वांना आश्रमांत घेऊन या; त्यावर **भरताने संकोच मानला नाही.** सर्ग ९१ भरद्वाजातिथ्यवर्णनपर आहे, ८३ श्लोक आहेत ! तेथे **मुनींनी कंदमूलफळे इत्यादींचा उच्चारसुद्धा केलेला नाही.** मुनींना चिंता वगैरे उत्पन्न झालेली नाही. त्यांनी अग्निशाळेत जाऊन इंद्रादी देवतांचे आवाहन केले आहे. व ते आल्यावर त्यांनी सर्व व्यवस्था केली आहे. **भरतादि सर्वांनीच** आतिथ्य स्वीकार केला आहे. **आकंठ भोजन वगैरे केले आहे.** मात्र भरत राजसिंहासनावर न बसता त्यावर चवऱ्या ढाळून मग मुख्य सचिवाच्या आसनावर बसले आहेत. सैन्यांतील वीर म्हणू लागले आहेत की **'नैवाऽयोध्यां गमिष्यामो न गमिष्याम दण्डकान् । कुशलं भरतस्यास्तु रामस्यास्तु तथा सुखम्** ॥५१॥ आम्ही अयोध्येत ही जाणार नाही व दंडकारण्यात (रामाकडे) ही जाणार नाही. भरताचे कुशल असो, राम ही सुखी असोत, इत्यादी. सर्व सर्गच मुद्दाम पाहण्यासारखा आहे.

**चौ. ३ - (१) पालन आज्ञा धरुनी माथां । परम धर्म हा अमचा नाथा !** - भाव हा की व्रतनियमादि पालन करणे हा **धर्म** आहे, पण आपली आज्ञा पालन करणे हा परम **धर्म** आहे. ही चौपाई अगदी अक्षरशः पूर्वी (१।७७।२) आली आहे. शंकर-शिव, प्रभु रामास, ते अवतार समाप्तीनंतर प्रगट झाल्यावर, म्हणाले - 'पालन आज्ञा धरुनी माथां । परम धर्म हा अमचा नाथा !' या पुनरुक्तीने सुचविले आहे की तेथील या पूर्वीची एक चौपाई व पुढील तीन चौपाया येथे अध्याहृत घ्यावयाच्या आहेत. **'शिव वदले हें उचित नसे जरि । नाथ-वचन मज न भंगवे तरि ॥ पालन आज्ञा धरुनी माथां । परम धर्म हा अमचा नाथा !**॥२॥

**माता पिता गुरु प्रभु वचनें । शुभ जाणुनि विण विचार करणें ॥३॥ तुम्हीं परम हितकारि सर्वपरिं । आज्ञा आपुली नाथ शिरावरि ॥४॥ प्रभु संतोषित शंकर-वचनें । भक्ति-विवेक धर्मयुत रचनें ॥५॥** (१।७७). यांत पहिल्या चौपाईत 'शिववदले' च्या ऐवजी 'भरत वदले' आणि पाचव्या चौपाईत 'प्रभु' च्या जागी 'मुनि' आणि 'शंकर' च्या जागी 'भरत' शब्द घातला म्हणजे भरताने येथे मुनींस दिलेले सविनय उत्तर व त्याचा मुनींवर झालेला परिणाम सांगितला जातो. आता येथे तोच सांगतात.

*हिं.* ***। भरत बचन मुनिबर मन भाए । सुचि सेवक सिष निकट बोलाए ॥४॥***
***। चाहिअ कीन्ह भरत पहुनाई । कंद मूल फल आनहु जाई ॥५॥***
***। भलेहिं नाथ कहि तिन्ह सिर नाए । प्रमुदित निज निज काज सिधाए ॥६॥***
***। मुनिहि सोच पाहुन बड़ नेवता । तसि पूजा चाहिअ जस देवता ॥७॥***
***। सुनि रिधि सिधि अनिमादिक आई । आयसु होइ सो करहिं गोसाईं ॥८॥***

*म.* ***। भरत - वचन रुचलें मुनि-हृदया । निकट घेति शुचि सेवक शिष्यां ॥४॥***
***। भरतातिथ्य असे कीं करणें । कंदमूलफल जाऊन अणणें ॥५॥***
***। भलें नाथ ! वदुनी पद वंदित, । गेले निज निज काजीं प्रमुदित ॥६॥***
***। मुनि-शुच 'अतिथी थोर निमंत्रित । जसा देव तसं पूजन समुचित' ॥७॥***
***। श्रवुनि ऋद्धि, अणिमादि हि आल्या । स्वामी आज्ञा द्या, करुं, वदल्या ॥८॥***

**अर्थ** - भरताचे म्हणणे मुनींच्या मनाला रुचले (आवडले) व त्यांनी पवित्र सेवकांना व शिष्यांना जवळ बोलावले; (व म्हणाले) ॥४॥ भरताचा पाहुणचार (आतिथ्य) करावयाचा आहे; तरी जाऊन कंदमूलफले घेऊन या ॥५॥ नाथ ! फार उत्तम ! असे म्हणून त्यांनी पायी वंदन केले व ते आपापल्या कार्याला निघून गेले.॥६॥ बडा-थोर-पाहुणा (अतिथि) आज बोलावला आहे; व जसा देव असेल तसे पूजन करणे आवश्यक व उचित आहे, अशी चिंता मुनींना लागली.॥७॥ (मुनींच्या मनांतील वचन) ऐकून ऋद्धि व अणिमादिक सिद्धिही आल्या व म्हणाल्या की, स्वामी ! आज्ञा द्यावी म्हणजे आम्ही तसे करू - करतो.॥८॥

**टीका. - चौ. ४ (१) निकट घेति शुचि सेवक शिष्यां** - शुचि सेवक व शुचि शिष्य. **'सेवक तोच किं जो सेवा करि'** (१।२७१) ३. सेवक असतील ते शिष्य असतातच असे नाही. शिष्य सेवक असतातच. परमार्थमार्गात मंत्रोपदेश,

योगदीक्षा इ. देण्यापूर्वी जवळ राहिलेला नुसता सेवक असतो. सेवाभाव, आज्ञाधारकपणा व अधिकार पाहून मग योग्य काळी त्या सेवकाचा शिष्य म्हणून स्वीकार केला जातो. **(क) कंदमूलफल जाउन अणणें.** या आज्ञेवरून कल्पना करावी की भरद्वाजाश्रमांत किती शिष्य असतील व त्या भागात ज्येष्ठ कृष्णपक्षांत कंदमूळफळे किती विपुल असतील ! लाखो लोकांना पुरेशी कंदमूलफळे आणावयाची आहेत आणि या वेळी निदान ५ तरी वाजले असतील; कारण तिसरे प्रहरी भरत प्रयागात येऊन नंतर सर्वांचा शोध घेऊन, त्रिवेणीस जाऊन स्नान व विप्रांना दाने देणे इत्यादी करून नंतर भरद्वाजाश्रमांत प्रयागच्या अगदी दुसऱ्या टोकाला आले व हा संवाद झाला. **(ख)** सिद्धींना बोलावून पाहुणचार करण्याचा विचार असता तर ही आज्ञा दिली नसती. **वा. रा.** देवांना बोलावून सर्व व्यवस्था करविली आहे. **अ. रा.** कामधेनूला बोलावून तिच्याकडून सर्व करविले आहे. **या दोन्ही ठिकाणी कंदमूलफले आणण्याची आज्ञा दिली नाही.** यावरून पक्के ठरते की या भरद्वाजांच्या मनात अशा प्रकारे काही करविण्याचा विचार मुळीच नव्हता.

**चौ. ६-७ (१) मुनि-शुच अतिथी थोर निमंत्रित -** जर ऋद्धिसिद्धींचे आवाहन करवून त्यांच्याकडून कार्य करविण्याचा विचार मुनींच्या मनात असता तर शुच = चिंता करीत बसण्याचे कारणच नव्हते. **चिंतातुर झाल्याचा उल्लेख वा. रा. व. अ.रा. यांत नाही; कारण, तेथे देव व कामधेनु यांना बोलावण्याचे मनात होते.** म्हणून निर्विवादपणे सिद्ध झाले की ऋद्धिसिद्धिंना बोलावण्याचा विचार भरद्वाजांच्या मनात नव्हता; म्हणूनच चिंताग्रस्त झाले की **(क) जसा देव तसे समुचित पूजन - गणपतीला** दूर्वा, शमी, मांदाराची फुले, लाल फुले, मोदक, पंचखाद्य पाहिजे. **शंकराला बेल,** अक्षता, जलधाराभिषेक, धोतऱ्याची फुले, श्वेतपुष्पे, दहीभात इ. पाहिजे. याप्रमाणे निरनिराळ्या देवतेच्या पूजेत त्यांच्या त्यांच्या आवडीप्रमाणे जसा भेद करावा लागतो तसेच मुनिव्रताचा अंगिकार केलेल्या रामाचे आतिथ्य कंदमूलफलांनी केले ते योग्य झाले. पण सम्राटपुत्र भरत, सचिव, सेनापति, सर्व राण्या, राजपरिवार, धनाढ्य लोक (महाजन) सर्व सैन्य इ. बोलावून त्यांच्यापुढे कंदमूलफले ठेवणे म्हणजे त्यांचा जाणून बुजून अपमान करण्यासारखे आहे; इत्यादी विचार-चिंता मुनि आपल्या मनात करीत आहेत. तोच त्यांची चिंता दूर करणारा एक अनपेक्षित प्रकार घडला. संस्कृतात **'यथा यक्षस्तथा**

**बलिः'** ही याच अर्थाची म्हण आहे; पण यक्ष ही क्षुद्र देवता असल्याने **मानसांतील ही म्हण अधिक प्रशस्त आहे.**

चौ. ८ - (१) **श्रवुनि ऋद्धि अणिमादि हि आल्या - ऋद्धि = समृद्धि;** (मेदिनी) **अणिमादि =** अणिमा, महिमा, गरिमा वगैरे अष्ट महासिद्धि. **'हि'** ने इतर सिद्धि दर्शविल्या. **(क) श्रवुनि =** मुनि मनांत जे विचार करीत होते ते ऐकून विचार करताना शब्दांचा व वाक्यांचा उपयोग करावा लागतोच. कोणी मनात केलेले विचार समजणे हीसुद्धा एक गौणसिद्धि आहे. मनात स्मरण केल्याबरोबर सिद्धि हजर झाल्याचे वर्णन मानसांतच आहे. 'स्मरुनि सकल सिद्धिंस बोलावी। नृप-पाहुणचारा करु लावी' (१।३०६।८, टी.प.) असे सीतेने केले आहे. स्मरण करतानासुद्धा शब्दांचा उपयोग करावाच लागतो.

(२) श्रीगोस्वामींनी येथे हे दाखविले आहे की **अशा अडचणीच्या वेळीसुद्धा अनन्य रामभक्त इतरांची आशा करीत नाहीत.** सिद्धींना बोलावणे, त्यांचे स्मरण करणे, म्हणजे रामाशिवाय इतरांची आशा करणे आहे. **'म्हणावि दास मम नर आशा करि। वदा कुठें विश्वास खरा तरि'** (७।४६।३). असे श्रीरामवचनच आहे. सिद्धींचे स्मरण केले असते तर ठरले असते की मुनींचा रामावर विश्वास नाही. म्हणजे ते अनन्य रामभक्त नाहीत; व ते परमविरागीही ठरले नसते. **'म्हणा तात तो परम विरागी। तृणसम सिद्धि त्रिगुणां त्यागी'** (३।१५।८) **(क)** इतक्या निरपेक्ष मुनींच्या जवळ त्यांचे विचार ऐकूनसुद्धा सिद्धि का व कशा आल्या ? चिंता करताना मुनींनी शेवटी मनात निश्चय केला की प्रभूची इच्छा असेल तसे होईल; मी व्यर्थ चिंता कशाला करू ? शिष्य कंदमूलफळे आणतील ती सर्वांना देऊ; त्यांत मला कसला कमीपणा ? मी तर आधी स्पष्ट सांगितले आहे. हा विचार ठरताच अन्तर्यामी रघुवीरांच्या प्रेरणेने सिद्धी समोर येऊन हात जोडून उभ्या राहिल्या व त्यांनी प्रार्थना केली. **'संकटी गोविंद उभा मागें पुढें। काहींच सांकडे उरों वेदी -'** तेव्हा मुनींनी जाणले की न बोलावता, स्मरण न करता या आल्या आहेत त्या अर्थी दासवत्सल, दासदैन्यहारी, चित्रकूटगिरीविहारी माझ्या प्रभु रघुवीराचीच ही दया आहे; यांचा अपमान करणेही बरे नव्हे. श्रीरामाला प्राणांपेक्षा प्रिय असलेल्या भरताची व अयोध्यावासी रामभक्तांची सेवा करण्यास सांगणे उपासनापराध ठरत नाही. येथे सिद्धी स्वयंसेविका म्हणून आल्या आहेत व मुनि त्यांस स्वतःच्या कार्यात राबवीत नाहीत हे आता दिसेल. सीतेने त्यांना वेठीला

धरल्या त्यांत स्वतःच्या पित्याची कीर्ति वाढविणे हा एक हेतु होता; तसा कोणताच हेतु मुनिराजांचा नाही हे आता ते सिद्धींना जी आज्ञा देतील त्यावरून दिसेल.

***हिं.दो.*** *। रामबिरह ब्याकुल भरतु सानुज सहित समाज ॥*
*॥ पहुनाई करि हरहु श्रम कहा मुदित मुनिराज ॥२१३॥*

***हिं.*** *। रिधि सिधि सिर धरि मुनिबर बानी । बड़भागिनि आपुहि अनुमानी ॥१॥*
*। कहहिं परसपर सिधि समुदाई । अतुलित अतिथि राम लघु भाई ॥२॥*
*। मुनि पद बंदि करिअ सोइ आजू । होइ सुखी सब राज समाजू ॥३॥*

***म.दो.*** *। रामविरहविव्हळ भरत सानुज सहित समाज ॥*
*॥ पाहुणचारें हरा श्रम म्हणति मुदित मुनिराज ॥२१३॥*

***म.*** *। ऋद्धि सिद्धि मुनिवच शिरिं धरती । महाभाग्य आपलें समजती ॥१॥*
*। सिद्धि समूह परस्पर कथिती । राम-बंधु लघु अतुलित अतिथि ॥२॥*
*। मुनि-पद नमुनि असें करूं आज । होइ सुखी सब राजसमाज ॥३॥*

**अर्थ** - मुनिराज प्रसन्न (मुदित) होऊन (सिद्धींना) म्हणाले की अनुजासह - आणि समाजासह भरत रामविरहाने व्याकुळ झालेले आहेत, तरी पाहुणचार करून श्रम हरण करा.॥दो.२१३॥ ऋद्धि सिद्धींनी मुनिश्रेष्ठांचे वचन शिरसावंद्य मानले व आपण महा भाग्यवान आहोत असे त्या समजल्या.॥१॥ सिद्धी व ऋद्धी समूह आपापसांत म्हणतात की रामाचे धाकटे बंधु अतुलनीय अतिथि (पाहुणे) आहेत.॥२॥ (तेव्हा) आपण मुनिचरणांना वंदन करून आज असे करू की सर्व राजसमाज सुखी होईल.॥३॥

**टीका. - दो. (१) हराश्रम - श्रम =** व्याकुळता, विव्हळता. **ल. ठे.** या दोह्यांत एक मर्म आहे ते सिद्धींच्या लक्षात आले आहे. 'श्रम हरा' असे सांगितले; पण कोणाचे ते स्पष्ट सांगितले नाही. वाल्मीकींनी रामचंद्रास 'श्रम' सफल करण्यास सांगितले. तेथे 'कोणाचे श्रम' याचा स्पष्ट उल्लेख आहे. **'श्रमां सफल सकलांच्या करणें'** (१३२।८). येथे मोघम ठेवण्याचे कारण इतकेच की भरत व शत्रुघ्न यांची व्याकुळता पाहुणचाराने यत्किंचितही कमी होणार नाही हे मुनिवरांस कळले आहे. **'कुरोगास या औषध नाहीं' 'राम परततां कुरोग नासे'** हे भरताचे शब्द मुनींच्या ध्यानांत आहेत. **(क)** या मोघमपणांत आणखी हेतु ऋद्धिसिद्धींना आव्हान देण्याचा आहे. 'तुम्ही सांगाल ते आम्ही करतो' असे जे तुम्ही म्हणाल्यात ते खरे करून दाखवा पाहू ! मुनि ऋद्धिसिद्धींना दाखवू इच्छितात की एकान्त भक्तांची

व्याकुळता हरण करण्याची ताकद तुमच्यांत नाही. ही गोष्ट ऋद्धिसिद्धींच्या ध्यानात आली आहे हे पुढे (चौ. २-३) वरून ठरते. **'रमाविलास राम अनुरागी । त्यजिति वमनसम जन बहुभागी'** (३२४।८) हे मुनींना माहीत आहे.

**चौ. १-२ (१) महाभाग्य आपलें समजती** - 'तृणसम सिद्धी त्रिगुणां त्यागी' - अशा परम विरागी रामभक्त मुनींनी आपली विनंती मानली हे आपले भाग्य; आणि भरतासह राजसमाजाची सेवा करण्यास सापडणार म्हणून महाभाग्य. सीतेने सिद्धीचे स्मरण करून त्यांना बोलावल्या व दशरथादि वऱ्हाडाची सेवा करण्यास पाठविल्या तेव्हा त्यांना ते आपले भाग्य सुद्धा वाटले नाही. (१।३०६।८ टी.प.) कारण तेथे वेठीला धरल्या होत्या. **(क) सिद्धिसमूह... रामबंधु लघु अतुलित अतिथी** - सिद्धींना आपले महाभाग्य वाटले खरे पण लगेच आपली चूक त्यांच्या लक्षात आली; तेव्हा आपसांत म्हणतात की 'रामलघु बंधु अतुलित अतिथी - लक्ष्मण लघुबंधु, भरतबंधु लघु, रावणभगिनी, इत्यादींत जसा गूढार्थ आहे तसाच येथे आहे की भरत म्हणजे रामाचेच धाकटे भाऊ ! रामासारखेच रामसेवा करण्याचे भाग्य लाभले तरी ती जशी आपल्याला करता येणार नाही तशीच राम लघुबंधूची सेवा आपण काय व कशी करणार ? कैकयीसुत असता तर सहज करू शकतो ! **(ख) अतुलित अतिथि - रामचंद्रांना पण 'प्राणप्रिय अतिथी मुनि पावति'** (१२५।३ वाल्मीकी) **'प्रियतमपूज्य पुरारि-अतिथि हे'** (१।३२।८) असे म्हटले आहे. राम वाल्मीकींचे प्राणप्रिय अतिथी. भरद्वाज वाल्मीकींचेच शिष्य, आणि भरत रामाचेच धाकटे भाऊ ! **'प्रेमप्रिय अतिथी'** असे भरद्वाजही म्हणाले आहेत. तेव्हा भरतशत्रुघ्नांची व्याकुळता आपल्याला काही दूर करता येणार नाही. राजसमाजाची व्याकुळता तरी आपल्याला दूर करता येईल का ? कारण **'रमाविलास राम-अनुरागी । त्यजिति वमनसम जन बहुभागी'** (३२४।८) असे सर्वच लोक आहेत. मग काय शरणचिठी द्यायची मुनींना आणि वाढायची कंदमूळफळं सगळ्यांना ? त्यावर कोणी म्हणाल्या :

**चौ. ३ - (१) मुनिपद नमुनि असें करूं... राजसमाज** - मुनींच्या प्रभावाने हे घडले तर घडेल; तेव्हा आता मुनींचे पाय धरू या, त्यांना शरण जाऊ; त्यांनी कृपा केली तर राजसमाज कदाचित सुखी होईल; व आपले हसे होणार नाही. ज्या अयोध्येची संपत्ती व ऐश्वर्य पाहून सुरराजाला सुद्धा हाव सुटते; व धनदाला लाज वाटते, त्या अयोध्येतील लोकांची रामविरहिव्याकुळता ऐश्वर्याने

व भोगांनी दूर करावयाची आहे ! असे केले तरच धडगत आहे; नाहीतर आपल्याला तोंड दाखवायला जागा नाही राहणार जगात ! पुढे स्पष्टच म्हटले आहे की - **'मुनीतपबलें कृतविभव विधिविस्मायक फार'** (२१४) असे म्हणून मुनींच्या पायांना वंदून कार्यास लागल्या.

हिं. *। अस कहि रचेउ रुचिर गृह नाना । जेहि बिलोकि बिलखाहिं बिमाना ॥४॥*
*। भोग बिभूति भूरि भरि राखे । देखत जिन्हहि अमर अभिलाषे ॥५॥*
*। दासीं दास साजु सब लीन्हें । जोगवत रहहिं मनहि मनु दीन्हें ॥६॥*
*। सब समाजु सजि सिधि पल माहीं । जे सुख सुरपुर सपनेहुँ नाहीं ॥७॥*
*। प्रथमहिं बास दिए सब केही । सुंदर सुखद जथा रुचि जेही ॥८॥*

दो. *। बहुरि सपरिजन भरत कहुँ रिषि अस आयसु दीन्ह ॥*
*॥ बिधि बिसमयदायक बिभव मुनिवर तपबल कीन्ह ॥२१४॥*

म. *। भवनें रुचिर रचित मग नाना । पाहुनि वाटे लाज विमाना ॥४॥*
*। भोग विभूति भूरि गृहिं भरली । अमरां हाव बघुनि ते सुटली ॥५॥*
*। दास दासि सामग्री घेउनि । जपत राहती रुचि अवलोकुनि ॥६॥*
*। सिद्ध करिति सब सिद्धि पळांतहि । तें सुख सुरपुरिं ना स्वप्नांतही ॥७॥*
*। प्रथम निवास दिले सर्वाला । सुंदर सुखद रुचे जो ज्याला ॥८॥*

म.दो. *। भरता परिजन-सह दिले ऋषि आज्ञे-अनुसार ॥*
*॥ मुनीतमबलें कृत विभव विधि विसायक फार ॥२१४॥*

**अर्थ** - मग सुंदर सुंदर नाना प्रकारची भवने (घरे) अशी निर्माण केली की (ती पाहून) विमानांनासुद्धा लाज वाटली.॥४॥ त्या घरांतून भोरा ऐश्वर्य इतके विपुल भरून ठेवले की, ते पाहून देवांनासुद्धा हाव सुटली.॥५॥ दास दासी विविध सामग्री घेऊन (ज्याच्या त्याच्या मनाची) रुचि जाणून जपत राहणारे आहेत.॥६॥ या प्रमाणे सिद्धींनी सर्व तयारी एका पळांतच केली. (व असे सुखसाधन तयार केले की) ते सुख स्वर्गात सुद्धा स्वप्नांत सुद्धा मिळणे शक्य नाही.॥७॥ प्रथम (बाकीच्या) सर्वांना ज्याच्या त्याच्या इच्छेप्रमाणे सुंदर व सुखदायक निवासस्थाने दिली.॥८॥ व मुनींच्या आज्ञेप्रमाणे (मुनींनी अशी = अस, आज्ञा दिली होती.) परिवारासह भरतांस निवासस्थान दिले. ऋद्धिसिद्धींनी मुनींच्या तपोबलाने ब्रह्मदेवाला (सुद्धा) फार आश्चर्यचकीत करणारे वैभव निर्माण केले.॥ दो. २१४॥

**टीका. चौ. ४-५ (१)** आधी घरे निर्माण केली; मग ती नानाविध ऐश्वर्य, भोगविलासांनी भरपूर भरून ठेवली. देवांना वाटले की असे भोग आपणांस भोगण्यास मिळतील तर फार सुख होईल. सार हे की असे भोगविलास व ऐश्वर्य स्वर्गात नाही. **(क)** सीतेच्या आज्ञेने सिद्धींनी जानोशाच्या सर्व घरांत जे ऐश्वर्य भरून ठेवले ते असे होते : **'सीताज्ञें सिद्धी सकल जाती जानोशास ॥ सहित सकल सुख संपदा सुरपुरभोगविलास** ॥३०६॥ **निज निज वासिं वऱ्हाडी पाहति । सुरसुख सुलभ सकल विविधा अतिं'** (३०७।१). येथले भोगविलास पाहून देवांच्या तोंडाला पाणी सुटले ! असा फरक का ? सिद्धींना तर स्वतः सीतेने पाठविल्या होत्या ! वेठीस धरलेल्यांनी केलेली कामगिरी व स्वयंस्फूर्तीने, रामलघुबंधूच्या निमित्ताने, महाभाग्य मानून केलेली कामगिरी यांत काही फरक हवा का नको ? शिवाय मुनींचे तपोबल हे एक विशेष कारण आहेच. **येथे हे दाखविले की रामदास सीतेहुनि मोठे.**

**चौ. ६-८ (१)** त्या त्या घरांत जे कोणी येऊन राहतील त्यांच्या सेवेसाठी प्रत्येक घरांत भरपूर दासी, दास निर्माण करून ठेवले; व ते असे आहेत की राहणाराच्या मनात असेल तो पदार्थ त्याने न मागता चटकन पुरविण्यासाठी अगदी टपून राहिलेले ! **(क)** येथे जे सुख मिळवण्यासारखे आहे ते इंद्रलोकांत सुद्धा स्वप्नांतही नाही; मग जागृतींत पाहण्यास व भोगण्यास कसे सापडणार ! जनकपुरीत सिद्धींनी सुरसुख सुलभ केले होते इतकेच. हे येथले सुख सुरांना स्वर्गातसुद्धा पाहण्यास व ऐकण्यास सुद्धा मिळालेले नाही व मिळणार नाही. **(ख)** या प्रमाणे सर्व तयारी एका पळांत झाली. आता भरतादिकांस बोलावून आणून त्यांना घरे द्यायची. वा. रा. प्रथम भरत शत्रुघ्न, मग सचिव असा उतरता क्रम आहे; पण येथे उलटा आहे. प्रथम इतर सर्व लोकांस स्थाने दिली व नंतर परिवारासह भरतास दिली आहेत. याचे कारण दोह्यांत 'मुनि-आज्ञे अनुसार' हे दिले आहे. मुनींची अशी आज्ञाच आहे की इतर सर्वांना स्थाने दिल्यानंतर सपरिवार भरताला निवासस्थान द्यावे.

**दो. (१) मुनि आज्ञे - अनुसार -** रिषि अस = अशी, आयसु = आज्ञा, दीन्ह = दिली आहे. मुनिनेच अशी आज्ञा दिली असल्या कारणाने भरताला सर्वांच्या शेवटी स्थान दिले आणि मुनींच्याच आज्ञेने ब्रह्मदेवाला सुद्धा आश्चर्यात पाडणारे (विस्मायक) ऐश्वर्य (विभव) मुनींच्याच तपोबलाने सिद्धींनी निर्माण

केले आहे. या दोन्ही गोष्टींशी मुनिआज्ञेचा संबंध दाखविण्यासाठी 'मुनिआज्ञे अनुसार' हे वाक्य दोहोंच्या मधे वापरले आहे. हिंदीतही असेच आहे.
**(क) शंका** - शिष्यांना व सेवकांना कंदमूलफळे आणावयास सांगितली आहेत त्यांचे आता काय करणार ? वसिष्ठ वामदेवादि पुष्कळ मुनि व तपस्वी ब्राह्मण भरताबरोबर आहेत इतरही पुष्कळ फलाहारी लोक आहेत. त्यांना देऊन उरतील तो प्रसाद म्हणून भरद्वाजाश्रमांतील शेकडो मुनि व हजारो शिष्य सेवक यांच्या उपयोगी पडतील. ल.ठे. या सर्व वर्णनांत वसिष्ठादि मुनींचे नाव नाही ! कोणत्या प्रकारचे काय काय भोग आहेत याचे वर्णन आता करतात :

*हिं.* *। मुनि प्रभाउ जब भरत बिलोका । सब लघु लगे लोकपति लोका ॥१॥*
*। सुख समाजु नहिं जाइ बखानी । देखत बिरति बिसारहिं ग्यानी ॥२॥*
*। आसन सयन सुबसन बिताना । बन बाटिका बिहग मृग नाना ॥३॥*
*। सुरभि फूल फल अमिअ समाना । बिमल जलासय बिबिध बिधाना ॥४॥*
*। असन पान सुचि अमिअ अमीसे । देखि लोग सकुचात जमी से ॥५॥*
*। सुर सुरभी सुरतरु सबही कें । लखि अभिलाषु सुरेस सची कें ॥६॥*
*। रितु बसंत बह त्रिबिध बयारी । सब कहँ सुलभ पदारथ चारी ॥७॥*
*। स्रक चंदन बनितादिक भोगा । देखि हरष बिसमय बस लोगा ॥८॥*

*म.* *। मुनीप्रभावा भरत विलोकत । सकल लोक लोकप लघु वाटत ॥१॥*
*। सुख सामग्रि कोण कशि वानी । बघतां विसरति विरती ज्ञानी ॥२॥*
*। आसन शयन सुबसन बितानां । वन वाटिका विहग मृग नाना ॥३॥*
*। सुरभि फूल फल मधुर सुधेसम । विमल जलाशय विविधा अनुपम ॥४॥*
*। अशन - पान शुचि अमृताऽमृतसें । जन पाहुन लाजति साधकसे ॥५॥*
*। सुरसुरभी सुरतरु सर्वांना । पाहुन लालुच इन्द्र-शचीनां ॥६॥*
*। ऋतुपति, वारा त्रिविधा वाहत । चारि पदार्थ सुलभ सर्वांप्रत ॥७॥*
*। स्रक् चंदन वनितादिक भोगहि । बघुनि हर्ष विस्मय-वश लोकहि ॥८॥*

**अर्थ** - ज्या वेळी मुनींचा प्रभाव भरताच्या दृष्टीस पडला त्या वेळी सर्व लोक व लोकपाल त्यांस तुच्छ वाटले.॥१॥ भोग सामग्रीचे वर्णन कोण कसे करू शकणार ? हे विषय भोग पाहून ज्ञानीसुद्धा वैराग्य विसरले. त्यांवर आसक्त झाले.॥२॥ आसने, शय्या, उत्तम वस्त्रे (भूषणे) छते, वने, पुष्पवाटिका, विविध पशुपक्षी इ. नाना पदार्थांना ॥३॥ व सुवासिक (सुरभि) फुले, अमृतासारखी

स्वादिष्ट फळे, विविध प्रकारचे, अनुपम व निर्मल जलाशय इत्यादी पदार्थांना ॥४॥ आणि अमृतालासुद्धा अमृतासारखे व पवित्र खाण्यापिण्याचे पदार्थ इत्यादींना पाहून लोक साधकांसारखे लाजू लागले.॥५॥ सर्वांनाच (प्रत्येक घरी) कामधेनु (सुर-सुरभी) व कल्पवृक्ष (सुरतरु) आहेत. हे सर्व पाहून इंद्र व शची यांना सुद्धा लालुच उत्पन्न झाली.॥६॥ वसंत ऋतू (ऋतुपति) असून शीतल मंद सुगंधी वारा वहात आहे आणि भोजनांतील चारी प्रकारचे पदार्थ (खाद्य, पेय, चोष्य लेह्य) सर्वांना सुलभ आहेत.॥७॥ पुष्पमाला (स्रक्) चंदन (उटी लावण्यास) व वनिता (तरुण स्त्रिया) वगैरे भोग पण (सुलभ) आहेत; व त्यांना पाहून लोकांना हर्ष, आश्चर्य व विषाद वाटू लागला. (काहींना हर्ष, काहींना आश्चर्य, काहींना विषाद) तर काहींना हर्ष व आश्चर्य व काहींना आश्चर्य व विषाद).॥८॥

**टीका. ल. टे. १** - मानसांतील हे वर्णन वा. रा. व अ. रा. यांतील वर्णनापेक्षा फारच संक्षिप्त असले तरी त्यापेक्षा अत्यंत प्रभावी, आकर्षक व मर्यादेचे उल्लंघन न करता सर्व गोष्टी सारांश रूपाने सांगणारे आहे. वा. रा. भरद्वाजांच्या वैभवापेक्षा हे उच्चतर व पवित्र आहे हे मोठ्या मार्मिकपणे सुचविले आहे. ते सर्व वैभव इंद्रादि देवांनी निर्माण केले आहे तर येथील वैभव पाहून ब्रह्मदेवाला फार आश्चर्य वाटले (दो. २१४) व इंद्रइंद्राणी यांना हाव सुटली, लोभ उत्पन्न झाला आहे. म्हणजेच इंद्र लोकांपासून ब्रह्मलोकासुद्धा सर्व लोकांत (स्वर्गात) असे वैभव कुठेच नाही; त्या सर्व स्वर्गातील वैभवापेक्षा हे श्रेष्ठ आहे. हाच भाव चौपाई ९ ने सिद्ध होतो.

**ल. टे. २** - येथील वर्णनांत दोन तीन क्रम साधले आहेत. भरत, ज्ञानी, साधक (यमी, जमी) व विषयी लोकांवर काय परिणाम झाला हे क्रमशः दाखविले आहे. **(क) भरताला** इंद्रादि लोकपालांचा प्रभाव व ऐश्वर्य याच्यापुढे तुच्छ वाटले; या शिवाय दुसरा परिणाम भरतावर झाला नाही. उपक्रम भरताच्या संबंधाने (चौ. १) केला व उपसंहारही (दो. २१५) भरताच्या संबंधानेच केला आहे. **(ख) ज्ञानी वैराग्य विसरले;** म्हणजे या भोगविलासांमध्ये आसक्त झाले. वैराग्यहीन ज्ञान हास्यास्पदद ठरते; तसेच येथे नुसत्या ज्ञानी लोकांचे झाले. **(ग) साधक** (जमी, संयमी) - मन व इंद्रिये यांचा निग्रह करण्याचा अभ्यास करणारे. यांना हे भोग भोगण्याची फार इच्छा तर झाली आहे, पण मनात संकोच व लाज वाटत आहे की हे भोग आपण भोगले असे लोकांना कळले तर काय म्हणतील.

ज्ञानी वैराग्यहीन होऊन पण 'इंद्रियाणींद्रियार्थेषु वर्तन्ते', 'मनः कृतं कृतं लोके न शरीरकृतं कृतम्' (यो.वा.) 'कुर्वन्नपि न लिप्यते' (भ. गी.) अशी वाक्ये उच्चारीत निःसंकोचपणे या विषयांत लुब्ध झाले. साधक भीत भीत, लाजत लाजत दांभिक साधूंप्रमाणे त्या भोगांत मग्न झाले. ज्ञानी व साधक यांची जेथे अशी दशा झाली, तेथे इंद्रइंद्राणीसारखे स्वभावताच विषयसुखांत रमणारे लोक होते त्यांचे काय विचारावे ? त्यांना फार हर्ष झाला. हे विषयी लोक होत.

**३. ज्ञानी, साधक व विषयी** यांनी कोणत्या प्रकारची स्थाने पसंत केली हे फार मार्मिकपणे दाखविले आहे. ज्याला जे स्थान आवडले ते दिले गेले असे पूर्वी (२१४।८) म्हटले; त्याचेच वर्णन येथे क्रमाने आहे. **(क)** ज्ञानी व साधक यांनी एकाच प्रकारची स्थाने पसंत केली हे दोघांच्या मध्ये 'आसन शयन सुवसन वितानां' पासून 'अशन पान शुचि अमृताऽमृतसें' पर्यंत. चौ. ३, ४ व पांचवीचा प्रथम चरण यानी सुचविले. कोणी वनांत तर कोणी पुष्पवाटिकांत, कोणी जलाशयांच्या जवळची, कोणी कंदमूलंफलांनी युक्त असलेली, तर कोणी पवित्र खाद्यपेये असलेली स्थाने पसंत केली. या वर्णनांतील 'शुचि', पवित्र हा शब्द पुढील वर्णनांत नाही. रंभादिक वनिता असलेली स्थाने या ज्ञानी व साधक वर्गांनी पसंत केली नाहीत. शुचि शब्दाने सुचविले की या स्थानांत मद्य, मांस व अभक्ष्य म्हणून वर्ज्य सांगितलेले इतर पदार्थ नव्हते. हे पदार्थ तिसऱ्या प्रकारच्या म्हणजे विषयी लोकांनी पसंत केलेल्या स्थानांत आहेत. **(ख)** 'सुरसुरभी सुरतरु सर्वांना...शचीनां' ही चौपाई पुढील एक वर्ग व मागील ज्ञानी व साधक या सर्वांच्या स्थानांविषयी आहे हे सर्वांना या शब्दाने सुचविले आहे. सर्व निवासस्थानांत कामधेनु आणि कल्पवृक्ष आहेत. **(ग)** 'ऋतुपति, वारा त्रिविधा वाहत' पासून 'बघुनि हर्ष' पर्यंतचे शेवटच्या दोन चौपायांतील वर्णन विषयी लोकांनी पसंत केलेल्या स्थानांचे आहे. ऋतुपति = वसंत ऋतु व शीतल मंद सुगंधि असा त्रिविध वारा कामविकार वाढविणारा असतो. १।१२६।१-५ या पांच चौपायांशी तुलना करून पहावी.

**(४) चारि पदार्थ सुलभ सर्वांप्रत** - येथे चारि पदार्थ म्हणजे चार पुरुषार्थ हा अर्थ घेणे मूर्खपणा ठरेल. ऋद्धिसिद्धीजनित ऐश्वर्य भोग मोक्ष देऊ शकत नाहीत. म्हणून येथे खाद्य, पेय, चोण्य लेह्य हे भोजनांतील चार प्रकारचे पदार्थ व तदनुषंगाने षड्रस सुचविले आहेत. हा चरणही सर्वांच्या स्थानांशी संबंधित घेणे

योग्य. पण यांचा या तिसरे स्थानांत उल्लेख करून सुचविले की विषयी लोकांचे लक्ष या गोष्टीकडे विशेष गेले.

(५) **स्रक् चंदन वनितादिक भोग हि - बधुनि हर्ष** - स्रक् = फुलांचे हार, गुच्छ, माळा इ. चंदन शब्दाने विविध अंगराग, अत्तरे तेले इत्यादी सुचविले. **'वनिता'** शब्दाने रंभातिलोत्तमादि अप्सरा व त्यांच्या सारख्याच अनेक सुंदर तरुण स्त्रिया सुचविल्या आहेत, हे वा.रा. सर्ग ९१ वरून उघड होते. प्रत्येक मनुष्याच्या अंगाला उटणी, तेले वगैरे लाऊन ७।७, ८।८ अशा सुंदर स्त्रिया अंगमर्दन करू लागल्या वगैरे सविस्तर वर्णन तेथे पहावे. **(क) वनितादि भोग,** यांतील आदि शब्दाने पलंग, शय्या, रत्नदीप, त्या स्त्रियांचे नृत्यगायन व रंभादि तरुण स्त्रियांचे भोग सुचविले आहेत. ही वेळ रात्रीची आहे. हे पुढे दोह्यांत सांगितले आहे. **(ख) बधुनि हर्ष विस्मयवश लोकहि** - विस्मय शब्दाचे आश्चर्य व विषाद हे दोन अर्थ मानसांत वापरले आहेत. येथे दोन्ही अर्थ घेणे जरूर आहे. या विषयी पूर्वी थोडे लिहिलेच आहे. येथे या वर्णनाचा अगदी थोडक्यात उपसंहार आहे : वनितादि भोग पाहून विषयी लोकांना हर्ष झाला; या वर्गात मुख्यतः सैन्याची गणना करणे योग्य ठरते. २।३।१ च्या टीकेत दिलेले वा. रा. वर्णन पहावे. प्रथम उल्लेखिलेल्या भरतांस आश्चर्य व विषाद वाटला. ज्ञानी लोकांना हर्ष व आश्चर्य वाटले; साधकांना हर्ष व विषाद वाटला. (**सूचना :** या आठ चौपायांचा अर्थ आज (२७।१०।५४ ला) लिहिला तेव्हा वरील कोणतेही भाव सुचलेले नव्हते व २०।२५ ओळींत सर्व टीका लिहून होईल असे वाटले; पण नदी कोरडी ठणठणीत असता एकाएकी मोठा लोंढा यावा त्या प्रमाणे जे काही वर लिहिले त्यांतील बहुतेक भाग (मा. पी मध्ये प्रसिद्ध झालेल्या १०।२० ओळी सोडून) आपोआपच बाहेर पडला.) या आठ चौपायांच्या रचनेतील कौशल्य आता कळले असेलच. आता भरताच्या विषादाचे सुंदर रूपकाने वर्णन करतात :

***हिं.दो.*** *। संपति चकई भरतु चक मुनि आयसु खेलवार ॥*
*॥ तेहि निसि आश्रम पिंजराँ राखे भा भिनुसार ॥२१५॥*

***म.दो*** *। चक्रि चक्र संपद भरत मुनि-शासन गारोडि ॥*
*॥ त्या निशिं आश्रमिं पंजरीं रात्र सरे तों कोंडि ॥२१५॥*

**अर्थ** - त्या भवनांतील संपद = संपत्ती ही चक्रवाकी आहे व भरत चक्रवाक आहे; मुनींची आज्ञा (निमंत्रण) हा गारोडि आहे. त्या गारोड्याने या दोघांना

आश्रमातील पिंजऱ्यांत रात्र सरेपर्यंत कोंडून ठेवली.।।दो.२१५।।

**टीका. (१) हा दोहा म्हणजे एक परंपरित सुंदर रूपक आहे.** चक्रवाक व चक्रवाकी यांची रात्री भेट होत नाही. जरी एखाद्या पारध्याने किंवा गारोड्याने खेळ करण्यासाठी म्हणून एकाच पिंजऱ्यांत कोंडून ठेवली तरी एकमेकांस स्पर्श करणे तर राहोच पण एकमेकांकडे बघत सुद्धा नाहीत. ३६ च्या आकड्यांतील अंकांप्रमाणे एकमेकांकडे पाठ करून पण दूर दूर बसतात. या प्रसिद्ध प्रकृति धर्माचे येथे रूपक केले आहे. **(क) आश्रम पिंजराँ** - याचा अर्थ आश्रमरूपी पिंजरा असा करणे चुकीचे आहे. त्यामुळे रूपक परिपूर्ण होत नाही; कारण, भरद्वाजाश्रमांत सिद्धींनी जे भवन निर्माण केले आहे त्यांत भरत आहेत. पिंजरा एखाद्या घरात असतो व त्यांत पक्षी कोंडून ठेवलेला असतो; म्हणून टीका लिहिताना अनुवाद ऐन वेळी बदलून 'आश्रम पंजरी' चे ऐवजी **आश्रमिं पंजरीं** = आश्रमांत पिंजऱ्यांत = आश्रमांतील भवनरूपी पिंजऱ्यांत, असा सरळ व सुसंगत अर्थ सांगणारा, फरक करावा लागला.

(२) **गारोडी** - (खेलवार - खेलवाड, खेलाडी) खेळ करून दाखविणारा. गारोडी पाखरांचा खेळ करून दाखवितो तो त्यांच्या सुखासाठी किंवा त्यांना दुःख देण्यासाठी करीत नसतो. तर त्या पक्ष्यांच्या स्वभावाचे ज्ञान खेळ पाहणारांस व ऐकणारांस व्हावे एवढ्यासाठी व स्वतःच्या समाधानासाठी खेळ करून दाखवतो. त्या प्रमाणे मुनींनी भरताला जे निमंत्रण दिले त्यांत हेतु कोणता हे या शब्दाने ध्वनित केले. **(क)** जसा चक्रवाक त्या चक्रवाकीकडे बघत नाही त्या प्रमाणे भरताने त्या भवनातील संपत्ती व विविध भोगैश्वर्य यांच्याकडे पाहिलेसुद्धा नाही; व चक्रवाकीच्या ठिकाणी जशी चक्रवाकाला मोहित करण्याची शक्तीच उरत नाही तशीच ब्रह्मदेवाला फार विस्मित करणाऱ्या व इंद्राला मोहित करणाऱ्या त्या संपत्तीच्या ठिकाणी भरताला मोहित करण्याची शक्तीच उरली नाही. भरताने तेथे प्रवेश करताच ती शक्ति नष्ट झाली. **(ख)** अशा रीतीने एकत्र कोंडून ठेवल्याने ज्या प्रमाणे चक्रवाक व चक्रवाकी सुखी तर होत नाहीतच पण 'रात्र संपेपर्यंत दुःखी खिन्न विषण्ण होऊन राहतात तसाच विषाद भरतांस वाटला व त्या संपत्तीलाही वाटला असेल ! 'कोक कोकि सम पुरनरनारी । **बांछिति उदय आर्त उरिं भारी'** (२।१८७।१) केव्हा उजाडेल व केव्हा येथून जाईन असे भरतांस वाटले.

(३) **कोंडि** - त्या घराला कुलूप लावले होते की काय ? घराला कुलूप नव्हते लावले. पण पिंजरा उघडा असूनसुद्धा रात्र असल्यामुळे चक्रवाकाला जसे बाहेर पडता येत नाही त्या प्रमाणेच भरतांस तेथून निघून जाता येईना. तसे केले असते तर - जेवावयास बोलावलेल्या पाहुण्याने वाढलेल्या पानावरून उठून जाण्यासारखे झाले असते; मुनींचे निमंत्रण स्वीकारून मुद्दाम अपमान केला असे ठरले असते. पानावर बसून अन्नाला स्पर्शसुद्धा न करण्याने अपमान नाही का होत ? पोटात कळा येत असल्या, वाताचे गोळे उठत असले म्हणजे हात पोटावर दाबलेला व विषाद तोंडावर पाहिला म्हणजे डोळस यजमान जाणतो, व अपमान होत नाही. **या यजमानाने तर भरताचा स्वभाव व दैवी वैभवाची अलौकिक शक्ति लोकांच्या नजरेस आणण्यासाठी जाणून बुजून हा खेळच केलेला आहे** ! आमंत्रण स्वीकारले, रात्रभर त्या घरात राहिले हाच मोठा मान राखला असे भरद्वाजांस वाटणारच !

**सूचना** - मुळात नसलेला यथासंख्य अलंकार 'संपद्' हा स्त्रीलिंगी शब्द वापरण्यासाठी अनुवादात सहज साधावा लागला. चक्रिचक्र संपद् **भरत**. चक्रवाकी स्त्री जाति आहे म्हणून स्त्रीलिंगी शब्द वापरणे भाग होते. तो वापरण्यास वरील क्रमाशिवाय वृत्त रचना जमेना व **यथासंख्य अलंकार इच्छा नसता साधला गेला.**

**वि.ल.ठे.** - या रूपकाने हे दाखविले की भरत व शत्रुघ्न याशिवाय इतर कोणीही (वसिष्ठादि मुनिसमाज यांत नाही) या संपत्तीच्या व भोगांच्या मोहांतून वाचला नाही. अयोध्येतील संपत्तीचा व भोगांचा त्याग करून, त्या संपत्तीच्या संरक्षणाची व्यवस्थासुद्धा न लावता जे आले ते रामप्रेमी व रामविरहव्याकुळ असून सुद्धा रामविरहव्यथा विसरून या संपत्तीच्या मोहास बळी पडले. व जे भरत सर्व संपत्तीच्या सु-रक्षणाची सु-व्यवस्था लाऊन आले तेच तेवढे या संपत्तीच्या मोहातून बचले व या संपत्तीला त्यांनी आपल्या वैराग्याने लाजविली. याचे कारण **'असे सकल रघुपति संपत्ती'** व **'करि स्वामिहीत सेवक तोही'** हा आधार बाकीच्या लोकांजवळ नाही; त्यांनी 'आपली संपत्ती' या भावनेने तिचा त्याग केला व ते रामविरहाने व्याकुळ होते; भरत राम दुःख दुःखाने दुःखी आहेत; इतका मोठा भेद आहे. भरत एकान्त भक्त आहेत, तर बाकीचे गौणी भक्ति करणारे आहेत. एकान्त भक्तांचे अशा मोहापासून संरक्षण रघुवीर करतात. **'ज्या रक्षिति रघुवीर ते बचले त्या अवसरिं'** (१।८५ टी.प.)

**अनन्य प्रेमभक्तीचा - पराभक्तीचा सिद्धान्त व प्रभाव ठसविणे हा या वर्णनांत कवींचा मुख्य हेतु आहे. 'सहज बोलणें हित उपदेश । करून सायास शिकविती'** या वचनाची सार्थकता येथे पाहून घ्यावी. भरतातिथ्य वर्णन हा मुख्य विषय असून सहज ओघाने इतर अनेक महत्त्वाचे सिद्धांत व स्वभावचित्रे ग्रंथित करून ठेवली आहेत.

***श्रीमानस गूढार्थचंद्रिका अयोध्याकांड अध्याय विसावा समाप्त.***

●●●

# अध्याय २१ वा

जो अध्याय **विसावा** समाप्त झाला, त्यांत भरद्वाजांनी भरत व अयोध्यावासी लोक यांना **विसावा** देण्याचा खूप प्रयत्न केला; अयोध्यावासी बहुतेक लोकांना त्यांत कमी अधिक प्रमाणांत विसावा मिळालाच; म्हणून मागील अध्यायाचे नाव बऱ्याच अंशी यथार्थ ठरले. बऱ्याच अंशी म्हणण्याचे कारण इतकेच की तो भरतांस विसावा देऊ शकला नाही. आता **एकविसावा** अध्याय सुरू होतो; यांत हेच दिसेल की भरतांस **विसावा** देणारा **एकच** आहे. **बाविसावा** अध्याय लक्ष्मणास सांगेल की **बा ! विसावा घे जरा,** असा अधीर व साहसी बनू नकोस. **तेविसावा** अध्याय आरंभीच भरतांस सांगेल की **ते (तुझा) विसावा** जेथे आहे ते स्थान पहा. त्याच अध्यायांत भरताचा विसावा भरतास भेटेल व दोघांनाही पूर्ण विसावा मिळेल. **सहजासहजी जुळलेल्या गोष्टींतून हा काव्यविनोद निष्पन्न झाला इतकेच.** आता उजाडल्याबरोबर भरत चित्रकूटास जाण्यास निघतात. भरतांच्या प्रवासांतील पाचवी रात्र या प्रमाणे भरद्वाजाश्रमांत गेली व साहवा दिवस उजाडला **हे लक्षात ठेवावे.**

***हिं.*** *। कीन्ह निमज्जनु तीरथराजा । नाइ मुनिहि सिरु सहिज समाजा ॥१॥*
*। रिषि आयसु असीस सिर राखी । करि दंडवत बिनय बहु भाषी ॥२॥*
*। पथ गति कुसल साथ सब लीन्हें । चले चित्रकूटहिं चितु दीन्हें ॥३॥*

***म.*** *। तीर्थराजिं तैं स्नाना करुनी । सहित समाज मुनिस शिर नमुनी ॥१॥*
*। आज्ञा आशीर्वच शिरिं धरिती । करुन दंडवत बहुत विनविती ॥२॥*
*। पथकुशलां सब लोकां घेउनि । निघति चित्रकूटीं मन देउनि ॥३॥*

**अर्थ -** (उजाडल्यावर) तीर्थराजांत - त्रिवेणीत स्नान केले व सर्व समाजासहीत मुनींना नमस्कार करून, त्यांची आज्ञा व आशीर्वाद मस्तकी धारण करून, मग दंडवत नमस्कार केला व पुष्कळ विनंती केली.॥१-२॥ उत्तम वाटाड्यांना व सर्व लोकांना (आपला समाज) बरोबर घेऊन चित्रकुटावर लक्ष लाऊन निघाले - चालू लागले.॥३॥

**टीका. चौ. १-२ (१) सहित समाज -** हे शब्द स्नान करण्याकडे सुद्धा घेणे योग्य. सचिव, बंधु, माता वगैरेंनीही भरद्वाजांस नमन केले. बाकीच्या सर्व लोकांना लांबूनच - नमस्कार करावा लागला असेल. **(क) बहुत विनविती -**

आपण एवढ्या मोठ्या सैन्यासह व समाजासह माझे जे स्वागत केलेत, त्याबद्दल मी आपला फार ऋणी आहे. आपला अद्‌भुत प्रभाव पाहून सर्वांना समाधान व आश्चर्य वाटले. हत्ती घोडे वगैरेंनी तपोवनाची नासधूस केली असेल, त्याबद्दल आपण मला क्षमा करावी. आपल्यासारख्या महानुभाव भगवद्‌भक्तांची कृपादृष्टी माझ्या सारख्या दीन-हीनावर सतत असावी व आपल्या कृपेने मला रामप्रेम प्राप्ती व्हावी एवढीच इच्छा आहे. आता सरळ जवळच्या वाटेने चित्रकूटासच जाण्याचा विचार आहे. सैन्यांतील वाटाड्यांस जवळचा रस्ता नक्की माहीत असेल नसेल वगैरे सांगितले असेल व मुनींनी पुष्कळ शिष्य वाट दाखविण्यास दिले असतील.

(२) भरत चित्रकूटास जाण्यासाठी किती अधीर झाले आहेत हे कवींनी मोठ्या कौशल्याने ध्वनित केले आहे. कोण पुढे, कोण मागे, वाहने केव्हा सजवली, वगैरे सर्व वर्णन गाळले. शृंगवेरपुराहून निघताना असलेल्या क्रमांत जेवढा बदल झाला तेवढाच पुढे सांगणार आहेत. **(क)** राम थोडे बाजूला वळून वाल्मीकींच्या आश्रमांत गेले; कारण त्यांना निवासस्थान विचारावयाचे होते व जाण्याची घाई नव्हती. भरतांनी विचार केला की भरद्वाजांचे गुरु वाल्मीकी ! त्यांनी आग्रह केला की धर्मसंकटांत पडावे लागेल व चित्रकूटास पोचण्यास जास्त दिवस लागतील व तेथे गेल्याशिवाय माझ्या जिवाला चैन पडणार नाही. **'राम माझ्या एक जीवींचा विसावा । शीघ्र तो भेटावा नान्य काज ॥१॥ जाऊन प्रभूला कधी भेटेन मी । सर्व दोष क्षमी विनवीन ॥२॥ एक राम माझे जाणती अंतर । पडलें अंतर ऐक्यामाजीं ॥३॥ कधीं पायांवर ठेवीन हा माथा । कधीं रघुनाथा पाहीन मी ॥४॥** (प्रज्ञा) इत्यादी प्रकारे चित्रकूटाकडे लक्ष लागले आहे.

*हिं. । रामसखा कर दीन्हें लागू । चलत देह धरि जनु अनुरागू ॥४॥*
*। नहिं पद त्रान सीस नहिं छाया । पेमु नेमु ब्रतु धरमु अमाया ॥५॥*
*। लखन राम सिय पंथ कहानी । पूँछत सखहि कहत मृदु बानी ॥६॥*
*। राम बास थल बिटप बिलोकें । उर अनुराग रहत नहिं रोकें ॥७॥*
*। देखि दसा सुर बरिसहिं फूला । भइ मृदु महि मगु मंगल मूला ॥८॥*
*म. । धृत आधारा रामसखा - कर । चालति जणुं अनुराग देहधर ॥४॥*
*। शिरिं छाया ना पायिं पायतण । प्रेमनेम - धर्म - व्रतिं कपट न ॥५॥*
*। लक्ष्मण - राम - सिता - पथ काहणि । पुसती सख्या बदति मृदु भाषणिं ॥६॥*

*। राम - वास - थळ - विटपां पाहत । उरिं अनुराग न रोधुनि राहत ॥७॥*
*। बघुनि दशा सुर वर्षति फूल । महि मृदु मार्गहि मंगलमूल ॥८॥*

**अर्थ** - रामसख्याचा गुहाचा हात आधाराला धरून असे चालत आहेत की जणू अनुरागाने देह धारण केला आहे. ॥४॥ डोक्यावर छाया नाही व पायांत पायतण (पादत्राण) नाही प्रेमाच्या नेमांत व सेवकधर्माच्या व्रतात कपट (माया) नाही ॥५॥ लक्ष्मण राम व सीता यांच्या प्रवासाची कहाणी रामसख्याला विचारीत आहेत; व ते मृदु भाषणाने सांगत आहेत. ॥६॥ रामवासाचे स्थळ (थळ) वृक्ष इ. पाहतांच अनुराग हृदयांत रोधून सुद्धा रहात नाही (बाहेर पडू लागतो) ॥७॥ (ही प्रेम) दशा पाहून देव पुष्पवृष्टी करू लागले, भूमि मृदु झाली व मार्ग मंगलमूल बनला ॥८॥

**टीका - चौ. ४-५ - (१) धृत आधारा रामसखाकर .. अनुराग देह धर - 'ये सर्वांगी स्नेह शिथिलता' (१७।१ टी.प.)** चित्रकूटास असलेल्या रामाचे व त्यांच्या जीवनाचे चिंतन सुरू होताच हातपाय गळले म्हणून गुहाचा हात धरून चालावे लागत आहे. (१९८।५ पहा). 'साक्षात् रामप्रेममूर्ति ही' 'रामस्नेहचि जणू देहधर' असे पूर्वी अयोध्यावासी लोकांनी व भरद्वाज मुनींनी म्हटले आहे. येथे जणू 'राम-अनुराग देहधर' म्हटले ही पदवी, हे नांव उत्तर कांडात रामभेटीपर्यंत पुनःपुन्हा दृष्टीस पडेल. **(क) यापूर्वी भरत रामप्रेममूर्ती नव्हते असे नाही** पण 'स्वभावे चि नर समयिं परीक्षित' (२८३।६) जनक पत्रिका आल्याचे कळल्यावर भरत दरबारांत आले व तेव्हा तेथेच त्यांचे 'रामप्रेममूर्तित्व' प्रगट झाले होते. पण तेथे स्पष्ट न म्हणता - **'पुलकति परिसुनि पत्रा भ्राते । प्रेम फार राहि न गात्रा ते' 'प्रीति पुनीत बघुनि भरताची'** (१।२९१।१-२) इतकेच म्हटले. पण विवाहानंतर बरीचवर्षे रामापासून फार दूर राहिल्याने ते प्रेम प्रगट झाले नव्हते; ते रामविरहाने बाहेर पाडले. (दो. २३८ सटीक पहा).

**(२) शिरिं छाया ना .... प्रेमनेम धर्मव्रतिं कपट न - प्रेमनेम** = प्रेमाचा नेम; 'प्रियतम चरणनेम निर्वाह' (२०५।५) याची सविस्तर टीका पहावी म्हणजे प्रेमनेम = प्रेमाचा नेम, अशी खात्री होईल. **(क) धर्मव्रत** - धर्म = सेवकधर्म, **'उचित मला जाणे की मस्तकिं । सेवक धर्म कठोर समस्तिं किं'** (२०३।७)टी. पहावी. **धर्मव्रत =** सेवकधर्माचे व्रत, जसे सत्यव्रत = सत्य हेच व्रत. प्राण गेला, वाटेल त्या आपत्ती कोसळल्या तरी सेवक धर्माचा त्याग न करणे म्हणजेच

सेवकधर्मव्रत चालविणे; म्हणून या दुसऱ्या चरणाचा अर्थ झाला तो - प्रियतमाच्या चरणांच्या प्रेमाचा नेम चालविण्यासाठी स्वीकारलेल्या सेवकधर्माच्या व्रतांत जरा सुद्धा कपट नाही. हातपाय गळले आहेत, चालण्याची ताकद नाही, अशाही स्थितीत, रथ, हत्ती, घोडे हजारो असून त्यांचा उपयोग करीत नाहीत व गुहाचा आधार घेऊन प्रेममग्न दशेत, पायांत काही नाही, डोक्यावर छाया नाही व उन्हाळा म्हणतो मी, तरी चालत जात आहेत ! हेच कपट नसल्याचे लक्षण आहे. राम असेच गेले म्हणून भरतास वाटले की रामसेवकाने असेच गेले पाहिजे. पायांना फोड कालच आलेले आहेत ! असे गेले नसते तर २०३।७ मध्ये जे म्हटले ते मायिक ठरले असते ! **(ख)** भरत हे लोकांना दाखविण्यासाठी करीत नसून त्यांचे रामप्रेम व सेवकधर्मनिष्ठा त्यांच्याकडून सहज करवीत आहेत. आम्ही रघुवीरदास, रामसेवक म्हणविणारे मात्र रामजयन्तीच्या कीर्तनास गावातच जाणे असले तरी पायांत पादत्राण घालून किंवा मोटार, सायकल इ. ने जातो आणि कीर्तन प्रवचन पारायण करताना ढसढसा रडतो; याचेच नाव कपट, माया; सेवकधर्मात देहलोभाने कुचराई, शरीरक्लेशांची भीती ! इतर सर्व मंडळी अशीच वाहनांतून जात आहेत. भरत आणि रामसखा हे दोघेच अपवाद म्हणूनच पुढे चित्रकूटास गेल्यावर गुहाला सुद्धा 'रामप्रेममूर्ति' असे वसिष्ठ म्हणणार आहेत. **गुहाचे नाव प्रल्हाद नारद बिभीषणादि परम भागवतात नसले तरी मानसांतील निषादराज भरताच्या बरोबरीचा रामभक्त आहे यांत संशय नाही.**

**चौ. ६ - (१) पथ काहणि पुसती सख्या, वदति मृदु भाषणें** - निषादराज रामाबरोबर शृंगवेरपुरापासून (दो. १०४) यमुना पार करून तापस भेट होईपर्यंत (दो. १११) होता. शृंगवेरपुरापासून प्रयागपर्यंत काही पंथकथा नाही. प्रयागातून निघाल्यापासून पंथकथांना प्रारंभ झाला आहे; व त्या पंथ कथांचे सार **'जाति यदा ते गांवावरूनी । नरनारी छबि बघति धाउनी'** (१०९।७) पासून १२४ पर्यंत वर्णिले आहे. ते तितकेच घडले असे नव्हे; ते नुसते नमुने म्हणून दिले आहेत. **(क) पथ काहणि** - इतरत्र पंथकथा म्हटले आहे - **'पंथकथा - खर आतप पवन चि'** (१।४२।४) येथे काहणी म्हटले. मानसांत काहणी म्हणजे कल्पित कथा किंवा ज्ञान, सिद्धान्त, समजुतीसाठी रूपकाच्या आधारे केलेले वर्णन; हे दोनच अर्थ आहेत. (१।१६३।६, २।२०।३; ५।५८।३ व ७।११७।१ पहा) हे दोन्ही अर्थ येथे लागू पडत नसतां व 'पंथकथा' असा प्रयोग पूर्वी केला असतां येथे

काहणी कां म्हटले? एक तर गुहाने जे जसे स्वतः = ऐकले व पाहिले ते तसेच बदल न करता सांगणे म्हणजे भरताचा विषाद वाढविणे होय; कारण त्यांत लोकांनी कैकयी व दशरथ यांस दिलेल्या दोषांचे वर्णन आहे. गाळून सांगणे म्हणजे सत्य कथा सांगणे नव्हे. एकूण सार हे आहे की प्रभूच्या प्रवासाच्या गोष्टी सांग असे भरताने सांगितले व गुहाला जशा आठवल्या तशा त्या गोष्टी त्याने सांगितल्या व भरताचा विषाद वाढणार नाही अशा तऱ्हेने सांगितल्या. यात्रा करीत असता हरिनामस्मरण करीत किंवा हरिगुणानुवाद श्रवण करीत चालत जावे ही आहे भरताची इच्छा. **प्रेमतत्वाचा अनुभव येण्यासाठीच कथाश्रवण कथन करावयाचे असते.**

**चौ. ७ - (१) रामवास थळ विटपां पाहत** - भरत व गुह अजून यमुनेपर्यंत गेले नाहीत. रामप्रवासात प्रभूंनी मधे कुठे वस्ती केल्याचा किंवा विश्रांतीसाठी थांबल्याचा उल्लेख पूर्वी केलेला नाही; असे असता कोणती वासस्थळे व वृक्ष गुहाने दाखविले? येथे वास म्हणजे थोडावेळ विश्रांतीसाठी थांबणे; पाणी पिण्यास, पायांत बोचलेला काटा काढण्यास वगैरे थांबणे असाच अर्थ घेणे जरूर आहे. त्या प्रवासवर्णनात राम फक्त एकदांच विश्रांतीसाठी थांबल्याचा उल्लेख असला तरी ४०।४५ मैलांच्या प्रवासात कुठेच थांबले नाहीत असा त्याचा अर्थ नाही. तो फक्त एक नमुना दिला आहे. **'प्रभु ज्या तरुतळिं जाउनि बसती । तया कल्पतरु महान म्हणती'** (११३।७) यावरून ठरते की प्रभु अनेक वृक्षांच्याखाली बसले होते. व **'गावोगावी असा आनंद'** (२।१२२।१) या वचनाधारे स्पष्ट ठरले आहे की प्रत्येक गावी त्याच त्याच गोष्टी घडल्या; म्हणून शंकेला जागा नाही. गुहाने कपोलकल्पित गप्पा झोकून दिल्या असे म्हणण्यास जागा नाही. जेथे राम जरा थांबले, कुठे पाणी पिण्यासाठी बसले, सीतेच्या पायांतील व स्वतःच्या पायांतील काटा काढण्यासाठी बसले; गांवच्या लोकांच्या प्रेमाला वश होऊन थांबले, सीता मागे राहिली म्हणून उभे राहिले इ. सर्व स्थाने व झाडे गुहाने त्या त्या गोष्टी सांगून दाखविली. **(क) उरिं अनुराग, न रोधुनि राहत** - अश्रु, रोमांच, कंठावरोध, स्नेह, कंप इ. सात्विक भाव त्या त्या ठिकाणी प्रगट होऊ लागले. त्या जागेला, वृक्षाला साष्टांग नमस्कार घालावा, तेथील धूळ मस्तकावर ठेऊन डोळ्यांना व हृदयाला लावावी, प्रदक्षिणा घालावी व पुन्हा नमस्कार करावा; कधी तटस्थ होऊन बाजूला बसावे, राम, रामसीता, लक्ष्मण

असे सद्गदित होऊन म्हणावे असा क्रम सुरू झाला. **'कण्ठावरोधरोमाञ्चाश्रुभिः परस्परं लपमानाः पावयन्ति कुलानि पृथिवींच' (ना.भ. ६८)** याची सत्यता येथे पुन्हा दिसली. **'अभिमान दम्भादिकं त्याज्यम्' (ना.भ. ६४)** याची सत्यता २०३।७ व 'कपट न' यानी दिसली. **'प्रकाशते कापि पात्रे' (ना.भ. ५३)** एवढ्या सर्व लाखो मंडळीत फक्त भरताच्या ठिकाणी पराप्रेमभक्ति प्रगट दिसत आहे आणि आम्हाला वाटते आम्ही मोठे रामभक्त झालो !

**चौ. ८ - (१) बघुनि दशा सुर वर्षति फूल - मंगलमूल - मोदन्ते पितरो नृत्यन्ति देवताः सनाथाचेयं भूर्भवति' (ना.भ. ७१)** पितरांना आनंद होतो, देव नाचू लागतात व ही भूमि सनाथ होते. येथे देव नुसते नाचले नाहीत तर पुष्पवृष्टी केली, आपण सनाथ झाल्याचे भूमि प्रत्यक्ष कृतीनेच दाखवीत आहे; मृदु झाली. सूत्रांतील क्रमच येथे आहे. देव व भूमि यांना आनंद झाल्यावर पितरांना होणारच. देवांनी इतकी पुष्पवृष्टी केली की पायांखालची जमीन मऊ झाली; व भूमीने मार्गावरील आपल्या पृष्ठभागी असलेल्या काटे, खडे, दगड इ. कठोर, दुःसह वस्तू नाहीशा केल्या. सर्व मार्गच असा मंगलरूप होत चालला. एका दिवसाच्या प्रवासानेच पायांना फोड आले ! अजून तर पुष्कळ चालावयाचे आहे ! याची काळजी देवांना व भूमीला वाटली. प्रभु याच मार्गाने सीतेसह चालत आले व एका दिवसांत ४५ मैलांचा प्रवास केला तरी या गोष्टी घडल्या नाहीत. भरत तर १०-१२ मैलांवरच मुक्काम करणार आहेत ! 'रामदास रामाहुनि मोठे' हे पुन्हा यथार्थ झाले. मार्ग मंगलमूल कसा झाला ते आता दाखवितात -

***हिं. दो.*** *। किएँ जाहिं छाया जलद सुखद बहइ बर बात ॥*
*। तस मगु भयउ न राम कहँ जस भा भरतहि जात ॥२१६॥*

***हिं.*** *। जड चेतन मग जीव घनेरे । जे चितए प्रभु जिन्ह प्रभु हेरे ॥१॥*
*। ते सब भए परम पद जोगू । भरत दरस मेटा भव रोगू ॥२॥*
*। यह बडि बात भरत कइ नाहीं । सुमिरत जिन्हहि रामु मन माहीं ॥३॥*
*। बारक राम कहत जग जेऊ । होत तरन तारन नर तेऊ ॥४॥*
*। भरतु राम प्रिय पुनि लघु भ्राता । कस न होई मगु मंगलदाता ॥५॥*
*। सिद्ध साधु मुनिबर अस कहहीं । भरतहि निरखि हरषु हियँ लहहीं ॥६॥*

***म. दो.*** *। करित जाति छाया जलद सुखद वहत वर वात ॥*
*॥ पथ न होइ रामा तसा जैसा भरता जात ॥२१६॥*

म. *। पथिं जड चेतन जिव बहु नाना । ज्यां बघती प्रभु दिसले ज्यांना ॥१॥*
*। ते सब परम पदा अधिकारी । भरत बघत गत भवरुज भारी ॥२॥*
*। ही महती भरता बहु नाहीं । राम मनीं स्मरती ज्यांना ही ॥३॥*
*। राम जगीं एकदां हि वदती । तेहि तरुन नर तारक बनती ॥४॥*
*। रामप्रिय लघु बंधूस भरतां । कां न बने पथ मंगलदाता ॥५॥*
*। सिद्ध साधु मुनिवर अस म्हणती । भरता निरखुनि हृदिं मुद भरती ॥६॥*

**अर्थ** - सजल मेघ (जलद) छाया करीत जाऊ लागले; व सुखदायक (शीतलमंद सुगंधि) सुंदर वारा वाहू लागला; जात असतां भरतास मार्ग जसा (मंगलमूल, सुखदाता) होत आहे तसा राम (स्वतः) जात असता त्यांना झाला नाही ॥दो. २१६॥ मार्गात (आजूबाजूस) असणारे पुष्कळ व नाना प्रकारचे जड व चेतन जीव आहेत व ज्यांना प्रभूंनी पाहिले किंवा प्रभू ज्यांना दिसले ॥१॥ ते सर्व (त्या वेळीच) परम पदाचे (मोक्षाचे) अधिकारी (मोक्षाला योग्य - जोगे, जोगू) झाले; व (आता) भरतानी त्यास पाहतांच किंवा भरत त्यांच्या दृष्टीस पडतांच त्यांचा मोठा भवरोगच नष्ट झाला. (भक्ती प्राप्त झाली.) ॥२॥ पण यांत भरतांचे मोठे महत्त्व आहे असे नाही; कारण त्यांचे स्मरण राम (स्वतः) आपल्या मनांत करीत असतात. ॥३॥ जे एकदाच 'राम' म्हणतात तेसुद्धा स्वतः (भवसागर) तरून इतरांस तारक होतात. ॥४॥ भरत तर रामचंद्रांना प्रिय आणि त्यांचे धाकटे भाऊ, मग त्यांना मार्ग (असा) मंगलदाता का होणार नाही? ॥५॥ असे सिद्ध, साधु व मुनिंवर म्हणू लागले व भरतांस निरखून पाहून ते आपले हृदय आनंदाने भरू लागले ॥६॥

**टीका. - दो.** (१) मागल्या चौपाईत सांगितले की मार्ग मंगलमूल झाला; व कसा मंगलमूल झाला हे सांगताना येथे म्हटले की 'सुखद वहत वर वात'. म्हणून मंगल = सुख व सुख = मंगल. या सुखद शब्दांचा अर्थ असा नव्हे की यामुळे भरतास सुख झाले व त्याचे दुःख कमी झाले. भरतांस शरीराच्या सुखदुःखाचे भानच नाही; तसे असते तर पायांना फोड आल्यानंतर २।४ दिवस सतत चालता येणेच शक्य नाही. रामदर्शन - लालसेने रामप्रेमांत मग्न होऊन चालत जात असलेल्या भरतांस बाह्यसुखदुःखाचे भान न राहिले तर मोठे आश्चर्य नाही. जनकपुरीतील सर्व लोक सुद्धा देहाचे सुखदुःख विसरूनच येतात - **'रामदर्शनोत्साह - लालसें । कुणा पथश्रम कष्ट लव नसे ॥ मन तिथ जिथ रघुवर**

**वैदेही । विणमन तन सुख दुःख कसेही ॥** (२।२७५।३-४) बारशाच्या दिवशी त्या बालकाच्या अंगावर जे अलंकार व वस्त्रे घालतात त्यांनी जर त्याला सुख होत असेल तर भरताला या सुखद परिस्थितीने सुख झाले असे म्हणावे. ते अलंकार व वस्त्रे जे कोणी घालतात ते त्या बालकावरील प्रेमामुळे किंवा त्या बालकांच्या आईबापांवरील प्रेमामुळे घालतात. तसे भरतासारख्या अलौकिक रामभक्ताची सेवा केल्याचे समाधान स्वतःस मिळावे किंवा लोकांनी बरे म्हणावे, किंवा रामकृपा व्हावी म्हणून केले. भरत रामतीर्थ यात्रा करीत असतां मही, मेघ, वायू इत्यादिकांनी त्यांचा मार्ग असाच सुखद केला आहे. तेथे शेवटी स्पष्ट उल्लेख आहे की **'सेविति सब रामप्रिय जाणुनि'** (३११।४-८ पहा) 'रामप्रिय व रामलघुबंधु' हेच कारण येथे पुढे दाखविले आहे यापेक्षा अधिक चर्चा अनावश्यक वाटते; **'सेवक-सेवें राम सुखावति'** (२१९।२) हे आहे खरे मर्म. **(क)** या दोह्यात व पुढील दोन चौपायांत दाखविले आहे की रामापेक्षा भरत श्रेष्ठ ! हे खरेच आहे. ज्ञानाची व भक्तीची प्राप्ती मुख्यतः **'महत्कृपया एव'** होते असे नारद भक्तीसूत्रही म्हणतेच.

**चौ. १ - २ - (१) पथि जडचेतन ... परमपदा अधिकारी** - रामदर्शनाचा पूर्वी काय परिणाम झाला तो त्या वर्णनांत न सांगता येथे भरताचे श्रेष्ठत्व दाखविण्यासाठी सांगितला. **जड** = पाषाण, मृत्तिका काष्ठादि व चेतनांत दोन प्रकार आहेत चर व अचर. १३९।१-२ ची टीका पहावी. **परमपदाचे अधिकारी** = ज्ञानी झाले. ज्ञानाने मोक्ष = परमपद मिळते; पण मोक्षसुख हरिभक्तीवाचून टिकत नाही असा मानसांतील सिद्धान्त आहे व रामभक्ती सहसा संतकृपेवाचून मिळत नाही; म्हणून म्हणतात **(क) भरत बघत गत भवरुज भारी** - भरत त्यांच्या दृष्टीस पडतांच किंवा भरतांची दृष्टी त्यांच्यावर पडतांच ते सर्व जीव भक्तिमान झाले व भवरोग समूळ नष्ट झाला. हा भक्ताचा महिमा सांगितला - अधिक विस्तार अनावश्यक.

**चौ. ३-६ - (१)** सिद्ध साधु मुनिवर काय म्हणतात ते 'ही महती भरता बहु नाही' पासून तीन चौपायांत सांगितले आहे. **(क) का न बने पथ मंगल दाता** - भरत रामप्रिय आणि रामलघुबंधु आहेत हेच मार्ग मंगलदायक, सुखदायक होण्याचे कारण आहे; व **'सेवक सेवें राम सुखावति'** (२१९।२) हा त्यांत हेतु आहे.

हिं. *। देखि प्रभाउ सुरेसहि सोचू । जगु भल भलेहि पोच कहुँ पोचू ॥७॥*
*। गुर सन कहेउ करिअ प्रभु सोई । रामहि भरतहि भेट न होई ॥८॥*

दो. *। रामु सँकोची प्रेम बस भरत सुपेम पयोधि ॥*
*॥ बनी बात बेगरन चहति करिअ जतनु छलु सोधि ॥२१७॥*

म. *। महिमा बघुनि सुरेशा शोच हि । भल्या भलें जग नीचा नीच हि ॥७॥*
*। गुरुस म्हणे करणें प्रभु तैसें । राम भरत भेटति ना जैसै ॥८॥*

दो. *। प्रभु संकोची प्रेमवश प्रेम पयोनिधिं भाइ ॥*
*॥ छल शोधुनि यत्ना करा सर्व साधलें जाइ ॥२१७॥*

**अर्थ** - भरताचा महिमा (प्रभाव) पाहून सुरेशाला चिंता पडली ! सज्जनाला जग सज्जन वाटते व नीचाला जग नीच वाटते.॥७॥ (तेव्हा इंद्र) गुरुला म्हणाला की प्रभू ! जेणे करून राम - भरत - भेटच होणार नाही असे करावे ॥८॥ (कारण) प्रभु संकोची (भिडस्त स्वभावाचे) व प्रेमाला वश होणारे आहेत व रामबंधु भरत तर प्रेमाचा सागरच (क्षीरसागरच) आहे; म्हणून काही तरी कपटयुक्ती (छल)साधून यत्न (उपाय) करावा. नाहीतर (आतापर्यंत) साधलेले सर्व (फुकट) जाणार ॥ दो. २१७॥

**टीका चौ. ७-८** - (१) भरताचे अलौकिक प्रेम व त्याचा प्रभाव पाहून सिद्धसाधू मुनिवरांना आनंद झाला; पण तोच प्रेमाचा प्रभाव पाहून सर्व देवांचा ईश जो इंद्र तो चिंतातूर झाला ! यावर कवि एक सुभाषित सांगतात. **(क) भल्या भले जग नीचा नीचहि** - ते सिद्ध साधु मुनिवर सज्जन होते म्हणून त्यांस भरताचे प्रेम चांगले, आनंददायक वाटले पण तेच इंद्राला दुःखदायक वाटले; म्हणजे इंद्राला नीच ठरवला व हेतु सुचविला - **'उच्च निवास नीच कर्तूती । शकति न पाहु परावि विभूती ॥ (२।१२।६)** असे सरस्वती सर्व देवांविषयी म्हणालीच आहे. सुरेशाला धास्ती पडली की रामभरत भेट झाली की राम अयोध्येत परत जाणार ! (कारण) -

**दो. - (१) प्रभु संकोची प्रेमवश** - राम संकोची = भिडस्त स्वभावाचे आहेत हे पूर्वी अनेकवेळा सांगितले व दिसले आहे व पुढेही दिसेलच. सुरेशाला रामाचा भिडस्त स्वभाव तेवढा आठवला व दिसला, पण भरताचा नाही दिसला. **'पुसले स्नेहे अति संकोचुन'** (१।२००।८) **'जणुसंकोच गृहीं घुसु बघती'** (२०६।६), २।२६ **पहा.** रामसंकोचाचे वर्णन पुढे २६४।७; २७०।३ २९०।७; ३१३।४; यांत पहावे.

**'डाव जुगाऱ्या अपला दिसतो'** हेच खरे ! येथे भरताला प्रेमपयोधि, प्रेमपयोनिधि, म्हटले हे नीट लक्षांत ठेवावे. या प्रेमपयोनिधीत रामप्रेमामृत भरलेले आहे व ते प्रगट होत आहे हे पाहून सुरेश घाबरला. इंद्राच्या म्हणण्याचा भाव हा की भिडस्त स्वभावामुळे राम भरताच्या प्रेमाला वश होऊन त्याच्या सांगण्याप्रमाणे अयोध्येत परत जातील; म्हणजेच रामवनवास घडविण्यासाठी तुम्ही आम्ही जी खटपट केली ती फुकट जाणार व रावणाचा वध करण्यास काही उपायच उरणार नाही ! प्रभूंनी चित्रकूटास आल्यावर इंद्रादि देवांना जे आश्वासन दिले त्यावरसुद्धा सुरेशाचा विश्वास नाही ! म्हणून सांगतात की कपटयुक्ती काहीतरी योजा; भरत रामविरोधी किंवा निदान राज्यलोभी होऊन रामास न भेटतांच परत जाईल असा भेद त्याच्या बुद्धीत निर्माण करा.

*हिं.* ***। बचन सुनत सुरगुरु मुसुकाने । सहसनयन बिनु लोचन जाने ॥१॥***
***। मायापति सेवक सन माया । करइ त उलटि परइ सुरराया ॥२॥***
***। तब किछु कीन्ह राम रुख जानी । अब कुचालि करि होइहि हानी ॥३॥***
***। सुनु सुरेश रघुनाथ सुभाऊ । निज अपराध रिसाहिं न काऊ ॥४॥***

*म.* ***। सस्मित सुरगुरु परिसुनि वचना । गणिति अलोचन सहस्त्रनयना ॥१॥***
***। मायापति - सेवकासि माया । करत उलटते ती सुरराया ॥२॥***
***। तैं कृत काहिं रामरुचि बघुनी । हानि आतां कीं कुचाळि करुनी ॥३॥***
***। श्रुणु सुरेश रघुपती - स्वभावहि । निज अपराधें क्रोध कदा नहिं ॥४॥***

**अर्थ** - सुरेशाचे म्हणणे ऐकून सुरगुरुंनी स्मित केले व त्यांना वाटले की त्याला हजार नेत्र असून नेत्रविहीन (आंधळा) आहे ! ॥१॥ (ते म्हणाले) सुरराजा ! मायापतिसेवकाशी माया - (कपटाचा प्रयोग) केल्यास ती करणारांवर उलटते ॥२॥ त्यावेळी जे काही केले ते रामाची रुचि (इच्छा) पाहून - जाणून केले. आता कुचाळी केली तर (तुमचीच) हानी होईल ॥३॥ (कारण) सुरेशा ऐक ! रघुपतीचा (रघुनाथाचा) असा स्वभाव आहे की त्यांचा स्वतःचा अपराध केल्याने त्यांना कधी क्रोध येत नाही. ॥४४॥ (पण) -

**टीका - चौ. १ - (१) सस्मित सुरगुरु... सहस्रनयना** - हे हास्य आश्चर्य अनादर व तिरस्कार सूचक आहे. मनात म्हणाले की हजार डोळे असून आंधळा रे आंधळा ! भरताचा प्रभाव दृश्य लोचन नसलेल्या वृक्षलतांनासुद्धा कळतो व ते स्थावर जीव भरताची सेवा करतात ! (३११।७ पहा) आणि हा हजार

नेत्रवाला सुरेश असून भरतविरोध करू पाहतो ! माझ्याजवळ म्हणाला म्हणून ठीक, दुसऱ्या कोणाजवळ बोलला असता तर तोंडात शेण कोंबले गेले असते! हे पुढे (२९५।४) घडतच आहे. **(क)** शिष्य स्वार्थांध झाला तरी गुरूने क्रोधांध किंवा अविवेकांध न होता शिष्याच्या हिताचा सरळ मार्ग सांगणे गुरूचे कर्तव्य जाणून आतां सिद्धान्त सांगतात.

**चौ. २ - (१) मायापति - सेवकासि माया .... सुरराया - मायापति** = मायेचे स्वामी. प्रभूची मायासुद्धा प्रभूच्या इच्छेविरुद्ध काही करू शकत नाही. प्रभूच्या मायेला शिव चतुरानन सुद्धा घाबरतात. **'शिवचतुरान न डरती जीतें । काय इतर जीवां गणती ते !'** (७।७१।८) अशी जी प्रबल माया ती भक्तीला घाबरते व काही करू शकत नाही. **'सानुकूल भक्तीस रघुराया । म्हणून घाबरे तिज अति माया'** (७।११६।५). मग तुमच्या आमच्या मायेला थप्पड खावी लागेल यांत नवल काय? आपली माया उलट आपल्यावरच उलटेल !

**चौ. ३ - (१) तैं कृत काहिं रामरुचिं बधुनीं** - तैं = तेव्हा = रामास वनवासास पाठविण्याच्या वेळी कैकयीसारख्या रामभक्त स्त्रीची बुद्धी फिरविली. (दो. १६ पहा) **'सुर-मायावश, वैरिणिसि सुहृद प्रतीती मानि'** तेंसुद्धा रामाची इच्छा नसती तर यशस्वी झाले नसते व आपल्यावरच उलटले असते. या **एका चरणांने रामायणाचे सर्व कोडे उलगडले आहे.** येथे स्पष्ट दाखविले की **रामवनवास सुद्धा रामाच्या इच्छेनेच घडला.** मग कोणाला त्याबद्दल दोष द्यावा हे वाचकांनी ठरवावे. **'आले देवाजीच्या मना । तेथें कोणाचें चाले ना' (क) ही पहा त्यावेळी रामाची इच्छा - 'राम असे मनिं विस्मित झाले ॥ - एक विमल कुळी अनुचित हें किति । त्यजुनि बंधु मोठ्या अभिषेकिति ॥** (२।१०।४-७ **पहा)** आता भरताला भेटण्याची प्रभूंचीच इच्छा आहे, व भरताचीही सहज प्रबळ इच्छा आहे रामाला भेटण्याची. आता भरताविरुद्ध काही केले तर तो भक्तापराध ठरेल. त्यावेळी केला तो मुख्यतः रामापराध केला, व तो तसा केला जावा अशी प्रभूंचीच इच्छा होती.

**चौ. ४ - (१) श्रुणु सुरेश रघुपती स्वभावहि** - तुम्ही सुरांचे ईश आहांत हे खरे, पण रघुपतीच्या इच्छेविरुद्ध तुम्हाला किंवा मला काही करतांच येणार नाही. नाहीतर वसिष्ठ काय असमर्थ होते? भगवंतांचा अपराध केला गेला तरी त्याबद्दल प्रभूला काहीच वाटत नाही; मुळीच क्रोध येत नाही. याची अनेक

उदाहरणे मानसातच आहेत. भृगुपतींनी वाटेल तेवढा अपमान केला तरी मुळीच क्रोध नाही; पण विश्वामित्रांसारख्या भक्ताचा अपराध करणाऱ्यांचा निर्वंश केला. शूर्पणखा कपटाने फसवू पहात होती तरी तिच्याशी विनोदच करीत राहिले. पण सीतेच्या अंगावर धाऊन जात आहे असे दिसतांच दंड केला, इत्यादी पुष्कळ उदाहरणे आहेत.

*हिं.* *। जो अपराध भगत कर करई । राम रोष पावक सो जरई ॥५॥*
*। लोकहुँ बेद बिदित इतिहासा । यह महिमा जानहिं दुरबासा ॥६॥*
*। भरत सरिस को राम सनेही । जगु जप राम रामु जप जेही ॥७॥*

*दो.* *। मनहुँ न आनिअ अमरपति रघुबर भगत अकाजु ॥*
*॥ अजसु लोक परलोक दुख दिन दिन सोक समाजु ॥२१८॥*

*म.* *। भक्तांच्या अपराधा करती । राम-रोष-पावकिं ते जळती ॥५॥*
*। लोकीं वेदिं विदित इतिहास । हा महिमा जाणति दुर्वास ॥६॥*
*। कोण भरत-सम रामस्नेही । जग जपि राम, राम जपि ज्याही ॥७॥*

*दो.* *। मनिंहि न आणा अमरपति रघुवर-भक्त-अकाज ॥*
*। अयश लोकिं परलोकिं अक शोका दिन दिन माज ॥२१८॥*

**अर्थ** - जे भक्तांचे अपराध करतात ते रामाच्या शोकरूपी पावकात जळतात ॥५॥ लोकांमध्ये व वेदांमध्ये हा इतिहास प्रसिद्ध आहे व हा महिमा दुर्वास ऋषींना (चांगला) माहीत आहे. ॥६॥ भरतासारखा रामस्नेही (रामभक्त) कोणी आहे का? की जग 'राम' या नावाचा जप करते पण राम ज्यांच्या नावाचा जप करतात? ॥७॥ (सातच चौपाया आहेत) ॥७॥ अमरपति ! रघुवरभक्ताचे अकार्य (अकल्याण) करण्याचे (कधी) मनांतसुद्धा आणू नका. (तसे कराल तर) सर्व लोकांत अकीर्ती व परलोकांत (सुद्धा) दुःखच भोगावे लागेल. व दिवसेंदिवस शोकाची वृद्धीच होत जाईल. ॥दो. २१८॥

**चौ. ६ - (१) लोकीं वेदिं विदित इतिहास** - भक्तापराध्यास भयंकर शिक्षा भोगावी लागते या विषयीचा इतिहास लोकांना माहीत आहे व वेदांमध्येही वर्णिला आहे. प्रल्हादाला जाळणारी **होलिका - धुंडी** स्वतः अग्निभयापासून मुक्त असूनसुद्धा भगवंताच्या रोषामुळे अग्नीतच जळली व प्रल्हादाला काहीच इजा झाली नाही. हिरण्यकश्यपूने हजारो अत्याचार केले, देवांनी पुष्कळ विनवण्या केल्या तरी काही केले नाही; पण प्रल्हादाला ठार मारण्यास सिद्ध होताच रत्नांच्या खांबातून

प्रगट झाले; व रोष तर एवढा आला होता की लक्ष्मी किंवा ब्रह्मदेवसुद्धा जवळ जाण्यास धजले नाहीत.

## (२) हा महिमा जाणति दुर्वास

(१) दुर्वास ऋषी हे अत्रि - अनसूया - पुत्र. रुद्राचे अंश. अत्यंत क्रोधी आहेत. यांनी अनेकांना शाप दिले आहेत. हरिभक्तांची परीक्षा घेऊन त्यांचा छळ करणे हा त्यांचा स्वभावच होता. त्याप्रमाणे ते एकदा अंबरीष राजाकडे गेले. तो परम वैष्णव होता व साधन द्वादशीचे व्रत मोठ्या निष्ठेने करीत असे. ऋषींच्या बरोबर त्यांचे बरेच शिष्यही होते, भक्तराज अंबरीषाने त्या सर्वांना आमंत्रण दिले व लवकर येण्याची विनंती केली. स्नान करून येतो म्हणून सांगून गेले ते द्वादशीची वेळ उलटून गेली तरी आले नाहीत. त्या दिवशी द्वादशी फक्त दोन घटका होती. द्वादशी संपण्याच्या आत पारणा करणे हे त्या व्रतातील एक मुख्य अंग आहे. इकडे राजा धर्मसंकटांत पडला. पारणा न करावी तर व्रतभंग होतो; भोजन करावे तर अतिथींचा ऋषींचा अपमान होतो; त्यामुळे मोठी चिंता पडली. तेव्हा पुरोहितांनी सांगितले की तुम्ही पूजेतील भगवच्चरणामृत (तीर्थ) प्राशन करा म्हणजे दोन्ही साधतील. व्रतभंगही होणार नाही व भोजन केले असेही ठरणार नाही. 'अशन न जलपाने होय पीतांच पाणी ।। अनशनहि नव्हे की स्पष्ट ही वेदवाणी' (अंबरीषाख्यान). त्या प्रमाणे राजाने केले. नंतर दुर्वास ऋषी आले. त्यांनी जाणले की राजाने पारणा केली (उपास सोडला) जाणून बुजून आपला अपमान केला असे समजून, ते अति संतप्त झाले व राजाला भस्म करण्यासाठी क्रोधाने जटा जमिनीवर आपटली. '।। झाली घोरा त्या जटेचीच कृत्या । धावे पाहे खावया विष्णुभृत्या।।' भगवंताचे सुदर्शन चक्र अंबरीषाच्या रक्षणास हजर होतेच; पण राजा ऋषींकडे तोंड करून निश्चिंतपणे हात जोडून उभा होता. चक्राने त्या कृत्येचेच भस्म केले व ते दुर्वासांच्या अंगावर धावले. दुर्वास आश्रयासाठी धावपळ करीत ब्रह्मा, शिव इत्यादींकडे गेले पण त्यांची दशा मानसांतील सुरपति सुतासारखी (जयन्त) झाली. एक वर्षभर अशी धावपळ चालली; शेवटी ऋषी वैकुण्ठास जाऊन भगवंतास शरण गेले; पण त्यांनी सांगितले की मी भक्तपराधीन आहे, मला यांत काही करता येण्यासारखे नाही; तुम्ही त्या माझ्या भक्तालाच शरण जा; तोच तुमचे रक्षण करील. तेव्हा तपाचा अहंकार जिरला व अंबरीषाला शरण गेले. राजाने

विष्णुचक्राला प्रार्थना केली. या सर्व काळात राजाने भोजन केले नाही. **बोलावलेल्या अतिथीला भोजन घातल्याशिवाय जेवणे हा अधर्म आहे.** भक्ताच्या प्रार्थनेने चक्राचे तेज शांत झाले व दुर्वास ऋषी वाचले. नंतर सर्वांनी भोजन केले.

II हा इतिहास हल्ली ज्याला 'बारशी' शहर म्हणतात तेथे घडला. दुर्वास जेथे स्नानाला गेले होते तेथे उत्तरेश्वर नावाचे सुंदर शिवालय व मोठा जलाशय आहे. भगवान प्रगट होऊन जेथे अंबरीषास दर्शन दिले तेथे **'भगवंताचे'** मंदिर आहे, म्हणून **भगवंताची बारशी** असे या शहरास म्हणतात. बारस = द्वादशी, (वसुबारस शब्द रूढ आहेच) म्हणून बारशी हे नाव पडले; जुने शहर मंदिराच्या व हल्लीच्या शहराच्या पश्चिमेस परांडा-सडकेच्या बाजूला हल्लीच्या शहराच्या बाहेर पडल्यावर डाव्या हाताला होते असे तेथील अनेक चिन्हांवरून खात्रीपूर्वक वाटते. पैठण (प्रतिष्ठान) प्रमाणेच हे अति पुरातन क्षेत्र आहे. **उत्खनन केल्यास काही पूर्वेतिहास हाती लागण्याचा संभव आहे असे मंद बुद्धीला प्रत्यक्ष अवलोकनानंतर वाटले.**

(३) येथे दिलेले हे उदाहरण सर्वांसच बहुधा माहीत आहे म्हणून दिले हे एक कारण आहेच; पण ब्राह्मण, ऋषि, रुद्राचे अयोनिसंभव अवतार, सुदर्शन चक्राच्या पुढे एक वर्षपर्यंत सतत धावपळ करण्याचे सामर्थ्य, व वैकुण्ठापर्यंत वाटेल त्या लोकांत सदेह जाणारे-येणारे असे सर्व प्रकारचे अलौकिक महापुरुष असून भक्तपराधाबद्दल त्यांना जी शिक्षा भोगावी लागली तशी कोणासही भोगावी लागली नसेल; हे दुसरे कारण आहे. इतके झाले तरी द्वापर युगांत पांडवांवर संक्रांत आणलीच होती ! **भक्तमहिमा वाढविण्यासाठी भगवानच अशांना अशी बुद्धि देतात ! 'प्रेरक हृदिं रघुवंश विभूषण'** म्हणून अशा महापुरुषांना वाईट म्हणतील व निंदा करतील ते घोर पापी ठरतील. अगस्ति, दुर्वास वगैरे सर्व **कारणमहापुरुष होत. (क)** यावर सुरेश म्हणेल कदाचित की अंबरीष परम भागवत होता म्हणून तसे घडले म्हणून विचारतात.

**चौ. ७ - (१) कोण भरतसम रामस्नेही ?** असा कोण भगवद्भक्त आहे किंवा झाला की ज्याच्या नावाचा जप भगवान स्वतः करतात ? सर्व जग भगवंताच्या नावाचा जप करते पण राम भरताच्या नावाचा जप करतात ! यापेक्षा भरत सर्वोत्कृष्ट भक्त असल्याचा आणखी कोणता पुरावा पाहिजे ? **'रामा निशिदिन बंधु-सुचिंता । जशि अंडांची कासविचित्ता'** (२।७।८) हा वरील

विधानाला मानसांतीलच पुरावा आहे.

(४) **या दोह्याच्या अंगभूत सातच चौपाया आहेत; एक कमी का ? एक चौपाई का गाळली, टाळली ?** सुरेश-गुरु सुचवितात सुरेशास की तुम्ही आपल्या **सप्तविध** सुखसोयींसाठी बाकी वाटेल ते करा पण **एकच गोष्ट अगदी टाळा. ती म्हणजे 'रघुवरभक्त अकाज'.** बाकी सगळ्या पापांची व अपराधांची शिक्षा देणारे निरनिराळे अधिकारी आहेत. पण रघुवरभक्तापराध करणारास भगवान स्वतः शिक्षा करतात किंवा आपल्या मायेकडून करवितात; व मग तो शरण गेला तरी भगवान क्षमा करीत नाहीत, थोडीतरी शिक्षा करतातच; म्हणून सुरेश ! एवढी एक गोष्ट गाळून बाकी वाटेल ते करा; नाहीतर सप्त स्वर्गाचासुद्धा विनाश होण्यास वेळ लागणार नाही.

**दो. (१) मनिंहि न आणा अमरपति** - चौपायांत भरतांविषयी सांगितले. आता सामान्य नियम सांगतात. **अमरपतीने जर हा नियम पाळणे अत्यंत आवश्यक आहे तर आम्ही माणसांनी तर या बाबतीत फारच सावध राहिले पाहिजे. (क) मनिंहि न आणा** - हरिभक्ताचे अकल्याण करण्याचे नुसते मनात आणणेसुद्धा अनर्थाचे मूळ आहे. तेवढ्याने सुद्धा नाना संकटे कोसळतील, दिवसेंदिवस शोक माजत जाईल. अधिकाधिक शोक करण्याची पाळी येईल. इतके बजावून सांगितले तरी ही दुर्बुद्धि सुरेशाला पुन्हा झालीच आहे !

***हिं. । सुनु सुरेस उपदेसु हमारा । रामहि सेवकु परम पिआरा ॥१॥***
***। मानत सुखु सेवक सेवकाई । सेवक बैर बैरु अधिकाई ॥२॥***
***। जद्यपि सम नहिं राग न रोषू । गहहिं न पाप पूनु गुन दोषू ॥३॥***
***। करम प्रधान बिस्व करि राखा । जो जस करइ सो तस फलु चाखा ॥४॥***
***। तदपि करहिं सम बिषम बिहारा । भगत अभगत हृदय अनुसारा ॥५॥***

***म. । श्रुणु सुरेश मम उपदेशाला । परम-प्रिय सेवक रामाला ॥१॥***
***। सेवक-सेवें राम सुखावति । सेवक वैरें वैर करिति अति ॥२॥***
***। यदपि सामान हि राग रोष ना । पाप पुण्य गुण दोष घेत ना ॥३॥***
***। कर्म-प्रधान विश्वा राखित । जो करि जसें तसें फळ चाखित ॥४॥***
***। तदपि करिति सम विषम विहारा । भक्त - अभक्त - हृदय - अनुसारां ॥५॥***

**अर्थ** - सुरेश ! आमचा उपदेश ऐक - रामाला आपला सेवक परम प्रिय वाटतो.॥१॥ रामसेवकाची सेवा केल्याने राम सुखी होतात (सुख मानतात)

आणि रामसेवकाशी वैर केले तर राम अधिक (अति) वैर करतात.॥२॥ जरी प्रभु सर्वांशी समान (सम) च असतात; त्यांच्या ठिकाणी राग = आसक्ति व रोष (द्वेष, क्रोध) नाही; ते कोणाचे पाप पुण्य वा गुणदोष घेत नाहीत.॥३॥ (कारण) त्यांनी या विश्वाला कर्मप्रधान करून ठेवले आहे व जो जसे कर्म करतो तसे फळ चाखीत असतो.॥४॥ तरीसुद्धा ते भक्त किंवा अभक्त यांच्या हृदयांनुसार (हृदयांतील भावनांप्रमाणे) सम विषम विहार (लीला) करीत असतात; (भक्तांवर प्रेम करतात, भक्त शत्रूंवर क्रोध करतात.)॥५॥

**टीका. चौ. १-२ (१) परमप्रिय सेवक रामाला** - सेवक कसा असतो व कोणाला रामसेवक म्हणावे हे भरतचरित्राने इतके उत्तम प्रकारे दाखविले आहे की आणखी उतारे देण्याची आवश्यकता नाही. लक्ष्मण, भरत, शत्रुघ्न, निषादराज, सुतीक्ष्ण, हनुमान, अंगद इ. उत्तम सेवकांची उदाहरणे आहेत. **'सर्वा प्रिय सेवक ही नीती । दासावरि मम अधिका प्रीती'** असे रामच म्हणाले आहेत. **'श्री रघुपतीला प्रिय कोण ? हे प्रकरण प्रस्तावना पृ. ५४६ पहा. (क) सेवक - सेवें राम सुखावति -** रामाला परमप्रिय असणाऱ्या सेवकाची, दासभक्ताची सेवा केल्याने राम जितके प्रसन्न होतात तितके ते त्यांची सेवा केल्याने होत नाहीत. व रामचंद्राशी वैर केले तरी ते त्याच्याशी वैर करीत नाहीत पण रामप्रिय सेवकाशी वैर केले, त्याचे अकल्याण करण्याचे नुसते मनात आणले तरी प्रभु त्याच्याशी विशेष वैर करतात. यावर शंका घेतली जाईल की असे असेल तर भगवंताच्या ठिकाणी रागद्वेष, वैषम्य, नैर्घृण्य (विषमता व निर्दयपणा) इत्यादी आहेत असे म्हणावे लागेल. या शंकेचा निरास पुढील तीन चौपायांत करतात :

**चौ. ३ (१) यदपि समान हि रागरोष ना... घेत ना** - 'नाऽऽदत्ते कस्यचित्पापं न चैव सुकृते विभुः ॥ अज्ञानेनाऽऽवृतं ज्ञानं तेन मुह्यन्ति जन्तवः' (भ.गी. ५।१५). निर्गुण ब्रह्म 'निर्दोष हि समं' आहे व ते निष्क्रिय आहे; म्हणून त्याचा येथे संबंध नाही; व सगुण ब्रह्म, ईश्वर क्लेशकर्मविपाकादिकांपासून सदा पूर्ण अलिप्त असल्याने त्याच्या ठिकाणी रागद्वेषांचे अस्तित्व नाही. इतरांना तसे दिसले तरी प्रभूच्या ठिकाणी नाहीत. सूर्य उगवला म्हणजे कमले व चक्रवाक सुखी, प्रसन्न होतात; आणि चकोर व कुमुदे दुःखी होतात; पण सूर्य कोणास सुख देत नाही किंवा दुःख देत नाही. सूर्य उगवला की जगाचे व्यवहार सुरळित सहज सुरू होतात, पण ते सूर्य करीत किंवा करवीत नाही; तसेच ईश्वराचे

आहे. **ईश्वर फक्त कर्मफलदाता आहे** - कर्मफल प्रेरक आहे हे आता सुचवितात.

**चौ. ४ - (१) कर्मप्रधान विश्वा राखित...चाखित** - जी विषमता व निर्दयता दिसते त्याचे कारण त्या जीवांनी या जन्मात वा पूर्व जन्मात केलेले त्यांचे त्यांचे कर्मच असते. सर्व विश्व कर्मावरच अवलंबून आहे. **'कर्म प्रधान वदति सत्य जन'** (९१।८) जो ज्या प्रकारचे कर्मरूपी बीज पेरतो त्या प्रकारची तशी फळे त्याला मिळतात. **'शुभ वा अशुभ कर्म-अनुसारें । ईश देइ फल हृदय-विचारें ॥ कर्म करी जो त्या फळ मिळती । निगम नीति अशि सगळे वदति'** (७७।७-८) **'कालरूप मी त्याना भ्राता ! शुभ नी अशुभ कर्मफलदाता'** (७।४१।५) हे श्रीराम वचनच आहे. **'कर्मविपाक'** हे प्रकरण प्रस्तावनेत पहावे.

**चौ. ५ (१) तदपि करिति सम - विषम विहारा... अनुसारां - 'ये यथा मां प्रपद्यन्ते तांस्तथैव भजाम्यहम्'** (भ. गी. ४।११) **'जो अगम सुगम हि सहज निर्मल, असम सम शीतल सदा'** (३।३२ छं.४) यांतही येथील सिद्धान्तच सांगितला आहे. **'नमे द्वेष्योस्ति न प्रियः । ये भजंति तु मां भक्त्या मयि ते तेषु चाप्यहम्'** (भ.गी.) भाव हा की कर्माचे फळ पदरांत टाकण्यासाठी जे भक्तविरोधी, भक्तवैरी असतील त्यांच्याशी प्रभूला वैर करावे लागते; व जे भक्त असतील त्यांच्या कर्माचे फळ त्यांना देण्यासाठी त्यांचे मित्र बनावे लागते. पण **(क) हृदय-अनुसारां** - ज्यांच्या त्यांच्या हृदयांतील भावनांप्रमाणेच भगवान करतात. अज्ञानी जीवांना मात्र असे वाटते की भगवान एकावर प्रेम करतात व एकाशी वैर करतात. भक्त भगवंतावर जे प्रेम करतात त्या प्रेमाचे फळ त्यांना देणे जरूर आहे. प्रेमाचे फळ अधिक प्रेम व वैराचे फळ अधिक वैर हे येणारच मिळणारच. एक नारळ लावला की हजारो पट नारळ त्याला लागतात व एक कुचल्याची बी लावली तर लाखो पट बिया तो वृक्ष देतोच. **शुभ वा अशुभ कर्म अनुसरें ईश देइ फल हृदयविचारें'** (२।७७।७) असे म्हटले व येथे **'भक्त-अभक्त-हृदय-अनुसारां'** असे म्हटले. भक्तहृदय शुभकर्मांनी - भावनांनी भरलेले असते. अभक्तहृदय अशुभ कर्मांनी - भावनांनी भरलेले असते व त्यामुळे भगवंतास **समविषमविहार** (लीला) करावा लागतो.

*हिं. । अगुन अलेप अमान एकरस । रामु सगुन भए भगत पेम बस ॥६॥*
*। राम सदा सेवक रुचि राखी । बेद पुरान साधु सुर साखी ॥७॥*
*। अस जियँ जानि तजहु कुटिलाई । करहु भरत पद प्रीति सुहाई ॥८॥*

दो. *। राम भगत परहित निरत पर दुख दुखी दयाल ॥*
*॥ भगत सिरोमनि भरत तें जनि डरपहु सुरपाल ॥२१९॥*

म. *। अगुण अलेप अमान एकरस । राम सगुण ते भक्त - प्रेमवश ॥६॥*
*। राम सदा सेवक - रुचि राखिति । वेद पुराण साधु सुर साक्षिति ॥७॥*
*। मनिं जाणुनि हे त्यजा कुटिलपण । प्रीति भरतपदिं करा सुशोभन ॥८॥*

म.दो. *। रामभक्त परहित - निरत परदुख-दुखी दयाल ॥*
*॥ भक्त - शिरोमणि भरत तों त्यां न भिणें सुरपाल ॥२१९॥*

**अर्थ** - अगुण, अलिप्त, अप्रमेय (अमान, मान = प्रमाण, मोजमाप) सदा एकरस असे जे राम तेच भक्तांच्या प्रेमाला वश होऊन सगुण होतात - झाले आहेत.॥६॥ राम सदा सेवकाची आवड पुरवितात अशी वेद, पुराणे, साधु व सुर साक्ष देतात (हे सर्व साक्षी आहेत) ॥७॥ हे मनात नीट जाणून (भरताशी) कुटिलपणा सोडा व भरतचरणी सुंदर (निष्कपट) प्रीति करा ॥८॥ रामभक्त दुसऱ्यांचे व शत्रूंचे (पर = शत्रू) ही हित करण्यात सदा रत असतात, (कारण) ते दयालु व परदुःखाने दुःखी होतात. भरत तर रामभक्त शिरोमणि आहेत; म्हणून सुरपाल ! त्यांचे मुळीच भय बाळगू नका.॥दो.२१९॥

**टीका. - चौ. ६-८ (१) अगुण अलेप अमान एकरस... प्रेमवश** - अगुण वगैरे चार शब्दांनी येथे निर्गुण निराकर ब्रह्माचे कथन केले आहे. हे सर्व १।५१, १।१९२, १।३४१; वगैरे दोह्यांच्या टीकेत पहावे. अलेप = अलिप्त, ज्याला कशाचाही लेप लागत नाही; ज्याचा कशाशीही कोणत्याही प्रकारचा संबंध नाही असे ब्रह्म, आत्मा. **(क)** या चारी शब्दांना सगुण दृष्टीनेही अर्थ आहे. **अगुण** = अनंतगुण, **अलेप** = करून अकर्ता, भोगून अभोक्ता. **अमान** = ज्याच्या गुण, कथा, चरित्रादिकांस मोजमाप नाही असा, व मोठेपणाचा अभिमान नसलेला. भक्तांसाठी वाटेल तो हलकेपणा घेणे, नीच योनीत अवतार घेणे इत्यादी करण्यास ज्यास लाजलज्जा, कंटाळा वाटत नाही असा. **'ज्या समयिं जैसें कार्य पडतें देह धरिशी तूं तसा ॥ कधिं मानिसी ना खेद तोषां भक्त-पालक तू असा ॥'** (मराठी ब्र-स्तुति). **एकरस** - ज्याला भक्ति हा एकच रस आवडतो असा **'प्रिय रघुवीरा भक्तिच भारी'** (७।११६।४)

**(२) राम सगुण ते भक्त प्रेमवश** - ते राम भक्तप्रेमवश सगुण होतात. **'एक अनीह अरूप अनाम । अज सच्चिदानंद परधाम ॥ व्यापक विश्वरूप भगवंत**

**। देह धरुनि कृत-चरित - अनंत ॥ करिति सकल हें भक्तांलागीं । प्रणतिं कृपाल परम अनुरागी'** (१|१३|३-५). **'संत समान तुम्हां प्रिय मातें । प्रार्थुनि इतरिं न धरुं देहातें ॥८॥ सगुणोपासक परहितीं निरत नीति दृढ नेम ॥ नर ते प्राणांसम मला...'** (५|४८) अशी वचने प्रत्येक कांडांत आहेत. **प्रस्तावनेत 'अवतारहेतुकथन'** पृ. ३५५ पहा.

**चौ. ७-८ (१) राम सदा सेवक रुचि राखिति** - प्रल्हादासाठी खांबांतून प्रगट झाले; भीष्माचार्यासाठी प्रतिज्ञा मोडली; अर्जुनासाठी सारथी बनले; मीराला - कान्हुपात्राला आपल्या पाषाणमूर्तीत मिळवून घेतली; इत्यादी कितीही उदाहरणे दिली तरी थोडीच ! येथे भाव हा आहे की प्रभूला भेटण्याची भरताची प्रबल इच्छा आहे. कपट करून जर तिच्या आड आला तर दुर्धर प्रसंग ओढवेल; हे ध्यानात घेऊन भरताशी छल कपट करण्याचा विचार सोडा व भरतावर शुद्ध प्रेम करू लागा, म्हणजे प्रभु तुमच्यावर कृपा करतील. **'सेवकसेवें राम सुखावति' आणि सेवकवैरें वैर करिति अति'** हे नीट लक्षात असू द्या. भक्ताची रुचि भगवान राखतात व रघुनाथांस परत नेण्याच्या हेतूने भरत आले आहेत हे जरी खरे असले तरी भिण्याचे मुळीच कारण नाही. कारण सांगतो ते ऐका.

**दो. (१) रामभक्त परहितनिरत... दयाल** - रामभक्त = संत, साधु = ज्ञानीभक्त; हे दयालु असतात; व दुसऱ्याचे किंवा (पर = शत्रु) शत्रूंचेही दुःख पाहिल्याने त्यांस दुःख होते व ते शत्रूचेही हित स्वतः दुःख भोगून सुद्धा करतात. रामभक्त, संत कधी कोणाच्या हिताचा विनाश करीत नाहीत. **"संत सहति दुःख परहितलागीं" 'भूर्जतरुसम कृपालु संतहि । परहितिं सहति विपद अति सतत हि'** (७|१२१|१५|१६) **'दुःखि दुःख बघतां सुखि सुख पर'** (७|३८|१). **'साधु न हानि करिति कार्यासी'** (५|६|४) हा सर्वसाधारण रामप्रिय संतांचा - भक्तांचा स्वभाव आहे. **(क) भक्तशिरोमणि भरत तों** - भरताच्या सारखा भक्त तर पूर्वी झाला नाही व पुढे होणार नाही; असे असून ते सुरकार्याचा सुरहिताचा विघात करतील ही कल्पना स्वप्नात येणे सुद्धा अविवेकाचे लक्षण ठरेल. म्हणून भरताचे हे अद्भुत प्रेम पाहून भिण्याचे मुळीच कारण नाही. **(क) सुरपाल** - पूर्वी सुरेश ! अमरपति ! असे म्हटले; येथे सुरपाल म्हणण्यात भाव हा आहे की सुरांचे पालन करण्याची तुमची जबाबदारी असल्याने तुम्हांस त्याबद्दल चिंता लागली आहे ती जर खरी असेल तर भरताचे भय न धरता त्यांच्या चरणी प्रेम करू लागा तरच

सुरांचे पालन होऊ शकेल; आणि जर कपट केलेत तर सुरांची दुर्दशा नष्ट न होता भलतेच कष्ट वाढतील हे मी स्पष्ट सांगतो. याचे कारण सांगतो -

*हिं.* ***। सत्यसंध प्रभु सुर हितकारी । भरत राम आयस अनुसारी ॥१॥***
***। स्वारथ बिबस बिकल तुम्ह होहू । भरत दोसु नहिं, राउर मोहू ॥२॥***
***। सुनि सुरबर सुरगुर बर बानी । भा प्रमोदु मन मिटी गलानी ॥३॥***
***। बरषि प्रसून हरषि सुरराऊ । लगे सराहन भरत सुभाऊ ॥४॥***

*म.* ***। सत्यसंध प्रभु सुरहितकारी । भरत हि रामाज्ञा - अनुसारी ॥१॥***
***। स्वार्थविवश तुम्हिं विकल जाहलां । भरत दोष नहिं तुम्हीं मोहलां ॥२॥***
***। परिसुनि सुरवर गुरुवर वाणी । प्रमुदित झाले गेली ग्लानी ॥३॥***
***। हर्षुनि सुमनें वर्षुनि सुरपति । भरताचा सुस्वभाव वानति ॥४॥***

**अर्थ** - प्रभु सत्यसंध ( = सत्यप्रतिज्ञ) असून सुरांचे हितकर्ते आहेत; आणि भरत रामाच्या आज्ञेप्रमाणे वागणारे आहेत; (म्हणून राम परत जातील अशी भीती भरतामुळे बाळगण्याचे कारण नाही).॥१॥ तुम्ही मात्र स्वार्थाला विशेष बळी पडून व्याकुळ झाला आहात, यांत भरताचा दोष नसून तुम्हाला मोह झाला आहे, भ्रम झाला आहे ॥२॥ सुरवराने आपल्या गुरुवरांची वर = सुंदर वाणी ऐकली व त्याची ग्लानी नष्ट होऊन तो प्रमुदित झाला.॥३॥ सुरपतीने हर्षित होऊन फुलांची वृष्टी केली व तो भरताचा सुस्वभाव वाखाणू लागला.॥४॥

**टीका. चौ. १ - (१) सत्यसंध प्रभु सुरहितकारी** - प्रभूंनी सुरहित करण्यासाठी तर अवतार घेतला व त्यापूर्वीच आकाशवाणीने प्रतिज्ञा केली ती विसरलात का ? **'भिऊं नका मुनि सिद्ध सुरेश्वर । तुमचेस्तव धरुं नरवेषा वर ॥ करिन सकल भूभारनिवारण । निर्भय आता रहा देवगण** ॥ (१८७।१,८) - प्रभु सत्यसंध आहेत, आपली संधा = प्रतिज्ञा कधीही असत्य ठरू देणार नाहीत. प्रभु आपली प्रतिज्ञा मोडतील ? इतका विश्वास नाहीं प्रभूच्या वचनावर ? नंतर सुरहित करण्यासाठी तर प्रभु सर्व अयोध्येला दुःखांत लोटून प्रतिज्ञा करून वनात आले. दशरथासारखे पिता विरह दुःखाने मरणार हे दिसत असून, त्याची पर्वा केली नाही; आणि **'काजिं अशाहि न जाइन वनिं जर । प्रथम गणां मज मूढ जनीं** तर, (२।४२।१) इत्यादी ज्या प्रतिज्ञा प्रभूंनी केल्या आहेत त्याचा ते भंग करतील असे तुम्हांस वाटते तरी कसे ? दशरथांनी राम विरहाने मरण पत्करले पण प्रतिज्ञा मोडली नाही; आणि राम रघुवंशशिरोमणि असून प्रतिज्ञा मिथ्या करतील असे तुम्हास

वाटते ! याला काय म्हणावे ? हा केवळ भ्रम झाला आहे तुम्हाला. भरताच्या प्रेमाला वश होऊन करतील असे वाटत असल्यास लक्षात ठेवा की **(क) भरत हि रामाज्ञा** - अनुसारी - भरत रामाज्ञेचे उल्लंघन करणार नाहीत; कारण ते रामसेवक आहेत. **'आज्ञे-सम न सुसाहिब - सेवा'** (३०१।४) **'चुकुनिहि भरत न टाळिती मनें हि रामाज्ञेस'** हे जनकराजांचे मत आहे. (२८९) 'भरत वचनिं मम, साधु जाणता' हे प्रभूचे मत आहे. देवगुरु हेच सांगत आहेत की भरत रामाज्ञेचे उल्लंघन करणार नाहीत. एवढेच नव्हे तर रामाच्या इच्छेच्या विरुद्ध वागणार नाहीत; कारण ते रामसेवक आहेत. **स्वामीच्या इच्छेविरुद्ध वागेल तो सेवकच नव्हे. 'रामाज्ञा रुचि राखणें हितकर हें आम्हांस'** (२५४ वसिष्ठ वचन) **येथे ध्वनित केले की राम अयोध्येत परत जाणार नाहीत. भरत परत जातील रामास भेटून.**

**चौ.** २-४ (१) **स्वार्थविवश तुम्हिं विकल जाहलां - मनुष्य** कितीही मोठा असो तो **एकदा स्वार्थांध झाला म्हणजे प्रत्यक्ष परमात्मा व परम भगवद्भक्त यांच्याविषयी सुद्धा तो किती साशंक बनतो व स्वकपोलकल्पित भयाने सज्जनांचा व साधूंचा छळ करण्यास कसा तयार होतो याचे एक अप्रतिम उदाहरण** या सुरेश-सुरगुरु-संवादांत दाखविले. **(क) गुरु - वर - वाणी** - वर वाणी एवढ्याच मुळे की सुरवराचा मोह नष्ट झाला, व भलतेच काहीतरी करून स्वतःचा व सर्व देवांचा विनाश केला असता तो टळला. उपदेश - हा मिळतो की तुम्ही कितीही मोठे व सत्ताधीश असा कोणाशीही छल-कपट करण्याची इच्छा झाली तर प्रथम आपणांस आदरणीय वाटणाऱ्या एखाद्या निःस्वार्थी प्रेमळ साधूचा किंवा गुरूचा सल्ला मोकळ्या मनाने घेतल्याशिवाय ती इच्छा कृतीत उतरू नका. संतांशी तर कधीच कपट करू नये व त्यांच्याकडून आपले अहित होईल ही कल्पनासुद्धा करू नये.

**देवगुरूंचा उपदेश -** 'मायापति सेवकासि माया - (२१८।२) याने उपक्रम केला व 'भरतदोष नहिं, तुम्हीं मोहलां' (२२०।२) याने उपसंहार केला. या बृहस्पतींनी केलेल्या उपदेशाला **बृहस्पतिगीता** हे नाव दिल्यास साजेल. **प्रस्तावनेत दिलेल्या एकादश गीतांमध्ये हिचा समावेश करावयाचा राहिला आहे.** यांत निर्गुण सगुण, अवतारहेतु, रामस्वभाव, कर्मविपाक, भक्तांचा स्वभाव व भक्तभगवान संबंध यांचे सिद्धान्तभूत, थोडक्यांत हृदयग्राही व तर्कशुद्ध विवरण करून स्वहिताचा व भगवत्कृपा संपादनाचा सरळ सोपा मार्ग सांगितला तो हा : राम

सेवकाची सेवा, संत सेवा व संतांवर प्रेम करणे. **(क)** यांतील कित्येक गोष्टी नित्य मनन करण्यासारखी व अनेक ठिकाणी आधारभूत सिद्धान्त म्हणून उपयोगी पडण्यासारखी आहेत. **प्रेम पयोनिधि व भक्त शिरोमणि या दोन पदव्या या संवादांत भरतांस मिळाल्या. 'स्वार्थविवश' हा शिक्का सुरेशाच्या कपाळावर देवगुरु बृहस्पतींनी उघड उघड मारला व 'सहस्रलोचन असुनि आंधळा' ही पदवी मनात दिली.** सुरेशाचा मोह गेला असे दिसले तरी स्वभावो दुरतिक्रमः हे पुढे दो. २९५ च्या चौपायांत दिसेल व त्याबरोबर हेही दिसेल की गुरुवचनावरही विश्वास नाही. आता भरत प्रवास कथासूत्र पुन्हा हाती घेतात -

***हिं.*** ***। एहि बिधि भरत चले मग जाहीं । दसा देखि मुनि सिद्ध सिहाहीं ॥५॥***
***। जबहिं रामु कहिं लेहिं उसासा । उमगत पेमु मनहुँ चहु पासा ॥६॥***
***। द्रवहिं बचन सुनि कुलिस पषाना । पुरजन पेमु न जाइ बखाना ॥७॥***
***। बीच बास करि जमुनहिं आए । निरखि नीरु लोचन जल छाए ॥८॥***

***दो.*** ***। रघुबर बरन बिलोकि बर बारि समेत समाज ॥***
***॥ होत मगन बारिधि बिरह चढ़े बिबेक जहाज ॥२२०॥***

***म.*** ***। असे भरत पथिं चालत जाती । बघुनि सिद्ध मुनि सेर्षा स्तविती ॥५॥***
***। राम' म्हणुनि जैं श्वासा घेती । प्रेमा पूर चारि दिशिं येती ॥६॥***
***। द्रवती परिसुनि पवि पाषाण हि । पुरवासी प्रेमा वदवत नहिं ॥७॥***
***। मध्यें वसुनी यमुने आले । निरखुनि नीर नयनिं जल भरले ॥८॥***

***दो.*** ***। रघुवर वर्ण बघून वर वारि समेत समाज ।***
***। बुडत विरह-वारिधीमधिं धरिति विवेक जहाज ॥२२०॥***

**अर्थ** - अशा प्रकारे भरत मार्गाने चालत जात आहेत; त्यांची ती दशा पाहून सिद्ध व मुनि ईर्षेने त्यांची प्रशंसा करीत आहेत.॥५॥ राऽऽम असा उच्चार करीत ज्या वेळी दीर्घ श्वास घेतात त्या वेळी जणू चारी दिशांना प्रेमाला पूर येतात.॥६॥ तो ध्वनि ऐकून वज्र व पाषाण यांनासुद्धा पाझर फुटू लागले; व पुरवासी लोकांचे प्रेम तर वर्णन करून सांगता येत नाही.॥७॥ मध्ये एक वस्ती करून यमुनेजवळ आले व ते नीर (जल) पाहून डोळे पाण्याने भरले.॥८॥ रघुवराच्या वर्णाचे ते सुंदर (वर) वारि पाहून समाजासहित विरहसागरात (वारिधींत) बुडत असता भरताने विवेकरूपी जहाजाचा आधार घेतला (चढले, बसले त्यात. ॥दो. २२०॥

**टीका. चौ. ५ (१) असे भरत पथिं चालत जाती - 'धृत आधारा रामसखाकर'** (२१६।४) पासून दो. २१६ पर्यंत भरतांच्या चालण्याच्या पद्धतीचे वर्णन केले व पुढे भरत महिमा वर्णन सुरू झाले ते सुरपति प्रशंसा करू लागेपर्यंत (२२०।४) केले. मागे वर्णिल्याप्रमाणे - ॥ **काहीं नाहीं पायां । शिरीं नाहीं छाया । प्रेमीं नाहीं माया । ऐशापरीं ॥१॥ मही झाली मृद । छत्र झाले जलद । वारा वाहे सुखद । ऐशा परीं ॥२॥ करीत भक्ति दान । ऐकत गुणगान । इंद्रा चिंता महान । ऐशापरीं ॥३॥ उपदेशें गुरुवर । निर्मोह सुरवर । रामप्रेम देहधर । मार्गे चाले ॥ (क) बघुनि सिद्धमुनि सेषाँ स्तविती** - 'सिद्ध साधु मुनिवर अस म्हणती । भरता निरखुनि मुद मनिं भरती' (२१७।६) असा यांचा संबंध पूर्वी दाखविला आहे. म्हणून येथे सिद्धमुनि = सिद्ध, साधु, मुनिवर असा अर्थ घेणे जरूर आहे. जो आनंद त्यांना झाला त्या आनंदात ॥ **सिद्ध मुनि भरता स्तविती । आपणांस निखंदिती । केवीं लाभेल ऐशी भक्ति । मनीं म्हणती ॥१॥ काय करावें आमचें ज्ञान । सिद्ध झालों महान । तथापि आहे पाषाण । हृदय आमचें ॥२॥ भक्तीचा नाही ओलावा । ज्ञानाला त्या आग लावा । आतां बरें भरतनांवा । जपत जावें ॥३॥ आम्हीं राहिलों तपोवनीं । भरत वाढले राजभवनीं । भक्तिसिंधु यांचे मनीं । उचंबळला ॥४॥ परी आम्हीं महाभाग । साधला दर्शन लाभ । आतां विझवूं भव-आग । भक्तिरसानें ॥५॥**

**चौ. ६ - (१) राम म्हणुनि जें श्वासा घेती... येती** - हे कसे शक्य आहे याचे वर्णन शब्दांनी करता येणे शक्य नाही. 'पाण्यामध्ये मासा । झोप घेतो कैसा । जावें त्याच्या वंशा । तेव्हां कळें ॥१॥' ज्यांना हे अशक्य वाटत असेल, अतिशयोक्ति वाटत असेल, त्यांनी श्री चैतन्य गौरांग प्रभूंचे चरित्र मुद्दाम वाचून पहावे; आणि मग त्यांनी श्रीरामचरितमानसांतील नुसते अयोध्याकाण्ड शांतपणे, श्रद्धेने वारंवर वाचावे म्हणजे त्यांची हृदये कुलिश पाषाणांपेक्षाही कठोर असली तरी पाझर फुटल्याशिवाय राहणार नाहीत. कोणी टीकाकार म्हणतात की हा ग्रंथ त्यांच्यासाठी नाही असे त्यांनी समजावे; कोणी म्हणतात की भारतांतील हवा त्यांस मानवत नाही असे त्यांनी समजावे पण **असे म्हणणे म्हणजे मानसांतील भरतचरित्राच्या प्रभावाबद्दल स्वतःचा स्वानुभवयुक्त दृढ आत्मविश्वास नसल्याचे जाहीर करणे आहे.**

(२) जिकडे तिकडे राऽऽम, राऽऽम, राऽऽऽम असा ध्वनि निघू लागला. राम व ओंम यांत काही फरक नाही. ओंमचा उच्चार मोठ्याने (प्लुत) 'दीर्घ

घण्टानिनादवत्' एखाद्या सात मजली चुनेगच्ची इमारतीच्या सभोवती बसून, ती इमारत ढासळावी या हेतूने शेकडो माणसांनी एकाच वेळी सतत तीन तास केल्यास ती इमारत जमीनदोस्त होईल **असे एका प्रसिद्ध गीताप्रेमी आंग्ल पुरुषाने म्हटले आहे.** (क. गीतांक पहावा) कोहिनूर हिऱ्याची किंमत भाजीविक्याला कशी करता येईल ? पण तोच रत्नपारख्यांच्या (आडनावाचे नव्हे) संगतीत काही काळ राहिला तर त्यालाही साधारणपणे कळेलच. 'केल्याने होत आहे रे'.

**चौ. ७ - (१) द्रवती पवि पाषाण** - पवि पाषाण म्हणजे इन्द्र व कोळी भिल्ल असा अर्थ समजण्याची आवश्यकता नाही, तो अर्थ चुकीचा ठरेल व पवि पाषाणांस खरोखर पाझर फुटू शकतील असे तो अर्थ करणारांस वाटत नाही असे ठरेल. **श्री चैतन्य गौरांग प्रभु चरित्र** वाचून पहावे म्हणजे कळेल की **हे सत्य कोटीतले आहे. कविकल्पना नाही.** कोळी भिल्लांची हृदये तर आम्हा टीकालेखकांच्या हृदयांपेक्षा शतपटींनी मृदु असल्याचे रामप्रवास वर्णनात आधीच सिद्ध झाले आहे. लक्षणेने अर्थ करण्याची आवश्यकता नाही. पाषाणांना द्रव फुटेल यांत आश्चर्य किंवा असंभाव्य काही नाही. या चौपाया मूकास्वादनवत ('मुक्याने गूळ खादला । गोडी न ये वर्णायाला' अशा) अनुभवावयाच्या आहेत. टीका-विवरण करून काही हाती लागणार नाहीच पण रसहानि मात्र होईल.

**चौ. ८ - (१) मध्ये बसुनी यमुने आले** - पाचवी रात्र भरद्वाजाश्रमांत काढली. एकवस्ती मधे केली तरी साहवी रात्र व **आज यमुनातीरीं राहतील ती सातवी रात्र.** राम शृंगवेरपुरापासून प्रयागास दोन दिवसांत आले; भरत एका दिवसांत तसेच चालत आले. राम प्रयागाहून निघाले ते यमुना ओलांडून **प्रयागापासून ४० मैलांवर कुँअर दोताल** येथे थोडा वेळ थांबून वाल्मीकी आश्रमाच्या रस्त्यांत ५।६ मैलांवर आले व तेथे वडाच्या झाडाखाली वस्ती केली (१२४।३-४ पहा.) प्रयागापासून यमुना (महिला घाट, येथे भरत आता वस्ती करणार) २० मैल आहे. प्रयागापर्यंतच्या प्रवासास भरतांस निम्मा वेळ लागला व येथे चौपट का लागला असा प्रश्न कोणी विचारतील. **(क)** रामाबरोबर सीता चालत येत होती व शृंगवेरपासूनच पायी प्रवासास प्रारंभ झाला. निघण्यास उशीर बराच झाला होता, सीतेला चालण्याची संवय नव्हती म्हणून पहिला मुक्काम ७-८ मैलांवरच करावा लागला. दुसरा टप्पा प्रयाग, १२ मैलांचा एकाच दिवसात गाठला; पण त्रिवेणी व भरद्वाजाश्रम जाणे-येणे मिळून १५ मैल तरी चाल झालीच व तिसऱ्या

दिवशी ४५ मैल सीता चालली ! पण हे लक्षात ठेवले पाहिजे की कोणाच्याही पायांना फोड आले नव्हते. कोणाचेही हातपाय गळले नव्हते, कोणाच्या खांद्यावर हात ठेऊन किंवा कोणाच्या हाताचा आधार घेऊन कोणास चालावे लागले नाही. **(ख)** भरत तर प्रेममग्न झालेले, राम थांबलेल्या ठिकाणी थांबून प्रदक्षिणा, नमस्कार वगैरे करीत, रामप्रवास गोष्टी ऐकत आले. व पायांना फोड आलेले असता १०-१० मैल रोज चालले हेच विशेष आहे. **पायांना फोड आल्यावर एका तासांत १ मैल तरी चालून दाखवावे.** वनांतील रस्त्याने तर प्रत्येक पाऊल टाकताना जीव घाबरा होतो; जावे त्याच्या वंशा तेव्हा कळते ! **हा उल्लेख येथे केला नसता तर असे ठरले असते की तुलसीदासांनी पुष्कळ लांबचा प्रवास अनवाणी पायी कधी केला नव्हता.** 'अनुभवियाच्या खुणा अनुभवी जाणती'. **हा उल्लेख करण्यात कवींच्या सावधगिरीची परमावधि दिसून येते. (ग)** प्रयागापासून यमुनापार ...ईपर्यंतच्या राम प्रवासाचे वर्णन अवघ्या चारच ओळींत (१०९।७-८ व दोहा) आहे. भरताच्या त्याच प्रवासाचे वर्णन २।६।४-२२१।३ अखेर म्हणजे ४९ ओळींत आहे.

(२) **निरखुनि नीर नयनिं जल भरलें** - नीर शब्दांत मजा आहे. 'र', 'ल' यांची सवर्णता मानली आहे. नीर = नील = रघुवर वर्ण ते यमुना जल दुरून दिसतांच तो नीलवर्ण पाहून वाटले की रामच आहेत. **(क) दोहा - रघुवरवर्ण वर वारि बघून** - दुरून वाटले की राम आहेत त्या बरोबर त्या 'वारि'ने शोक, दैन्य ग्लानि यांचे निवारण केले; पण जवळ येऊन पाहतात तो राम नसून यमुनाजल आहे, त्या बरोबर **विरहवारिधीमध्ये** प्रेमपयोनिधि बुडण्याच्या बेतांत होता. पण वारि-धी, बुद्धीने (धी = बुद्धि) निवारण केले; तिने **विवेक** ... आधार दिला. तिने सांगितले की तुम्हाला पद : ।। प्रभुदर्शन लवकर ... वाटे जीवें भावें ।। तर वेळ न मोडा वाटे । बुडुं नका शोक जरि ... प्रभुदर्शनिं शोक सराटे ! लागति ना, दुःखहि आटे ।। जर धराल तुम्हि धीराला । तर जाल शीघ्र तीराला ।। या माता व्याकुळ भारी । ही प्रजाहि विव्हळ सारी ...) या विवेक जहाजाचा आधार मिळाला. सीता माउली बरोबर असून ... दिवसांत प्रभु पलीकडे जाऊन आणखी पुष्कळ पुढे गेले आणि मला इथे ... तीन दिवस लागले ! हे काय तीव्र दर्शन लालसेचे लक्षण !

***श्रीमानस गूढार्थ चंद्रिका अयोध्या कांड अध्याय २१ वा ...***

# अध्याय २२ वा.

हिं. *। जमुन तीर तेहि दिन करि बासू । भयउ समय सम सबहि सुपासू ॥१॥*
*। रातिहिं घाट घाट की तरनी । आईं अगनित जाहिं न बरनी ॥२॥*
*। प्रात पार भए एकहि खेवाँ । तोषे रामसखा की सेवाँ ॥३॥*
*। चले नहाइ नदिहि सिर नाई । साथ निषादनाथ दोउ भाई ॥४॥*
म. *। यमुनातटिं त्या दिवसिं राहती । यथासमय सुख सकल पावती ॥१॥*
*। घाटघाटिंच्या तरणि न गणना । रात्रिं येति करुं कसें वर्णना ॥२॥*
*। उदयीं एका खेपें उतरति । राम-सखा-सेवेनें तोषति ॥३॥*
*। स्नान करुनि यमुने शिर नमती । सहित निषादा भ्राते निघती ॥४॥*

**अर्थ** - त्या (सातव्या) दिवशी यमुनेच्या तीरी वस्ती केली; व समयानुसार सर्वांच्या सुखसोयी लागल्या ॥१॥ रात्री घाटा-घाटाच्या अगणित नावा जमल्या (आल्या) त्यांचे वर्णन कसे करता येणार !॥२॥ उजाडतांच एकाच खेपेत सर्व यमुनेच्या परतीराला आले. व रामसख्याच्या सेवेने भरत संतुष्ट झाले.॥३॥ मग स्नान करून यमुनेला नमस्कार - करून निषादराजासह भरतशत्रुघ्न (दोघे भ्राते) निघाले.॥४॥

**टीका.** - (१) शृंगवेरपुरास सैन्य उतारावरून गेले व पाचशेंच्यावर नावा होत्या तरी नऊ खेपा कराव्या लागल्या व चार घटका मोडल्या. येथे सैन्य, हत्ती, घोडे इ. सर्वांनाच नावांतून जाणे भाग होते; तेव्हा ७।८ हजार तरी नौका, जहाजे, तराफे वगैरे सहज लागणार. रामसखा नावाड्यांचा राजा आहे; त्याच्या बरोबर निषादगण आले होतेच. त्याने साहव्या दिवशी सायंकाळच्या सुमारासच सर्वांना दोन्ही दिशांस पाठवून त्रिवेणीपासून या महिलाघाटा पर्यंतच्या भागातल्या व वरच्या बाजूच्या अशा सर्व नावा आज (७ व्या) रात्रीपर्यंत घेऊन येण्याचे हुकूम ठिकठिकाणी पाठविले. सकाळी एकाच खेपेत काम उरकल्याने त्यांचाही वेळ मोडला नाही फार. ही सर्व व्यवस्था रामसख्याने भरतांस कळू न देता केली. त्याच्या सेवाभावाने व ३।३॥ घटका वाचल्याने भरत संतुष्ट झाले. **(क)** भरतासारखा रामभक्त संतुष्ट झाल्याचा परिणाम पुढे दिसणार आहे. दोघे बंधू निघाले असा उल्लेख असला तरी ते पुढे चालू लागले नाहीत. येथून कोणी कोणाच्या पुढे मागे जावयाचे याची ते व्यवस्था लावू लागले असे पुढील वर्णनावरून ठरते.

हिं. *। आगें मुनिबर बाहन आछें । राजसमाज जाइ सबु पाछें ॥५॥*
*। तेहि पाछें दोउ बंधु पयादें । भूषन बसन बेष सुठि सादें ॥६॥*
*। सेवक सुहृद सचिवसुत साथा । सुमिरत लखनु सीय रघुनाथा ॥७॥*
*। जहँ जहँ राम बास बिश्रामा । तहँ तहँ करहिं सप्रेम प्रनामा ॥८॥*
दो. *। मग बासी नर नारि सुनि धाम काम तजि धाइ ॥*
*॥ देखि सरूप सनेह सब मुदित जनम फलु पाइ ॥२२१॥*
म. *। उत्तम वाहनिं मुनिवर पुढतीं । मागें राजसमाजहि निघती ॥५॥*
*। त्यांमागें दो भ्राते चालति । भूषण वसन साधिं अति घालति ॥६॥*
*। सेवक सुहृद सचिवसुत साथ हिं । लक्ष्मण सिते स्मरत रघुनाथहि ॥७॥*
*। रामवास-विश्राम जिथ जिथें । प्रेमें प्रणमन करिति पथिं तिथें ॥८॥*
म.दो. *। त्यजुनि काम गृह नारिनर श्रवुनि येति धावून ॥*
*॥ छबि बघुनी स्नेहहि, मुदित जन्म फला पावून ॥२२१॥*

**अर्थ** - सर्वांच्या पुढे उत्तम वाहनांत (दिव्य रथांत) मुनिवर आहेत; व त्यांच्या मागे सर्व राजसमाज जात आहे.॥५॥ त्यांच्या मागे अगदी साधी वस्त्रे भूषणे घातलेले दोघे भाऊ पायी चालले आहेत.॥६॥ त्यांच्या बरोबर सेवक, मित्र व सचिवसुत असून सर्व लक्ष्मण, सीता, व रघुनाथ यांचे स्मरण करीत आहेत.॥७॥ वाटेत जिथे रामवास वा विश्राम स्थळे, वृक्ष इ. लागतात तेथे तेथे प्रेमाने प्रणाम करीत (चालले) आहेत.॥८॥ (मार्गावरील गावचे लोक) स्त्रिया व पुरुष ऐकताच कामाचा त्याग करून व घर (कामे इ.) विसरून (पाहण्यासाठी) धावत येत आहेत व (भरत शत्रुघ्नांचे) सुंदर रूप व स्नेह पाहून जन्मफल पाऊन मुदित (प्रसन्न) होत आहेत.॥दो.२२१॥

**टीका. - (१) सूचना - येथे पुन्हा क्रम बदलला** - आता रथांत किंवा घोड्यावर बसण्याचा आग्रह कोणी करील अशी शंका उरली नाही. प्रयागांतच ही बातमी कळली व सेवकांनी भरताचे विचार लोकांच्या कानी घातल्याने ते सर्वांस कळणारच. शृंगवेरपुरापासून प्रयागापर्यंत भरताबरोबर घोडे व सेवकच होते. प्रयागापासून निषादराज होते. आता शत्रुघ्न, मित्र व सचिव पुत्र यांची भर पडली. शत्रुघ्नाने विनंती करून अनुज्ञा घेतली असेल. मित्रांना व सचिव सुताला लाज वाटू लागली असेल की भरत पायी जात असता आपण वाहनांत जाणे बरे नाही. व आता शेवटचा टप्पा तरी भरतांच्या संगतीत पायी चालत श्रीराम

दर्शनास जावे. **काही विशेष न सांगता सहज, मानवस्वभावाचे व भावनांचे निदर्शन केले आहे.** या वेळी घोडे बरोबर नाहीत. भरत, शत्रुघ्न, निषादराज, मित्र व सचिवसुत अशी शेलकी तरुण, समवयस्क मंडळी बरोबर चालत निघाली. निषादराज तेवढा समवयस्क नाही. सेवक बरोबर आहेतच. जे घोडे घेऊन बरोबर चालत होते तेच हे महा भाग्यवान सेवक असले पाहिजेत.

**(२) उत्तम वाहनिं मुनिवर** - अयोध्येतून निघताना वसिष्ठ रथांतून अरुंधती व अग्नीवगैरेसह सर्वांच्यापुढे जसे विप्रसमाजासह आले तसेच येथे सर्वांच्या पुढे आहेत. तो रथ कसा होता हे तेथे सांगितले नव्हते ते येथे उत्तम शब्दाने सांगितले **(क) 'भूषण वसन साधिं अति घालति'** - भरत शत्रुघ्न अयोध्येतून निघताना कोणत्या वेषात निघाले हे आत्तापर्यंत सांगितले नव्हते ते येथे सांगितले. राजा म्हणून राजपुत्र म्हणून रामदर्शनास जात नसून रामदुःखदुःखी व विरहव्याकुळ झालेला एक रामसेवक या नात्याने जात आहेत व त्या भावनेला अनुरूप असा अगदी साधा वेष केला आहे. राजपुत्राचा मौल्यवान वेष नाही किंवा मुनिवेषही नाही.

**(३) रामवास विश्राम जिथ जिथे** - प्रयागापासून वाल्मीकी आश्रमाच्या वाटेत रामचंद्रांनी फक्त एकच वस्ती केली आहे. विश्रांतीसाठी अनेक स्थळी थांबले असतील. वासाचा, रात्रीच्या वस्तीचा उल्लेख करण्यांत हेतु इतकाच दिसतो की जेथे रघुनाथाने ५ व्या रात्री वस्ती केली तेथपर्यंत वाल्मीकीआश्रमाचा व चित्रकूटचा रस्ता एकच असावा; व तेथून पुढे दोन मार्ग निराळे झाले.

**(४) त्यजुनि काम गृह नारिनर** - मानसांत कामत्याग (काम = वासना व कामविकार) व. गृहकार्यादि व्यवहाराचा विसर असा भेद सर्वत्र पाळला आहे. **प्रस्तावनेत 'कार्यविसर व कामत्याग' हे प्रकरण पृ. ४८९ पहा.** म्हणूनच हिंदीत 'त्यजि' = त्यजुनि शब्द 'धाम'च्या जवळ न घालता 'काम'च्या जवळ घातला आहे. मानसात घरकाम = गृहकारज, गृहकाज हे शब्द आहेत.

*हिं. । कहहिं सपेम एक एक पाहीं । रामु लखनु सखि होहिं कि नाहीं ॥१॥*
*। बय बपु बरन रूप सोइ आली । सीलु सनेहु सरिस सम चाली ॥२॥*
*। बेषु न सो सखि सीय न संगा । आगे अनी चली चतुरंगा ॥३॥*
*। नहिं प्रसन्न मुख मानस खेदा । सखि संदेहु होइ एहिं भेदा ॥४॥*
*म. । प्रेमें वदति परस्पर काहीं । दिसति राम लक्ष्मण सखि ! नाहीं? ॥१॥*

*। वय वपु वर्ण रूप सखि ! सारखिं । स्नेह शील सम, समान चाल किं ॥२॥*
*। वेष न तो सीता नहिं संगीं । पुढें कटक चाले चतुरंगी ॥३॥*
*। अप्रसन्न मुख मानस-खेदें । सखि ! संदेह येत या भेदें ॥४॥*

**अर्थ** - काही जणी एकमेकीस म्हणू लागल्या की सखी ! रामलक्ष्मणच दिसतात नाही का? ॥१॥ वय, शरीराचा बांधा, वर्ण व रूप अगदी सारखी आहेत; स्नेह व शील पण अगदी तस्स व चालसुद्धा अगदी तशीच आहे (की गं !) ॥२॥ (दुसरी म्हणाली) वेष मात्र तसा नाही, सीता बरोबर (दिसत) नाही आणि पुढे चतुरंगिणि सेना आहे. ॥३॥ (आणखी एकजण म्हणाली) मनांतील खेदाने मुख अप्रसन्न दिसत आहे; म्हणून सखी ! या भेदामुळे संदेह वाटतो. ॥४॥

**टीका** - (१) वारंवार वापरलेल्या सखि शब्दाने सुचविले आहे की या वनांतील कोळी भिल्लांच्या स्त्रिया क्रमाक्रमाने आपले मत सांगत आहेत. गावचे पुरुषपण आलेच आहेत परंतु यांना पाहिल्याबरोबर प्रथम राम-लक्ष्मणांची आठवण स्त्रियांना झाली. याने दाखविले की रामप्रेमभावना स्त्रियांतच जास्त आहे. येथील चर्चेवरून दिसते की त्यांची जिज्ञासा, निरीक्षण चातुरी व तर्कनिपुणता पुरुषांपेक्षा अधिक आहेत. जनकपुरीत भरत शत्रुघ्नांना प्रथम पाहिल्यावर **अशाप्रकारची चर्चा प्रथम स्त्रियांतच सुरू झाली आहे. अशा प्रकारची जिज्ञासा व कुतूहल पुरुषांपेक्षा स्त्रियांत जास्त असतात हे दाखविले.**

**चौ. २-३ - (१) वय वपु वर्ण रूप - वय =** १७ वे वर्ष संपून १८ वे नुकतेच लागलेले. राम, नवमीचा जन्म, भरत दशमीला सकाळी व लक्ष्मण शत्रुघ्न चैत्रशुद्ध एकादशीला दुपारी जन्मले. १।१ दिवसाचाच फरक आहे. 'भरत किं रामाचे अनुसारी । सहज न जाणु शकति नर नारी ॥ लक्ष्मण रिपुसूदन रूपें सम । नखशिखांत सर्वांगें अनुपम' (१।३११। ६-७) अशी चर्चा जनकपुरीतील स्त्रियांनी केली आहे. रानांतील कोळी भिल्लांच्या स्त्रियांनाही तसेच वाटले. **(क) स्नेह शील सम समान चाल** - रामलक्ष्मणांचे जसे प्रेम दिसले व लक्ष्मण जसे प्रेमाने व सेवक भावाने वागताना दिसले तसेच शत्रुघ्न दिसले. चालण्याची ढबसुद्धा सारखीच. शत्रुघ्न भरताच्या मागे त्यांच्या किंचित डाव्या बाजूला राहून भरताच्या पदचिन्हांवर पाऊल पडणार नाही अशा पद्धतीने लक्ष्मणासारखे चालत आहेत. **'सीताराम-पदांकां राखुनि । लक्ष्मण चालति उजवीं घालुनि ॥ रामसिता लक्ष्मण**

**सुप्रीती । वाचतीता वदूं कशी ती'** (२।१२३। ६-७) **(ख) वेष न तो** - त्यांच्या सारखा मुनिवेष नाही हा सहज नजरेत भरण्यासारखा भेद आहे; व दोघांच्या मधे 'नारि सुकुमारी' नाही व पुढे मोठे सैन्य गेले आहे हा भेद तर त्याहून चटकन कोणाच्याही लक्षांत येण्यासारखा आहे त्यामुळे 'मग हे दोघे कोण?' अशी जिज्ञासा सहज उत्पन्न होणारच.

**चौ. ४ - (१) अप्रसन्न मुख मानस-खेदे** - हा भेद जाणण्यास मात्र खरोखरच निरीक्षण चातुर्य पाहिजेच; शिवाय रामलक्ष्मणांच्या सुप्रसन्न वदनमूर्ती या स्त्रीच्या हृदयांत व नेत्रांपुढे इतरांपेक्षा अधिक दिसत असतील म्हणून हिच्या हा भेद चटकन लक्षांत आला, आता बाकीच्या स्त्रिया हिच्या या चातुर्याची प्रशंसा करतील.

**हिं.** ***। तासु तरक तियगन मन मानी । कहहिं सकल तेहि सम न सयानी ॥५॥***
***। तेहि सराहि बानी फुरि पूजी । बोली मधुर बचन तिय दूजी ॥६॥***
***। कहि सपेम सब कथा प्रसंगू । जेहि बिधि राम राज रस भंगू ॥७॥***
***। भरतहि बहुरि सराहन लागी । सील सनेह सुभाय सुभागी ॥८॥***

**दो.** ***। चलत पयादें खात फल पिता दीन्ह तजि राजु ॥***
***॥ जात मनावन रघुबरहि भरत सरिस को आजु ॥२२२॥***

**म.** ***। तर्क तिचा स्त्रीगण-मन मानी । म्हणति सकल तुज सम न शहाणी ॥५॥***
***। खरें म्हणसि तू, तिज सन्मानी । दुजी, वदे मृदु मधुरा वाणी ॥६॥***
***। प्रेमे सब सांगते प्रसंगा । जो करि राम-राज्य-रस-भंगा ॥७॥***
***। भरता पुन्हां प्रशंसूं लागे । शील-स्नेह-सुभाव-सुभागें ॥८॥***

**दो.** ***। त्यजुनि राज्य पितृदत्त तें पायिं पायिं फळ खात ॥***
***॥ जाती विनवूं रघुवरा कुणि सम भरत जगांत ॥२२२॥***

**अर्थ** - तिचा तर्क स्त्रीसमूहाच्या मनाला मान्य झाला (पसंत पडला) व त्या सर्व म्हणाल्या की तुझ्यासारखी शाहणी (आमच्यात खरोखर) कोणी नाही ॥५॥ तू म्हणालीस ते खरे आहे; असे म्हणून दुसऱ्या एकीने तिला शाबासकी दिली (मान दिला) व मृदु मधुर वाणीने ती बोलू लागली ॥६॥ ज्याने रामराज्यरसाचा भंग केला तो सगळा प्रसंग तिने प्रेमाने सांगितला. ॥७॥ मग पुन्हा ती भरताचे शील, स्नेह, सद्भाव, (सुभाव-शुद्ध भाव) व उत्तम भाग्य यांची प्रशंसा करू लागली. ॥८॥ पित्याने दिलेल्या त्या राज्याचा त्याग करून फलाहार करून, पायी अनवाणी चालत रामचंद्रांना (अयोध्येत नेण्यासाठी) विनविण्यासाठी जात

आहेत. जगांत भरतांसारखा दुसरा कोण आहे? (कोणीसुद्धा नाही) ।।दो. २२२।।

**टीका.** (१) रामराज्यरसभंगकथा या कोळी भिल्लांना रामप्रवासाच्या वेळीच साधारणपणे कळली होती व रामसखा या कोळी भिल्लांचाच राजा असल्याने त्या नंतरच्या सुमारे ४५ दिवसांच्या काळात शृंगवेरपुरास काही नात्याचा संबंध असल्यामुळे सर्व इत्थंभूत हकीगत हिला समजली असेल यांत नवल नाही; पण भरताने राज्याचा त्याग केला व तो रामचंद्रांना विनविण्यास जात आहे व विशेषतः फलाहार करीत आहे हे तर तर्काने समजणे अशक्य आहे. राज्याचा त्याग केला हे साध्या वेषाने पायी अनवाणी चालत जाण्यावरून सहज तर्काने कळेल व राम राम म्हणत प्रेममग्न होऊन जात आहेत यावरून रामास विनविण्यास जात आहेत हेही चाणाक्ष माणसास कळेल; पण फळे खाण्याचे वर्णन आतांपर्यंत कुठेच केलेले नाही; व ते तर्काने समजणे शक्य वाटत नाही. यावरून एकच अनुमान करतां येते की भरत शृंगवेरपुराहून निघाल्यानंतर तेथील कोणी तरी व्यक्ती या स्त्रीला मधल्या २।३ दिवसात भेटली असली पाहिजे; आणि भरताने शृंगवेरपुरास फलाहार केला असला पाहिजे.

**चौ. ८ व दोहा** - (१) **शील स्नेह सुभाव सुभागें** - यांच्या वर्णनाने ती भरताची प्रशंसा करू लागली. त्याचा नमुना दोह्यात आहे. **(क) त्यजुनि राज्यपितृदत्त** - यांत शील व स्नेह दिसला. स्नेह नसता रामावर तर राज्याचा स्वीकार केला असता. स्नेह असून उत्तम शील नसले तरीही राज्यत्याग केला नसता. प्रत्येक कार्यात स्नेह हे कारण आहेच. **ल.टे.** स्नेह मुख्य असून कवींनी शीलाचा उल्लेख प्रथम करून सुचविले आहे की **भरत शेवटी सेवकाच्या शीलाला शोभेल असेच करतील. (ख) पायी चालत फलाहार** करून जात आहेत यांत सेवकाचा सु-भाव = उत्तम भाव मुख्य आहे. **(ग) रघुवरास विनविण्यास जात आहेत** यांत स्नेह, शील व शुद्ध सेवाभाव या तिन्ही गोष्टी आहेत. **(घ)** इतके प्रखर वैराग्य, परमावधीचे रामप्रेम व परम श्रेष्ठ सेवक धर्मव्रताचरण यांचा एकत्र संयोग होणे हे परमभाग्याचे लक्षण नाही असे कोण म्हणेल? हेच सु = अति, भाग = भाग्य.

(२) **'ते सब परमपदा अधिकारी'** (२१७।२) कसे झाले हे या वनवासी कोळी भिल्लांच्या स्त्रियांच्या भाषणावरून स्पष्ट दिसते. बाह्यत्याग, अंतरीचे वैराग्य, रामप्रेम, धर्माचरण, सेवाभाव, शील इत्यादींची रुचि अत्यंत वाढली

असल्याशिवाय अशा प्रकारचे सहजोद्गार हिंसक, विषयासक्त, जंगलांत राहणाऱ्या, बद्धजीवांच्या मुखांतून निघणेच शक्य नाही. रामदर्शनाचा हा प्रत्यक्ष परिणाम दिसला. प्रयागच्या स्त्रियांचा उल्लेख दोन्ही वेळच्या प्रवासवर्णनात नाही हे वैशिष्ट्य ध्यानांत आलेच असेल. 'हा रघुनंदन दर्शनमहिमा' (२५१।६)

*हिं. । भायप भगति भरत आचरनु । कहत सुनत दुख दूषन हरनू ॥१॥*
*। जो कछु कहब थोर सखि सोई । राम बंधु अस काहे न होई ॥२॥*
*। हम सब सानुज भरतहि देखें । भइन्ह धन्य जुबती जन लेखें ॥३॥*
*। सुनि गुन देखि दसा पछिताहीं । कैकइ जननि जोगु सुतु नाहीं ॥४॥*

*म. । भरत भक्ती आचरण बंधुपण । श्रवण कथन हरि दुःखें दूषण ॥१॥*
*। सखि ! थोडें जितकें सांगावें । रामबंधु कां असे नसावे ॥२॥*
*। आम्हीं सानुज भरत - विलोकनिं । गणलों गेलों धन्य युवतिजनिं ॥३॥*
*। परिसुनि गुण शोचति गति बघुनी । योग्य न सुत कीं कैकयी जननी ॥४॥*

**अर्थ** - भरतांचा बंधुभाव (बंधुपण) भक्ती व आचरण यांचे श्रवण व कथन दुःखे व दोष हरण करणारे आहे. ॥१॥ सखी ! जितके सांगावे तितके थोडेच. (पण) रामबंधु असे का असणार नाहीत ? (असणारच) ॥२॥ अनुजासह भरताचे आम्हाला दर्शन झाले त्यामुळे आम्ही धन्य झालो व धन्य स्त्रियांत आपली गणना झाली. ॥३॥ (भरताचे हे वर्णन केलेले) गुण ऐकून व त्यांची ती दशा (गति) पाहून स्त्रियांना वाईट वाटले की या सुताला योग्य जननी कैकयी नाही (कैकयीचा हा मुलगा असे म्हणण्यास लाज वाटते).

**टीका. चौ. १-२ - (१) भरतभक्ती आचरण बंधुपण** - या चौपाईत भरतचरित्राचे माहात्म्य व श्रवणकथनाची फलश्रुती सांगितली. मानसारंभी **'शमन अमित उत्पात सब भरतचरित...'** (१।४१) अशी सांगितली व या काण्डाच्या शेवटी उपसंहारात (३२६।५ पासून) सांगितली आहे. रामचरित्राची फलश्रुती जशी आदिममध्यान्ति सांगितली, तशीच भरतचरित्राची वर दाखविल्याप्रमाणे सांगितली. **(क) बंधुपण** = बंधुभाव, भ्रातृप्रेमानुकुलचरित्र रामकीर्ती सरयूतील जलाच्या माधुरीतील सुवास आहे. **'चौघामाजिं सुबंधुता जलमाधुरी सुवास'** (१।४२ **टी.प.**) भरताच्या बंधुभावाची व तदनुकूल आचरणाची फलश्रुति सांगितली, पण भरतभक्तीचा महिमा अनिर्वचनीय स्वसंवेद्य आहे **'भरतभाव राहणि कर्तूती । भक्ती विरति गुण विमल विभूती ॥ वर्णत सकल सुकवि संकोचति । कुंठित शेष-**

**गणेश-गिरा-गति ॥'** (३२५।७-८). **म्हणूनच ही स्त्री म्हणते की (ख) सखि ! थोडे जितके सांगावे - 'अमित भरतमहिमा श्रुणु राणी । जाणति राम, न वदवे वाणीं ॥ वर्णु न शकति कोणि वरवर्णी ! । जशि जलहीन-मीनगति धरणी'॥** (२८९।२,१) असे जनकराज सुनयना राणीला म्हणाले.

**चौ. ३-४ (१) गणलों गेलों धन्य युवतिजनिं** - रामलक्ष्मणसीता दर्शनानंतर यांना भरत दर्शन झाल्यावर या स्त्रिया स्वतःस धन्य मानतील यांत काहीच आश्चर्य नाही. भरद्वाजांसारखे महामुनीसुद्धा म्हणाले की **'दर्शन तुमचे । सवें प्रयागा सुभाग्य अमचें'** (२१०।५) भरद्वाजांनी भरतमहिमा वर्णिला तसा यांनीही वर्णन केला. रामदर्शनाने यांना जीवनमुक्ती मिळाली व भरतदर्शनाने प्रेमभक्ती मिळाली. **'भरत बघत गत भवरुजभारी'** (२१७।२ टी.प.) यापेक्षा आणखी धन्यता ती कोणती? **(क) योग्य न सुत किं कैकयि जननी** - भाव हा आहे की भरत कैकईचा मुलगा असे कोण म्हणेल? कौसल्यासुत म्हणणेच शोभेल पण दैव! **'हंसवंश दशरथ जनक, भाऊ लक्ष्मण राम ॥ झालिस जननी जननि तू स्ववश न जें विधिवाम'** (१६१) असा पश्चात्ताप जसा भरतांस झाला तसेच यांना या गोष्टीबद्दल फार वाईट वाटत आहे. आता एकजण स्त्री या वाईटांतून चांगले कसे बाहेर काढते पहा -

*हिं. । कोउ कह दूषनु रानिहि नाहिन । बिधि सबु कीन्ह हमहि जो दाहिन ॥५॥*
*। कहँ हम लोक बेद बिधि हीनी । लघु तिय कुल करतूति मलीनी ॥६॥*
*। बसहिं कुदेस कुगाँव कुबामा । कहँ यह दरसु पुन्य परिनामा ॥७॥*
*। अस अनंदु अचिरिजु प्रति ग्रामा । जनु मरुभूमि कलपतरु जामा ॥८॥*
*हिं. दो.। भरत दरसु देखत खुलेउ मग लोगन्ह कर भागु ॥*
*॥ जनु सिंघल बासिन्ह भयउ बिधि बस सुलभ प्रयागु ॥२२३॥*
*म. । राणिस दोष नसे कुणि सांगति । विधि करि सर्व, अम्हां उजवा अति ॥५॥*
*। आम्हिं कुठें श्रुतिजनविधि - हीना । तुच्छ नारि कुल-कर्म-मलीना ॥६॥*
*।वसुं कुनारि कुस्थळिं कुग्रामीं । दर्शन कुठें पुण्यपरिणामी ॥७॥*
*। विस्मय मोद असा प्रतिगांवा । जणुं मरुंत सुरतरु उगवावा ॥८॥*
*दो. । होत भरत - दर्शन खुललें पथ-जन-भाग्य किं आज ॥*
*॥ जणूं सुलभ सिंहलजनां भाग्यें प्रयागराज ॥२२३॥*

**अर्थ** - कोणी म्हणाल्या की यांत राणीचा काही दोष नाही, हे सर्व दैवाने

(विधीने) घडविले (कारण) ते आम्हाला अनुकूल (उजवे) झाले. ।।५।। आम्ही वेदविधिहीन व लोकविधिहीन, तुच्छ, पापी कुळातल्या व पापकर्म करणाऱ्या, कुदेशांत व कुग्रामांत राहणाऱ्या , निंद्य स्त्रिया कुठे व पुण्याचा परिणाम म्हणून मिळणारे हे (भरतांचे) दर्शन कुठे ! ।।६-७।। गांवोगांवी असे आश्चर्य व असा आनंद होत आहे की जणूं मारवाड देशांत कल्पतरूच उगवला असावा ! ।।८।। भरताचे दर्शन होतांच मार्गावरील लोकांचे भाग्य असे खुलले की जणू सिंहल द्वीपात राहणाऱ्या लोकांना भाग्याने प्रयागराजच सुलभ झाला ! ।।दो. २२३।।

**टीका. चौ. - ५ - (१) राणिस दोष नसे कुणि सांगति** - रामसीतालक्ष्मण यांना पायी जाताना पाहून या वनवासी लोकांनी ब्रह्मदेवाला व राजाराणींना पुष्कळ दोष दिला आहे. पण तेच लोक, त्याच वनवासी स्त्रिया, आतां कैकईला दोषी न ठरविता म्हणत आहेत की आपले दैव उघडले म्हणूनच कैकयीला दैवाने तशी बुद्धी देऊन हे सर्व घडविले. **'अवगुण तजुनि सब गुणां ग्रहती' (२।१३१।१) हे भक्तीचे लक्षण येथे दाखविले.**

**चौ. ६-७ (१) आम्ही कुठे श्रुतिजन विधि-हीना...** या पहिल्या चरणाने सुचविले की या कोळी भिल्लांच्या स्त्रिया आहेत. 'लोकिं वेदिं जो नीच सर्वपरिं । छायास्पर्शे स्नान वदति तरि' (१९४।३ टी.प.) 'कपटी कातर कुमति कुजाती ।लोकीं वेदीं बाह्य सब रीतीं' (१९६।१ टी.प.) **(क) तुच्छ नारि कुल-कर्म-मलीना - 'हि अमची अति मोठी सेवा । वस्त्र पात्र की चोरुं न देवा ! ॥ अम्हिं जड जीव जीवगणघाती । कुटिल कुचाली कुमति कुजाती ॥ पाप करत, रात्री दिन जातहि ।.... स्वप्नीं कधिं कोणा रुचि धर्मा' (२५१। ३-६)** 'कुल मलीन' व कर्म मलीन' या शब्दांनी या चौपायांचे सारच थोडक्यांत सांगितले आहे. **(ख) वसुं कुनारि कुस्थानिं कुग्रामीं** - कुलमलीन व कर्म मलीन म्हणून कुनारी. **कुग्राम** - जेथे सत्संगति व सत्कथाश्रवणाची सोय नाही; - ब्राह्मणांची वस्ती नाही; वैद्य नाहीत बाजार नाहीत, शिक्षणाची सोय नाही, मुबलक स्वच्छ पाणी नाही अशांना कुग्राम म्हणतात.

**(२) ल.टे...** कुग्रामात, अस्पृश्य जातीत स्त्रियांचा जन्म मिळाला यावरून ठरते की पूर्वजन्मी काही पुण्यसंग्रह केला नव्हता. या जन्मांत तर पोटाची खाच भरण्यासाठी पाप करण्यातच रात्रंदिवस जातात, धर्माचरण काहीच घडले नाही. आणि भरतांसारख्या रामभक्ताचे दर्शन तर अनंत जन्मींचे अपार पुण्य परिपक्व दशेला येऊन फळ देण्यास योग्य होते तेव्हाच घडते. म्हणून म्हणतात की विधि

सर्वप्रकारे अनुकूल झाला म्हणूनच हे घडले. कवि म्हणतात की **'हा रघुनंदन दर्शनमहिमा' आणि त्याचे फळ भरतदर्शन.**

**चौ. ८ - (१) विस्मय मोद असा प्रति गावा .... उगवावा** - पूर्वजन्मीचे पुण्य नसून व या जन्मी केले नसून हे दर्शन घडले; कारणाशिवाय कार्य घडले हे आश्चर्य गावोगावच्या लोकांस वाटत आहे. **(क) मोद असा** - भरत दर्शनाने येथल्या लोकांस झाला तसा मोद = आनंद, 'गावोगावी असा आनंदू । बघुनि भानुकुल - कैरव - चंदू' (१२२।१) पण त्यावेळी रामदर्शनाने होणाऱ्या आनंदाबरोबर रामचंद्रांच्या दुःखाच्या कल्पनेने मनांत खेद होत होता आणि कोणाला तरी दोष दिले जात होते. तसे मिश्रण या वेळच्या आनंदात नाही. रामदर्शनाने परमपदाचे अधिकारी, शोकमोहविहीन झाल्याचा व भरतदर्शनाचा हा परिणाम आहे. **(ख) जणु मरुत सुरतरु उगवावा** - भरतदर्शन घडणे किती अशक्य आहे हे या उत्प्रेक्षेने सुचविले आहे. मरू देशांत मारवाडांत मरुभूमीत साधा वृक्षसुद्धा आपोआप उगवणे फार दुर्लभ; कल्पवृक्ष तर या पृथ्वीतळावर कुठेच उगवणे अशक्य; तो स्वर्गातच असावयाचा. असे असता तो मारवाडांतील रेताड शुष्क वाळवंटात आपोआप उगवणे हे परम आश्चर्य आणि अलौकिक परमभाग्याचेच लक्षण ! या उत्प्रेक्षेने हेही सुचविले की हे लोक पूर्णकाम झाले आहेत. ऐहिक कामना कोणत्याच राहिल्या नाहीत. कल्पवृक्ष फारतर अर्थ व काम देतो; म्हणून आतां दुसरी उत्प्रेक्षा करतात -

**दो. (१) जणूं सुलभ सिंहलजनां भाग्ये प्रयागराज - सिंहल =** सिंहलद्वीप, हल्ली ज्याला सिलोन म्हणतात ते बेट. हल्लीच्या काळात सुद्धा तेथील लोकांना प्रयागराजाचे दर्शन दुर्लभच. धनहीन, लहानमुले व फार वृद्ध यांना तर होणेच शक्य नाही; पण प्रयागराजच तेथे प्रगट झाला तर कष्टाने का होईना त्यांना दर्शन होऊ शकेल. तसेच भरत स्वतः आपल्या पायांनी प्रत्येक गावावरून जात आहेत. **(क)** रामसीता लक्ष्मणांच्या प्रवासांत ते आल्याची बातमी कळते न कळते तोच तीनच व्यक्ती असल्याने केव्हाच पुढे निघून जात व त्यामुळे बालवृद्धांना त्यांचे दर्शन होणे दुर्लभच झाले; पण भरताच्यापुढे सेनेचा मोठा लोंढा व त्याच्या मागे लाखो लोक व पाठीमागे भरत शत्रुघ्न असल्याने बातमी कळल्यानंतर घरांतून हळूहळू येऊन सुद्धा बालवृद्धांना सहज दर्शन घडत आहे. **(ख) प्रयागराज धर्म** - अर्थ काम व मोक्ष आणि भगवद्भक्तिसुद्धा देऊ शकतो. त्याप्रमाणेच

भरतदर्शनाने बालवृद्धांच्यासुद्धा सर्व कामना पूर्ण होऊन त्यांना सुद्धा ज्ञान व भक्ती यांचा लाभ झाला. रामदर्शन न झालेल्याससुद्धा भरतदर्शन सुलभ झाले. जे अति परम दुर्लभ ते अति सुलभ झाले हे सिंहलद्वीपांत प्रयागराज प्रगट होण्यासारखेच आश्चर्य आहे. यमुना तीरवासी लोकांच्या प्रेमाचे व भाग्याचे वर्णन येथे समाप्त झाले.

**वि. ल. ठे.** - भरतशत्रुघ्न रामलक्ष्मणांसारखेच सर्वप्रकारे रूपलावण्यसंपन्न असून त्यांच्या रूपावर हे लोक का लुब्ध झाले नाहीत ? यांना हृदयांत किंवा नेत्रात लपवून ठेवावे, त्यांच्या मागोमाग चालू लागावे, मन त्यांच्याबरोबर पाठवावे किंवा दिसत नाहीसे झाले म्हणजे त्यांच्या विरहाने शोकाकुल व्हावे इत्यादि गोष्टी येथे का घडल्या नाहीत? यांतच एकान्त, अनन्यभक्तीचे रहस्य भरले आहे. **ज्यांनी आपले हृदय राममय केले त्यांचे मन जगांत इतर कशावरही व कोणावरही लुब्ध होत नाही.** त्यांच्या हृदयांत त्या एका विशिष्ट मूर्तीशिवाय इतर कोणालाही थारा नसतो. भरताच्या रूपाकडे टक लाऊन बघत राहिल्याचे तरी वर्णन आहे का यांत? भरताचे रामप्रेम पाहून रामप्रेमातच सर्व दंग होऊ लागले. ज्याला रामरूपाची चटक लागली तो ताजमहाल किंवा आणखी काही सुंदर कृती कसा बघत राहील !

*हिं.* *। निज गुन सहित राम गुन गाथा । सुनत जाहिं सुमिरत रघुनाथा ॥१॥*
*। तीरथ मुनि आश्रम सुरधामा । निरखि निमज्जहिं करहिं प्रनामा ॥२॥*
*। मनहीं मन मागहिं बरु एहू । सीय राम पद पदुम सनेहू ॥३॥*
*। मिलहिं किरात कोल बनबासी । बैखानस बटु जती उदासी ॥४॥*
*। करि प्रनाम पूँछहिं जेहि तेही । केहि बनु लखनु रामु बैदेही ॥५॥*

*म.* *। निजगुण सहित रामगुण-गाथा । श्रवत जाति चिंतित रघुनाथा ॥१॥*
*। तीर्थां मुनि-आश्रम - सुरधामां । स्नान करिति पाहुनी प्रणामां ॥२॥*
*। मनोमनीं या वरास मागति । सीताराम - चरण - कमलां रति ॥३॥*
*। भेटति भिल्ल कोळि वनवासी । वैखानस बटु यती उदासी ॥४॥*
*। नमुनि पुसति ज्या त्या कुठलेही । वनिं लक्ष्मण राम नि वैदेही ॥५॥*

**अर्थ** - आपल्या गुणांसहित रामगुणगाथा श्रवण करीत व रघुनाथाचे चिंतन करीत भरत जात आहेत. ॥१॥ तीर्थ, मुनींचे आश्रम व देवस्थाने दृष्टीस पडतांच (तीर्थात) स्नान व प्रणाम आणि मुनि - आश्रमांना व देवस्थानांना

प्रणाम करीत आहेत ॥२॥ आणि मनांतल्या मनांत वर मागत आहेत की सीतारामचरण कमलांच्या ठिकाणी रति (दृढ प्रेम) द्या ॥३॥ वाटेने जातांना कोळी भिल्ल व वनवासी, वानप्रस्थ, ब्रह्मचारी, यती (गृहीसाधक) व उदासी (संन्यासी) दृष्टीस पडू लागले. (भेटू लागले) ॥४॥ (तेव्हा) ज्याला त्याला प्रणाम करून विचारू लागले की लक्ष्मण राम व वैदेही कुठल्या वनांत आहेत? ॥५॥

**टीका - चौ. १ - (१) निजगुणसहित रामगुणगाथा श्रवत** - यांत ऐकणे या क्रियेचे कर्म रामगुणगाथा हे आहे; व गाड्यांबरोबर जशी नाड्यांची यात्रा होते, तसेच निजगुण गौण आहेत. नुकताच जो स्त्रियांचा संवाद झाला त्यांत सुद्धा रामगुण - गाथा (कथा)च मुख्य आहे. 'रामलक्ष्मणच आहेत की नाहीत? वय वपु वर्णरूप चाल स्नेहशील तसेच आहे. यांत रामगुणवर्णन आहे की भरतगुणवर्णन? 'रामबंधु कां असा नसावा' यांत रामाचा मोठेपणा मुख्य की भरताचा? आपल्या गुणांचे श्रवण म्हणून यांतले काय टाकता येईल? २२२ व्या दोह्यात केवळ भरतगुण आहेत व थोडेथोडे इतरत्रही आहेत.यावर अशी शंका घेतली जाते की सज्जन **'स्वगुण कानिं पडतां संकोचति'** (३।४६।१) **मग भरतांना संकोच का वाटला नाही? (क) समाधान** - उत्तम गुण, सद्‌गुण ही दैवी संपत्ती आहे. **'असे सकल रघुपतिसंपत्ती'** ही भरताची दृढभावना आहे. दृश्यसंपत्ती जशी रघुनाथाची तशीच दैवीसंपत्तीसुद्धा रघुनाथांचीच असे भरतांस व खऱ्या रामभक्तांस वाटते. स्वतःचे काही गुण आहेत असे त्यांस वाटतच नाही. दोष मात्र स्वतःचे आहेत असे त्यांस वाटते. **'गुण - तुमचे समजे निज दोषा'** (२।१३१।४) हे भक्ताचे लक्षण भरताच्या ठिकाणी असल्याचे दाखविण्यासाठीच कवींनी भरतांस संकोच वाटल्याचे वर्णन केले नाही. भरद्वाजांनी तर भरताची पुष्कळच स्तुती केली; पण तेथे या शंकेखोरांस शंका आलेली नाही ! भरत दोष स्वतःचे कसे मानतात व बोलून दाखवितात हे पूर्वी दिसले, पुढे दिसेल. **(ख) चिंतित रघुनाथा** - भरत जिथे तिथे बहुधा रघुनाथ, रघुवर, रघुपति, रघुराज असेच म्हणत आहेत, जेथे गुण वा रूपाचा संबंध आहे तेथेच बहुधा राम शब्द भरतांनी वापरला आहे. ते रामचंद्रांनाच अयोध्याधीश मानीत आहेत; आणि अशी दृढ भावना आहे की राम रघुनाथ (अयोध्याधीश) झाल्याशिवाय, अयोध्येच्या सिंहासनावर आरूढ झाल्याशिवाय सर्व रघुकुळ अनाथ आहे. राम अयोध्येत कसे येतील, काय प्रार्थना करावी, कसे काय करावे याचे चिंतन चालू आहे. **ल. टे.** येथे रामप्रवास मार्ग

सुटून भरत चित्रकूटाकडे वळले असे पुढील चौपायांवरून ठरते. आतां रामप्रवासांत न दिसलेले निराळेच दृश्य दिसू लागले.

**चौ २-३ (१) तीर्था मुनि - आश्रम - सुरधामां** - तीर्थ मुनिआश्रम व देवालये यांचा उल्लेख रामप्रवासकथेत नाही. कोणी वानप्रस्थ बहु उदासी वगैरे त्यांस मार्गात भेटले नाहीत. यावरून ठरते की रामचंद्रांनी पाचवी वस्ती जिथे केली त्या स्थानाच्या पुढे काही अंतरावर रस्ता बदलला व चित्रकूटच्या आसपासच्या भागांत भरतानी प्रवेश केला. **(क)** तीर्थदर्शन झाल्यावर त्यास वंदन करून मग त्यात स्नान करून पुन्हा वंदन करून मनांतल्यामनांत सीतारामभक्ती - वर मागतात. मुनींच्या आश्रमांना व देवालयांना वंदन करून तसाच व तोच वर मागतात. **राम अयोध्येत परत येऊ देत हे सुद्धा मागत नाहीत** हे विशेष लक्षात ठेवण्यासारखे आहे. राम परमात्मा आहेत हे भरत जाणतात त्यामुळे त्यांची इच्छा असली तरच ते घडणार व तीर्थमुनि व देव वगैरे कोणीही रामेच्छाविरुद्ध काही करू शकत नाहीत, अशी त्यांची खात्री आहे; आणि अशी प्रार्थना करणे म्हणजे स्वामिविरोध ठरतो, हा सेवकाचा धर्म नाही. यावरून **भक्तीमार्गी साधकानी काय तो बोध घ्यावा.** रामगिरियात्रेतसुद्धा असेच केले आहे. **सर्व करूनि रति रामपदिं मागति एक फळाहि'** (२।१३९) हे रामभक्तीचे व भक्ताचे लक्षण दाखविले. वाल्मीकींनी १४ भवनांची वर्णिलेली बहुतेक लक्षणे भरतांच्या ठिकाणी सापडतील. शोधून तुलना करणे हा एका स्वतंत्र लेखाचा विषय आहे. हे कार्य वाचकांवर सोपविणेच भाग आहे. **(ख) मनोमनीं या वरास मागति** - रामचरण - रति द्या असे वारंवार मोठ्याने म्हणण्याने ओळखीच्या लोकांत प्रतिष्ठा वाढण्याचा संभव असतो; म्हणून आपली भक्तिभावना शक्य तितकी गुप्त ठेवण्याचा कसून प्रयत्न करावा **हा उपदेश येथे मिळतो.** प्रयागास भीक मागितली असल्याने मोठ्याने मागणे भागच होते व कोणी परिचित व्यक्ती तेथे नव्हत्या. शृंगवेरपुरास गंगेजवळ सहज स्नेह मागितला त्यावेळी बाकीची मंडळी स्नान उरकून गेली होती.

**चौ. ४ - (१) वैखानस बटु यती उदासी - यती =** ज्याने सर्व इंद्रिये उत्तम प्रकारे जिंकली आहेत त्यास यति किंवा यती म्हणतात : 'ये निर्जितेंद्रियग्रामा यतिनो यतयश्च ते' (अमरे) यति = संन्यासी हा अर्थ अमरकोशांत नाही. **येथे यती = परमार्थ साधक गृही** असा अर्थ घेणे जरूर आहे. 'प्रमुदित होती तीर्थ पतिवासी । वैखानस बटु **गृही** उदासी' (२०६।९) भरत चरित्र वर्णनांतच हे

आहे. येथे वैखानस बटु यती उदासी' असे म्हणून सुचविले की गृही असलेले यती = परमार्थ साधन, इंद्रीयजयाचा यत्न करणारे. वानप्रस्थ, ब्रह्मचारी, गृहस्थ असून एकटेच तपश्चर्येसाठी येऊन राहिलेले यती = गृहीसाधक व उदासी = संन्यासी, मुनि, ज्ञानी; असेच लोक या भागांत रहात आहेत व **विषयी बद्ध लोक या भागात नाहीत हे येथे दाखवित आहेत.**

**चौ. ५ - (१) नमुनि पुसति ज्या त्या** - कोळी भिल्लांनासुद्धा नमस्कार कसा केला? हा नमन भक्तीचा नमुना आहे. 'सिताराममय सब जग जाणुनि । करतो प्रणति पाणियुगं जोडुनि' (१।८।२) 'प्रणमे दण्डवद्भूमौ आश्वचाण्डाल गो खरान्' (भाग.) भरत आर्त आहेत व त्या लोकांकडून माहिती मिळवावयाची आहे म्हणून नमस्कार केला असे म्हणणे म्हणजे भरत स्वार्थसाधू, कपटी आहेत असे ठरविण्यासारखे आहे. तुलसीदासांनी वंदन प्रकरणांत जडचेतनादि सर्वांना हातजोडून नमस्कार केला तेथे कोणी शंका का घेत नाहीत? कुत्रा, चाण्डाल, गाय, गाढव यांनासुद्धा दण्डवत नमस्कार करणे अयोग्य नाही **(क) 'ज्याला त्याला विचारले'** ही स्वभावोक्ती आहे. हे अधीर झाल्याचे लक्षण आहे. आणि रामकथा यश श्रवण करण्यास सापडावे हाही त्यांत गौण हेतु आहे. कोणाला माहित असेल कोणाला नसेल. कोळी भिल्लांनी त्यांना वनांत हिंडताना, शिकार करतांना वगैरे पाहिले असतील व बाकीच्यांनी मुद्दाम जाऊन पाहिले असतील असे वाटणे स्वाभाविक आहे.

*हिं. । ते प्रभु समाचार सब कहहीं । भरतहि देखि जनम फलु लहहीं ॥६॥*
*। जे जन कहहिं कुसल हम देखे । ते प्रिय राम लखन सम लेखे ॥७॥*
*। एहि बिधि बूझत सबहि सुबानी । सुनत रामवनबास कहानी ॥८॥*
*दो. । तेहि बासर बसि प्रातहीं चले सुमिरि रघुनाथ ॥*
*॥ रामदरस की लालसा भरत सरिस सब साथ ॥२२४॥*
*म. । ते प्रभु समाचार सब कथिती । भरती बघुनि जन्मफळ लुटिती ॥६॥*
*। जे कुणि वदले कुशल बघितले । प्रिय राम नि लक्ष्मण सम गणले ॥७॥*
*। असे पुसति सकलांस सुवाणीं । श्रवति रामवनवास - कहाणी ॥८॥*
*दो. । त्या दिनिं वसुनि, सकाळिं ही स्मरुनि निघति रघुनाथ ॥*
*॥ रामदर्शना लालची भरतासम सब साथ ॥२२४॥*

**अर्थ** - ते प्रभूंचा सर्व समाचार सांगू लागले व भरताला पाहून जन्मफळ

लुटू लागले. ॥६॥ आम्हीं कुशल पाहिले असे जे म्हणतात ते रामलक्ष्मणांसारखे प्रिय वाटू लागले. ॥७॥ याप्रमाणे सर्वांना प्रेमळ, नम्र वाणीने (सुवाणीं) विचारू लागले व रामवनवासाची कहाणी श्रवण करू लागले. ॥८॥ त्या दिवशी (रात्री) वस्ती करून सकाळीच रघुनाथांचे स्मरण करून निघाले. भरत व त्यांचे सर्व साथीदार या सर्वांना रामदर्शनाची लालसा (लालच) सारखीच आहे. (लालची झाले आहेत.) ॥दो. २२४॥

**टीका. चौ. ७ - ८ - (१) प्रिय राम नि लक्ष्मण सम गणले** - वैखानस बटु यती, उदासी वगैरेंना आपल्यापेक्षा श्रेष्ठ मानून रामासारखे प्रिय मानले; व कोळी भिल्ल वगैरेंना लक्ष्मणासारखे प्रिय मानले. भरत लक्ष्मणापेक्षा वयाने मोठे - **(क) पुसति सकलांस** - सर्वांना विचारणे हे प्रेमाधिक्य व रामगुणयशमहिमा श्रवण करण्याची लालसा = लालच दाखविते. कहाणी = गोष्ट; (२१६।६ टी. पहा.)

**दो. - (१) रामदर्शना लालची - लालची = लालच, लालसा उत्पन्न झालेले = रामदर्शनलोभी. साथ = संगतीतले लोक = साथीदार;** शत्रुघ्न, रामसखा, सचिवसुत, मित्र व सेवक, जे भरताबरोबर यमुनेपासून चालत आले ते. या सगळ्यांना आता रामदर्शन लालसा भरतासारखीच उत्पन्न झाली आहे. हा संगतीचा परिणाम ! - पुन्हा येथे रघुनाथ शब्दच वापरला ! २२४।१ टीकेत पहा. (क) **ल.ठे... हा आठवा मुक्काम** भरतांनी यमुनेपासून २५ मैलांपेक्षा अधिक दूर आल्यावर केला. विवेकजहाजाचा जो आधार घेतला त्याचा हा परिणाम आहे; पण आतां पुढल्या प्रवासांत ही गति एकदम फारच मंद झालेली दिसेल !

*हिं.* ***। मंगल सगुन होहिं सब काहू । फरकहिं सुखद बिलोचन बाहू ॥१॥***
***। भरतहि सहित समाज उछाहू । मिलिहहिं रामु मिटिहि दुख दाहू ॥२॥***
***। करत मनोरथ जस जियँ जाके । जाहिं सनेह सुराँ सब छाके ॥३॥***
***। सिथिल अंग पग मग डगि डोलहिं । बिहबल बचन पेम बस बोलहिं ॥४॥***

*म.* ***। मंगल शकुन होति सकलानां । स्फुरण सुखद भुजविलोचनानां ॥१॥***
***। सह समाज भरता उत्साहो । दिसतिल राम जाइ दुखदाहो ॥२॥***
***। करिति मनोरथ जे ज्यां सुचती । स्नेह - सुरा - उन्मत्त चालती ॥३॥***
***। शिथिल अंग पद पथिं लटपटती । प्रेमें विव्हळ वचनें वदती ॥४॥***

**अर्थ** - सर्वांना मंगल शकुन होऊ लागले; (व) बाहू व नेत्र यांचे सुखदायक

स्फुरण होऊ लागले.॥१॥ समाजासहित भरताला उत्साह वाटू लागला की राम भेटतील (दर्शन होईल) व दुःखजनित दाह शान्त होईल (जाईल) ॥२॥ ज्याला जसे सुचतात तसे मनोरथ करीत प्रेम मदिरेने उन्मत्त होऊन चालत जात आहेत.॥३॥ शरीरे शिथिल झाली आहेत, रस्त्याने चालताना पाय लटपटत (झोकांडी जात) आहेत व प्रेमाने विव्हळ वचने बोलत आहेत.॥४॥

**टीका. चौ. १-२ (१) सुखद भुज-विलोचनांनां स्फुरण** - पुरुषांचा उजवा बाहू व उजवा डोळा स्फुरण पावणे व स्त्रियांचा डावा बाहू व डावा डोळा स्फुरण पावणे सुखद असते. नेत्रबाहूंच्या शुभस्फुरणाचे फळ, फार प्रिय असेल त्याची भेट होणे हे आहे. **'मानसांत शुभाशुभ शकुन' प्रकरण प्रस्तावना पृ. ६७२ पहा.** या शकुनांनी सर्वांना खात्री वाटू लागली की रामदर्शन होणार. **'भेटति राम शकुन शुभ होती'** (७।१।७)

**चौ. ३-४ (१) स्नेह - सुरा - उन्मत्त चालती** - येथे रामस्नेहाला सुरा = मदिरा म्हणून दारुड्याचे पूर्ण रूपक केले आहे. तो प्रथम काहीतरी पुटपुटत असतो, तसे हे पायी चालत जाणारे मनोरथ करीत आहेत. अंग ढिले पडते पण तसाच चालत असतो; पाय लटपटतात, झोकांडी जातात; व काहीतरी असंबद्ध बडबड करीत असतो; तसेच यांचे चालले आहे. अशा दशेत चालण्याची गति मंद पडणारच. **(क)** अरण्य काण्डांत **सुतीक्ष्णाच्या प्रेमोन्मत्त दशेचे असेच वर्णन आहे**; फक्त मदिरा प्यायलेल्याचं रूपक नाही इतकेच. **'प्रेमपूरिं मुनि बुडले ज्ञानी । वदवें ना ती दशा भवानी ! ॥ पंथ दिशा विदिशा समजे ना । कोण कुठें मी जात कळे ना ॥ मागें वळे पुन्हां कधिं फिरतो । कधिं गुणगानीं नृत्या करतो ॥ प्रेमभक्ति अविरल मुनि लाहे'** (३।१०।१०-१३). ॥ प्रेमभक्ति अविरल हे पावति' (हे = चालत जाणारे भरतादि) हे वरील रूपकाचे सार आहे. **'प्रेमदशा ऐसी लाभेल जयासी । राम तया पासी सन्निधचि ॥** (प्रज्ञा)

*हिं.* *। रामसखाँ तेहि समय देखावा । सैल सिरोमनि सहज सुहावा ॥५॥*
*। जासु समीप सरित पय तीरा । सीय समेत बसहिं दोउ बीरा ॥६॥*
*। देखि करहिं सब दंड प्रनामा । कहि जय जानकि जीवन रामा ॥७॥*
*। प्रेम मगन अस राजसमाजू । जनु फिरि अवध चले रघुराजू ॥८॥*
*दो.* *। भरत प्रेमु तेहि समय जस तस कहि सकइ न सेषु ॥*
*॥ कबिहि अगम जिमि ब्रह्म सुखु अह मम मलिन जनेषु ॥२२५॥*

म. *। रामसखा त्या समयिं दाखवित । शैल-शिरोमणि सहज सुशोभित ॥५॥*
*। तया समीप पयस्विनि-तीरा । सीतेसहित वास दो वीरां ॥६॥*
*। बघुनि करिति दण्डवत् प्रणामा । मुखिं जय जानकि जीवन रामा ॥७॥*
*। बुडे प्रेमिं नृपसमाज यापरिं । जणुं रघुराज गमन नगरा करि ॥८॥*

दो. *। प्रेम भरतमनिं तैं जसें वदवे ना शेषास ॥*
*॥ कवि-अगम्य जस ब्रह्मसुख मी - मम - मलिन जनास ॥२२५॥*

**अर्थ** - त्या समयी रामसख्याने सहज सुशोभित असलेला शैलशिरोमणि सर्वास दाखविला.॥५॥ (आणि सांगितले की) त्याच्या समीपच पयस्विनी नदीच्या काठी सीतेसहित दोघां वीरांचे वसतिस्थान आहे.॥६॥ तो पाहून जय जय जानकि जीवन राम, असे म्हणत सर्व दण्डवत नमस्कार करू लागले.॥७॥ या प्रमाणे राजसमाज प्रेमात असा बुडला (मग्न झाला) आहे की जणू रघुराज (आतांच) अयोध्या नगरास (परत) जाण्यास निघाले आहेत !॥८॥ त्या वेळी भरताच्या मनात जसे प्रेम आहे तसे त्याचे वर्णन शेषालाही करता येणार नाही व कवीला तर ते तसे अगम आहे जसे मी व मम (अहंता व ममता) यांनी मलीन झालेल्या मनुष्यास ब्रह्मसुख ॥दो. २२५॥

**टीका. चौ. ५-६ (१) त्या समयिं** रामसखा सहज सुशोभित शैलशिरोमणि दाखवित - **त्या समयि** - ज्या वेळी सर्व मंडळी प्रेमसुरेने उन्मत्त झाली आहे व मार्ग आक्रमण होत नाहीसा झाला आहे त्या वेळी गुहाने कामदगिरि दाखविला. याच्या जवळच चित्रकूट आहे. या वेळीच हा पर्वत दिसू लागला. हा दाखविला म्हणजे रामदर्शनाच्या उत्सुकतेने सर्व वृत्तीवर येऊन भराभर चालू लागतील हा गुहाचा यांत हेतु आहे. यावरून हे प्रथम ठरते की **निषादराजाने हा गिरि व त्याच्या जवळील रामनिवासस्थान पूर्वी स्वतः पाहिले असले पाहिजे.** नंतर हे ठरते की त्याचा स्नेहसुरामद हा पर्वत दृष्टीस पडताच प्रथम उतरला. हा पर्वत चित्रकूटापेक्षा अधिक उंच आहे म्हणून आधी दिसला. कामदगिरि व पयस्विनी या विषयी (१३३।२-३) पूर्वी लिहिले आहे. **(क) सीतेसहित वास दो वीरां** - ते दोघे (रामलक्ष्मण) वीर असल्यामुळे निर्भयपणे वनांत रहात आहेत व ते दोघे वीर बरोबर असल्याने सीता सुद्धा निर्भयपणे रहात आहे.

**चौ. ७-८ (१) दण्डवत् प्रणामा करिति** - वाहनांतून उतरून प्रणाम केल्याचा उल्लेख नाही म्हणून हे वचन फक्त पायी चालत जाणाऱ्या भरतादिकांविषयीच

आहे. (क) **बुडे प्रेमिं नृपसमाज यापरिं - नृपसमाज** = अयोध्यावासी सर्व लोक. **'उत्तम वाहनिं मुनिवर पुढतीं । मागें राजसमाजहि निघती'** (२२१।५) यावरून ठरते की आठव्या मुक्कामानंतर चालण्याचा क्रम बदलला आहे. भरतादिक सर्वांच्या पुढे आहेत; त्यांच्या मागे राज समाज आहे. मुनिवर व विप्र त्यांच्या मागे आहेत व सैन्य सर्वांच्या मागे आहे. जेव्हा त्या पर्वताकडे बघून हात जोडून 'जय जय जानकिजीवनराम' असा जय जयकार करीत असलेले मागल्या लोकांच्या दृष्टीस पडले तेव्हा त्यांना ही समजले आणि सर्वच **या परिं** = या प्रमाणे = 'जय जय जानकिजीवनराम' म्हणून जयजयकार करू लागले. **(ख) जणुं रघुराज गमन नगरा करि** - याने हे दाखविले की सर्वांच्याच हृदयांत एकच लालसा आहे की रामचंद्रांनी वनांतच राज्याभिषेक करवून घेऊन मोठ्या थाटाने अयोध्येस परत जावे. राम तसे परत जाण्यास निघाले असता प्रेममग्न होऊन सर्व लोक जसा 'जय जय जानकि जीवन राम' वगैरे जयजयकार करू लागले असते तसाच जयजयकार अत्यंत प्रेममग्न होऊन सर्व राज समाजसुद्धा करीत आहे. पण उत्प्रेक्षेने कवि सुचवितात की हा मनोरथ केवळ कल्पनाच ठरणार आहे.

**दो.** (१) **प्रेम भरत मनिं तैं जसें** - शैलशिरोमणि दिसल्यावर भरताशिवाय इतरांच्या हृदयांत जे प्रेम उत्पन्न झाले त्याचे वर्णन कवींनी केले; पण भरताच्या हृदयांत जसे - ज्या प्रकारचे प्रेम उत्पन्न झाले व त्यामुळे त्यांची जी दशा झाली ती **कवि - अगम्य** आहे. गोस्वामी म्हणतात की कोणत्याही कवीला ते प्रेम, ती प्रेमदशा, यांची कल्पनासुद्धा करता येणार नाही व त्याचे यथार्थ वर्णन तर सहस्र मुखांचा शेष सुद्धा करू शकणार नाही. सारांश ते प्रेम कल्पनातीत व अनिर्वचनीय आहे. भरताचे राम प्रेम कवींना कसे अगम्य आहे याला दृष्टान्त देतात. **(क) जस ब्रह्मसुख मी मम - मलिन जनास** - हिंदीतील 'अहमम = अहं मम' 'अहंममेत्ययं बन्धः, नं अहं मम इति मुक्तता' (श्रुति) अहं = अहंता, मीपणा, मी मी असे वाटणे, आणि मम = माझे असे वाटणे = ममता हाच बंध आहे, हीच अविद्या आहे. अशा मायेने ज्याचे चित्त मलीन झाले आहे, त्याला जशी ब्रह्मसुखाची कल्पनासुद्धा करता येत नाही तशी कविंना या भरतप्रेमाची कल्पनासुद्धा करता येणे शक्य नाही. **(ख)** येथील **'शेष'** शब्दाचा अर्थ लक्ष्मण असा समजून कोणी म्हणतात की, लक्ष्मणांस या प्रेमाची कल्पना

करता येईल. हे म्हणणे पुढील भाग ज्यांनी एकदाही वाचला किंवा ऐकला नाही अशांनाच शोभेल ! कारण की वस्तुस्थिती याच्या अगदी उलट आहे, हे पुढील अद्‌भुत व अनपेक्षित बिकट प्रसंगावरून कळेल.

*हिं.* *। सकल सनेह सिथिल रघुबर कें । गए कोस दुइ दिनकर ढरकें ॥१॥*
*। जलु थलु देखि बसे निसि बीतें । कीन्ह गवन रघुनाथ पिरीतें ॥२॥*
*। उहाँ रामु रजनी अवसेषा । जागे सीयँ सपन अस देखा ॥३॥*
*। सहित समाज भरत जनु आए । नाथ बियोग ताप तन ताए ॥४॥*
*। सकल मलिन मन दीन दुखारी । देखीं सासु आन अनुहारी ॥५॥*

*म.* *। रामस्नेह-शिथिल सगळे जरि । दोन कोस गत अस्त होय तरि ॥१॥*
*। वसले स्थल जल बघुनि; उजाडत । रघुनाथप्रेमें गमना कृत ॥२॥*
*। राम पहाटें उठले तिकडे । सीता सांगे स्वप्न तिज पडे ॥३॥*
*। सहित समाज भरत आले जणुं । नाथ वियोगज - ताप - तप्त - तनु ॥४॥*
*। दुःखी दीन उदास हि सारीं । सासू दिसल्या कशाच भारी ॥५॥*

**अर्थ** - सगळे लोक रामस्नेहाने जरि शिथिल झाले आहेत तरि सूर्यास्त झाल्यानंतर सुद्धा दोन कोस गेले.॥१॥ रात्री जागा व पाणी यांची सोय पाहून राहिले व उजाडताच रघुनाथप्रेमाने निघाले - गमन केले.॥२॥ तिकडे राम पाहटेसच जागे झाले तेव्हा सीतेने तिला पडलेले स्वप्न सांगितले - ॥३॥ जणू सर्व समाजासह भरत आले - आहेत व नाथ वियोगाच्या तापाने तप्त होऊन ते शरीराने कृश (तनु) झाले आहेत.॥४॥ सर्वच मंडळी दुःखी दीन व उदास आहेत व सासवा तर अगदी कशाशाच (सौभाग्य चिन्ह रहित विधवांसारख्या) दिसल्या ! ॥५॥

**टीका. चौ. १-२ (१) रामस्नेहशिथिल सगळे... अस्त होय तरि** - रामदर्शनाची उत्कंठा किती लागली आहे व त्यासाठी देहकष्टांकडे कसे दुर्लक्ष झाले हे या चौपाईत दाखविले. शैल दर्शनाने सर्वांना हुरूप - जोम आला असे पूर्वीच सांगितले आहे. आधीच स्नेहाने शिथिल झालेले; त्यांत सकाळीच निघून विश्रांति न घेता केवळ मनाच्या उत्साहाने व जोरावर सर्व दिवसभर चालून अगदी दमून गेले असले तरी सूर्यास्त केव्हा झाला हे समजलेसुद्धा नाही; चालले आहेत रामस्नेह सुरामस्त होऊन ! **'मन तिथं जिथ रघुवर वैदेही । मन विण तन सुख दुःख कसें ही ?'** (२७५।४). पण जेव्हा काळोख पडला व दिसतच नाहीसे झाले तेव्हा

नाइलाज झाला. चांदणी रात्र असती तर रात्रभर चालले असते ! मग जेथे पाणी चकाकताना दिसले व रात्रभर उतरण्यासारखी सपाट जागा दिसली तेथे उतरले. **(क) रात्रीं नुसतें पाणी पिऊनच सर्व लोक राहिले** हे फक्त जलाचाच उल्लेख करून सुचविले. पूर्वी **'यथासमय सुख सकल पावती'** (२२१।१) हा जसा उल्लेख केला तसा येथे नाही. या रात्री कोणासच झोप आली नसेल. उजाडण्याची वाट बघत पडल्या पडल्या राम व भरत यांच्या विषयीच्या चर्चेतच रात्र संपली असेल.

**चौ. ३-४ (१) राम पहाटें उठले तिकडे** - राम नेहमीच पाहटेस = उषःकाळी - उठत असत; तसे अजूनही उठतात हे येथे दाखविले. सीता उठल्याचा उल्लेख नाही; यावरून ठरते की राम जागे होण्यापूर्वीच सीतामाई उठल्या होत्या व प्रभु केव्हा जागे होतात व पडलेले स्वप्न केव्हा एकदा सांगते अशा उत्कंठेने वाट पहात बसल्या होत्या. स्वप्न ऐकल्याबरोबर प्रभु लक्ष्मणाशी बोलू लागले आहेत. (चौ.७) यावरून ठरले की - लक्ष्मण हजरच होते. शृंगवेरपुरापासून लक्ष्मण जागत राहून पाहरा करू लागले तो त्यांचा क्रम चालूच आहे. **(क) तिकडे** - या शब्दाने सुचविले की कविराज जे सुमंत्राबरोबर इकडे आले ते अद्याप चित्रकूटला रामसमीप गेले नाहीत. भक्त शिरोमणि भरताची संगति सोडून थोड्या वेळेसाठी तिकडे कोण जातो ? इथे तिथे; इकडे तिकडे, आले गेले या शब्दांनी सुचविलेला फरक मानसांत सर्वत्र आढळतो व पुष्कळ वेळा गूढभाव सूचक असतो. **(ख) सीता सांगे स्वप्न तिज पडे** - आज प्रचलित असलेल्या कोणत्याही रामायणांत या स्वप्नाचा उल्लेख नसला तरी तुलसीदासांनी ही कथा कपोलकल्पित लिहिली असे, जे कूपमण्डूक असतील तेच म्हणतील. **या विषयी विस्तुत चर्चा प्रस्तावनेत 'श्रीरामचरितमानस विचित्र - कथा प्रबंध'** (पृ. १२४-१४२) **या प्रकरणांत पहावी.**

**सूचना - भरताचे या शेवटच्या मुक्कामासुद्धा नऊ मुक्काम झाले.** १. तमसा, २. गोमती, ३. सईतीरी, ४. गंगातीरी शृंगवेरपुरास, ५. प्रयागांत, ६. यमुनेच्या मार्गांत (२२०।८) ७ यमुनातीरी (२२१।१), ८ कामदगिरि दिसला त्याच्या पूर्वी रात्री (२२४), ९ सूर्यास्त झाल्यावर दोन कोस चालून आल्यानंतर केला तो शेवटचा (२२६।१). दाहव्या दिवशी रामभरतभेट होणार. **(क) भरत रामवनवासाच्या ४३ व्या दिवशी अयोध्येतून निघाले** हे पूर्वी दाखविले आहे. म्हणजे **रामवनवासाच्या ५२ व्या दिवशी** रामचंद्रांस भरत भेटणार. राम वैशाख

शुद्ध पंचमीला वनवासास निघाले. ४ + ५२ = ५६; म्हणजे **ज्येष्ठ वद्य - द्वादशीला भेट होणार.** शेवटच्या मुक्कामाच्या दिवशी एकादशी असणार; व म्हणूनच सर्व जलाहार करून राहिले. **(ख)** राज्याभिषेकाच्या तयारीच्या दिवशी, म्हणजे वनवासाच्या पूर्व दिवशी सीता व राम यांना **अंग स्फुरणाचा जो शुभशकुन झाला** (२।७।४-७ टी.प.) **त्याचे फळ ५३ वे दिवशी त्यांना मिळणार.**

***हिं.*** ***। सुनि सिय सपन भरे जल लोचन । भए सोचबस सोच बिमोचन ॥६॥***
***। लखन सपन यह नीक न होई । कठिन कुचाह सुनाइहि कोई ॥७॥***
***। अस कहि बंधु समेत नहाने । पूजि पुरारि साधु सनमाने ॥८॥***

***म.*** ***। स्वप्न ऐकुनी सजल विलोचन - । होति शोचवश शोचविमोचन ॥६॥***
***। स्वप्न बरें हे लक्ष्मण ! नाहीं । अशुभ खबर कुणि देइल काहीं ॥७॥***
***। स्नान बंधुसह करुनीं पूजिति - । त्रिपुरारिस साधुंस सन्मानिति ॥८॥***

**अर्थ** - (सीतेचे) स्वप्न ऐकून (रघुनाथाचे) नेत्र अश्रूंनी भरले व (इतरांची) चिंता हरण करणारे स्वतः चिंतातुर झाले; (शोच = चिंता) ॥६॥ (व लक्ष्मणाला म्हणाले) लक्ष्मणा ! हे स्वप्न चांगले नाही; कोणी काहीतरी अशुभ समाचार (खबर) सांगणार (देणार) ॥७॥ मग बंधूसह स्नान केले आणि त्रिपुरारीचे व साधूंचे पूजन करून त्यांचा सत्कार केला.॥८॥ कुचाह = वाईट समाचार, खबर.

**टीका. चौ.** ६-७ **(१) होति शोचवश शोचविमोचन** - श्रीरामाची ही माधुर्यलीला, हे नरनाट्य ऐकून त्यांच्याविषयी मनुष्य भावना उत्पन्न होऊ नये म्हणून पथसंरक्षका प्रमाणे येथे कवि सावध करण्यास हजर आहेत. **(क) शोचविमोचन** - भक्तांचा शोक, चिंता इत्यादी नाहीसा करणारे परमात्मा, हे आहेत असे कवि बजावीत आहेत. या शोचविमोचन शब्दाने आणखी हे सुचविले की समाजासहित भरताचा शोक राम नाहीसा करणार, त्या सर्वांना शोकमुक्त करणार. मारीच वधानंतरसुद्धा येथल्यासारखीच चिंतेची बतावणी केली आहे. **'चिंता बाह्य** विशेषें दावति' (३।३०।१)

**(२) होति शोचवश** - भगवंताच्या या चिंतातुर होण्यात फारच गूढ हेतू आहे. भरताचे रामप्रेम व राम दुःखाने भरत कसे दुःखी होतात हे आतापर्यंत दाखविले. **रामदुःखाने रामसेवामूर्ति लक्ष्मण कसे व किती दुःखी होतात हे दाखविण्याची जबाबदारी प्रभूंनी आपल्यावर घेऊन** त्याचा पाया म्हणून **हे चिंतेचे नाट्य सुरू केले आहे.** राम दुःखी झाले म्हणून भरताने - आपल्या जननीची निर्भर्त्सना करून

तिचा त्याग केला, राज्याचा व सर्वस्वाचा त्याग केला. रामदुःखाने व्याकुळ होऊन ते दुःख निवारण करण्याच्या इच्छेने लक्ष्मण कशाचा व किती त्याग करण्यास सिद्ध होतात व रामदुःखाचे कारण बनणाऱ्या भरताला व त्यांना मदत करणाऱ्या स्वतःच्या सहोदराला - पाठच्या भावालाही ठार मारण्यास लक्ष्मण सिद्ध होतात व इतक्या थराला हा प्रसंग जाऊन पोचला तरी राम अगदी मौन ? रामसेवेसाठी लक्ष्मणाने अलौकिक त्याग केला हे दिसले आहे. पण रामदुःखाचे कारण ठरणाऱ्या आपल्या सहोदरासहित भरतावर लक्ष्मणाचे प्रेम आहे की नाही हे दिसले नाही; तेच येथे भगवान स्वतः दाखविणार आहेत. त्या नाटकाची नांदी म्हणजे हे चिंतातुर होणे व पुढील लक्ष्मणाशी केलेले संदिग्ध भाषण आहे. **(क) अशुभ खबर कुणि देइल काहीं** - हे वचन संदिग्ध आहे. याच वचनाने व प्रभूच्या चिंतेच्या नाट्याने लक्ष्मणाला पुढील घटनेतील खरा हेतु कळू दिला नाही. हे वचन व यांतील **'खबर देईल' हे शब्द नीट ध्यानात ठेवावे** म्हणजे नीतिरसाने रणरसाचे विक्राळ रूप कसे धारण केले हे कळेल.

**चौ. ८ - (१) स्नान करुनिं पूजिति त्रिपुरारिस, साधुंस** - राम रोजच स्नानसंध्या झाल्यावर पार्थिव पूजेच्या रूपाने शिवपूजन करीत असतात. (२।१०३।१ व १०६।६ पहा.) मात्र येथे शिव न म्हणता पुरारि = त्रिपुरारि म्हणण्यात हेतु आहे. **त्रिपुरारि** = त्रिपुरासुरांचा संहार करणारे. अशुभ स्वप्नाने सुचविलेल्या अरिष्टाचा विनाश त्यांनी करावा या हेतूने पूजन केले; व त्याच हेतूने मुनि, तापसी इ. साधूंचे पूजन करून त्यांस कंदमूलादि समर्पण करून स्तुति, नमस्कार इत्यादींनी त्यांचा सत्कार केला. दुःख प्रदोष परिहरार्थ हे केले. 'धर्ममार्ग चरित्रेण' (श्रुति) आचरण करून दाखविला. या गोष्टी भरताने मामाकडे असता करून दाखविल्या आहेत (१५७।६-८ पहा). 'अशुभ खबर देईल' याची प्रतीति ताबडतोब !

*हिं. छं. । सनमानि सुर मुनि बंदि बैठे उतर दिसि देखत भए ।*
*॥ नभ धूर खग मृग भूरि भागे बिकल प्रभु आश्रम गए ॥*
*। तुलसी उठे अवलोकि कारनु काह चित सचकित रहे ।*
*॥ सब समाचार किरात कोलन्हि आइ तेहि अवसर कहे ॥१॥*

*सो. । सुनत सुमंगल बैन मन प्रमोद तन पुलक भर ॥*
*॥ सरद सरोरुह नैन तुलसी भरे सनेह जल ॥२२६॥*

*म. छं. । मानूनि सुर मुनि नमुनि बसले उत्तरेला बघति जैं ।*

*॥ नभिं धूळ खगमृग भूरि पळुनी भीत आश्रमिं येति तैं ।*
*। तुलसी उठोनी बघुनि, कारण काय चिंतिति चकित जों ।*
*॥ सब खबर कोळी भिल्ल येउनि सांगती प्रभुला हि तों ॥१॥*
सो. *। श्रवुनि सुमंगल वाणि प्रमुदित मन तन पुलक युत ॥*
*॥ तुलसी स्नेहज पाणि शरद - सरोरुह विलोचनिं ॥२२६॥*

अर्थ - देवांचा सन्मान व मुनींना नमन करून प्रभु बसले व (सहज) उत्तर दिशेकडे जेव्हा पाहिले तेव्हा आकाश धुळीने भरलेले व पुष्कळ पशुपक्षी भयभीत होऊन पळत पळत आश्रमाकडे येत आहेत असे दिसले. तुलसीदास म्हणतात की, प्रभूंनी उठून पाहिले व कारण काय बरे असावे अशा चिंतेने जो चकित होतात तोच कोळी भिल्लांनी येऊन प्रभूला सर्व खबर दिली (समाचार सांगितला) ॥छंद॥ ती अति मंगलकारक वाणी ऐकून प्रभूंचे मन प्रमुदित झाले, शरीर रोमांचांनी भरले व शरदांतील सरोरुहासारख्या नेत्रांत स्नेहामुळे पाणी भरले (स्नेहाश्रू आले) असे तुलसीदास सांगतात.॥ सोरठा ॥.

**टीका. - छंद (१) - उत्तरेला बघति** - सीतास्वप्नांत दोन भाग होते = भरताचे आगमन व सासूंचे विद्रूप दिसणे. पण प्रभूंनी सांगितले की हे स्वप्नच अशुभ सूचक आहे. भरतभेटीची तर अत्यंत उत्कंठा लागली आहे; परंतु नरनाट्य करून लक्ष्मणाचे रामदुःखदुःखित्व व कोमल स्वभाव प्रगट करून दाखविणे आहे; म्हणून भरतभेटीची उत्कंठा बाहेर दाखविली नाही. पण भक्त मीलनलालसा कशी स्वस्थ बसू देणार ! मनाने डोळ्यांना अयोध्येच्या दिशेकडे वळविलेच. **(क) नभिं धूळ** - एवढी धूळ भराभर आकाश भरीत अहे याचे कारण तरी काय ? उत्तरेकडून पशुपक्षी भराभर इतक्या मोठ्या संख्येने का बरे धावत येत आहेत ? अशी जिज्ञासा उत्पन्न झाली; व ती स्वस्थ बसू देईना तेव्हा **(ख) उठोनि, बघुनि चकित, चिंतिति कारण काय ?** उठले, उत्तरेस पाहिले मात्र तो आश्चर्य चकित झाले व चिंता उत्पन्न झाली की हे आहे तरी काय ? पशुपक्षी इतके भयभीत कशाने झाले ? ही चिंतातुर मुद्रा पाहून लक्ष्मणाला काय वाटले असेल याचा विचार वाचकांनी करावा ! असे चिंतेने, चकित होऊन बघत आहेत तोच कोळीभिल्लांनी येऊन खबर दिली की भरत सर्व समाजासह येत आहेत. **या बातमीत सैन्य आल्याची बातमी नाही**; ती पुढे दुसरे लोक येऊन सांगणार आहेत. (चौ. २ पहा).

**सोरठा - (१) श्रवुनि सुमंगल वाणि** - भरतागमनाचा समाचार हीच प्रभूंना सुमंगल वाणी वाटली. **स्नेहज =** स्नेहापासून जन्मलेले; स्नेहामुळे आलेले पाणी म्हणजे स्नेहाश्रू = (स्नेहजल सनेहजल) भरताच्या आगमनाची बातमी भगवंतांस सुमंगल अतिकल्याणकारक वाटली मग अशा भक्तांचे दर्शन इतरांचे किती कल्याण करीत असेल याचा विचार करावा. (क) रघुनाथास भरताच्या भेटीची तळमळ वनवासाच्या आदल्या दिवसापासूनच लागलेली आहे. **'गत किति दिन वाटे चुकलेंसे । शकुनीं वाटे प्रिय भेटेसें ॥ कोण जगीं प्रिय सम भरता ही । हेंच शकुन फल दुसरें नाही.॥ रामा निशिदिन बंधु - सुचिंता । जशि अंडांची कासविचित्ता ॥** (२।७।६-८) अशी जी भरतभेटीची चिंता रात्रंदिवस लागली होती तिचा आज आता अंत होणार व सर्व जगांत प्रिय असलेला भरत भेटणार हे ठरताच जो आनंद झाला तो या सोरठ्यांत सांगितला आहे.

ल. ठे. - या कांडांतील प्रत्येक छंदांत किंवा सोरठ्यांत कवींचे नाव आहे. शेवटच्या छंदांत असून सोरठ्यांतही आहे (३२६); पण ते उपसंहार म्हणून आहे. येथेच छंदात असून सोरठ्यांतही आहे. तुलसीदासांना आश्चर्य वाटत आहे की काय हे ! किती सुंदर नरनाट्य ! एका क्षणापूर्वी जे चिंतातूर व चकित झाले होते तेच माणसांसारखे दुसऱ्या क्षणाला प्रेमाकुल ! प्रेमाने सात्विकभावापन्न झाले ! अशा प्रकारे क्षणाक्षणाला हर्षविषाद, सुख दुःख इ. विकारांचा पालट होण्यास प्रारंभ रामचंद्रांपासूनच झाला ! असली दृश्ये आता येथे (चित्रकूटात) वारंवार दिसतील. आता पुन्हा सीतारमण चिंतातुर झालेले दिसतील.

*हिं* *। बहुरि सोचबस भे सियरवनू । कारन कवन भरत आगबनू ॥१॥*
*। एक आइ अस कहा बहोरी । सेन संग चतुरंग न थोरी ॥२॥*
*। सो सुनि रामहि भा अति सोचू । इत पितु बच इत बंधु सकोचू ॥३॥*
*। भरत सुभाउ समुझि मन माहीं । प्रभु चित हित थिति पावत नाहीं ॥४॥*
*। समाधान तब भा यह जाने । भरतु कहे महुँ साधु सयाने ॥५॥*

*म.* *। पुनरपि चिंता सीतारमणा । कारण कवण भरत-आगमना ॥१॥*
*। कोणि येइ सांगे कर जोडी । संगिं चमू चतुरंगि न थोडी ॥२॥*
*। राम सचिंत अती जैं ऐकति । इथ पितृवच इथ बंधुर्भाड अति ॥३॥*
*। स्मरती स्वभाव भरताचा जैं । न मिळे स्थिरता प्रभुचित्ता तैं ॥४॥*
*। समाधान मनिं असें जाणतां । भरत वचनिं मम साधु जाणता ॥५॥*

**अर्थ** - सीतारमणाला पुन्हा चिंता लागली की भरताच्या येण्याचे कारण काय असावे ?॥१॥ इतक्यात कोणी (कोळी भिल्ल) येऊन हात जोडून म्हणाला की बरोबर चतुरंगिणी सेना (चमू) आहे व ती थोडीथोडकी नाही ! (अफाट आहे).॥२॥ हे ऐकून तर रामास फारच चिंता वाटू लागली (कारण) इकडे पित्याचे वचन व इकडे भावाची अति भीड ! ॥३॥ भरताचा (प्रेमळ) स्वभाव आठवतांच प्रभूच्या चित्ताला क्षणभर सुद्धा स्थिरता येईना.॥४॥ (मग) भरत माझ्या वचनांत आहे (आज्ञा मोडणार नाही) साधु आहे व जाणता (शहाणा) आहे हे जाणून मन समाधान पावले (स्थिर झाले)॥५॥

**टीका. चौ. १ (१) सीतारमण** = सीतापति, सीतेशी क्रीडा करणारे, सीतेच्या साह्याने क्रीडा-लीला करणारे. हे लक्षात ठेवले पाहिजे की भरत ससैन्य येत आहे व दशरथ मरण पावले आहेत या गोष्टी अद्याप रामचंद्रांस कळलेल्या नाहीत. शंका आली की सुमंत्राने आग्रह केला तेव्हा सीता गेली नाही. सीतेला वनात ठेवणे बरे नाही असे वाटून महाराजांनी सीतेला घेऊन जाण्यासाठी तर भरतास पाठविला नसेल ? कौसल्या मातेचे आज्ञापत्र घेऊन सीतेला नेण्यासाठी येत आहे ? सीता गेली की सर्व खेळच आटोपला; तिच्या आधारावर तर निशाचर विनाशाचा खेळ व इतर पुष्कळ गोष्टी करावयाच्या आहेत. भरतास हे रहस्यही सांगता येत नाही; कारण ते कळल्यास तो परतच जाणार नाही. 'इमां वाप्येष वैदेहीं अत्यन्तसुखसेविनीम् । पिता मे राघवः श्रीमान् वनादादाय यास्यति' (वा.रा. ९७।२३)

(२) प्रथम धूळ वगैरे पाहून चिंता वाटली; भरत येत आहेत असे ऐकताच चिंता जाऊन दुसऱ्या क्षणी परमानंद झाला. का येत आहे याचा विचार करता तिसऱ्या क्षणी आनंद गेला व पुन्हा चिंतेने ग्रासले ! मानवी मनाच्या अति चंचल व अति विकारवश स्वभावाचे किती सुंदर चित्र आहे ! किती सुंदर नाट्य आहे ! पण एवढ्यानेही झाले नाही; या चिंतेचे रूपांतर अति चिंतेत होण्यास आता आणखी एक क्षणच पाहिजे. (क) **वा. रा.** अवतरणे येथे उपयोगी पडण्यासारखी नाहीत; तेथे राम चिंताग्रस्त झाले असले व लक्ष्मण क्रोधांध झाले असले तरी **ते चित्र निराळे व हे चित्र अगदीच निराळे.** मागील परिच्छेदात व्यक्त केलेला अर्थ न मानल्यास सीतारमण शब्द निष्फळ ठरतो; व मानसांत अशा शब्दांचा उपयोग निरर्थक केलेला नाही.

**चौ. २-३ (१) संगिं चमू चतुरंगि न थोडी** - हे कळतांच सीतेच्या संबंधी

चिंता व भीती गेली ख़री; पण दुसरीच अति चिंता येऊन उभी राहिली. मोठ्या सैन्यासह येत आहेत हे कळताच भरताचा हेतु ध्यानात आला की मला राज्याभिषेक करवून राजधानीत परत नेण्यासाठीच येत असला पाहिजे. हा अर्थ **'इथ पितृवच इथ बंधुभीड अति'** या वरून अगदी स्पष्ट आहे. भरत आपल्याबरोबर लढाई करण्यासाठी आला असेल अशी शंका रघुनाथास कालत्रयीं स्वप्नांतसुद्धा येणे शक्य नाही. तुलसीरामायण श्रवण पठन करून जे हा अर्थ काढतील त्यांनी ते न वाचणेच चांगले. वाल्मीकींनी लिहिलेले तर्क येथे लागू पडतात - 'स्नेहेनाक्रान्तहृदयः शोकेनाकुलितेंद्रियः ॥ द्रष्टमभ्यागतो ह्येष भरतो नान्यथाऽऽगतः ॥११॥ अम्बां च कैकयी रुष्य परुषंचाऽप्रियं वदन् ॥ प्रसाद्य पितरं श्रीमान् राज्यं मे दातुमागतः ॥१२॥ प्राप्तकालं यदेषोऽस्मान् भरतो द्रष्टु मर्हति ॥ **अस्मासु मनसाऽप्येष नाऽहितं किंचिदाचरेत्** ॥१३॥ अथवा **नौ** ध्रुवं मन्ये मन्यमानः सुखोचितौ ॥ वनवासमनुध्याय **गृहाय प्रतिनेष्यति** ॥२२॥ सार हे आहे की मला राज्य देण्यासाठी आला असावा. आपले अकल्याण करण्याची कल्पनासुद्धा भरताच्या मनास शिवणार नाही. किंवा तो आपल्याला अयोध्येत घेऊन जाण्यासाठी आला असावा. (वा.रा. २।९७) पण तेथे **हे तर्क चिंतेतले नसून लक्ष्मणाचे क्रोधयुक्त भाषण ऐकल्यानंतरचे लक्ष्मणास स्पष्ट सांगितलेले आहेत.** म्हणूनच म्हटले की ते चित्र निराळे व हे चित्र अगदी निराळे.

(२) **इथ पितृवच इथ बंधुभीड अति** - धर्मसंकट येऊन पडले आहे. भरताच्या आग्रहाप्रमाणे त्याची भीड मोडणे शक्य नाही व राज्याभिषेक करवून घेणे किंवा अयोध्येस परत जाणे या दोन्ही गोष्टी पितृवचनाचा भंग करणाऱ्या आहेत. पितृवचन-पालन केलेच पाहिजे व तसे करावयाचे म्हणजे भरताची भीड मोडून त्याला अप्रसन्न करणे भाग आहे; पण हे माझ्या स्वभावाला व त्याच्या स्वभावाचा विचार करता अगदी अशक्य आहे. दोन्ही गोष्टी अगदी सारख्याच महत्त्वाच्या आहेत हे दाखविण्यासाठी इथ-इथ-(इकडे - इकडे, इत इत) म्हटले; अन्यथा इकडे आड तिकडे विहीर (इत उत) असे प्रयोग अन्यत्र आहेत. तेथे कोणती तरी एक गोष्ट करणे वा न करणे हा विचार असतो. पण इथे दोन्ही गोष्टी करणे जरूर आहे व त्या इथेच ठरविल्या पाहिजेत हा भाव येथे दाखविला. भरताची भीड का मोडता येत नाही याची कारणे आता सुचवितात.

**चौ. ४ - (१) स्मरती स्वभाव भरताचा जैं... प्रभुचित्ता तैं** - भरताच्या

स्वभावाची काहीशी कल्पना कौसल्येने व्यक्त केली आहे; त्यांतील भावच येथे आहे की - भरत एक तर मला घेतल्याशिवाय अयोध्येत जाणार नाही व मी येत नाही असे सांगून त्याला जाण्याची आज्ञा दिली तर त्याचे प्राण देहांत राहतील की नाही याची शंकाच आहे. या विषयी कौसल्यावचन दो. २८२ व २८४।२-४ पहा. (क) **न मिळे स्थिरता प्रभुचित्ता** भरताची इच्छा पूर्ण करावी की पितृवचन-परिपालन करावे या दोन टोकांत चित्त लंबका प्रमाणे फेऱ्या घालीत आहे. दोन्ही गोष्टी कशा साधाव्या हा विचार मुख्य आहे; व यामुळे चित्त अत्यंत अस्थिर व घाबरे झाले आहे. **(ख) प्रभु** = सर्व समर्थ असून भक्त प्रेमाच्या प्रभावाने त्यांच्या चित्ताची अशी स्थिति झाली आहे ! **भक्तीचा महिमा किती अगाध आहे हे दाखविले.**

**चौ. ५ - (१) समाधान मनिं भरत वचनिं मग, साधु, जाणता - भरत वचनिं मम** - भरत माझ्या वचनांत आहे; माझे वचन पाळणारा आहे; अनादर करणार नाही. साधुपरहित निरत, परोपकारी आहे. मी अयोध्येत आल्याने व तो माझ्याबरोबर वनात राहिल्याने परहित हानि कशी होईल हे त्यास समजाऊन सांगितले म्हणजे हट्ट धरणार नाही; व धैर्याने प्रेमाचे व शोकाचे आवेग कसेतरी सहन करील. तो **जाणता** = शाहणा असल्याने त्याची समजूत लवकर पटेल. हा विचार जेव्हा मनात आला तेव्हा चित्ताला स्थिरता आली व समाधान झाले. देवगुरु बृहस्पतींनी भरत स्वभावाचे हे निदान आधीच केले आहे. दो. २१९ पहावा. प्रभूच्या चिंताग्रस्त मौनाचा लक्ष्मणावर काय परिणाम झाला पहा -

**हिं.** ***। लखन लखेउ प्रभु हृदयँ खभारु । कहत समय सम नीति बिचारू ॥६॥***
***। बिनु पूछें कछु कहउँ गोसाईं । सेवकु समयँ न ढीठ ढिठाई ॥७॥***
***। तुम्ह सर्बग्य सिरोमनि स्वामी । आपनि समुझि कहउँ अनुगामी ॥८॥***

**दो.** ***। नाथ सुहृद सुठि सरल चित सील सनेह निधान ॥***
***॥ सब पर प्रीति प्रतीति जियँ जानिअ आपु समान ॥२२७॥***

**म.** ***। प्रभु हृदिं खळबळ लक्ष्मण लक्षिति । नीतिविचार समयसम सांगति ॥६॥***
***। स्वामिं कांहि वदु तुम्हीं न पुसतां । समयीं धृष्ट न दासधृष्टता ॥७॥***
***। स्वामी तुम्हिं सर्वज्ञ - शिरोमणि । सेवक वदतो जें वाटे मनिं ॥८॥***

**दो.** ***। नाथ सुहृद अति सरलधी शील - स्नेह - निधान ॥***
***॥ प्रीति सर्वि विश्वास, सब जाणां आत्मसमान ॥२२७॥***

**अर्थ** - प्रभूच्या हृदयांत खळबळ उडाली (चिंता लागली) आहे हे लक्ष्मणाच्या लक्षात आले; तेव्हा समयासारखा (समयानुकूल) नीतीचा विचार सांगू लागले.।।६।। स्वामी ! आपण न विचारतांच मी बोलत आहे; पण प्रसंगी सेवकाने धीटपणा करणे म्हणजे सेवकाने उद्धट बनणे नव्हे.।।७।। स्वामी ! आपण सर्वज्ञांचे शिरोमणि आहांत; (आपण सर्व काही सहज जाणतांच) पण या सेवकाला मनात जे वाटते ते हा सांगत आहे.।।८।। नाथ ! आपण अति शुद्ध हृदयी व अति सरळ बुद्धिचे आहांत; शील व स्नेह यांचे निवासस्थान आहांत; आपण सर्वांवर प्रीति करता व सगळ्यांचा आपल्याला विश्वास वाटतो; व सर्व आपल्यासारखेच (आत्मसमान) आहेत असे आपणांस वाटते.।।दो. २२७।।

**टीका. चौ. ६ - (१) प्रभुहर्दिं खळबळ लक्ष्मण लक्षिति** - रामहृदयांत खळबळ झाली, चिंता लागली हे जितके खरे तितकेच हेही खरे की 'समाधान मनि' झाले. लक्ष्मणास खळबळ कळली मग समाधान झालेले का कळले नाही ? प्रभूंनी कळू दिले नाही म्हणून; म्हणजेच झालेले समाधान मुखावर प्रगट होऊ न देता प्रभु चिंतातुरच राहिले. 'तो जाणे ज्या जाणूं देतां' (१२७।३) समाधान झालेले लक्ष्मणास कळू नये अशीच प्रभूची इच्छा आहे. २२६।६-७ च्या टीकेत (२) पहा. **(क)** स्वप्न अशुभ आहे असे म्हणाले व ससैन्य भरताच्या आगमनाची खबर मिळतांच अति चिंतामग्न झाले इतकेच लक्ष्मणास कळले. अशुभत्व काय हे सांगितलेच नाही; त्यामुळे एकनिष्ठ, सर्वस्व त्यागी, इतर कोणतेही नाते न मानता फक्त रामाचेच नाते जाणणारा सेवक जे समजला असता तेच लक्ष्मणांस वाटले. भरताचे सैन्यासह येणे प्रभूला फार दुःखद झाले आहे असा त्यांचा समज झाला; व **असा समज व्हावा हीच या लीलेतील भगवदिच्छा आहे. जो रामाचा अपमान करील, रामाच्या दुःखाचे कारण बनेल तो कोणीही व कितीही मोठा असला तरी खऱ्या निरिच्छ सेवकाप्रमाणे लक्ष्मण ते सहन करू शकत नाही.**

(२) कैकईने रामास दुःख दिले असे वाटल्यामुळेच भरताने तिचा जो अपमान व निर्भत्सना केली; फार काय वा. रा. व अ. रा. यांप्रमाणे तिला ठार मारण्यास प्रवृत्त झाला व तसे (वा.रा.) तिच्या तोंडावर बोलून दाखविले ते आम्ही सर्व ज्या दृष्टीने व भावनेने क्षम्य मानतो **तीच दृष्टी व तीच भावना मानसांतील लक्ष्मणाची असता** आम्हांस येथील लक्ष्मणाचे वर्तन गैरशिस्त का वाटते ? **कैकयी रामदुःखाचे कारण** नसता भरतांस वाटले की तीच कारण आहे. तसेच प्रभूच्या

**येथील नाट्यावरून लक्ष्मणांस वाटले की भरतच आपल्या दुःखाचे कारण आहे असे प्रभूला वाटत आहे. 'बघुं न शकसि मज दुःखी अंमळ । सदा स्वभाव बंधु तव कोमल'** (६।६१।३) असे जे प्रभूंनी म्हटले ते या वेळेच्या लक्ष्मणक्रोधाला अनुलक्षूनच आहे. लक्ष्मणाचा हा स्वभाव येथेच खराखुरा प्रगट झाला आहे; व तो प्रगट व्हावा ही रामाचीच इच्छा आहे.

**सूचना** - पुढील टीका वाचण्यापूर्वी **प्रस्तावनेतील 'श्रीराम-सेवामूर्ति लक्ष्मण'** हे लक्ष्मण चरित्र (पृ. ६०२) आधी पहावे.

**(३) नीति विचार समयसम सांगति - समय** - रामदुःखदायी शत्रु सैन्यासह जवळ आला आहे हा समय. स्वामीच्या घरावर दरोडा येत असता स्वामी स्वस्थ बसले तरी **'करी स्वामिहित सेवक तोही'** या भरतसूत्राला धरून स्वामींस हालवून जागे करणे हा सेवकाचा धर्मच आहे. विचारल्याशिवाय सेवकाने बोलू नये हा नियम अशा प्रसंगी लाऊन कसे चालेल ? जगात चोर दरोडेखोर नाहीत असे स्वामींस वाटत असले तरी दरोडेखोरांची चाहूल लागताच स्वामींस जागे करणे हा सेवकाचा धर्म आहे. तसे येथे नीतीच्या चार गोष्टी भीती न बाळगता सांगणे जरूर आहे, तेच लक्ष्मण करीत आहेत. **दो. 'विचारल्याविण या स्थळी स्वामिस सांगे दास ॥ सर्प, अस्त्र, अरि, विष, अनल अनिल कंट दुर्वास ॥ अनिल कंट दुर्वास अशन पथ अपथ निवेदी ॥ लाभहानि दुखदानि वदत अघ नाहीं अगदीं ॥ (कुंडलिया रामायण** हिंदी मा. पी. वरून अनुवाद). अशा प्रसंगी स्वामींना चार नीतीच्या गोष्टी सांगणे सेवकाचे कर्तव्यच आहे.

**चौ. ८ व दोहा - (१) स्वामी तुम्हिं सर्वज्ञ शिरोमणि, नाथ, सुहृद, सरलधी, शीलनिधान, स्नेहनिधान, सर्वांवर प्रीति, सर्वांवर विश्वास** ही सर्व विशेषणे व वचने साभिप्राय आहेत. ही सर्व विरुद्धार्थाने भरताच्या ठिकाणी आहेत व त्यांना सर्व जग त्यांच्या सारखेच (आत्मसमान) दिसत आहे हा ध्वनि यांत आहे. भरत सेवक म्हणतात मात्र; मूर्खशिरोमणी बनले आहेत. अनाथ असून स्वतःस नाथ समजतात; हृदय दुष्ट आहे, कपटबुद्धि आहेत; शत्रु, अधर्मी आहेत; राज्यावर व मातेवर तेवढी प्रीति आहे; बाकी नाही कोणावर, कोणावर विश्वास नाही; तुमच्यावर माझ्यावर विश्वास नाही व स्वतःसारखेच जग आहे, असे त्यांस वाटत आहे. परंतु आपल्या ठिकाणच्या या अलौकिक, जगद्वंद्य गुणांमुळे ते तुम्हाला तसे वाटत नाही. तुम्हाला वाटते की ते तुमच्यासारखेच आहेत. हे

सर्व गूढभाव पुढील चौपायांत स्पष्टच सांगितले जात आहेत.

*हिं. । बिषई जीव पाइ प्रभुताई । मूढ़ मोह बस होहिं जनाई ॥१॥*
*। भरत नीति रत साधु सुजाना । प्रभु पद प्रेमु सकल जगु जाना ॥२॥*
*। तेऊ आजु राज पदु पाई । चले धरम मरजाद मेटाई ॥३॥*
*। कुटिल कुबंधु कुअवसर ताकी । जानि राम बनबास एकाकी ॥४॥*
*। करि कुमंत्रु मन साजि समाजू । आए करै अकंटक राजू ॥५॥*
*। कोटि प्रकार कलपि कुटिलाई । आए दल बटोरि दोउ भाई ॥६॥*
*। जौं जियँ होति न कपट कुचाली । केहि सोहाति रथ बाजि गजाली ॥७॥*

*म. । विषयी जीव जैं प्रभुता पावति । मूढ मोहवश होती प्रगटति ॥१॥*
*। भरत नीतिरत साधु जाणते । प्रभुपदरत हें विश्व जाणतें ॥२॥*
*। तेही आज राजपद पावुनि । निघति धर्ममर्यादा सांडुनि ॥३॥*
*। कुटिल कुबंधू कुसमय साधुनि । वनीं राम एकाकी जाणुनि ॥४॥*
*। करुनि कुमंत्रा साजा साजति । राज्य अकंटक करण्या धावति ॥५॥*
*। कोटि रीतिं कल्पुनी कुटिलता । कटक जमवुनी येति उभयता ॥६॥*
*। जर नसती मनिं कपट-कुचाळी । कुणा रुचे रथ - वाजि - गजाली ॥७॥*

**अर्थ** - विषयी जीवांना जेव्हा प्रभुता (ऐश्वर्य, सत्ता) मिळते तेव्हा ते त्या मोहाला वश होऊन मूढ बनतात व (आपली सत्ता) प्रगट करू लागतात.॥१॥ भरत नीतिरत, साधु, जाणते (शाहणे) व प्रभूच्या चरणी रत आहेत हे सर्व जग जाणते.॥२॥ पण ते सुद्धा आज राजाचा अधिकार मिळतांच धर्ममर्यादा सोडून निघाले आहेत.॥३॥ कुटिल व दुष्ट भाऊ (कुबंधू) ही भलतीच वेळ साधून व राम वनांत एकटे आहेत हे जाणून ॥४॥ कुमंत्र (= कुविचार) करून व सर्व जय्यत तयारी करून (मिळालेले) राज्य निष्कंटक करण्यासाठी धावत येत आहेत.॥५॥ अनंत प्रकारांनी (तुमच्या विषयी) कुटिलता कल्पून (तुम्ही कुटिल आहात अशा कल्पना करून) सर्व सैन्य गोळा करून दोघे (बंधू) येत आहेत.॥६॥ कपटाने दुष्टपणा करण्याची इच्छा जर मनात नसती तर रथ, घोडे व हत्ती यांच्या त्या रांगाच्या रांगा (आलि = पंक्ति, रांग, आवलि) - तांडेच्या तांडे - घेऊन येणे कोणाला - रुचले - आवडले असते ?॥७॥

**टीका. चौ. १ - (१) विषयि जीव जैं प्रभुता पावति** - सहजा सहजी विशेष कष्ट, प्रयत्न न करता ऐश्वर्य व सत्ता हाती आली म्हणजे त्या ऐश्वर्याच्या व सत्तेच्या

मोहाला बळी पडून विषयी जीव मूर्ख बनतात; व आपल्या ऐश्वर्याचे व सत्तेचे प्रदर्शन करीत सुटतात. गरिबांच्या कुळांतील श्रीमंतांच्या मांडीवर दिलेले दत्तक; मोठ्या लॉटऱ्या लागलेले भिकारी व विषयी असून सत्ताधीश बनलेले लोक ही उदाहरणे प्रत्यक्ष आजही दिसतातच. ही सर्वसाधारण विषयी जीवांची गोष्ट झाली.

**चौ. २-५ (१) भरता सारख्यांना राजसत्ता मिळाल्याबरोबर** मोह झाला; तेथे इतरांचे काय ? राज्य मिळेल अशी कल्पना स्वप्नांतसुद्धा नव्हती, पण पहा की मोठ्या भावाला वनवासी असता, ठार मारण्यासाठी सैन्य जमवून येणे हा काय बंधुधर्म आहे ? येथे मूर्ख शिरोमणि ठरविले. कारण की विषयी मूढ बनला तर नवल नाही, पण नीतिरत, साधुसुजाण, बंधुप्रेमी असून धर्ममर्यादा ओलांडली, अधर्मी बनले, त्याअर्थी मूर्खशिरोमणि ठरले. सेवक असून राजा झालो, स्वामी झालो, असे वाटू लागले. राम सुहृद तर हे कुबंधू = दुष्ट भाऊ, राम सरलधी तर हे कुटिल बनले. वनवासी भाऊ कंटकाप्रमाणे - कांट्यासारखा सलू लागणे याने स्नेहाच्या-प्रीतीच्या विरुद्ध = वैर दिसते. वनवासी भाऊ शील निधान असून त्याचा कांटा काढण्यास सिद्ध होणे यांत दुःशीलता दिसते. राज्याचा लोभ नसता तर अशी इच्छा झाली नसती. राम राजा असून त्यांच्यावरील प्रीती नष्ट होऊन राज्यावर बसताच राज्य मिळवून देणारी फार प्रिय वाटू लागणारच. स्वतः सैन्य घेऊन आले यावरून इतर कोणावर विश्वास नाही हे ठरले; रामलक्ष्मण प्रिय व विश्वासार्ह होते; त्यांच्यावरचा विश्वास उडाला, त्यांची भीती वाटू लागून ते शत्रु वाटू लागले; म्हणून तर सैन्य घेऊन आले आहेत - धावत.

**चौ. ६ - (१) कोटि रीतिं कल्पुनी कुटिलता** - रामाला जर राज्याचा लोभ असता तर त्यांनी राज्य सोडलेच नसते, हे त्यांना माहीत नाही की काय ? ते स्वतः कपटी कुटिल बनले असल्यामुळे राम कोटिपट कुटिल व कपटी आहेत अशी कल्पना त्यांनी केली. आज नसला तरी उद्या लोभ कशावरून उत्पन्न होणार नाही ? १४ वर्षे पूर्ण झाल्यावर परत येणारच. लोकांचे त्यांच्यावर फार प्रेम आहे; ते लोकांना व सैन्याला फितुर करणार; अशा एक ना अनंत कुटिलपणाच्या कल्पना त्यांनी केल्या असल्या पाहिजेत; म्हणून तर सर्व सैन्य गोळा करून उभयता आले आहेत. याचे कारण इतकेच की त्यांना जग त्यांच्या सारखेच (आत्मसमान) वाटू लागले. पण इतक्या शंका घेण्यास आधार तरी काय असे म्हणतील म्हणून सांगतात.

**चौ. ७ - (१) कुणा रुचे रथवाजि गजाली** - गज + आलि = रांग, पंक्ति, तांडा = प्रभूंना राज्याभिषेक करण्यासाठी किंवा अयोध्येत नेण्यासाठीच जर यावयाचे असते, तर ते रथांचे तांडेच्या तांडे, घोडेस्वारांच्या त्या सागराच्या उत्तुंग लाटा व हत्तींच्या त्या मेघांच्या पंक्तीच्या पंक्ती पाहिजे होत्या कशाला ? इतकी उपाधि घेऊन येणे कोणाला बरे वाटले असते. प्रभु दर्शनाचीच जर तळमळ असती तर २/४ उत्तम शरीर संरक्षक घेऊन दोन उमद्या वाजींवरून आले असते तर दोन दिवसांत भेट झाली असती. एवढे सगळे लटांबर, लवाजमा घेऊन येताना ८/१० दिवस तरी लागले असतील. याला काय दर्शनाची लालसा म्हणायची ? लोकांनी विचारले तर तोंडावर टाकण्यास साधन म्हणून राज्याभिषेकाची भाषा बोलत असतील व विश्वास बसावा म्हणून स्वतः पायी चालत यावे; हेच कपट ! अगदी जवळ येऊन मग चारी बाजूंनी अचानक हल्ला चढवावा म्हणजे राज्य निष्कंटक होईल; हा हेतु मनात नसता तर एवढे सैन्य पाहिजे होते कशाला ?

**ल.ठे.** - निषादराजाने अशाच प्रकारचे विचार प्रगट केले असले तरी दोघांच्या हेतूंत व भावनांत महदंतर आहे. भरताच्या आगमनामुळे राम दुःखी, अति सचिंत व व्यथित झाले आहेत हे प्रत्यक्ष डोळ्यांनी पाहिल्यामुळे लक्ष्मणाच्या कोमल हृदयाला रामदुःखी पाहणे सहन झाले नाही. निषादाच्या क्रोधास असे प्रत्यक्ष कारण काही नव्हते. रामापासून सैन्य व भरत फार दूर होते. तात्कालिक भय निर्माण झाले नव्हते. वकील-दूत पाठवून किंवा स्वतः भेटून मर्म जाणण्यास सवड होती. निषाद भरताच्या ओळखीचा नव्हता किंवा हाच रामसखा असे माहीत नसल्यामुळे त्याच्या स्वतःच्या जीवितास धोका नव्हता. येथे रामाचे जीवित धोक्यात आहे. अचानक येऊन भरत दारात उभे आहेत. त्याच्या जवळ हजारो वीर होते, राम एकटे व एकटा लक्ष्मण सेवक. सगळीच परिस्थिति निराळी.

*हिं. । भरतहि दोसु देइ को जाएँ । जग बौराइ राजपदु पाएँ ॥८॥*

*दो. । ससिही गुर तिय गामी नघुषु चढेउ भूमिसुर जान ॥*

*॥ लोक बेद तें बिमुख भा अधम न बेन समान ॥२२८॥*

*हिं. । सहसबाहु सुरनाथ त्रिसंकू । केहि न राजमद दीन्ह कलंकू ॥१॥*

*म. । कोण दोष दे वृथा च भरता । माजे जग चि राजपद मिळतां ॥८॥*

*दो. । शशि गुरुतल्पग नहुष नृप करी भूसुरां यान ॥*

*॥ विमुख लोकवेदां बने अधम कि वेन समान ॥२२८॥*

*म. । दशशतभुज सुरपती त्रिशंकू । कुणा राज्यमद दे न कलंकू ॥१॥*

**अर्थ** - भरतालाच वृथा दोष कोणी द्यावा ! राजपद मिळाल्याने सर्व जगच माजते (मदांध होते.) ॥८॥ चंद्र गुरुपत्नी गामी बनला; नहुष राजाने ब्राह्मणांस वाहन बनविले (आपली पालखी वाहण्यास लावले) आणि वेन राजा लोकविरोधी व वेदविरोधी बनला; त्याच्या सारखा अधम कोण असेल ? (कोणी नाही) ॥दो.२२८॥ सहस्र बाहु (सहस्रार्जुन), देवराजा इन्द्र, त्रिशंकु इत्यादी कोणाला राज्यपदाने कलंक नाही लावला ?॥१॥

**टीका. चौ. ८, दो. व चौ. १ - (१) कोण दोष दे वृथाच भरता** - वरील सर्व भाषणाचे सार व भरताच्या कृतीचे निदान हे ठरविले की हा भरताचा दोष नसून राज्य मिळाले, राजा बनला, त्याचा हा दुष्परिणाम आहे. या जगात नेहमी असेच चालते. **(क)** या सिद्धान्ताला दिलेले दृष्टान्त देवांतले व मनुष्यांतले आहेत. स्वर्गातली तीन उदाहरणे आहेत व पृथ्वीवरील उदाहरणे तीनच आहेत. चंद्र, इंद्र व नहुष ही स्वर्गातली आणि सहस्रार्जुन, त्रिशंकु व वेन ही पृथ्वीवरील आहेत. अशी समसंख्यांक उदाहरणे देण्याने दाखविले की या बाबतीत स्वर्ग व पृथ्वी यांत काही कमी अधिक नाही. देवसुद्धा असेच करतात, मग मनुष्य करतील तर नवल काय ? आणि भरताचा तरी यांत दोष काय ? हा राज्यमद चढल्याचा परिणाम आहे; हे शेवटी निदान केले.

**शशि गुरुतल्पग** - (तल्प = पत्नी) चंद्र हा देवांपैकी एक असून त्याचा स्वतंत्र लोक आहे. त्याला चंद्रलोक म्हणतात. त्या लोकांचा तो राजा आहे. सर्व देवांचे गुरु बृहस्पति. एकदा चंद्राने राजसूय यज्ञ केला. त्या वेळी गुरुपत्नी तारेला पाहून चंद्र तिच्यावर मोहित झाला; तिला बलात्काराने ताब्यात घेतली व तिचे सतीत्व नष्ट केले. देवगुरूंनी देवराजा इंद्राकडे तक्रार केली. इंद्राने गुरुपत्नी परत देण्यास सांगितले; पण चंद्राने ते मानले नाही. शेवटी आपसांत युद्ध सुरू झाले. ही सुसंधी पाहून दानवांनी - देवशत्रूंनी चंद्राला युद्धात मदत केली. शेवटी ब्रह्मदेवाच्या मध्यस्थीने तारा बृहस्पतींना मिळाली. तिला चंद्रापासून पुत्र झाला तो बुध (नवग्रहांपैकी एक) यांत राज्यमदच मूळ कारण आहे.

**वेन राजा** - हा एक सूर्यवंशातलाच राजा होता. अंगराजाचा पुत्र व पृथू राजाचा पिता. वेन राजा झाल्यावर स्वतःसच ईश्वर मानू लागला. इतर देवदेवतादिकांच्या नावाने कोणी कोणतेही यज्ञ याग, संध्या, पूजा इ. कर्म करता

उपयोगी नाही असा वटहुकूम त्याने काढला. या विरुद्ध ऋषींनी एकत्र जमून त्याला पुष्कळ समजाऊन सांगितले पण त्याने कोणाचे ऐकले तर नाहीच पण ऋषींची व परमेश्वराची खूप निंदा केली; तेव्हा अभिमंत्रित केलेल्या दर्भांनी ऋषींनी त्याला ठार मारला व राज्य चालविण्यासाठी त्याच्या देहाचे मंथन करून त्यांतून पृथु राजा निर्माण केला (भाग. ४।१३,१४) वा. रामायणांत पृथु वेनाचा पुत्र नसून अनरण्य राजाचा पुत्र आहे. **'अनरण्यात्पृथुर्जज्ञे त्रिशंकुस्तु पृथोःसुतः'** (वा.रा. १।७०।२४) यांतील सूर्यवंशाच्या वंशावळीत वेनराजाचे नाव नाही, हा भेद कल्पभेदानुसार आहे. प. पु. अंगराजपुत्र वेनाची कथा आहे. ती भागवतांतील कथेहून भिन्न असली तरी सार व परिणाम एकच आहे.

**सहस्रार्जुन कथा** १।४।३; १।२७२।८ च्या टीकेत; **त्रिशंकुकथा** १।६।८; इंद्राची कथा १।२१० व १।३१७।६; आणि **नहुष** कथा २।६१ च्या टीकेत पहावी.

**ल. टे.** - वरील चौपाया व दोहा यांतील ओजाकडे पाहिले म्हणजे दिसते की लक्ष्मणाच्या मनात क्रोध व उत्साह वाढत चालला आहे. वेनराजाचे उदाहरण देऊन त्याला अधमाधम अधमशिरोमणि म्हणण्यात कटाक्ष भरतावर आहे. राम परमेश्वर असून भरत त्यांचे स्वामी होऊ पहात आहेत हे साम्य आहे. वेन सूर्यवंशातलाच, अत्यंत धर्मशील अशा अंग राजाचा मुलगा असून ईश्वरविरोधी व धर्मविरोधी बनला तसेच भरत ! वेनाचा योग्य समाचार ऋषींनी घेतला तसा मी यांचा घेईन ही भावना हृदयांत अंकुरली आहे व तिला आता लवकरच शब्दरूपी पालवी फुटेल. (त्रिशंकु सूर्यवंशातलाच !) हे साही दृष्टान्त वेनाप्रमाणेच भरताकडे लागतात पण विस्तार भयास्तव येथे ते साम्य दर्शविता येत नाही. एक नमुना स्पष्ट करून दाखविला त्या प्रमाणे वाचकांनी बाकीचे स्पष्ट करावे.

***हिं.*** *। भरत कीन्ह यह उचित उपाऊ । रिपु रिन रंच न राखब काऊ ॥२॥*
*। एक कीन्हि नहिं भरत भलाई । निदरे रामु जानि असहाई ॥३॥*
*। समुझि परइ सोउ आजु बिसेषी । समर सदोष राम मुख पेखी ॥४॥*
*। एतना कहत नीतिरस भूला । रन रस बिटपु पुलक मिस फूला ॥५॥*

***म.*** *। भरत करति या उचित उपावा । रिपु-रिण-लेश न कधिं उरवावा ॥२॥*
*। बरें परंतु न भरतें हें कृत । बघुनि राम असहाय अनादृत ॥३॥*
*। समजेल चि परि विशेष आजीं । सरुष राममुख बघतां आजीं ॥४॥*
*। इतकें वदत नीतिरस भुलला । रणरसबिटप पुलकमिषिं फुलला ॥५॥*

**अर्थ** - भरताने हा जो उपाय (उपाव) चालविला आहे तो योग्यच आहे, कारण की शत्रु व ऋण यांचा लेश सुद्धा कधी राहू देऊ नये (अशी नीतीच आहे.)॥२॥ परंतु भरताने एक गोष्ट चांगली केली नाही (ती ही की) राम असहाय्य आहेत असे पाहून त्यांचा अनादर केला.॥३॥ पण आज (आजी) रणांगणांत (आजी-युद्धांत) रामचंद्रांचे सरोष मुख दिसतांच ते ही चांगले विशेष प्रकारे समजेल ! ॥४॥ इतके म्हणताच नीतिरस विसरला गेला व वीर (रण) रसरूपी वृक्ष रोमांचांच्या रूपाने फुलला. (नीति सांगतां सांगता वीररस एकदम जागृत झाला व आवेशाने अंगावर रोमांच उभे राहिले).॥५॥

**टीका. वि.ल.टे.** - ज्या रामचंद्रांनी लक्ष्मण सुमंत्राबरोबर पाठविण्यासाठी संदेश सांगत असता **'अनुचित' म्हणून** तत्काळ त्यांचे तोंड बंद केले; जनकसभेत लक्ष्मण फार क्रुद्ध झालेले पाहतांच नुसत्या नेत्रांच्या खुणेने व डोळे वटारून ज्यांनी निमिषार्धात त्यांचे तोंड बंद करून गोगलगाईसारखे शांत केले तेच राम -भरतांसारख्या प्राणांपेक्षा प्रिय वाटणाऱ्या व अत्यंत निर्दोष महापुरुषाची लक्ष्मणाने एवढी निंदा केली असता तोंड मिटून ऐकत स्वस्थ कां बसले ? डोळे वटारून किंवा 'अनुचित' म्हणून त्यांना **का दाबले नाहीत ?** वा. रामायणांत स्पष्ट शब्दांनी कान उघाडणी केली आहे तशी 'अधम किं वेनसमान' या प्रश्नानंतर तरि का केली नाही ? लक्ष्मणाच्या धुमसणाऱ्या क्रोधानलांत, त्यांचा स्वभाव माहीत असून, **'मौनं संमतिलक्षणम्' रूपी घृताहूति घालून तो का भडकविला ?** व लोकांच्या व मुनिसमूहांच्या समक्ष असे भाषण का करू दिले ? या सर्व प्रश्नांचे एकच उत्तर आहे. **'बधुं न शकसि मज दुःखी अंमळ । सदा स्वभाव बंधु तव कोमल'** (६।६१।३) हे जगात प्रगट करावयाची प्रभूंची इच्छा आहे. २२६।६-७ च्या टीकेत केलेल्या विधानाला रामचंद्रांच्या या मूक संमतीने चांगलीच पुष्टी मिळते. **(क) वाल्मीकींच्या लक्ष्मणक्रोधाला राम दुःखी झालेले पाहणे व मूकसंमति हे कारण नाही. मानसांतील या एकाच गोष्टीने लक्ष्मणाच्या चरित्राला व स्वभावाला भरतांच्यापेक्षाही श्रेष्ठता आणली आहे. अन्यथा निषाद राजाचा क्रोध व लक्ष्मणाचा क्रोध एकाच प्रकारचा ठरून लक्ष्मण रामभक्तींत भरतापेक्षा कमी दर्जाचे ठरले असते.**

**(२) रिपु - रिण - लेश न कधिं उरवावा - 'ऋणशेषोऽग्निशेषश्च शत्रुशेषस्तथैवच पुनः पुनः प्रवर्धन्ते तस्मान्निःशेषमाचरेत्'** (सु.भा.) ऋण (रिण), अग्नि, व रिपु (शत्रु) हे थोडे जरी शिल्लक राहिले तरी पुनः पुन्हा वाढतात; म्हणून यांना

निःशेष करावे. रिपु = रोग असाही अर्थ आहेच. **'रिपु रुज पावक पाप प्रभु, अहि, समजा सान न'** (३।२१ रा) हे सर्व लहान, थोडे, क्षुद्र, अल्प आहेत असे समजू नये. **(क) येथे 'रिण' शब्द सुद्धा सहेतुक आहे. रिण** = कर्ज, आपले नसलेले पण दुसऱ्याकडून व्याजी किंवा बिनव्याजी आणलेले, काही मुदतीने परत करण्याच्या बोलीने मिळालेले धन. तसेच रामराज्यरूपी धन भरतांस (१४ वर्षांच्या मुदतीने मिळाले आहे. रिण आहे तोपर्यंत चिंता आहेच. ते रिण फेडून टाकण्यासाठी भरत येत आहेत. सावकाराला पुत्र वगैरे नसला आणि सावकाराला ठार मारून टाकला म्हणजे कर्ज निःशेष फिटल्यासारखे होते. मागणीचे भय उरत नाही. परत देण्याची चिंता रहात नाही. अशा हेतूने काही मारवाडी सावकारांचे खून झालेच अलीकडल्या काळात. **(ख) रिपु** - बलवान प्रतापी, प्रसिद्ध क्षत्रिय, सावत्र भाऊ म्हणून शत्रू वाटत आहेत रघुनाथ ! सध्या राजाची साह्यकारक अंगे म्हणजे खजिना, मंत्री, मित्र, दुर्ग, राज्य, सैन्य, हेर, चिलखत, शिरस्त्राण, पादत्राण, रथ, सारथी इ. काहीही जवळ नाहीत. तोच हल्ला केला तरच हा शत्रु निःशेष होण्यासारखा आहे असा विचार करूनच भरत आले आहेत.

(३) राज्यलोभाने व सत्तामदाने मदांध झाल्यामुळे विचार सुचला नाही की ताटका मारीच सुबाहु यांच्यासारख्या, इंद्रादि देवांनासुद्धा अजिंक्य अशा, कपटी, महाघोर राक्षसांचा संहार याच रामानी केला, तेव्हा कोणते राज्यांग त्यांच्या जवळ होते ? आजच्यापेक्षाही अति घोर अरण्यात होते व आजच्यापेक्षा ४/४।। वर्षांनी लहान होते. भरतांस कशी आठवण झाली नाही की २१ वेळा पृथ्वी निःक्षत्रिय करणाऱ्या भृगुनंदनाचा मद याच रामांनी, याहीपेक्षा अधिक असहाय स्थितीत, त्रैलोक्यांतील वीरांच्या देखत पराभव करून शांतपणे जिरवला !

**चौ. ३-४ (१) 'बधुनि राम असहाय - सरुष राम मुख'** - असहायता कशी हे मागील दोन परिच्छेदांत दाखविले गेले आहे. येथे राम समोर आहेत हे जणू लक्ष्मण विसरले आहेत ! म्हणून नाथ, प्रभु, आपण इ. न म्हणता 'राम राम' असे शब्द सहज निघू लागले ! **नीतिरस विसरल्याचा हा प्रत्यक्ष पुरावा आहे.** रणांत उभ्या राहिलेल्या महावीराला आजूबाजूला, मागे कोण आहे याचे भान रहात नाही. समोर उभा असलेला शत्रुवीर तेवढा दिसत असतो, तसेच जवळ असलेले राम लक्ष्मणांस दिसत नसून भरतच त्यांच्या दृष्टी समोर दिसू लागले आहेत ! व पुढील (चौ.४) चौपाई तर जणूं समोर असलेल्या भरतांस उद्देशून,

त्यांच्या तोंडावरच बोलत असावे अशा दशेतली आहे. **(क)** आजी = आजच्या दिवशी, आज. दुसऱ्या चरणांतील 'आजी' = युद्धांत लढाईत; आजि = युद्ध, रण, संग्राम (अमर कोष पहा).

**चौ. ५ - (१) इतकें वदत = 'सरुष राममुख बघतां आजीं'** इतके उच्चारल्याबरोबर दास्यरस ताडकन खवळला आणि विचारू लागला की **'तू सेवक म्हणविसि रामाचा । राम जाति रणिं वदसी वाचां ? ॥१॥ स्वामी हो ना कहिं न म्हणती । मान्य तुझें मत मूकसंमती ॥२॥ तूं जगसी तों प्रभुनी लढणे । प्रभुचा सेवक कशास म्हणणे ॥३॥ शत्रुसवें प्रभु रणांत लढतिल । काय भाकऱ्या घरीं भाजशिल ॥४॥ असें बोलतां लाज न वाटे । काय वीर्य तव समूळ आटे ॥५॥ जरा न होती प्रभुला शीण । धर कार्मुक शर तनु जों क्षीण ॥६॥ स्वामि दुःख वारील दास तो । ना तर केवळ दंभदास तो ॥७॥ दास्य म्हणे वीरा हो जागा । सेवक नांवा गाजवि जा गा ? ॥८॥ प्रभुला तूं किं नीतिरस पाजसि । सेवक म्हणावया ना लाजसि ?॥** अशी स्फूर्ति झाल्याबरोबर दास्यरसच रणविटपाच्या व्याजाने - मिषाने - पुलक रूपाने फुलला. भाव हा की दास्यरसानेच वीररसरूपी विटपाचे सोंग घेतले व पुलक रूपाने फुलला. ही सेवेची सुवर्णसंधि आहे असे जाणून उत्साह व आनंद झाला. **अन्वय** असा करावा - रस (दास्य) रणविटपमिषिं पुलक फुलला. **अर्थ** - दास्यरस रणविटपाच्या व्याजाने - मिषाने पुलक रूपाने फुलला. मिष = व्याज (सोंग), दंभ (अमरे) वाच्यार्थ प्रथम दिलाच आहे.

*हिं.* *। प्रभु पद बंदि सीस रज राखी । बोले सत्य सहज बलु भाषी ॥६॥*
*। अनुचित नाथ न मानब मोरा । भरत हमहि उपचार न थोरा ॥७॥*
*। कहँ लगि सहिअ रहिअ मनु मारें । नाथ साथ धनु हाथ हमारें ॥८॥*

*हिं.दो.* *। छत्रि जाति रघुकुल जनमु राम अनुग जगु जान ॥*
*॥ लातहुँ मारें चढ़ति सिर नीच को धूरि समान ॥२२९॥*

*म.* *। प्रभु - पद वंदुनि रज शिरिं लावत । वदले सत्य सहज बल सांगत ॥६॥*
*। अनुचित माझें मानां नाथ ! न । भरत नाल्य करि अपलें पूजन ॥७॥*
*। किति सोसावें तोंड दाबुनी । नाथ साथ धनु हातीं असुनी ॥८॥*

*म.दो.* *। क्षात्र जाति रघुकुळिं जनन रामानुग म्हणतात ॥*
*॥ नीच धूळि सम कोण, शिरिं चढे हि देतां लाथ ॥२२९॥*

**अर्थ** - प्रभूच्या पायांना वंदन करून पायधूळ मस्तकाला लावीत आपले

सहज बळ सांगत सत्य (च) वदले की - ॥६॥ आपण माझे अनुचित मानू नये; भरताने आपले काही थोडे पूजन नाही केले (पुष्कळ छळले आहे आपल्याला) ॥७॥ तोंड दाबून कोठवर व किती सोसावे ! नाथ संगतीत (साथ) आहेत व आमच्या हातांत धनुष्य आहे.॥८॥ जातीने क्षत्रिय (जातिवंत क्षत्रिय) आहोत, रघुकुळांत जन्म झाला आहे आणि रामसेवक (रामअनुग) म्हणतात (जगांत) ! धुळीसारखे नीच कोणी आहेत काय ? पण ती सुद्धा लाथ मारताच (मारणारांच्या) डोक्यावर चढतेच !॥दो.२२९॥

**टीका. चौ. ६ (१) प्रभुपद वंदुनि रज शिरिं लावत** - लढाईला निघताना जय व कुशल यांची इच्छा करणारे वीर आपल्या उपास्य देवतेला वंदन करून, प्रसाद मिळाल्यास मस्तकावर धारण करून जातात. लक्ष्मणाचे उपास्य व सर्वस्व, सर्व स्वामी राम. त्यांना वंदन केले. पायधूळ रूपी प्रसाद मस्तकावर धारण केला व सुचविले की आपल्या चरणरजाच्या प्रसादाने हा सेवक शिरसलामत विजय मिळवून येईल; आपण स्वस्थ निश्चिंत असावे. आपल्याला धनुष्य हाती घेण्याची वेळ येणार नाही. **(क) वदले सत्य सहज बल सांगत** - जें **सहज** = जन्मजात बळ आहे तेच सांगत आहेत; त्यांत खोटे किंवा अहंकार, अतिशयोक्ती काही नाही; खरे आहे तेच सांगत आहेत. **ल. ठे.** - इतक्या थराला गोष्ट आली तरी **राम अगदीं स्वस्थ, मूक का ?**

**चौ. ७ - (१) नाथ ! माझें अनुचित न मानां** - मी जे काही म्हणालो व जे काही म्हणजे भरताशी युद्ध करणार आहे ते अनुचित आहे असे आपण मानू नये. मी एकटा असलो तरी मी अनाथ नाही; आपण माझे नाथ जवळ आहात. इतके म्हटल्यावर सुद्धा रामचंद्रांनी हूं का चूं न करणे, डोळ्यानेसुद्धा विरोध न दर्शविणे याचा **अर्थ वाचक हो ! काय होतो ? (क) भरतनाल्प करि अपलें पूजन** - अपले शब्द वापरून येथे मुख्यत रामचंद्रांचा उल्लेख केला. या वचनांत वक्रोक्ति आहे. **पूजन = छळ, अनादर;** रामचंद्रांचा अनादर केल्याचा उल्लेख आधीच केला आहे. **'बघुनि राम असहाय अनाहत'** (चौ.३). रामाचा अनादर-अपमान करणारा लक्ष्मणाला रामवैरी वाटतो हे जनकपुरीत उत्तम प्रकारे दिसले आहे. पुढे **'रामनिरादर-फळ पावोत किं'** (चौ.४) असा पुन्हा उल्लेख आहेच. भाव हा आहे की मातेला पुढे करून तुमचे राज्य कपटाने घेतले. तुम्हाला दुःसह वनवास दुःखांत ढकलले, वनांत कंदमूल फले खाऊन जमिनीवर झोपता ते पण त्यांस पाहवत नाही ! ही

काय थोडी पूजा केली ? एवढे थोरले उपकार आपल्यावर केले. त्यांची अल्पशी फेड करून यथायोग्य पूजा करणे हे या दासाचे कर्तव्यच आहे.

**चौ. (८) किति सोसावें तोंड दाबुनी** - त्या वेळीच हे करण्याची माझी इच्छा होती; पण तेव्हा आपली इच्छा अनुकूल दिसली नाही; म्हणून सर्व राग (रोष) गिळून तोंडाला कुलूप घातले होते; पण आता आपण दुःखी, फार चिंतातुर दिसलांत व मी इतके बोललो तरी आपण नापसंती दर्शविली नाही. तेव्हा आपली संमति जाणून आता मला हा तुमचा अपमान असह्य झाला आहे. **(क) नाथ साथ** - स्वामी जवळ असून, त्यांचे दुःख व अपमान दिसत असून व हातांत धनुष्य असून आता सहन करणे अशक्य आहे. अजूनही राम मौनी कां ?

**दो. - (१) क्षात्र जाति, रघुकुळिं जनन रामानुग म्हणतात** - अफाट सैन्यासह भरतांचे यथायोग्य स्वागत-पूजन करण्याचे सामर्थ्य माझ्या ठिकाणी स्वभावतःच, जन्मतःच आहे. मुख्य म्हणजे नाथ पाठीशीं आहेत, चरणरजरूपाने आपला प्रताप माझ्याबरोबर आहे. जातिवंत, अस्सल क्षत्रिय बच्चा आहे; साध्या क्षत्रिय कुळांतला नसून रघुकुळांतला आहे. क्षात्रतेज व रघुकुलांत जन्म भरतांचाही असला तरी ते आज अनाथ आहेत; आणि माझे विशेष सहजबळ = रामानुग = रामसेवक बालपणापासूनच असणे त्यांच्या जवळ नाही. सर्व जगच मला रामानुग – रामसेवक म्हणते. **सेवकाचे मुख्य बळ स्वामी. सेवकाला स्वतःचा जय अपजय, सुख-दुःख, मान-अपमान लाभहानि नाही.** जे काय होईल ते - स्वामींचे व स्वामींच्या प्रतापाचे फळ ! जय झाला तरी स्वामींचाच; आणि माझ्या स्वामींच्या प्रतापाचा पराभव करील असा कोणी ब्रह्मांडांत नाही. हे सहज बल, (बल = सैन्य) माझ्या जवळ आहे; आणि मी स्वामींचा अनादर, अपमान सहन करू ? स्वामींचे चिंतातुर मुख शांतपणे स्वस्थ बसून पाहू ? हे कसे शक्य होणार ? **(क) दृष्टान्त देतात =** अत्यंत नीच, सदा सर्वांनी अपमानित असलेली धूळ सुद्धा अति अपमान केला तर सहन करीत नाही. लाथ मारली की मारणाराच्या डोक्यावर बसते ! मग तो कोण आहे हे तीसुद्धा पहात नाही; आणि एवढे अलौकिक सहजबळ असणाऱ्या रामसेवकाने स्वामींचा अपमान व दुःख सहन करून धुळीपेक्षाही नीच ठरावे काय ? व रामसेवकत्व, रघुवंश क्षत्रिय जन्म आणि धनुष्य यांना कलंक लावावा काय ? हे अशक्य आहे. अजूनसुद्धा रघुनाथ मौन का ?

***हिं. । उठि कर जोरि रजायसु मागा । मनहुँ बीर रस सोवत जागा ॥१॥***

*। बाँधि जटा सिर कसि कटि भाथा । साजि सरासनु सायकु हाथा ॥२॥*
*। आजु राम सेवक जसु लेऊँ । भरतहि समर सिखावन देऊं ॥३॥*
*। राम निरादर कर फलु पाई । सोवहुँ समर सेज दोउ भाई ॥४॥*

म. *। उठुनि जुळुनि कर आज्ञा मागे । जणूं वीररस निद्रित जागे ॥१॥*
*। बांधि जटा शिरिं कसि कटिं भाता । सज्य शरासन सायक हातां ॥२॥*
*। आज रामसेवक यश घेतो । धडा समरिं भरताला देतो ॥३॥*
*। राम - निरादर - फळ पावोत किं । रणशय्ये दोघे झोपोत किं ॥४॥*

**अर्थ** - (असे म्हणून) उठून हात जोडून आज्ञा मागितली; (तेव्हा असे वाटले की) जणू काय झोपलेला वीररसच जागा झाला.॥१॥ मस्तकावर जटा बांधल्या, कमरेला भाता कसला व धनुष्य सज्य करून बाण हातात घेतला.॥२॥ (व म्हणाले) आज युद्धांत भरताला (चांगला) धडा देतो व रामसेवक म्हणून यश घेतो.॥३॥ रामाचा निरादर (अपमान) करण्याचे फळ ते दोघे (भाऊ) पावोत व रणभूमिरूपी शय्येवर दोघे (कायमचे) झोपोत की (एकदाचे) ॥४॥

**टीका - चौ. १-२ - (१) उठुनि जुळुनि कर आज्ञा मागे** - 'उठुनि' शब्दाने हे सुचविले की ज्यावेळी चरणांना प्रणाम केला तेव्हां साष्टांग नमस्कार करून प्रभूंच्या चरणाशी पडूनच राहिले होते ते आता उठून उभे राहिले. 'प्रभूस्नेहिं शिशु मी प्रतिपालित' (७२।३) या भावनेस अनुसरूनच हे केले. कशाप्रकारे उठले हे उत्प्रेक्षेने सांगतात. **(क) आज्ञा मागे** - सेवक आणि शिशु असल्यामुळे आज्ञेशिवाय काहीही न करणे हाच सेवकाचा धर्मही आहे आणि सेवकाची काही चूक असेल तर स्वामी मना करतील, अडवतील हेही लक्ष्मण जाणतात. **(ख) जणूं वीररस निद्रित जागे** - किती सुंदर आणि सुयोग्य उत्प्रेक्षा! वीररस रण विटप रूपाने पुलक (रोमांच) रूपानें फुलल्यावर 'प्रभू पद वंदुनि रज शिरिं लावत।' चरणांच्याजवळच पडून राहिले होते. त्या आनंदात जणु झोपी गेले होते आणि 'अनुचित माझें माना नाथ! न' पासून 'नीच धूळिं सम कोण, शिरिं चढेहि देतां लाथ' पर्यंतचे भाषण म्हणजे जणुं झोपेंत केलेली बडबड होती. आणि आता जागा होऊन उठून उभा राहिला आहे. जाग आल्यानंतरच क्रियाशीलता सुरू होते. जी 'बांधि जटा शिरिं.... सायक हाता' या चौपाईने दाखविली आहे. धनुष्यास प्रत्यंचा चढवून ते डाव्या हातात धरले आणि उजव्या हातांत बाण धरला. लहान (धाकट्या) भावाचा क्रोध आणि अत्यंत उत्साह

इतक्या थरापर्यंत गेला तरी मोठे बंधु त्याचे स्वामी राम काहीच बोलले नाहीत हे मोठे आश्चर्यच नाही का? पण या लीलेद्वारे आणखी एक हेतूही साधून घ्यावयाची इच्छा आहे. तो योग्य समयी प्रकट करणेच श्रेयस्कर आहे.

**चौ. ३-४ - (१) आज रामसेवक यश घेतो** - 'करी स्वामिहित सेवक तोहि....' भरत आणि त्यांच्या सहाय्यक शत्रुघ्नास ठार मारण्यानेच स्वामीहित होईल असे या वीररसाच्या मूर्तीस वाटत आहे. आणि स्वामींच्या प्रतापाने विजय मिळेलच असा या सेवामूर्तीला दृढ आत्मविश्वास आहे. निषादराजापाशी वीरांचे सैन्य असूनही त्यास निःसंशय असे वाटत होते की आपण या युद्धात मारले जाऊ! लक्ष्मणांना वाटत आहे की युद्धांत भरतशत्रुघ्न यांना मारल्यानंतर 'खरा रामसेवक' अशी माझी कीर्ति होईल.

**(क) 'धडा समरिं भरताला देतो'** - असा धडा शिकवतो की जन्मजन्मांतरी विसरणार नाही. रामद्रोह, रामविरोध याचे फळ काय मिळते हे मेल्यानंतरही त्याच्या चांगले ध्यानात राहील. राम विरोध केला असता अत्यंत प्रेमी भाऊ आणि सहोदरही, सर्व नाते विसरून साक्षात् कृतान्त भक्षक होतो हे ते मेल्यावरही विसरणार नाहीत असे (आज) करतो. 'तू कृतान्त-भक्षक सुरपाता' (६-८४-६) असे श्रीरघुवीरानेच लक्ष्मणास म्हटले आहे. 'रामद्रोह्या कोणि रक्षि ना ।। पितृ यम माता मृत्यु समाना ।। सुधा विष बने श्रुणु हरियाना ।।' (इत्यादि ३-२ । ५-८) पहावे.

**(२) राम-निरादर-फळ पावोत किं** - श्रीराम जवळच बसलेले आहेत हे वीररस विसरून गेला. (भरत, शत्रुघ्न) ते दोघे बंधुच नजरेसमोर दिसत आहेत. ठार मारीन हे एकदां 'धडा समरिं भरताला देतो' याने सुचविले. येथे परत 'रणशय्ये दोघे झोपोत किं' याने परत तेच सांगत आहेत. परत चौ. ७-८ मध्ये हेच सांगत आहेत. भरत, शत्रुघ्नांना मारून स्वामीहित करण्यासाठी किती उत्साहित आणि अधीर झाले आहेत हे पहा.

*हिं. । आइ बना भल सकल समाजू । प्रगट करउँ रिस पाछिल आजू ।।५।।*
*। जिमि करि निकर दलइ मृगराजू । लेइ लपेटि लवा जिमि बाजू ।।६।।*
*। तैसेहिं भरतहि सेन समेता । सानुज निदरि निपातउँ खेता ।।७।।*
*। जौं सहाय कर संकरु आई । तौं मारउँ रन राम दोहाई ।।८।।*
*हिं.दो. । अति सरोष माखे लखनु लखि सुनि सपथ प्रवान ।।*
*।। सभय लोक सब लोकपति चाहत भभरि भगान ।।२३०।।*

म. *। भला योग सब समाज आला । करतो प्रगट पूर्व - रोषाला ॥५॥*
*। करि निकरा मृगराज निर्दळी । जसा ससाणा लाव्यां कवळी ॥६॥*
*। तैसा सानुज ससैन्य भरता । तुडवुनि मारिन रणीं खेळतां ॥७॥*
*। येतिल साह्या शंकर रणिं जरि । राम शपथ मारीन राम - अरि ॥८॥*
म.दो. *। रुष्ट तात लक्ष्मण बघुनि सत्य शपथ ऐकून ॥*
*॥ सभय लोक सब लोकपति पाहति पळूं भिऊन ॥२३०॥*

**अर्थ** - (आज) चांगला योग आला आहे की सर्व समाज (जमून) आला आहे; आता मागला रोष प्रगट करतो.॥५॥ मृगराज (सिंह) जसा हत्तींच्या कळपांचे निर्दालन करतो आणि ससाणा जसा लावा पक्ष्यांचा संहार करतो.॥६॥ तसाच भरताला त्याच्या अनुजासह आणि सैन्यासहित खेळत खेळत रणांगणांत तुडवून ठार करून टाकीन.॥७॥ जरि शंकर साह्य करण्यास आले तरी रामाची शपथ घेऊन सांगतो की - रामवैऱ्यांना रणांत मारीन.॥८॥ लक्ष्मण रोषाने संतप्त (लाल) झालेले पाहून व त्यांनी घेतलेली सत्य (प्रमाण = प्रवान) शपथ ऐकून सर्व लोक व लोकपाल भयभीत झाले व घाबरून (आपापले लोक सोडून) पळून जाण्याची तयारी करू लागले.॥दो.२३०॥

**टीका. - चौ. ५ - (१) भला योग सब समाज आला** - भाव हा की भरताचे सर्व साथीदार व त्याच्या पक्षाचे सगळे लोक एकत्र जमून आले. हा तरी एक सुयोगच आला नाहीतर अस्तनीतल्या निखाऱ्यासारखे हितशत्रू ओळखणे कठीण झाले असते. **(क) करतो प्रगट पूर्व रोषाला** - वनवासाची आज्ञा झाल्यावर जेव्हा अयोध्येत खळबळ उडाली त्या वेळी लक्ष्मणाला रोष आल्याची शंका घेण्याससुद्धा तेथे जागा नाही. त्यांनी शब्दांनी किंवा मुद्रेने प्रगटच केला नव्हता. मग कसा कळणार ! पण येथील या उल्लेखावरून ठरते की त्या वेळी रोष आला होता. रघुनाथाबरोबर वनांत जाण्याच्या एकाच सेवाभावजनित, दास्यभक्तिमय विचाराने इतर विकारांना दाबून टाकले होते. आज वीररस प्रगट झाला व तो आता भयानक, व रौद्ररसाचे रूप धारण करीत आहे; त्यामुळे क्रोध-रोष प्रगट होणार; प्रगट करतो म्हणतात तेच संयुक्तिक आहे.

**चौ. ६-७ (१) करिनिकरा मृगराज निर्दळी - कवळी** - येथे दोन दृष्टान्त दिले आहेत व ते यथासंख्य अलंकाराने पुढील चौपाईत स्पष्ट केले आहेत. **(क)** भरत शत्रुघ्न हे दोघे गजराज व त्यांच्या बरोबरीचे मित्र वगैरे त्यांच्या

कळपांतले हत्ती (निकर = कळप समुदाय; करी = करि = हत्ती) त्यांना मी एकट्या मृगराजाप्रमाणे विदारण करून लोळवीन; पळू सुद्धा देणार नाही. **(ख)** बाकीचे सर्व सैन्य म्हणजे लावा पक्ष्यांच्या झुंडी; त्यांना तर नुसत्या धनुष्याच्या टणत्कारानेच निर्जीव झाल्यासारखे करून टाकीन; किंवा पळून-लपून तरी बसतील. लावा पक्षी ससाण्याला (श्येनाला) फार भितात. त्याच्या झडपेचा नुसता आवाज ऐकताच लपण्याचा प्रयत्न करतात; पण तो त्यांना पकडतोच. तसेच सैन्याचे करीन. भृगुपतीचा कराल वेष **'पाहुनि सकल महिप संकुचले । श्येनझडपिं जणुं लावे लपले'** (१।२६८।३) तसेच माझे प्रलय भयंकर परम रौद्ररूप पाहूनच सर्व सैन्य शरण येईल. गजयूथपतींसह गजयूथांना मारलेले पाहताच, सैन्यरूपी ती घाबरट पाखरे येतात कशाला पुढे ! अयोध्येतील सैन्याचा संहार करावा लागणार नाही हा आहे दुसऱ्या दृष्टांतातील भाव.

**चौ. ८ (१) येतिल साह्या शंकर रणिं जरि - शंकर =** शं-कर = कल्याण करणारे. भरताचे कल्याण करण्याच्या हेतूने त्यांस साह्य करण्यास कदाचित शंकर येतीलही; कारण रघुकुल - इष्टदेव शंकर आहेत; भरत त्यांची पूजा, अभिषेकादि उपासना करतात. (१५७।७) ते आमचे कुलदैवत असून मी त्यांची कधीच पूजा केली नाही की त्यांना नमस्कारही करीत नाही. माझे एकमेव दैवत राम-रघुवीर. **(क)** रुद्राचा अवतार शत्रुघ्न व विष्णूचा अवतार भरत आहेत; म्हणून सुद्धा शंकर मदतीस येणे अगदी शक्य आहे. येथे लक्ष्मण शेषशायी नारायणाचे अवतार आहेत म्हणून ते शंकरांचा पराभव करण्याची भाषा बोलतात ती योग्यच आहे. (१।२६०।१-२ टी.पहा.) **(ख)** हिंदीतील **'रामदोहाई'** शब्दाचे दोन अर्थ आहेत : रामशपथ आणि रामद्रोही = रामवैरी = राम अरि - मराठीत दोन्ही अर्थ सांगणारे शब्द घातले गेले आहेत. भरतांस मारण्याचे कारण ते रामद्रोही = राम अरि रामाचे शत्रु बनले आहेत इतकेच आहे. इतर कोणतेही कारण किंवा लक्ष्मणाचा स्वतःचा संबंध नाही. **दोहाई =** द्रोही (अरि, वैरी, विरोधी) हा अर्थ १८६।४ मध्ये भरतांच्याच भाषणात आहे. टीका पहावी.

**दो. - (१) सभय लोक सब लोकपति** - इंद्रलोकादि सर्व दिक्पालांचे लोक व सर्व लोकपति, म्हणजे सर्व ब्रह्मांडच लक्ष्मणाचे ते रौद्ररूप पाहून व शपथ ऐकून घाबरून गेले. प्रलय होणार की काय अशी सर्वांना धास्ती पडली. **(क) सत्य शपथ =** ही शपथ कधी खोटी होणार नाही अशी सर्व लोकपालांचीसुद्धा

खात्री असल्याने ते घाबरले. शपथ खोटी ठरली नाहीच. **'मारीन राम-अरि'** या मुद्यावर शपथ घेतली आहे. भरतास मारीन असे म्हणून शपथ घेतली असती तर ती खोटी ठरली असे म्हणावे लागले असते. भरत रामअरि नाहीत असे ठरल्यावर शपथ सत्यच ठरते, खोटी ठरत नाही. भरत रामअरि नाहीत हे आता आकाशवाणीने सांगितले जाणार आहे.

**२. मानसांतील हा लक्ष्मणाचा क्रोध** - लक्ष्मणाच्या या क्रोधाचे यापूर्वी ठिकठिकाणी या टीकेत यथामति विवरण केले आहे. या छोट्याशा प्रकरणांतील वर्णनांत मानवी मनाचा व अनन्य सेवकाचा दास्यभक्ति भावनांचा एक परमोत्कृष्ट नमुना आहे. प्रेम किती आंधळे बनते व त्यामुळे विवेक विलोचन किती मलिन होतो हे अति रमणीय रोमांचकारी व स्वाभाविक यथोचित भाषाशैलीने सहज सुचविले आहे. लक्ष्मणाच्या स्वभावाची ही दोन चित्रे, एकाच कागदावर जवळ जवळ काढणे फार भावोद्‌बोधक होईल व त्यांच्या खाली 'हे चित्र पहा व ते चित्र पहा' असे लिहिणे योग्य होईल. त्याबरोबरच या प्रकरणांतील रामचंद्रांची सुद्धा अशीच दोन चित्रे चित्रित करण्यासारखी आहेत. एक चिंतातुर होऊन समाधान होईपर्यंतचे. या चित्रांत समोर राम मुखकमलाकडे अवलोकन करीत असलेला लक्ष्मण पाहिजेच. नंतर रामचंद्रांचे पूर्ण निर्विकार पण गंभीर व मौनी असे दुसरे चित्र व समोर खवळलेल्या लक्ष्मणाचे चित्र पाहिजे व त्याखाली लिहावे की राम अजून मौन का ?

हिं. *। जगु भय मगन गगन भइ बानी । लखन बाहुबल बिपुल बखानी ॥१॥*
*। तात प्रताप प्रभाउ तुम्हारा । को कहि सकइ को जाननिहारा ॥२॥*
*। अनुचित उचित काजु किछु होऊ । समुझि करिअ भल कह सब कोऊ ॥३॥*
*। सहसा करि पाछें पछिताहीं । कहहिं बेद बुध ते बुध नाहीं ॥४॥*

म. *। जग भयमग्न होइ नभवाणी । लक्ष्मण - भुजबल बहु वाखाणी ॥१॥*
*। तव प्रतापा तथा प्रभावा । जाणे कोण, कोणि वर्णावा ॥२॥*
*। अनुचित उचित कार्य कीं बघती । समजुनि करिति बरें त्यां म्हणती ॥३॥*
*। सहसा करुनी मग पस्तावति । ते ना बुध, बुध वेदहि सांगति ॥४॥*

**अर्थ** - सर्व जग भयांत पडले (बुडले); तेव्हा आकाशवाणी झाली व तिने लक्ष्मणाच्या बाहुबलाची पुष्कळ प्रशंसा केली.॥१॥ तात ! तुमचा प्रताप आणि त्या प्रमाणेच प्रभाव कोण जाणणार व कोणाला वर्णन करता येईल ! ॥२॥

कार्य अनुचित आहे की उचित आहे हे पाहून व नीट समजून जे करतात त्यांना सर्व चांगले म्हणतात.।।३।। (पण) सहसा (अविचाराने व उतावळेपणाने) करून पाठीमागून पश्चात्ताप करतात ते बुध (शाहणे) नाहीत, असे बुध व वेद सुद्धा सांगतात (म्हणतात).।।४।।

**टीका. ल. टे.** - इतका वेळ राम स्वस्थ का बसले या विषयी पूर्वी पुष्कळ लिहिले आहे. प्रश्न एवढाच उरतो की शपथ घेण्याच्या किंचित पूर्वी किंवा शपथ घेतल्याबरोबर **रामचंद्रांनी स्वतःच का समजूत घातली नाही ? समाधान** - शपथ घेईपर्यंत स्वस्थ बसणे रामचंद्रांच्या मनातील हेतू सिद्ध होण्यास आवश्यकच होते. शपथ घेतल्यावर किंवा केव्हाही प्रभूंनी लक्ष्मणाची समजूत घातली असती तरी ते परम शान्त होऊन भरताविषयी काही किल्मष त्यांच्या मनात राहिले नसते; पण **आकाशवाणी करवून ज्या गोष्टी साधावयाच्या त्या साधल्या नसत्या.** I लक्ष्मणाचा प्रताप व प्रभाव किती आहे याची तेथील मुनींना व इतर बटुतापसादिकांना आकाशवाणीने जी कल्पना दिली व त्या वाणीने जो परिणाम झाला तो त्यांच्यावर झाला नसता. II या मुनि वगैरे मंडळींच्या मनात भरताविषयी शंका शिल्लक राहण्यास जागा राहू न देणे ही दुसरी गोष्ट आकाशवाणीने साधली. III लक्ष्मणाच्या भाषणाने मुनींची भावना झाली असेल की राम सर्वज्ञशिरोमणि म्हणजे परमात्मा परमेश्वर आहेत व लक्ष्मण शंकरांपेक्षा मोठे म्हणजे नारायण असले पाहिजेत; या भावनेवर आकाशवाणीकडून पाणी फिरविले; कारण लक्ष्मण बुध नाहीत म्हणजे मूर्ख आहेत हे आकाशवाणीने सिद्ध झाले. आणि ते असा मूर्खपणा करीत असून राम काहीच बोलले नाहीत यावरून ते सर्वज्ञसुद्धा नाहीत अशी भावना सर्व श्रोत्यांची सहजच होणार. आपला ऐश्वर्यभाव गुप्त ठेवणे या आकाशवाणीमुळेच शक्य झाले. या प्रमाणे या एका लीलेने अनेक गोष्टी साधल्या. आकाशवाणी झाली नसती तर या तिन्ही गोष्टी साधल्या नसत्या; फक्त पूर्वी दाखविलेला (२२६।६-७ टीकेत) एकच हेतु साधला असता.

**(२) आकाशवाणी कोणी केली ?** 'सुनि सुर बचन' असे (चौ.५) पुढे म्हटले आहे पण त्या वचनाने इतकेच दाखविले आहे की श्रोत्यांचा समज काय झाला. **सुर शब्दाचा अर्थ माया असाही होतो. 'संतत सुरानीक हित ज्यातें'** (१।४।१०) च्या टीकेत तो अर्थ पहावा. 'ते बुध ना' या शब्दांवरून स्पष्ट ठरते की लक्ष्मणाचे उग्र रूप पाहून घाबरून पळ काढण्याच्या बेतात असलेल्या देवांना, लक्ष्मणांस

अबुध ठरविण्याचे धारिष्ट होणे शक्य नाही. आकाशवाणी लक्ष्मणापेक्षा वरचढ असणाऱ्या कोणाची तरी असली पाहिजे; व अशी वरचढ शक्ति फक्त राममायाच आहे; पण ती स्वतंत्र नाही. म्हणून ठरले की **रामचंद्रांनीच आपल्या मायेला प्रेरणा देऊन तिच्याकडून आकाशवाणी करविली आणि असे करण्याचे प्रथमपासूनच ठरविले असल्याने शेवटपर्यंत अगदी काष्ठमौन स्वीकारून स्वस्थ राहिले.**

**चौ. ३ - (१) अनुचित उचित कार्य कीं बघती** - योग्य-अयोग्य, हितअहित, बरेवाईट, उचितअनुचित असे म्हणण्याचा प्रघात असता व तसे प्रयोग मानसांत असता येथे 'अनुचित' आहे. हे नाट्य, श्राव्य, काव्य आहे. 'अनुचित' हा शब्द ऐकताच पुढील शब्द ऐकण्यापूर्वी ऐकणारांची काय भावना होईल ? प्रताप व प्रभाव एवढा आहे खरा पण अनुचित ! 'अनुचित' च्या नंतर जरा थांबून हे वाक्य उच्चारावे म्हणजे झाले.

**चौ. ४ - (१) सहसा करुनी मग पस्तावति - 'सहसा करुनि मूढ पस्तावे' (१९२।७) च्या टीकेत विस्तार पहावा. भर्तृहरि म्हणतात - 'गुणवदगुणवद्वा कुर्वता कार्यमादौ ॥ परिणतिरवधार्या यत्नतः पण्डितेन ॥ अतिरभस कृतानां कर्मणामाविपत्तेः। भवति हृदयदाहि शल्यतुल्यो विपाकः ॥** (नी.श.) कार्य गुणवान (उचित) असो की अगुणवान (अनुचित) असो. पण्डितानें - शाहण्या माणसाने (बुधाने) त्याच्या परिणामाचा - फळाचा - विचार यत्नपूर्वक केला पाहिजे; अति उतावळेपणाने व अविचाराने (सहसा) केलेल्या कार्यांनि विपत्ति असेपर्यंत शल्यासारखा हृदयदाहरूपी परिणाम भोगावा लागतो. याच श्लोकाचे सार अगदी सोप्या भाषेत पण सुभाषित रूपाने येथे (चौ. ३-४) दोन चौपायांत दिलेले किती प्रभावी आहे पहावे ! आता एकदम निराळे चित्र पहा :

**हिं.** *। सुनि सुर बचनलखन सकुचाने । राम सीय सादर सनमाने ॥५॥*
*। कही तात तुम्ह नीति सुहाई । सब तें कठिन राज मदु भाई ॥६॥*
*। जो अचवँत नृप मातहिं तेई । नाहिन साधुसभा जेहिं होई ॥७॥*
*सुनहु लखन भल भरत सरीसा । बिधि प्रपंच महँ सुना न दीसा ॥८॥*

**हिं.दो.** *। भरतहि होइ न राजमदु बिधि हरिपद पद पाइ ॥*
*॥ कबहुँ कि काँजी सीकरनि छीर सिंधु बिनसाइ ॥२३१॥*

**म.** *। श्रवुनि सुरवचा लक्ष्मण लाजति । राम सिता सादर सन्मानति ॥५॥*
*। तात कथित तुम्हिं नीती सुंदर । बंधो ! नृपमद इतरिं कठिणतर ॥६॥*

*। चढे पिउनि मद भूपां त्यां ही । साधुसभा जिहिं सेवित नाहीं ॥७॥*
*। भला भरतसा लक्ष्मण ! कोणी । विधीप्रपंचीं दृष्ट न कानीं ॥८॥*
म. दो. *। होइ न भरता राज्यमद विधि हरिहरपदिं जात ॥*
*॥ नासत कांजीसीकरें क्षीरसिंधु कधिं तात ! ॥२३१॥*

**अर्थ** - सुरवचनास ऐकून लक्ष्मण लज्जित झाले; (तेव्हा) राम व सीता यांनी त्यांचा आदराने सन्मान केला.॥५॥ तात ! तुम्ही सुंदर नीति सांगितलीत; बंधू ! इतर सर्व मदांपेक्षा राजमद (राज्यमद) अधिक कठीण असतो (हे अगदी खरे) ॥६॥ (पण) त्याचे पान करून मद त्याच भूपांनां चढतो की ज्यानी (जिहिं) साधुसभा सेविली नाही.॥७॥ लक्ष्मणा ! भरतासारखा भला - चांगला (माणूस) ब्रह्मदेवाने निर्माण केलेल्या प्रपंचांत कधी (कुठे) दिसला नाही व कधी कानांवर नाही (ऐकला नाही).॥८॥ ब्रह्मा, हरिहर यांच्या पदी चढले (गेले) तरी भरतांस कधी राज्यमद होणार नाही. कांजीच्या शितोड्याने कधी क्षीरसागर नासतो का ? ॥दो.२३१॥

**टीका. चौ. ५ (१) श्रवुनि सुरवचा** - सर्वांना ही देवांनी केलेली आकाशवाणी वाटली; पण मर्म काय ते पूर्वीच दाखविले आहे. **(क) लक्ष्मण लाजति** - आपल्या चुकीबद्दल लक्ष्मणांस पश्चात्ताप होऊन लाज वाटली. त्यांनी मान खाली घातली, नेत्रांतून चार थेंबही गळले असतील. हे पाहून **(ख) राम सिता सादर सन्मानति** - सीता म्हणाली असेल की तुमचं त्यात काय चुकलं; उत्तम एकनिष्ठ भक्ताचे, सेवकाचे ते कर्तव्यच होते. राम म्हणाले असतील की बाळा ! यांत तुझी चूक नाहीच. कारण मी काहीच बोललो नाही त्यामुळे तुला जे वाटले ते बरोबरच वाटले. तुझ्या बोलण्याकडे माझे लक्षच नव्हते, तेव्हा मूळ चूक माझीच इ. इ.

**चौ. ६-७ (१) कथित तुम्हि नीती सुंदर** - तुम्ही तर नीतीचे उत्तम प्रतिपादन केलेत. सर्व मदांमध्ये राजमद फार कठीण हे काही खोटे नाही. अभिजनमद (उत्तम कुळांत वर्णात, जन्मल्याचा मद) यौवन मद, रूपमद, धनमद, विद्यामद, तपोमद, ज्ञानमद, वैराग्यमद, सत्तामद, सुरामद इत्यादी अनेक मद आहेत; पण राजमद सर्वात मोठा; कारण त्याच्या आश्रयाने इतर अनेक मद तेथे जमतात. मात्र हा नियम सर्वांना लागू नाही. **(ख) साधुसभा जिहिं सेवित नाहीं** - सुरामद एक प्रहरच टिकतो पण राजमदरूपी मदिरा फारच कठीण आहे. ज्यांनी साधूंची सेवा केली नाही; व ज्यांनी संतांच्या मुखाने दीर्घकाळपर्यंत सच्छास्त्र श्रवण केले

नाही त्यांनाच राजमद चढतो; कोणताच मद नसणे हे सुशीलाचे लक्षण आहे; आणि संतसाधूंच्या सेवेशिवाय सच्छीलाची प्राप्ति होत नाही; मद आला की शील गेलेच. 'बुधसेवेविण शील किं मिळतें' (७।९०।६) बुध = ज्ञानीभक्त, = संत = साधु. ही चौपाई (२३१।७) सर्वांनीच आणि विशेषतः सत्ताधीशांनी सतत मनन करण्यासारखी आहे; पण अर्थप्रधान, निधर्मी पक्षनिष्ठ सत्ता असेल तेथून बहुधा संत, धर्म, सच्छील यांना बहिष्कृतच केलेले दिसावयाचे ! (दोह्याच्या उत्तरार्धाची टीका पुढील चौपाईला जोडून घेत आहे.)

*हिं.* *। तिमिर तरुन तरनिहि मकु गिलई । गगनु मगन मकु मेघहिं मिलई ॥१॥*
*। गोपद जल बूड़हिं घटजोनी । सहज छमा बरु छाड़ै छोनी ॥२॥*
*। मसक फूँक मकु मेरु उड़ाई । होइ न नृपमदु भरतहि भाई ॥३॥*
*। लखन तुम्हार सपथ पितु आना । सुचि सुबंधु नहिं भरत समाना ॥४॥*

*म.* *। तिमिर तरुण तरणिला गिळो ही । गगन मेघिं एकत्र मिळोही ॥१॥*
*। गोपद - जळीं बुडो घटयोनी । क्षमा सहज जरि सांडी क्षोणी ॥२॥*
*। मशक - फुंकरें मेरु उडे जरि । नृपमद भरता कधिं न जडे तरि ॥३॥*
*। लक्ष्मण तुझी शपथ पितृ आण । शुचि सु-बंधु नहिं भरत समान ॥४॥*

**अर्थ** - घनदाट (तरुण) अंधार मध्यान्हींच्या (तरुण) सूर्याला गिळो; सगळे आकाश एकाच ढगांत एकत्र राहो.॥१॥ गाईच्या खुराइतक्या पाण्यात अगस्थ ऋषि कदाचित बुडोत किंवा पृथ्वी (क्षोणी) आपल्या ठिकाणची सहज क्षमा सोडून देवो.॥२॥ मशकाच्या फुंकरेने मेरु पर्वत हवा तर उडून जावो, पण भरताच्या ठिकाणी - राजमद कधी उत्पन्न होणे शक्य नाही.॥३॥ लक्ष्मणा तुझी शपथ व पित्याची आण घेऊन सांगतो की भरतासारखा पवित्र व चांगला भाऊ (जगात) नाही.॥४॥

**टीका** - (१) लक्ष्मणाने 'माजे जगच राजपद मिळतां' (२२८।८) असा उपक्रम करून शशी, नहुष, वेन, सहस्रार्जुन, इंद्र व त्रिशंकु हे सहा दृष्टान्त देऊन उपसंहार केला की 'कुणा राजमद दे न कलंकू' या प्रश्नाचे उत्तर रामचंद्रांनी सामान्य नियम म्हणून दिले की ज्यांनी साधु सभा सेविली नसेल त्यांनाच राजमद होतो. लक्ष्मणाने ज्या हेतूने हे दृष्टान्त दिले तो म्हणजे भरताला राजमद झाला आहे हा आक्षेप. 'होइ न भरता राजमद' या मागल्या दोह्याच्या पूर्वार्धाने खंडन केला व नंतर दृष्टान्त देण्यास प्रारंभ केला व कांजीच्या सीकराने, तुषाराने

क्षीरसागर नासतो काय असा पहिला प्रश्न केला. कांजी = एक प्रकारचे धान्याम्ल (acid) कांजिकं धान्याम्लं' (अमरे) अर्थ कच्च्या भिजविलेल्या धान्यांपासून तयार केलेले एक प्रकारचे आम्ल (acid). (क) आम्ल दुधात पडले म्हणजे दूध नासते त्या प्रमाणेच राज्य मिळाले म्हणजे राजमद चढतो हे खरे; पण दूध नासण्यास पुरेसे आम्ल पडले तरच दूध नासते. पावशेर दुधात आम्लाचा - आंबट पदार्थाचा एक थेंब पडला तरी ते नासते पण एक थेंब आम्ल दुधाच्या सागरात पडले तर तो सागर जसा नासत नाही त्याच प्रमाणे राज्य मिळाल्याने भरताला राजमद होणे शक्य नाही. भरताचे हृदय क्षीरसागरासारखे आहे व राज्य एका आम्ल बिंदूसारखे त्याला आहे. अयोध्येचेच राजपद नव्हे तर ब्रह्मपद, हरिपद, हरपद मिळाले तरीसुद्धा भरतरूपी क्षीरसागराला ते एका आम्लबिंदू सारखेच नगण्य, अत्यंत तुच्छ, क्षुद्र, नसल्यासारखेच आहे.

**दृष्टान्ताचे सार** - विरुद्ध, विनाशक, स्वभाव असणाऱ्या पण अत्यंत अल्प वस्तूने अपार, अगाध असणाऱ्या वस्तूचा विनाश होऊ शकत नाही, तिच्यात दोष उत्पन्न होऊ शकत नाही. हेच तत्त्व पुढील पाच दृष्टान्तांत आहे. भरताला राजमद झाला हे ठसविण्यासाठी लक्ष्मणाने तीन पृथ्वीवरील व तीन स्वर्गादि लोकांतील दृष्टान्त दिले. रामसुद्धा भरताला राजमद होणे शक्य नाही हे ठसविण्यासाठी सहाच दृष्टान्त देतात. क्षीरसागर, सूर्य व आकाश हे या पृथ्वीवरील नाहीत व गोपदजल, क्षमा व मशक हे या पृथ्वीवरील दृष्टान्त आहेत. यांतील आकाश जसे केवळ स्वर्गातले किंवा केवळ पृथ्वीवरचे म्हणता येत नाही त्या प्रमाणे त्रिशंकू स्वर्गातलाही म्हणता येत नाही व पृथ्वीवरीलही म्हणता येत नाही. कारण तो अंतराळांतच लोंबकळत आहे. या प्रत्येक दृष्टांतात वैशिष्ट्य काय हे पाहणे जरूर आहे.

(१) **क्षीरसागर** - हा या पृथ्वीवरील किंवा ब्रह्मदेवनिर्मित नाही; तसेच भरत ब्रह्मदेवनिर्मित नाहीत. **'भला भरतसा लक्ष्मण ! कोणी । विधीप्रपंची दृष्ट न कानीं'** (क) क्षीरसागरात नारायण, महालक्ष्मी व शेष यांचा निवास आहे; तसा भरताच्या हृदयरूपी क्षीरसागरात माझा, जानकीचा व तुझा निवास आहे. (ख) क्षीरसागरांतून जसे अमृत निघाले व ते देवांना मिळाले तसे भरतरूपी क्षीरसागरांतून भगवत्प्रेमरूपी अमृत निघाले आहे व ते साधुरूपी सुरांना (देवांना) सुलभ झाले आहे. भरद्वाजांनी आधीच सांगितले आहे की हे अमृत आता पोटभर प्या; शिवाय **'प्रेम अमृत,**

**मंदर विरह, भरत पयोधि गभीर ॥ काढि मधुनि सुर-साधु - हित कृपासिंधु रघुवीर'** (२३८) **(ग)** लक्ष्मणा ! तुझा माझा व जानकीचा निवास ज्या हृदयांत असेल तेथे कोणता तरी विकार उत्पन्न होऊ शकेल काय ? **'हृदयिं वसति खल नाना तोंवर । लोभ मोह मद मान नि मत्सर ॥ जों हृदयीं न वसति रघुनायक । तूण कटीं, धृत कार्मुक सायक'** (५।४७।१-२) **'सीताराम भरतहृदिं राहति'** (२९५।७) असे शारदेने इन्द्राला सांगितले आहे. **(घ) लक्ष्मणाने प्रथम चंद्राचा दृष्टान्त दिला.** तो क्षीरसागरांतून देवांनी व असुरांनी मंथन करून काढलेला; त्यामुळे त्याच्या ठिकाणी आसुरी लक्षणे प्रगट झाली. पण भरताला कोणी उत्पन्न केलेला नाही, तो स्वतः प्रगट झाला. या प्रमाणेच क्षीरसागरांतून मंथन करून काढलेली सर्वच रत्ने सदोष आहेत. पण ते दोष येथे दाखविणे अप्रासंगिक ठरेल. भरताला राजमद होणार नाही हे क्षीरसागर व कांजीने नासणे या असंभाव्य दृष्टान्ताने सांगितले. मद का होणार नाही हे आता सांगतात.

**चौ. १ - (१) तिमिर तरुण तरणिला गिळो** - तरुण तिमिर व तरुण तरणि असा तरुण शब्द घ्यावा. उगवता सूर्य - बाल, मध्यान्ही तरुण व सायंकाळी वृद्ध गणला जातो. अंधाराचा नाश सूर्य उगवल्याबरोबर होतो. मध्यान्ही अंधार पूर्ण नाश पावतो. अंधार प्रकाशविरोधी आहे हे खरे, पण तो कितीही निबिड (घनदाट = तरुण) असला तरी सूर्य त्याचा सहज नाश करतो. असे असता कदाचित सूर्याला - अंधाराने गिळला एखादे वेळी तरी भरताला मद होणे शक्य नाही. प्रलयाच्या वेळी सूर्याला अंधार गिळतोच. 'तम आसीत् तमसा गूढम् अग्रे' (ऋग्वेद) महाप्रलय झाला तरी भरताला राजमद होणार नाही. **(क) तिमिर** = तम = रात्र - **'मोहनिशे** सर्वहि निजणारे' **'महामोहतमपुंज** यद्वचनें **रविकरनिकर'** (१ मं. सो. ५) **'यज्ज्ञानार्के** भवनिशि नासे.... तयां समीप किं **मोह नि ममता'** 'ममता तरुण तमी अंधारी' सूर्याने अंधार व रात्र यांचा नाश होतो तसा ज्ञानसूर्याने - ज्ञानार्काने मोहतम व ममता रात्र (तमी) यांचा नाश होतो. याने सुचविले की भरताच्या ठिकाणी मोह ममता नाहीत. जेथे मोहममता नाहीत तेथे मोहापासून ममतेने उत्पन्न होणार मद कसा असेल ? **'मोह सकल रोगांचे मूळ'** (७।१२१।२९) तथापि क्वचित **'ज्ञान न नाशी जरि मोहासी । तूं प्रतिकूल नव्हसि रामासी'** (२।१६९।३) सूर्याला अंधाराने गिळला = ज्ञानाने मोहममता नाश झाला नाही तरी कौसल्या भरताला म्हणते, तू रामाला प्रतिकूल होणार

नाहीस; म्हणजेच भरतास राजमद होणार नाही. याचे कारण शारदा देवीने इंद्राला सांगितले आहे. **'विधिहरिहरमाया सुप्रबला । भरतमतिस बघु शके न अबला ॥ वसति भरतहृदिं राम नि सीता । तिमिर किं जिंथे प्रकाशि सविता'** (२९५।५,७) सूर्याला जरि अंधाराने गिळला तरि **भरत हृदयांतील सीताराम-प्रतापतरणीचा विनाश कोणी करू शकत नाहीत म्हणून भरतास मोह नाही व म्हणून मद नाही.**

**(२) हा दुसरा दृष्टान्त आहे.** लक्ष्मणाने दिलेला **दुसरा दृष्टान्त नहुषाचा आहे.** तो इंद्राणी वर **मोहित झाला** व त्याने त्यामुळे ऋषींना पालखी-यान वाहक (भोई) केले. हे स्वर्गात घडले. सूर्य सुद्धा स्वर्गातलाच. सूर्यही वाहनांत बसूनच जातो, पण त्याच्या रथाला घोडे असतात. सूर्य अंधाराचा, मोहाचा नाशक. अगदी उलटा दृष्टान्त. नहुष मोहाने कामांध व मदांध बनला. याने सुचविले की **भरताच्या ठिकाणी कामसुद्धा नाही. (क) सूर्य = तेजतत्व.** (४।२८।२-४ पहा.) पुढील चार दृष्टान्तात गगन, जल, पृथ्वी (क्षोणी) व मशकफुंकर = वारा, वायु, यांचा उल्लेख आहे. या पंचतत्वांचीच पंचमहाभूते झाली आहेत. व ती आपला स्वभाव कधी सोडीत नाहीत. (५।५९।२-४ पहा) या पंचमहाभूतांनी जरी आपला स्वभाव सोडला तरी भरत आपला स्वभाव सोडणार नाहीत. भरत विधिप्रपंचातील नाहीत. विधि प्रपंच, पंच भूतनिर्मित आहे, म्हणून प्रलयांत त्यांचा नाश होतो. **भरताचा विनाश व त्यांच्या बंधुप्रेमाचा विनाश प्रलयांत सुद्धा होणार नाही.**

**(३) गगन मेघिं एकत्र मिळो ही** - हा **रामचंद्रांनी** दिलेला तिसरा दृष्टांत आहे. आकाश अनन्त, अपार आहे. **'खं ब्रह्म'** ख = आकाश, ब्रह्मासारखे, ईश्वरासारखे सर्वव्यापक अनंत आहे. त्याच्या एका लहानशा अंशात मेघाची सत्ता (अस्तित्व) असते. मेघांत आकाशाचा अति अति अल्प अंश असतो. संपूर्ण आकाश कधी एका मेघांत किंवा प्रलयकाळीच्या अनंत मेघातसुद्धा साठविता येणे अशक्य आहे. पण ते साठवता येईल एका मेघांत असे मानले तरी भरताला मद होणार नाही. **(क) लक्ष्मणाने तिसरा दृष्टांत वेन राजाचा दिला - 'साधु सुजाण सुशीलहि नृपती । ईश - अंशभव कृपाकर अती'** (१।२८।८) असा राजा असला तरी तो ईश्वराचा अंशच असतो. वेन तर दुष्ट, अधर्मी, वेद विरोधी होता, म्हणजे ईश्वरांश नव्हता. असे असून तो आपणांस ईश्वर मानू लागला. ईशाने निर्मिलेल्या एका लहानशा भूभागाला व्यापणारीच त्याची सत्ता होती. असे असून जणू अनंत अपार ईश्वराला स्वतःमधेच साठवून ठेवला आहे जसे मेघात सर्व

आकाश साठवून ठेवावे तसेच जणू मानीत होता. **(ख)** आकाशांत जसा मेघ असतो तसे मेघश्याम रामरूपी मेघ भरताच्या हृदयात आहे. मेघाने आकाशाला आपल्या स्वतःत साठवले म्हणजे मेघ व आकाश एकरूपच होतील. तसेच भरताचे हृदयाकाश राममेघाने व्यापून टाकल्याने भरतहृदय व राम एकरूपच आहेत. भरताच्या हृदयांत रामाशिवाय दुसरे काही नाही. **'कधि मम जाणा स्वभाव तुम्ही तर । कधिं मज-भरतामधी तिळ अंतर?'** (७।३६।७) असे प्रभूनीच म्हटले की माझ्यात व भरतात मुळीच अंतर नाही. 'तस्मिन् तज्जने भेदाऽभावात्' (ना.भ.) ज्याचे सर्व हृदयाकाश राममेघाने व्यापले आहे त्याच्या हृदयांत राजमदाला जागा कुठली मिळणार? वेनाच्या हृदयांत राम नव्हते म्हणून राजमदाला व दुसऱ्या अनेक गोष्टींना तेथे जागा मिळाली. **भरत अधर्मी, ईश्वरद्रोही, विप्रापमानी नाही हे वेनराजाच्या विरुद्ध दृष्टान्ताने सांगितले.**

**चौ. २ पूर्वार्ध - (१) गोपदजळीं बुडे घटयोनी** - हा **चौथा दृष्टान्त** आहे. **लक्ष्मणाने दिलेला चौथा दृष्टान्त 'सहस्रबाहु'** (सहस्रार्जुन) हा आहे. त्याला हजार बाहू होते. रावणाने आपल्या बाहूंना सागर व बाहुबळाला जल म्हटले अहे. **'बलजल पूरित मम भुजसागर । बुडले ज्यांत शूर बहु सुर नर ॥ वीस पयोधि अगाध अपार हि । कोण शूर जो पावे पारहि.'** (६।२८।३-४). पण सहस्रबाहूला हे वीस भुजबलजलाचे सागर एखाद्या किड्याच्या पायासारखे वाटले व रावण हा एक विचित्र किडा वाटला. **'एक (रावण) सहस्रभुजा आढळला । जंतु गणुनि धावुनी पकडला.** (६।२४।१५) यावरून सहस्रबाहूचे बाहू केवढाले मोठे बलजलाचे महासागर असतील याची कल्पना करावी. पण दोनच भुज असणारा एका विप्राने या सहस्रबाहूचे काय केले पहा - **'दशशतभुज-भुज - शहन अपार । दहन अनलसम यस्य कुठार?** (६।२६।२) परशुरामाने सहस्रबाहूचे बाहू तोडले त्यांचा वध केला. आणि हे झाले कशामुळे? त्या विप्राच्या पित्याजवळ असलेल्या एका गाईमुळे. गाय = गो. तिच्यासाठी केलेला जो उद्योग - व्यवसाय, ते गोपद. **'पदं व्यवसितित्राण स्थान...'** (अमरे) व्यवसिति व्यवसाय, उद्योग. गाईसाठी केलेला उद्योग हेच जल = **गोपदजल.** या जलांत रावणाच्या भुजबल सागरांपेक्षा मोठाले एक हजार महासागर बुडालेच ! **(क) गोपदजळीं बुडे घटयोनी - घटयोनी** = कुंभज = अगस्ति ऋषि. यांनी तीन आचमनांत सागर शोषून टाकला. ते कदाचित गाईचा खुर बुडेल एवढ्या पाण्यांत बुडतील; पण भरताला मद होणार नाही.

याचे कारण पहा - ज्या परशुरामाने सहस्रबाहूला गोपदजलांत बुडविला; त्या परशुरामाचा गर्व ज्यांना पाहताच पळाला ते राम भरताच्या हृदयांत आहेत. **'तो स्वगर्व ज्या बघतां त्यागी । तो कीं नर दर्शशिर्ष ! अभागी ॥'** (६।२६।४) **(ख)** अगस्तींनी जे सागर शोषण केले ते क्रोध आल्यामुळे केले. ते फार क्रोधी होते. **'कुंभज ऋषि शापें की भवानी ।** राक्षस बनला मुनी जो ज्ञानी' (५।५७।११) त्यांना फार क्रोध येऊन त्यांनी एका ज्ञानी मुनीला शाप दिला. क्रोधाला 'जल' असे मानसांतच म्हटले आहे. (२।३४।२ पहा) व तो क्रोध सुद्धा वाढलेल्या अन्नांत काही भलताच पदार्थ दिसल्यामुळे आला. गो = इन्द्रिय, पद = उद्योग, प्रयत्न. इंद्रियतृप्तीच्या प्रयत्नांत क्रोधरूपी जलांत = गोपदजलांत अगस्ती बुडाले. ही कथा ५।५७।३१ च्या टीकेत पहावी. दाखविले की **अगस्तीसारख्या महर्षींना क्रोध आला पण भरताला क्रोध येणार नाही.**

**चौ. २ उत्तरार्ध - (१) क्षमा सहज जरि सांडी क्षोणी - हा पांचवा दृष्टान्त** आहे. **लक्ष्मणाने** सुरनाथ = **सुरपति** - इंद्र हा **पांचवा दृष्टान्त दिला आहे.** इंद्राने गौतमऋषींचे रूप घेऊन गौतमपत्नी अहल्येशी काय केले हे सर्व जाणतात. त्यात त्याने कपट केले. गौतम माझे काय वाकडे करणार असे त्यास वाटले; पण गौतमांनी शाप दिलाच, म्हणजे क्षमा केली नाही; त्यांनी क्षमेचा व कृपेचा त्याग केलाच. 'कृपा विप्र उरिं फार असावी । चूक नेणतां घडे क्षमावी' (१।२८२।४). **(क) क्षोणी =** पृथ्वी, क्षमा. पृथ्वीने क्षमा हा गुण सोडणे म्हणजे आपले नाव गमावणे आहे; पृथ्वीला क्षमा हे नाव आहे. कदाचित पृथ्वी आपला जन्मजात गुण सोडून अक्षमा = मत्सर, द्वेष, वैर करू लागेल. पण भरत क्षमेचा त्याग केव्हाही करणार नाहीत. भरत क्षमाच करतील. **भरत इंद्रासारखे कपटी नाहीत व माझ्याविषयी त्यांच्या मनांत ईर्षा, द्वेष, मत्सर इ. काहीही नाही.** लक्ष्मण! तुझ्याकडून चुकून त्यांचा अपराध केला गेला असला तरी न मागतांच भरत क्षमा करतील. **भरत पृथ्वीपेक्षा क्षमाशील व विप्रोत्तमापेक्षा कृपाशील आहेत. कुबडीची दया त्यांना आलीच.**

**चौ. ३. (१) मशक - फुंकरे मेरु उडे जरि - हा सहावा दृष्टान्त आहे. लक्ष्मणाने सहावा दृष्टान्त दिला 'त्रिशकु'चा.** त्रिशंकु राजाने वसिष्ठ गुरुंचा अपमान करून सदेह स्वर्गास जाण्यासाठी, वसिष्ठांना वैरी मानणाऱ्या विश्वामित्रांचा आश्रय केला. त्रिशंकू भूमीवर असून अति दूर व अति उच्च अशा स्वर्गात देहासहित जाण्याचा प्रयत्न करीत होते; पण शेवटी स्वर्गात कोणी घेईनात व पृथ्वीवर

येऊ देईनात अशी दशा होऊन मध्येच लोंबकळत राहिले! हे राजमदाचे फळ त्यांस मिळाले. **मनुष्य मदांध वा क्रोधांध होऊनच गुरुचाही अपमान करून आपल्या शक्तीला अशक्य असलेली गोष्ट साध्य करण्याचा प्रयत्न हट्टाने करतो.** (क) रामचंद्रांनी दिलेला दृष्टान्त अगदी असाच आहे. मेरु पर्वत फारच उच्च व खोल आहे. त्याला फुंकरेच्या वाऱ्याने उडविण्याचा प्रयत्न मशकाने करणे म्हणजे वृथा मदाने महामूर्खपणा त्रिशंकूसारखाच करणे आहे. मशकाच्या फुंकरेचा वारा जसा मधल्यामधेच राहतो, तो मेरू पर्वताला स्पर्शही करू शकत नाही, तसेच त्रिशंकूचे झाले. गुरु- अपमान करून सुद्धा त्रिशंकू स्वर्गात गेला असता तर मशकफुंकरेच्या वाऱ्याने मेरू उडून गेला असे म्हणता आले असते. असे हे जरि शक्य झाले कदाचित, तरी भरत कधी असला दुष्टपणा मदांध होऊन करणार नाहीत; कारण **भरत विमलयश विधूंत गुरुअपमान दोष नाही.** (२०९।५) असे त्रिकालज्ञ, सर्वज्ञ भरद्वाजांनीच म्हटले आहे. आणि कीर्तिचंद्र पूर्ण रामसुप्रेमपियूषे' आहे.

(२) **नृपमद भरता कधि न जडे तरि - 'भरता होइ न राजमद'** (२३१) असा उपक्रम करून येथे उपसंहार केला. लक्ष्मणाने उपक्रमोपसंहार केला त्याच्या अगदी उलट हे आहेत. लक्ष्मणाच्या सहा दृष्टांतांच्या तोडीचे सहाच दृष्टान्त, त्याच क्रमाने देऊन त्यांनी लक्ष्मणाने भरतावर केलेल्या इतर सर्व आरोपांचेही खंडन केले व शिवाय कितीतरी गूढभाव कसे भरून ठेवले आहेत! प्रत्येक दृष्टांतांतील दोष भरताच्या ठिकाणी उत्पन्न न होण्याचे एकच एक कारण सीतारामचंद्रांचा भरत हृदयांत निवास हे मानसांतच येथील अगदी खुणेच्या शब्दांनी आधार भरून ठेऊन कसे दाखविले आहे हे **पाहिले म्हणजे कवींच्या काव्यप्रतिभेची, शब्दप्रयोगकलेची, व पूर्वावर संगतीची जेवढी प्रशंसा करावी तेवढी थोडीच असे वाटते.**

**चौ. ४ - (१) लक्ष्मण ! तुझी शपथ पितृआण** - लक्ष्मणाने म्हटले की **'कुटील कुबंधु कुसमय साधुनि । ... राज्य अकंटक करण्या धावती'** (२८८।४-५) त्यावर राम म्हणतात की तसे नसून त्यांच्या अगदी उलट आहे. **'शुचि सुबंधु नहि भरतसमान'**. व लक्ष्मणाचा विश्वास बसावा म्हणून प्रथम लक्ष्मणाची शपथ व नंतर पित्याची आण घेतात. त्यात भाव हा आहे :- लक्ष्मणा तू जसा पवित्र व सुबंधु आहेस तसेच भरत आहेत. माझ्यावर प्रेमकरणे हा जसा तुझा स्वभाव आहे तसाच भरतांचा आहे. माझे तुझ्यावर जितके प्रेम आहे त्यापेक्षा तुझ्यावर भरतांचे अधिक प्रेम आहे. **"लालन योग्य चारु लघु लक्ष्मण"** इत्यादि (२००।१-

४ सटीक पहा.) **(क) शुचि** - पवित्र म्हणण्याचे कारण इतकेच की तेही तुझ्यासारखेच पूर्ण विषय विरक्त असून, स्वार्थरहित. आमची दोघांची सेवा करण्याची त्यांना लालसा आहे; पण - **(ख) पितृआण** - आपले पिता जसे माझ्यावर व तुझ्यावर प्रेम करतात तसेच भरतांवर करतात. पिता जसे मला व तुला आदरणीय तसेच आता भरतांस आपण मानले पाहिजेत; कारण पित्याच्या आज्ञेने १४ वर्षे पर्यंत ते अयोध्यापती आहेत. त्यांनी राज्याचा स्वीकार केला असेल असे मला वाटत नाही; पण केला असला वा नसला तरी पित्राज्ञेप्रमाणे ते अयोध्याधीश आहेत व आपण प्रजाजन आहोत. पित्याचे माझ्यावर जितके प्रेम आहे तितकेच भरतांचे आहे; फरक वात्सल्यभाव व दास्यभाव इतकाच आहे. पित्यासारखेच आपल्या तिघांच्या विरहाने व्याकुळ होऊन भेटण्यास येत आहेत, यांत संदेह मुळीच नाही. **(ग) भला भरतसा लक्ष्मण ! कोणी विधिप्रपंची दृष्ट न कानी'** असे म्हणून उपक्रम केला व **'शुचि सुबंधु नहि भरत समान'** असा येथे उपसंहार केला. विधिप्रपंची हे शब्द येथे अध्याहृत घ्यावयाचे व येथील सुबंधु शब्द उपक्रमांत अध्याहृत घ्यावयाचा आहे. ज्या विषयाची चर्चा सुरू केली होती तो खरोखर येथे संपला; पण राम भरताच्या प्रेमात इतके रंगले आहेत की त्यांचेच वर्णन करतात -

**हिं.** ***। सगुनु खीरु अवगुन जलु ताता । मिलइ रचइ परपंच बिधाता ॥५॥***
***। भरत हंस रबिबंस तडागा । जनमि कीन्ह गुन दोष बिभागा ॥६॥***
***। गहि गुन पय तजि अवगुन बारी । निजजस जगत कीन्हि उजिआरी ॥७॥***
***। कहत भरत गुन सीलु सुभाऊ । पेम पयोधि मगन रघुराऊ ॥८॥***

**म.** ***। सुगुण दूध अवगुण जल ताता । मिळवुनि रची प्रपंच विधाता ॥५॥***
***। भरत हंस रविवंश - तडागां । जन्मुनि कृत गुण - दोषविभागां ॥६॥***
***। पय गुण घे त्यजि अवगुण वारी । स्वयशें कृत जग भास्वर भारी ॥७॥***
***। वदत भरत गुण शिला स्वभावहि । प्रेम - पयोधिं मग्न रघुराव हि ॥८॥***

**अर्थ** - ताता ! सद्गुणरूपी दूध आणि अवगुण (दोष) रूपी पाणी मिळवून विधात्याने प्रपंचाची रचना केली आहे. ॥५॥ रविवंशरूपी तडागांत (मानस - सरोवरात ) जन्मून भरतरूपी हंसाने गुण व दोष यांची विभागणी केली. (गुणदोषांचे पृथक्करण केले.) ॥६॥ (आणि) सद्गुणरूपी दूध घेऊन व अवगुण (दोष) रूपी पाणी टाकून त्यांनी आपल्या यशाने जगाला फार प्रकाशमय केले.

॥७॥ भरताचे गुण, शील व स्वभाव यांचे कथन करता करता रघुराज (राम) प्रेमपयोनिधींत बुडाले (मग्न झाले) ॥८॥

**टीका. चौ. ५-७ (१) सुगुण दूध अवगुण जल ... विधाता - बऱ्या वाइटांविधिने सृजिले ! गणुनि दोष गुण वेदिं निवडिले ॥ कथित वेद इतिहास पुराणीं ! विधीप्रपंच गुणागुण खाणी ॥ संत हंस गुण घेति पय त्यजुनि जला दोषांस'** (१।६।४ व दो.) यांत जे सांगितले तेच येथे सांगितले आहे व पुढील दोन चौपायांनी ठरविले आहे की भरत उपजत स्वभावानेच संत आहेत. **(क) भरतहंस रविवंशतडागीं** - हंस मानस सरोवरांतच असतात म्हणून येथे तडाग = मानस सरोवर. हंसांच्या ठिकाणी दूध व पाणी यांचे पृथक्करण करून त्यांतील फक्त दूधच पिण्याची ग्रहण करण्याची शक्ती जन्मतांच असते. तशी या जगांतील फक्त सद्गुणच घेऊन दोषांकडे मुळीच न बघण्याची शक्ती संतांच्या ठिकाणी असते. वरील १।६ दोहा पहा. भरत जन्मापासूनच दोषरूपी पाण्याला स्पर्श न करता सद्गुणरूपी दूधच घेत असतात, म्हणजेच भरत उपजल्यापासूनच संत, साधु आहेत. त्यांच्या ठिकाणी दोष मुळीच नसून सद्गुणच आहेत. कारण ते कधीं दोषाला स्पर्शच करीत नाहीत.

(२) **गूढार्थ** - हंस = विष्णु, सूर्य व निर्लोभनृपति. **'हंसो विहंगभेदे स्यात् अर्के विष्णौ हयान्तरे ।.... निर्लोभनृपतौ** हंसः शरीरमरुदन्तरे' (विश्वः) विष्णूचा अवतार भरत आहेत हे पूर्वी (२३०।८) टीकेत सांगितलेलेच आहे. हे **अवताररहस्य सुचविले. (क) सूर्य** - सर्व जगाला प्रकाशमय बनवितो; **'स्वयशें कृत जग भास्वर भारी'** याने स्पष्टच आहे. **'रामें जन्मुनि कृत जग भास्वर । रूप-शील-सुख-सबगुण सागर'** (२००।५) असे भरत रामाविषयी म्हणाले तेच राम येथे भरताविषयी म्हणत आहेत. भरताने रूपशीलसुख सबगुणसागर म्हटले ते येथे गृहीत धरावयाचे आहे. **(ख) निर्लोभ नृपति** - भरताने पितृदत्त राज्याचा त्याग केला; व रघुनाथांस परत नेण्याचा जिवापाड प्रयत्न केला याच गोष्टीने मुख्यतः भरताचे सुयश पसरले. भरताचे रामप्रेम जेवढे जसे आहे तेवढे तसेच राहून भरताने जर राज्याचा स्वीकार केला असता तर भरताचे सुयश न होता अकीर्तीच पसरली असती; म्हणूनच पूर्वी टीकेत म्हटले आहे की भरताच्या त्यागापेक्षा व रामाच्या त्यागापेक्षाही लक्ष्मणाचा त्याग सर्वांत मोठा व श्रेष्ठ आहे; कारण तो केवळ निर्हेतुक आहे; व्यावहारिक, लौकिक हेतु त्यांत नाही.

**चौ. ८ - (१) वदत भरत-गुण-शिला स्वभावहि ... रघुरावहि.** ही चौपाई

फारच महत्त्वाची आहे. भरतावर रामप्रेम कोणत्या प्रकारचे व किती आहे हेही चौपाई दाखविते हे तिच्या दोन बहिणी सांगतील. I **'राम रूप गुण शिला स्वभावा। बघुनि परिसुनी प्रमोद रावा'** (२।१।८) II **'रामरूप गुण शिला स्वभावा। स्मरुनी स्मरुनि शोक हृदिं रावा ॥'** (१४९।८) ही दोन्ही वचने दशरथांविषयी आहेत. या वचनांनी स्पष्ट कळते की दशरथांचे रामावर जितके व ज्या प्रकारचे प्रेम होते, तितके व त्या प्रकारचे प्रेम रामाचे भरतावर आहे. **'ज्येष्ठो भ्राता पितुः समः'** या वचनाची अक्षरशः सार्थकता दर्शविली. III **वदत रामगुण शिला स्वभावा। लोचन सजल पुलक मुनिरावा ॥ लक्ष्मण सीता प्रीती बानुनि। स्नेहिं शोकिं बुडले** (= मग्न) **ज्ञानी मुनि'** (१७१।७-८) या चौथ्या पुनरुक्तीने दाखविले की वसिष्ठांचे रामचंद्रावर जसे ज्या भावनेने प्रेम आहे तसे त्या भावनेनें रामाचे भरतावर आहे; व वसिष्ठांचे तसेच भरतावर आहे; हे पुढे दिसेलच. सार हे की रामचंद्रांचे भरतावरील प्रेम, पुत्रवत व शिष्यवत मानून, म्हणजे पिता व गुरु या दोन भावनांनी मिश्र आहे हे पुढे दिसेलच.

**सूचना** - या प्रकरणांतील लक्ष्मणाच्या क्रोधाला जे कोणी आततायीपणा म्हणतील ते पक्षपाती ठरतील व त्यांना तुलसीमानस समजलेच नाही असे म्हणावे लागेल; आणि जगांतील सर्व नात्यांचा त्याग मनातून सुद्धा करता येतो या म्हणण्यावर त्यांचा विश्वास नाही असे ठरेल. **(क) 'हरगिरिहुनि गुरु सेवक धर्म'** व **'सेवक धर्म कठोर समस्तिं'** याचे मर्म जाणून पूर्णपणे पालन करून दाखविणारा सेवक एकच सुमित्रानंदवर्धन - रामानुज लक्ष्मण ! **(ख)** लक्ष्मणाचे रामप्रेम भरतापेक्षा लेशमात्र कमी नसून कांकणभर जास्तच आहे. इत्यादि अनेक गोष्टींचे मानसाधारे सविस्तर विवेचन **प्रस्तावनेत 'श्रीरामसेवामूर्ति लक्ष्मण'** या प्रकरणांत (पृ. ६०२) पहावे आणि **'श्रीमानसांतील चरित्रचित्रण'** (पृ. ६९२) हे प्रकरण मुद्दाम पहावे.

*हिं.दो. । सुनि रघुबर बानी बिबुध देखि भरत पर हेतु ॥*
*॥ सकल सराहत राम सो प्रभु को कृपा निकेतु ॥२३२॥*

*म.दो. । श्रवुनि विबुध रघुवरवचन पाहुनि भरतीं स्नेह ॥*
*॥ स्तविती सकल किं रामसा प्रभु कुणि कृपा-सुगेह ॥२३२॥*

**अर्थ** - रघुवराचे भाषण ऐकून व (त्यांचा) भरतावरील स्नेह पाहून सगळ्या देवांनी (विबुध = देव) स्तुती केली की रामचंद्रांसारखा कृपेचे माहेरघर असणारा समर्थ स्वामी दुसरा कोण आहे ? (कोणी नाही) ।।दो. २३२।।

**टीका.** (१) **कृपानिकेत =** कृपेचे निवासस्थान = कृपा - सु-गेह - म्हटले; कारण, ज्याला राज्य मिळवून देण्यासाठी कैकयीने वनवासासारख्या दुःखाच्या दावानलांत टाकले व अनेक अनर्थ केले त्या तिच्या मुलावर इतके अपार प्रेम! **हेतु** (हिंदी) = स्नेह, प्रेम. **प्रभु** = वाटेल ते करण्यास समर्थ असून, दीना प्रमाणे वनवास विपत्ती भोगीत आहेत. असा स्वामी दुसरा कोणीही मिळणार नाही. **'स्वामी रघुपति समान नाही'** हे प्रकरण प्रस्तावनेत (पृ. ५३८) **पहावे.** या देवांनीच स्वतःच्या स्वार्थासाठी त्या बिचारीच्या नावाला निरंतरचा कलंक लावला व पुन्हा नामानिराळे राहिले ! आता भरताची प्रशंसा करतील.

*हिं.* ***। जौं न होत जग जनम भरत को । सकल धरम धुर धरनि धरत को ॥१॥***
***। कबि कुल अगम भरत गुन गाथा । को जानइ तुम्ह बिनु रघुनाथा ॥२॥***
***। लखन राम सिय सुनि सुर बानी । अति सुख लहेउ न जाइ बखानी ॥३॥***

*म.* ***। होता ना जगिं भरतजन्म जर । कोण धरणि धरि सकल धर्मधुर ॥१॥***
***। भरत गुणकथा कविकुल-गम्य न । कळे कुणा रघुनाथ तुम्हांविण ॥२॥***
***। लक्ष्मण राम सिता सुरवचनें । सुख पावति अति शक्य न वदणें ॥३॥***

**अर्थ -** (देव म्हणतात) भरताचा जन्म जर जगात झाला असता तर धरणी व सर्व धर्मांची धुरा कोणी धारण केली असती ! ॥१॥ कवि व ज्ञानी यांच्या समूहांनासुद्धा अगम्य अशा भरताच्या गुणकथा (गुणगाथा) रघुनाथ ! तुमच्या शिवाय कोणाला कळू शकणार ? (कोण जाणणार !) ॥२॥ देवांच्या वचनाने (वचन ऐकून) लक्ष्मण राम व सीता यांना अति सुख झाले; (पण) त्याचे वर्णन (त्यांनासुद्धा) करता येत नाही.॥३॥

**टीका. चौ. १ - (१) धरणि कोण धरि सकल धर्मधुर -** याचे दोन-तीन अर्थ होतात; एक सरळ वाच्यार्थ वर दिलाच आहे. **(क) धुर =** भार असा दुसरा अर्थ आहे. 'धूर यानमुख - भारगोः' (हैमः) सकल धर्मांचा भाररूपी धरणी कोणी धारण केली असती ? शेष पृथ्वीचा भार धारण करतो म्हणून पृथ्वी टिकली आहे; भरताने सकल धर्मरूपी धरणीचा भार धारण केला आहे म्हणून धर्म टिकला आहे व म्हणून धरणीचा विनाश होत नाही. हेच भरताने निराळ्या भाषेत म्हटले आहे. **'हटें' द्याल मज राज्या जेव्हां । रसा रसातळिं जाइल तेव्हां'** (१७९।२२।प.) पुत्रधर्म, भ्रातृधर्म, राजधर्म, भागवतधर्म, सेवकधर्म, शिष्यधर्म इ. सर्व धर्मांचे पालन भरतांनी काटेकोरपणे केले आहे. लक्ष्मणाने केवळ सेवक

धर्माचे व भागवत धर्माचेच पालन केले आहे. यामुळे भरतचरित्र बहुजन समाजास अनुकरणीय असा उत्तम आदर्श आहे यांत शंका नाही. **लक्ष्मण चरित्र अलौकिक, दिव्य असल्याने सर्वसाधारण समाजाच्या अनुकरण शक्तीच्या बाहेरचे आहे. त्यामुळे सर्वसाधारण वाचकांस व श्रोत्यांस ते भरत चरित्रासारखे चित्ताकर्षक वाटत नाही हे तितकेच खरे. (ख) तिसरा अर्थ** - धुर = मुख्य, धुरेचा - सकलधर्मात मुख्य - श्रेष्ठ धर्म = भागवत धर्म. या भागवत धर्मरूपी धरणीचे धारण कोणी केले असते ? **'श्रीरामसीता प्रेमपीयूषमय न जन्मत भरत कीं ॥ कलिकालिं तुलसी सम शठा कुणि रामसंमुख करत कीं'** (३२६ छंद) हे वचन या तिसऱ्या अर्थाला अनुकूल आहे. **'भरत राहि महि तुम्हिं राखा तर'** (२६४।१) असे रामच म्हणाले आहेत. **'जोही विश्वभरण पोषण करि । नाम तयाचें भरत जाण तरि'** (१।१९७।७) ही वचने दुसऱ्या अर्थाला पोषक आहेत. म्हणजे तिन्ही अर्थ घेणे जरूर आहे असे मानस निर्मात्यांचे स्पष्ट मत आहे.

**चौ. २-३ (१) कविकुल - गम्य न - कविकुल =** शुक्राचार्य, गणपति, शारदाशेष, ब्रह्मा, बृहस्पति, वाल्मीकी, व्यास इ. सर्व कवि समाज यांना गम्य नाही. **(क) लक्ष्मण राम सिता सुख पावति** - येथे व पुढे एक मोठा चमत्कार पाहण्यास सापडतो की जो लक्ष्मण भरताचा कृतान्त होऊ पहात होता, त्याच लक्ष्मणास रामवचने व देववचने ऐकून सर्वांच्या आधी सुख झाले. पुढे लवकरच दिसेल की लक्ष्मणाच्या मनात पूर्वी घडलेल्या या गोष्टींचा गंधसुद्धा उरलेला नाही. कारण या गोष्टींशी त्याचा व्यक्तिशः काहीच संबंध नाही. लक्ष्मणाचे भरतावरील प्रेम या घटनेने अनंतपट वाढले हे पुढे दिसून येत आहे. अलौकिकांचे सर्वच अलौकिक ! भरताविषयीच्या प्रतिकूल भावनांशी लक्ष्मणाचा व्यक्तिशः जर लेशमात्र संबंध असता तर हृदयाकाश इतक्या विद्युद्वेगाने अगदी स्वच्छ होणे शक्यच नव्हते. **लक्ष्मणाच्या हृदयांत रामाशिवाय इतर कोणाला व कशालाही, फार काय लक्ष्मण या व्यक्तीला सुद्धा जागा नाही**; यामुळे या दोन्ही गोष्टी सहज घडल्या. पण हे फारच दुर्मिळ आहे. **उपदेश** हा आहे की गैरसमजाने घडलेल्या गोष्टीबद्दलचा गैरसमज दूर झाल्यावर संकोचालासुद्धा त्या हृदयांत जागा असता नये. हे विशाल, परम शुद्ध, सरळ व कोमल स्वभावाचे लक्षण असून **कर्तृत्व भावना पूर्णपणे नष्ट झाल्याशिवाय हे घडणे शक्य नाही.**

सीता स्वप्न व रघुनाथाची चिंतातुर दशा यांनी निर्माण केलेले हे रोमांचकारी

प्रेम, पर्यवसायी, मुख्यतः लक्ष्मण स्वभावचित्र निदर्शन प्रकरण येथे पूर्ण झाले. भरत आता कुठे व काय करीत आहेत ते पाहू या :

हिं. *। इहाँ भरतु सब सहित सहाए । मंदाकिनीं पुनीत नहाए ॥४॥*
*। सरित समीप राखि सब लोगा । मागि मातु गुर सचिव नियोगा ॥५॥*
*। चले भरतु जहँ सिय रघुराई । साथ निषादनाथ लघु भाई ॥६॥*
*। समुझि मातु करतब सकुचाहीं । करत कुतरक कोटि मन माहीं ॥७॥*
*। रामु लखनु सिय सुनि मम नाऊँ । उठि जनि अनत जाहिं तजि ठाऊँ ॥८॥*

म. ***। इथें भरत सह सर्वहि मंडळि । स्नान करिति मंदाकिनि-शुचि जळिं ॥४॥***
***। लोकां सरितें समीप ठेउनि । माता - गुरु - सचिवाज्ञा घेउनि ॥५॥***
***। निघति जिथें सीता रघुराऊ । साथ निषादनाथ लघु भाऊ ॥६॥***
***। जननीकरणी समजुनि लाजति । कोटि कुतर्क मनीं करूं लागति ॥७॥***
***। रामसितालक्ष्मण मम नावा । श्रवुनि न जाती त्यजुनि किं ठावा ॥८॥***

**अर्थ** - इथे भरतानी सगळ्याच मंडळींसह मंदाकिनीच्या पवित्र (शुचि) जलात स्नान केले.॥४॥ आणि नदीच्या जवळ सर्व लोकांना ठेऊन माता (कौसल्या) गुरु (वसिष्ठ) व सचिव यांची आज्ञा घेऊन - ॥५॥ निषादनाथाला साथीदार म्हणून घेऊन जिकडे सीता व रघुराज राहतात तिकडे धाकट्या भावासह चालले.॥६॥ जननीच्या करणीचा विचार मनात येताच (समजुनि) लाज वाटली व मनांत अनंत कुतर्क करू लागले की - ॥७॥ माझे नाव ऐकून रामसीता व लक्ष्मण (आपले) निवासस्थान सोडून (दुसरीकडे) जाणार तर नाहीत ?॥८॥

**टीका.** चौ. ४-६ (१) भरत कथेचे सूत्र **'बसले स्थल जल बघुनि, उजाडत । रघुनाथ प्रेमें गमनांकृत'** (२२६।२) येथे सोडले होते, ते आता पुन्हा हाती घेतात. भरतादिक उजाडल्याबरोबर निघाले; व तिकडे राम पाहटेस उठून सीतास्वप्न श्रवणादि सर्व प्रकार उरकला; तोपर्यंत भरतादि मंडळी मंदाकिनी नदी ओलांडून आली व सर्वांनी स्नान केले. (क) **लोकां सरिते समीप ठेउनि** का निघाले याचे एक कारण कवींनी शेवटच्या (८ व्या) चौपाईत सुचवून ठेवले आहे. राम कुठे रहात होते हे गुहाला माहीत आहे. परंतु रामचंद्रांनी स्थलांतर केले असल्यास नवीन स्थानाचा पत्ता लागेपर्यंत सर्वांची धींड काढणे मूर्खपणा व निर्दयपणा ठरला असता. वनवासी मुनि उपाधि होऊ नये म्हणून स्थळांतर करीत असत. दीड महिन्यांपूर्वीच येऊन राहिल्यामुळे स्थान हवा, पाणी मानवणे इ. अनेक

गोष्टीमुळे स्थलांतराचा संभव होता; म्हणून फार मंडळी बरोबर घेतली नाहीत हेच योग्य केले. **(ख) साथ निषादनाथ लघु भाऊ** यांना का घेतले मग ? याचे उत्तर साथ व निषादनाथ या शब्दांनीच दिले आहे. **निषादनाथ शब्द** या पूर्वी फक्त दोनच वेळा वापरला (२०३।१; २२१।४) असून दोन्ही ठिकाणी **उत्तम मार्गदर्शक** (वाटाड्या) **म्हणूनच वापरला** असून त्या दोन्ही ठिकाणी निषादनाथ सर्वांच्या पुढे आहे. राम कुठे राहतात व तिकडे जाण्याचा रस्ता त्यास उत्तम प्रकारे माहीत आहे म्हणून त्यास पथदर्शक (वाट दाखविणारा) या नात्याने बरोबर घेतला; व त्याचा उल्लेख प्रथम करून सुचविले की तो पुढे व धाकट्या भावासह भरत त्याच्या मागे असे चालले -

**चौ. ७-८ (१) जननी करणी समजुनि लाजति** - मी आपले कलंकित तोंड श्रीरघुनाथाला कसे दाखवू असे वाटले. २।९६।४-५ पहा. लक्ष्मण काही अनुचित बोलले त्या वेळी रघुनाथांस संकोच वाटलाच आहे. तेथील टीकेत **उपदेश** पहावा. **(क) कुतर्क करूं लागति** - भरत पुढे जे विचार, तर्क करीत आहेत ते कुतर्क आहेत; कारण रामस्वभावाचे ज्ञान त्यांना असून व पूर्वी त्यांनीच तसा आत्मविश्वास प्रगट केला असून रामस्वभावानुसार जे घडणे शक्य नाही ते घडेल की काय अशा कुकल्पना ते करीत आहेत. 'यद्यपि मी वाइट अपराधी । जरी मजमुळें सर्व उपाधी ।। तदपि शरण सन्मुख जैं बघतिल । क्षमुनि सकल बहु कृपा वर्षतिल ।। शील, भीड, अति ऋजू स्वभाव । कृपा स्नेह सद्मचि रघुराव ।। रिपु-अहितहि कधिं राम नाचरति । मी शिशु सेवक जरी वाम अति ।। जन्म कुमाताजठरिं जरि मी शठ दोषि सदाहि ।। त्याजिति न मज रघुवीर, निज गणुनी प्रतिति मला हि' (१८३।३-६ व दोहा) - असे अयोध्येतील दरबारांत जे भरत रामाविषयी प्रतीतिपूर्वक म्हणाले, तेच भरत येथे म्हणतात की माझे नाव ऐकून स्थान सोडून जातील की काय ? मी मातेला सामील आहे असे समजून त्याग करतील की काय ? हे कुतर्क नाहीत काय ? बरे राम असे करतील अशी शंका येण्यास आधार काडीमात्र नाही. लक्ष्मणाने भरताविषयी जे कुतर्क केले त्यांना फार मोठा आधार म्हणजे भरताने फार मोठे सैन्य घेऊन, आधी दूत वगैरे पाठवून न कळविता येणे व रामाची चिंतातुर मुद्रा व त्यांची मूक संमति. **(ख)** भरत रामाविषयी निराधार कुतर्क, स्वतःच्या दृढ विश्वासाविरुद्ध सुद्धा करीत आहेत. ते काही वाचकांस प्रिय वाटतात; भरत प्रत्यक्ष आपल्या जन्मदात्रीला न भूतो न भविष्यति बोलले ते ऐकून वाचकांस आनंद होतो व ते अक्षम्य वाटत नाही आणि लक्ष्मणाने सरळ पुराव्याच्या

आधारे जे कुतर्क केले ते काही वाचकांस वाईट दिसतात व अक्षम्य वाटतात ! **हा एक मोटा चमत्कारच आहे.** (ग) माझे नाव ऐकून राम स्थान सोडून जातील अशी शंका येणे म्हणजे राम निर्दय आहेत, ते भरताचा स्वभाव व शुद्ध हृदय जाणत नाहीत असे वाटणेच नव्हे काय ? पण पक्षपाती व पूर्वग्रह दूषित श्रोत्यांच्या व वाचकांच्या चित्तावर विपरीत परिणाम होतो.

*हिं.दो.* *। मातु मते महुँ मानि मोहि जो कछु करहिं सो थोर ॥*
*॥ अघ अवगुन छमि आदरहिं समुझि आपनी ओर ॥२३३॥*

*हिं.* *। जौं परिहरहिं मलिन मनु जानी । जौं सनमानहिं सेवकु मानी ॥१॥*
*। मोरें सरन रामहि की पनही । राम सुस्वामि दोसु सब जनही ॥२॥*
*। जग जस भाजन चातक मीना । नेम पेम निज निपुन नबीना ॥३॥*

*म.दो.* *। मातृमतीं मज मानुनी थोडें जें करतील ॥*
*॥ क्षमुनि दोष अघ, आदरति स्वताकडे बघतील ॥२३३॥*

*म.* *। त्यागिति जरि मन मलिन समजुनी । जरि सन्मानिति सेवक गणुनी ॥१॥*
*। राम-उपानह सुशरण मजला । स्वामि राम शुभ दोष जनाला ॥२॥*
*। जगीं मीन चातक यश-भाजन । प्रेम नेम निज नव पटु पावन ॥३॥*

**अर्थ** - मी मातेच्याच मताचा आहे असे मानून जे काही करतील ते थोडेच आहे; पण आपल्या स्वतःकडे बघतील तर माझे सर्व दोष व पापे क्षमा करून आदर देतील.॥ दो.२३३॥ मी मलीन मनाचा (पापी) आहे असे समजून त्याग केला किंवा सेवक मानून सन्मान केला; तरी मला स्वामींचे जोडे (पादुका) च योग्य शरण = आश्रय आहेत; कारण की राम चांगले स्वामी आहेत व दोष माझा दासाचा आहे.॥१-२॥ जगात मीन व चातक (खरे) यशपात्र आहेत कारण (मीनाचे) प्रेम व (चातकाचा) प्रेमाचा नेम नित्य नवा व पवित्र ठेवण्यात ते निपुण आहेत.॥३॥

**टीका.** - (१) येथे दोह्यांत दोन गोष्टींची शक्यता मानली. मातेच्या कुटिल करणीत मी सामील होतो व आहे असे मानून माझा त्याग करणे; किंवा माझ्या दोषांकडे व पापांकडे न पाहता स्वतःच्या ब्रीदाकडे पाहून स्वीकार करणे. **(क)** त्याग केला तरी त्यांत चूक स्वामींची नाही, स्वामींचा दोष नाही; व क्षमा केली तर त्यांत स्वामींचा मोठेपणा आहे. **(ख)** काहीही घडले तरी मी मात्र स्वामींच्या चरणपादुकांचाच सेवक राहणार; कारण मी रामसेवक म्हणविण्यास लायक नाही माझा अधिकार फार तर

त्यांच्या जोड्यांशी उभा राहण्याचा आहे. (१९१।४ टी. पहावी).

**चौ. ३ - (१) जगीं मीन चातक यशभाजन... पावन** - या चौपाईत यथाक्रम अलंकार आहे. मीन आपल्या प्रेमाबद्दल प्रसिद्ध आहे. पाण्याचा वियोग झाला की तडफडून प्राण सोडतो, ते त्याचे प्रेम कधी जुने होत नाही व या त्याच्या प्रेमात तो सदा निपुण असतो. चातक आपल्या प्रेमाच्या नेमाबद्दल प्रसिद्ध आहे २।२०५।१-५ टीका पहावी. भरत म्हणतात माझ्याकडून एकही घडले नाही. रामाला सोडून मामाकडे गेलो व कितीतरी वर्षे राहिलो; यावरून मी चातक नाही. चातक झाला लक्ष्मण ! "**अहह ! धन्य लक्ष्मण बहुभागी । रामपदारविंद-अनुरागी** । रघुवीरविहीन राम धाम पाहिले पण प्राण गेले नाहीत; अर्थात मी मीनही नाही. मीन झाले अयोध्यापति !

*हिं.* *। अस मन गुनत चले मग जाता । सकुच सनेहँ सिथिल सब गाता ॥४॥*
*। फेरति मनहुँ मातु कृत खोरी । चलत भगति बल धीरज घोरी ॥५॥*
*। जब समुझत रघुनाथ सुभाऊ । तब पथ परत उताइल पाऊ ॥६॥*
*। भरत दसा तेहि अवसर कैसी । जल प्रबाहँ जल अलि गति जैसी ॥७॥*
*। देखि भरत कर सोचु सनेहू । भा निषाद तेहि समयँ बिदेहू ॥८॥*

*म.* *। असें म्हणत मनिं मार्गी जातां । गात्रीं लज्जा - स्नेह - शिथिलता ॥४॥*
*। दोष मातृकृत त्यां जणुं फिरवित । धीर भक्तिबल चाहुरिं चालत ॥५॥*
*। स्मरतां स्वभाव रघुनाथाचा । त्वरें पाय पथिं पडतो त्यांचा ॥६॥*
*। भरतदशा त्या समयीं तैसी । जलअलिगति जल-ओघीं जैसी ॥७॥*
*। बघतां स्नेह खेद भरताचा । होइ निषाद हि विदेह साचा ॥८॥*

**अर्थ** - असे मनात म्हणत (कुतर्क करीत) मार्गाने जात असता भरताच्या गात्रांत लज्जा व स्नेह यांमुळे शिथिलता आली.॥४॥ मातेने केलेले दोष जणुं त्यांना (मागे) फिरवीत आहेत; पण भक्तिबल व धीर या चाहुरीच्या बळावर चालत आहेत.॥५॥ रघुनाथाच्या स्वभावाची आठवण झाली म्हणजे मात्र पाऊल रस्त्यावर भराभर पडते.॥६॥ त्या वेळी भरताची तशी दशा झाली जशी पाण्याच्या प्रवाहांत जलभ्रमराची होते.॥७॥ भरताचा स्नेह व खेद पाहून निषादसुद्धा त्या वेळी खराखुरा विदेह बनला (देहभान विसरला) ॥८॥

**टीका. चौ. ४-७ (१)** या वेळी चालत असता भरताची गति कशी होती याला जलाच्या प्रवाहांतून जाणाऱ्या जलभ्रमराचा दृष्टान्त दिला. जोपर्यंत तो धारेत सापडला

नाही तोपर्यंत प्रवाहाच्या उलट दिशेने सुखाने जात असतो; पण धारेत सापडला म्हणजे धारेची गति त्याला मागे लोटित असते. जेव्हा कैकयीच्या दोषांची आठवण होते तेव्हा जणू चालवत नाहीसे होऊन पाऊल मागेच पडू लागते; पण रामभक्तीचे बल, जोर व धीर या दोन बैलांना जुंपले त्या गाड्याला म्हणजे मग देहरूपी गाडा चालू लागतो. **(क)** गाड्याच्या बैलांना चढणीला वगैरे बोजा ओढवत नाहीसा झाला म्हणजे आणखी एक बैलांची जोडी पुढे जोडतात तेव्हा मग गाडा पुढे नेता येतो. या नव्या जोडलेल्या बैलांना चाहुरी ( = धोरी) म्हणतात. भरताच्या देहरूपी गाड्याला ओढून नेणारे दोन बैल (म्हणजे दोन पाय) लज्जा व स्नेह यांनी अगदी गळून गेले आहेत. त्यांत मातेने केलेल्या दोषांची आठवण झाली म्हणजे जणू चढणीला लागलेला गाडा जसा मागे घसरत जावा तशीच दशा होत आहे. गाडी हाकणारा एकटाच आहे. एकटा गाडीवान असला म्हणजे दोन मस्त बैल एकदम जुंपता येत नाहीत. प्रथम एक जुंपला जातो; तसा रामस्वभावाचे स्मरण झाले की भक्तिबल रूपी एक नवा बैल जोडला जातो. बळ मिळाले म्हणजे धीर येतो की मी कितीही दोषी असलो व मातेने महा अनर्थ केला असला तरी प्रभु तिकडे मुळीच पाहणार नाहीत - असा हा धीररूपी दुसरा बैल सहज जुंपला गेला की देहगाडा चालू लागतो. **(ख)** येथे गाड्याचा दृष्टान्त न देता जल भ्रमराचा देण्यात इतकाच हेतु आहे की जलभ्रमर (अलि) जसा गुंजारव - गुणगुण करीत जात असतो तसे भरत मनांत गुणगुण करीत जात आहेत. पाण्याच्या प्रवाहाने मागे लोटलेला भ्रमर एकदम जोर करून सूर मारल्यासारखा पुढे जातो, पुन्हा मागे लोटला जातो, असे पुनः पुन्हा चालते तसेच भरतांचे चालले आहे; म्हणून गाड्याची उपमा दिली नाही. एकदा नवे मस्त बैल (चाहुरी) मदतीला जुंपले म्हणजे मग गाडा सारखा त्वरेने जातो; तसे येथे होत नाही. मातेच्या कृतीची आठवण झाली की चालवेनासे व्हावे व रामस्वभावाची आठवण झाली की धीर येऊन जोराने पावले पडावी असे वारंवार चालले आहे, इतकेच या भ्रमराच्या दृष्टान्ताने सांगावयाचे आहे.

(२) **रामस्वभाव - 'प्रभुमनिं राहि न चूक कृतीची । स्मरती शतदां स्थिती हृदींची'** (१।२९।५) **'दोष दिसुनि कधिं मनिं न आणितां । श्रवुनि गुणां संतांत वानितां'** (२९९।४) **प्रभु जन - अवगुण मनीं न आणति । स्वभावें-च मृदु दीनबंधु अति'** (७।१।६) प्रस्तावनेत 'मानसांत श्रीरामस्वभाव' हे प्रकरण (पृ. ५४०) पहावे.

**चौ. ८ - (१) बघतां स्नेह खेद... विदेह साचा - 'भरत शील-सुस्नेहां पाही । होई तदा निषाद विदेही'** (१९५।४) तेथे पूर्वी स्नेहाच्या जोडीला शील हे वैशिष्ट्य

होते तर येथे प्रसंगानुरूप खेद, शोक, चिंता स्नेहाच्या जोडीला आहेत; इतकाच फरक. निषाद व विदेह होणे या विषयी अनेक वेळा लिहिले आहे. **(क) बघतां** शब्दाने सुचविले की भरताच्या मनांतील विरुद्ध विचारांची रस्सीखेच निषादाने जाणली आहे; आणि वाटले की धन्य आहे या ग्लानीची व प्रेमाची ! अनेकांनी अनेक वेळा समजूत घातली तरी यांची ग्लानि, विषाद कमी न होता प्रेमाच्या वाढत्या प्रमाणात यांची पण तितकीच वाढ होत आहे !

***हिं.दो.*** ***। लगे होन मंगल सगुन सुनि गुनि कहत निषादु ॥***
***॥ मिटहि सोचु होइहि हरषु पुनि परिनाम बिषादु ॥२३४॥***

***म.दो.*** ***। होति शकुन शुभ ऐकुनी चिंतुनी वदे निषाद ॥***
***॥ शोकनाश होइल हरुष परि परिणामिं विषाद ॥२३४॥***

***हिं.*** ***। सेवक बचन सत्य सब जाने । आश्रम निकट जाइ निअराने ॥१॥***
***। भरत दीख बन सैल समाजू । मुदित छुधित जनु पाइ सुनाजू ॥२॥***
***। ईति भीति जनु प्रजा दुखारी । त्रिविध ताप पीडित ग्रह मारी ॥३॥***
***। जाइ सुराज सुदेस सुखारी । होहिं भरत गति तेहि अनुहारी ॥४॥***

***म.*** ***। सेवक - वचन सत्य सब जाणति । निकट आश्रमा जाउनि पोचति ॥१॥***
***। भरत बघत गिरिसमूह कानन । क्षुधित मुदित जणुं मिळत सुभोजन ॥२॥***
***। प्रजा जणूं ईती भय दुःखित । मारी, ग्रह, तापत्रय पीडित ॥३॥***
***। जात सुराज - सुदेशिं सुखावे । होइ भरतगति तशी स्वभावें ॥४॥***

**अर्थ** - इतक्यात शुभ (मंगल) शकुन होऊ लागले; ते ऐकून व विचार करून निषाद (गुह) म्हणाला की शोकनाश होऊन हर्ष होईल; पण शेवटी (परिणामी) विषाद होईल ॥ दो. २३४ ॥ सेवकाचे सर्व म्हणणे सत्य आहे हे भरतांनी जाणले; (तोच) ते आश्रमाच्या जवळ जाऊन पोचले.॥१॥ कानन व पर्वतसमूहांना पाहताच भरतांस असा आनंद झाला की जणू भुकेल्यास सुग्रास भोजन मिळावे व त्यास आनंद व्हावा.॥२॥ जणू ईतींच्या भीतीने दुःखी झालेली आणि महामारी (वाखा) ग्रहदशा व त्रिविधताप यांनी पीडलेली प्रजा -॥३॥ सुराजा असलेल्या सुंदर देशांत जाऊन सुखी व्हावी, तशीच भरताची दशा होत आहे.॥४॥

**टीका. दो. (१) निषाद** - पूर्वी (१९२।४-७) टीकेत दाखविले आहे की हे निषाद जातीचे लोक शकुन शास्त्र जाणणारे असतात. येथे जातीचे वैशिष्ट्य निषाद शब्दाने सुचविले आहे. **(क) शकुन ऐकुनी** - ऐकुनी शब्दाने सुचविले की

पक्ष्यांच्या बोलण्याचे शकुन झाले. निषादनाथ वाटाड्या असून देहभान विसरला होता; त्यामुळे वाट चुकण्याचा संभव होता; पण पक्ष्यांच्या आवाजाने निषादनाथ वृत्तीवर आला व शकुनांचा विचार करूं लागला. यात प्रथम **क्षेमकरीचा** (लालपंखांची श्वेतमुखाची घार) आवाज ऐकला असेल; कारण घारीचा आवाज माणसाला तंद्रींतून जागा करण्यास पुरेसा असतो. ती आवाज करीत करीत मंडलाकार घिरट्या घेत घेत समोर उडत आली. हा शकुन मंगल करणारा व मनातील चिंता दूर करणारा आहे. (बा. कां. ३०३।७) टी.पहा.) नंतर पिंगळा पक्ष्याच्या विविध आवाजाने तीन प्रकार दाखविले. **'किलबिल'** शब्द उल्हासदर्शक = शोकनाशक; **'चिलबिल'** शब्द भोजनादिप्राप्ति दर्शक = तृप्तिदर्शक. हा दृष्टान्त पुढे (चौ. २) मध्ये आहेच. **'खिट्‌खिट'** शब्द बंधनदर्शक = विषाद. याप्रमाणे येथे पिंगळा शब्द शकुनच ध्वनित केला आहे. **(ख) परि परिणामि विषाद** - परि = परंतु, राम अयोध्येत येणार नाहीत व त्यामुळे परत जाताना विषादयुक्त चित्तानेच जावे लागेल.

**चौ. १-२ (१) सेवकवचन सत्य सब जाणति** - 'मानिति' न म्हणता **जाणति** - म्हणण्याने सुचविले की भरतसुद्धा शकुनशास्त्र जाणणारे आहेत. **सब =** तिन्ही गोष्टी ज्या क्रमाने सांगितल्या त्या त्याचक्रमाने घडणार हे भरतानीसुद्धा त्याच शकुनावरून जाणले. **(क) निकट आश्रमा जाऊनि पोचति** - हे कवींचे वचन आहे; पण पुढे जे दृष्य दिसले व जे समाधान व आनंद मिळाला त्यावरून भरतानी जाणले की रामाश्रम जवळच असावा. **(ख) क्षुधित मुदित जणु मिळत सुभोजन** - क्षुधिताला पंच पक्वान्नांचे सुग्रास भोजन मिळाले; म्हणजे ते अन्न पाहिल्याबरोबरच आनंद होतो व नंतर पोटात गेले म्हणजे क्षुधाशांती होऊन समाधान प्राप्त होते. तसाच आनंद ती निसर्ग रमणीयता पाहून झाला व ते दृश्य पाहिल्याने एकप्रकारचे समाधान वाटू लागले. आतापर्यंत पुष्कळ सुंदर सुंदर वनांतून आले, पण अशी वनश्री कोठेच दिसली नाही व असा आनंदही कुठे झाला नाही; यावरून जाणले की रामाश्रम जवळपासच असावा. भरताचा आनंद जसजसे ते पुढे चालले तसतसा वाढत चालला; त्याला उपमा नाही म्हणून पुढील दोन चौपायांत उत्प्रेक्षांनी सांगतात.

**चौ. ३-४ - (१)** जणू ईतीभय पीडित - 'अतिवृष्टिरनावृष्टिर्मूषकाः = शलभाः शुकाः ।। स्वचक्रं परचक्रं च सप्तैता ईतयः स्मृताः' अतिवृष्टि, अनावृष्टि (दुष्काळ, पाऊस न पडणे) उंदीर, टोळ, पोपट, स्वचक्र (आपल्याच लोकांनी स्वारी करणे)

परचक्र (शत्रूची स्वारी) या सात गोष्टींना ईति म्हणतात. उंदीर, टोळधाड व पोपट धान्यादि पिके खाऊन टाकतात; व या सर्वांच्यामुळे लोकांना परागंदा व्हावे लागते. या सात ईतींच्या भयाने व महामारीच्या साथीच्या भयाने, ग्रहदशेच्या फेऱ्यात सापडलेले व त्रिविध तापांनी अगदी त्रस्त झालेले लोकांस चांगल्या परोपकारी धर्मशील राजाच्या सुदेशांत म्हणजे जेथे राहण्यास सुरक्षित जागा, मुबलक अन्न व पाणी सहज सुलभ आहे अशा देशात प्रवेश करण्यास सापडला असता त्यास जसजसा आनंद होईल व जे समाधान सुख वाटेल तसा आनंद व तसे समाधान भरतास होत आहे. **(क)** ७ ईति, मारी, ग्रह व तापत्रय मिळून या १० उत्प्रेक्षा आहेत. यांचे तंतोतंत साम्य अयोध्येतील प्रजेच्या बाबतीत मानसांतच भरपूर वचनांनी दाखविले आहे. **हे साम्य प्रस्तावनेत** पृ. २९० **'अनेक उत्प्रेक्षांचा नमुना'** या शीर्षकाने सविस्तर साधार छापले असल्याने येथे दिले नाही; ते प्रस्तावनेत पहावे. **(ख)** भरताच्या या आनंदाच्या वर्णनाने सुचवून ठेवले की बाकीच्या सर्वलोकांनासुद्धा या वनात प्रवेश करताच असाच आनंद होईल, झाला असे समजावे.

***हिं.*** ***। राम वास वन संपति भ्राजा । सुखी प्रजा जनु पाइ सुराजा ।।५।।***
***। सचिव विरागु विवेकु नरेसू । विपिन सुहावन पावन देसू ।।६।।***
***। भट जम नियम सैल रजधानी । सांति सुमति सुचि सुंदर रानी ।।७।।***
***। सकल अंग संपन्न सुराऊ । रामचरन आश्रित चित चाऊ ।।८।।***

***म.*** ***। राम वसति वनिं संपत् भ्राजे । सुखी प्रजा जणु मिळत सुराजे ।।५।।***
***। सचिव विराग विवेक नरेश हि । विपिन सुशोभन पावन देश हि ।।६।।***
***। भट यम नियम शैल नृपधानी । शांति सुमति, शुचि सुंदर राणीं ।।७।।***
***। उत्तम नृप सर्वांग - सुपूरित । रामपदाश्रित मन उत्साहित ।।८।।***

**अर्थ** - राम (या) वनात वसत असल्याने वनांत संपत्ती शोभत आहे; जणू उत्तम राजा मिळाल्याने प्रजा सुखी आहे. ।।५।। वैराग्य मंत्री आहे, ज्ञान (विवेक) राजा आहे, सुंदर पावन वन हाच (त्याचा) सुंदर व पावन देश आहे. ।।६।। यम नियम हे सैन्यातील वीर आहेत. चित्रकूट पर्वत (शैल) ही त्याची राजधानी आहे आणि शांति व सुमति या पवित्र व सुंदर राण्या आहेत. ।।७।। हा उत्तम राजा (राज्याच्या) सर्व अंगांनी उत्तम प्रकारे परिपूर्ण आहे आणि रामचरणांचा आश्रित असल्याने मन सदा उत्साहयुक्त आहे. (सदा उत्साही आहे.) ।।८।।

**टीका.** - (१) मागील चौपाईत म्हटले की सुराजाच्या सुदेशांत शिरत असताच

सुख होते. हे रूपकच आता स्पष्ट करतात. अशा राज्यात प्रवेश केल्याने सुख होण्याचे कारण काय हेही पुढील विस्तारावरून कळते. मानसांतील सुखप्राप्तीचे साधन येथे अंगोपांगासह सारांशरूपाने अप्रत्यक्षपणे सुचविले आहे. सुराज्यात सुराजा, मंत्री, खजिना, देश, राजधानी, सैन्य, राण्या व मित्र इतकी अंगे तरी पाहिजेत व सर्व पवित्र व सुंदर पाहिजेत. ज्ञान (विवेक) राजा आहे ३।१५।७ पहा. मंत्री विराग आहे, **'तृणसमसिद्धी त्रिगुणां त्यागी'** (३।१५।८) असा उत्तम मंत्री आहे. वनश्री ही संपत्ती (खजिना) आहे; सुशोभित पावन वन हाच धनधान्यादिसंपन्न पावन सुंदर देश आहे; अहिंसा सत्य अस्तेयादि ५।१०।१२ यम व स्वाध्याय, तप ईश्वरोपासनादि पांच, दहाबारा नियम हे वीरांचे सैन्य आहे. शांती व सुमति या पवित्र = पतिव्रता व सुंदर राण्या आहेत. चित्रकूट पर्वत ही राजधानी आहे. व रामचरणांचा आश्रय = रामस्नेह हा स्नेही (मित्र) आहे.

(२) **येथे स्वांतःसुखप्राप्तीचा साधनमार्ग क्रमशः सांगितला आहे.** ज्याला दुःख रहित नित्य सुखसमाधान पाहिजे असेल त्याने प्रथम लोकवस्तीचा त्याग करून पवित्र व सुंदर वनात जाऊन रहावे, त्या वनात सृष्टिसादर्य विपुल असावे. यमनियमांचे निष्ठेने पालन करावे; हेच वीर मोहरूपी राजाच्या सैन्यातील वीरांचा नाश करू शकतील. वनात राहणे ते सुंदर पर्वतावर रहावे. प्रथम सुमतिरूपी राणीचे पाणिग्रहण करून तिला धर्मपत्नी करावी. म्हणजे वैराग्याची प्राप्ती होईल. यांच्या मदतीने ज्ञान प्राप्त होईल. मग शांतीरूपी राणी स्वयंवरांत माळ घालील. मग रामचरणीचा स्नेह प्राप्त करण्याचा प्रयत्न करावा. तो प्राप्त झाला म्हणजे स्थिर, चिर, शुद्ध निर्भेळ सुख होईल. **(क) किंवा** वनात जातानाच सुमती राणीला बरोबर न्यावी. सुमति हीच की भक्तीच्या योगानेच नित्यशुद्ध सुखाची प्राप्ती रामकृपेने सहज होईल; म्हणजेच विश्वासाश्रित सात्विक श्रद्धा पाहिजे. पर्वतशिखरावर जाऊन राहिल्यावर रामचरणांचे ध्यान करण्याचा अभ्यास करावा. तो करताना यमनियमांचे पालन केलेच पाहिजे. म्हणजे बाकीच्या सर्व गोष्टी रामकृपेने सहज प्राप्त होतील. हा दुसरा मार्ग अधिक सोपा, निर्भय व निर्विघ्न आहे. भक्तीशिवाय नुसते ज्ञान निराश्रित असल्यामुळे मोह राजा केव्हा पकडील याचा नेम नाही. पहिला क्रम प्रौढतनयांचा आहे व दुसरा क्रम बालकसुतांचा आहे. बालकसुतांचा सांभाळ राम करतात हे अनेक वेळा सविस्तर साधार सांगितले असल्याने येथे व्याख्या, आधार - अवतरणे दिली नाहीत.

*हिं. दो.। जीति मोह महिपालु दल सहित विवेक भुआलु ॥*
*॥ करत अकंटक राजु पुरँ सुख संपदा सुकालु ॥२३५॥*
*हिं. । वन प्रदेस मुनिबास घनेरे । जनु पुर नगर गाउँ गन खेरे ॥१॥*
*। बिपुल बिचित्र बिहग मृग नाना । प्रजा समाजु न जाइ बखाना ॥२॥*
*। खगहा करि हरि बाघ बराहा । देखि महिष बृष साजु सराहा ॥३॥*
*। बयरु बिहाइ चरहिं एक संगा । जहँ तहँ मनहुँ सेन चतुरंगा ॥४॥*
*म.दो. । जिंकुनि मोहमहीप दल सहित विवेक भुपाल ॥*
*। करत अकंटक राज्य पुरिं सुख संपदा सुकाल ॥२३५॥*
*म. । वन-सुदेशिं मुनिवास किती तरि । जणुं पुर नगर गांव खेडीं बरि ॥१॥*
*। विपुल विचित्र विहग मृग नाना । प्रजा समाज न शक्ति वर्णना ॥२॥*
*। गेंडे वाघ महिष किरि हरि करि । वृष, बघुनी स्तुति कोण किती करि ॥३॥*
*। त्यजुनि वैर विचरतात संगे । जणुं सर्वत्र चमू चतुरंगे ॥४॥*

**अर्थ** - मोहरूपी राजा व त्याचे सैन्य यांना विवेक भूपाल आपल्या सैन्याच्या साह्याने जिंकून नगरात निष्कंटक राज्य करीत असून (त्याच्या राज्यांत) सुख, संपत्ती व सुकाळ (सुभिक्ष) नांदत आहेत. ॥दो. २३५॥ वनरूपी सुंदर देशांत मुनींचे कितीतरी आश्रम आहेत, तीच जणु शहरे, नगरे, गाव व चांगली खेडी आहेत. ॥१॥ नाना प्रकारचे विपुल चित्रविचित्र पक्षी व पशू हाच प्रजा समाज आहे; पण त्याचे वर्णन करणे शक्तीच्या बाहेरचे आहे. ॥२॥ गेंडे, वाघ, महिष, (रेडे, म्हशी) वृष (गाई, बैल) वराह (किरि) सिंह (हरि) हत्ती (करि, करी) वगैरेंना पाहून कोण किती प्रशंसा करणार ॥३॥ हे सर्व पशू आपसांतील (स्वभाव) वैर विसरून (सोडून) संगतीने असे फिरत असतात की जणू जिकडेतिकडे (सर्वत्र) चतुरंगिणी सेनाच (फिरत) आहे. ॥४॥

**टीका. - दो. -** (१) यांत मोह महीपाल व त्याचे सैन्य (दल) आणि विवेक भूपाल व त्याचे सैन्य यांचे युद्ध सुचविले आहे. **मोह** = अज्ञान; **विवेक** = ज्ञान. **जीवांच्या हृदयांत हे युद्ध अव्याहत चालू आहे.** रामायणांत रावण व राम; व महाभारतांत कौरव व पांडव यांची युद्धे म्हणजे अज्ञान व ज्ञान यांचीच युद्धे आहेत. रामाने १३ वर्षे वनवासांत काढल्यावर १४ व्या वर्षीच रावणाचा वध केला. पांडवांना १२ वर्षे वनवास व एकवर्ष अज्ञातवासात काढल्यावरच चौदाव्या वर्षी भगवान कृष्णाच्या साह्यानेच कौरवांचा विनाश करता आला. याचा अर्थच

हा की **सगुण साकार भगवंतांची पूर्ण कृपा संपादन केल्याशिवाय, त्यांचे पूर्ण साह्य असल्याशिवाय, अज्ञानाचा निर्बीज विनाश करता येणे शक्य नाही. हे भगवत्साह्य प्रेमभक्तीशिवाय मिळत नाही.** (क) ज्ञानाने मोहाचा नाश झाला असे वाटते; पण तो असा मायावी राक्षस आहे की कोठेतरी दडून लपून पाळतीवर असतो. त्याचे मोठमोठे महाप्रतापी कामक्रोधलोभ अहंकार ममत्व इ. वीर निरनिराळी मनोहर, गोंडस रूपे घेऊन हल्ला करण्यास सदा सर्वकाळ टपलेले असतात. म्हणूनच राज्य **अकंटक** = निष्कंटक होत नाही. रामाचा आश्रय व रामभक्तिरूपी परम दिव्यशक्ति असल्याशिवाय, सुख साम्राज्य निष्कंटक होऊ शकत नाही. म्हणजेच उत्तर कांडात म्हटले की **'ढाल विरति, असि बोध, रिपु मद मोहादि वधून ॥ जय मिळतो हरिभक्ति ती बघ खगेश चिंतुन'** (७।१२० म) भक्तिचिंतामणि जवळ असला म्हणजे **'निकट मोहदारिद्र्य येत ना'** (७।१२१।४) भक्तिचिंतामणि प्रकरण पहावे. **(ख) सुख संपदा सुकाळ** - सुराज्यांत धनधान्यादिकांची समृद्धि असते. रोगांचा व चोरादिभयाचा अभाव असतो. सुराज्याचे वर्णन उत्तरकांडात रामराज्यवर्णनात किंवा प्रतापभानुचरित्रांत बालकांडांत पहावे. **सुख** = ब्रह्मानंद, संपत्ति - **संपदा =** भक्ति = परमानंद व **सुकाळ**. दुःखभयशोकांचा पूर्ण अभाव. **सूचना -** प्रबोधचंद्रोदय नाटाकांत मोहमहिपाल व विवेकभूपाल या दोन राजांच्या युद्धाचे रूपकाचे वर्णन आहे असे मा.पी. मध्ये दिलेल्या तुलनेवरून वाटते.

**चौ. १-४** (१) सुराज्याच्या मुख्य अंगांचे वर्णन येथवर केले. आता उपांगांचे करतात. मुनींच्या आश्रमात बटु, तापसी, व मुनि यांच्या अनेक पर्णकुटी असतात म्हणून त्यांना नगर पुर गांव वगैरे म्हटले ते योग्यच आहे. **(क)** प्रजेतील लोकच सैन्यात असतात म्हणून पशुपक्षी ही प्रजा म्हटल्यावर गेंडे वगैरे पशुंना चतुरंगिणीसेना म्हणणे क्रमप्राप्त आहे. हल्लीच्या काळी असे रूपक करावयाचे असते तर विहंगांचा समावेश विमानदळात करता आला असता. राजा व सर्वप्रजा अहिंसा परमधर्माचे पालन करणारी आहे. नुसती अहिंसावादी नाही. (१३३।१ - १३९।६ पर्यंतचे वर्णन पहा.)

***हिं.*** *। झरना झरहिं मत्त गज गाजहिं । मनहुँ निसान विविधि विधि बाजहिं ॥५॥*
*। चक चकोर चातक सुक पिक गन । कूजत मंजु मराल मुदित मन ॥६॥*
*। अलिगन गावत नाचत मोरा । जनु सुराज मंगल चहुँ ओरा ॥७॥*
*। बेलि बिटप तृन सफल सफूला । सब समाजु मुद मंगल मूला ॥८॥*

*हिं. दो. । राम सैल सोभा निरखि भरत हृदयँ अति पेमु ॥*
*॥ तापस तपं फल पाइ जिमि सुखी सिराने नेमु ॥२३६॥*

*म. । निर्झर झरति मत्त गज गाजति । जणूं नगारे नाना वाजति ॥५॥*
*। चक चकोर चातक शुक पिक गण । कूजति मंजु मराल मुदित-मन ॥६॥*
*। अलिगण गाती नाचति केकी । जणुं सुराज्यिं मंगल सब लोकीं ॥७॥*
*। वेलि विटप तृण सफल सफूल हि । सब समाज मुद-मंगल-मूल हि ॥८॥*

*म. दो. । रामशैल शोभा बघुनि भरत हृदयिं सुप्रेम ॥*
*॥ तापस तपफल मिळुनि सुखि जसा संपतां नेम ॥२३६॥*

**अर्थ** - निर्झर धो धो वहात आहेत व मत्त हत्ती गर्जत आहेत; हेच जणू नाना प्रकारचे नगारे वाजत आहेत. ॥५॥ चक्रवाक (चक = चक्र) चकोर चातक, पोपट, कोकीळा, व सुंदर हंस यांचे समूह (गण) प्रसन्न चित्ताने कूजन करीत आहेत. (हीच जणू इतर मंगलवाद्ये वाजत आहेत) ॥६॥ भुंगे गायन करीत आहेत आणि मोर (केकी) नृत्य करीत आहेत. जणू सुराज्यांत सर्व लोकांकडे मंगल कार्ये (लग्न मुंजी इ.) - चालली आहेत. ॥७॥ वेली, वृक्ष, तृणे ही सर्व फल फूलयुक्त झाली आहेत. सर्व समाजच आनंदमंगलाचे मूळ आहे. ॥८॥ श्रीरामगिरीची ही शोभा पाहून भरताच्या हृदयांत प्रेम अतिशय वाढले. (सु = अति, प्रेम) व तापसाला तपाचे फळ मिळाले म्हणजे नियमांची समाप्ती होते व तो जसा सुखी होतो (तसे भरत सुखी झाले). ॥दो. ३२६॥

**टीका.** (१) पूर्वी शहरे, नगरे, गावे, खेडी यांचा उल्लेख केला; प्रजा कोण ते सांगितले; सुख, संपत्ती व सुकाळ झालेला आहे हे सांगितले व या सर्वांचे संरक्षण करणारी सेना सांगितली. एवढे सर्व सुख व सुखसाधने भयरहित प्राप्त झाल्यावर जिकडेतिकडे मंगलकार्ये, उत्सव, नृत्य गायन इत्यादि चालणारच. कार्यारंभी किंवा उत्सवारंभी नगारे वाजविले जातात. **(क) निर्झर** = डोंगरातून वाहणारे प्रवाह; यांचा धो धो घो घो असा आवाज व हत्तींच्या गर्जना यांचा ध्वनि जणू त्या पर्वतातील वनात नगाऱ्यांप्रमाणे, चौघड्यांप्रमाणे ऐकू येत आहे. नंतर उत्सवांतील इतर मंगल वाद्ये वाजू लागतात. तसे चक्रवाकादि विहंगांचे कूजन चालू आहे. कमळे वगैरे फुले फुललेली असली की भृंगांचा गुंजारव चालू असतो. वेली व वृक्ष फुललेले असल्याचे वर्णन पुढे आहेच. भृंगांचा गुंजारव हेच जणू गायन चालू आहे व मोर (केकी) नाचत आहेत. तेच जणू ठिकठिकाणी

नृत्य चालू आहे. भरताच्या मस्तकावर जलद छाया करीत येत आहेत हे विसरू नये म्हणजे शंका येणार नाही. हे नृत्य गायनादि पाहण्यास व ऐकण्यास लोकसमाज पाहिजे. विविध लतावेली हा स्त्रीसमाज, वृक्ष हा पुरुष समाज व तृणें हा बालक समाज होय. हा सर्व समाज ठिकठिकाणी फुलांचे विविध अलंकार घालून व भेट, आहेर, खाऊ, नजराणा देण्यासाठी विविध फळे घेऊन जमलेला आहे. असे मंगलोत्सव या वनराज्यांत जिकडेतिकडे चालू आहेत. तृणांनासुद्धा फुले येतात, बीजरूपी फळे येतात. काही तृणांच्या फुलांना अगदी अत्तरासारखा सुवास येतो. रोसा गवताची फुले अत्तराच्या बोळ्याप्रमाणे हातावर चोळली तर तेलकटपणा दिसतो. त्या फुलांचा सुगंध वाऱ्याने दरवळत असतो. अनेक लतांच्या व वृक्षांच्या फुलांना मनोहर, आल्हाददायक सुगंध येतो. एकदल असलेल्या सर्व धान्यांस तृणधान्येच म्हणतात. भात, नागली, वरी, बाजरी, जोंधळा, गहू, जव, मका, सावे, कोद्रू, हरख (हरक) राळे, नीवार, (देवभात) ही सर्व तृणधान्येच होत.

**दोहा** - (१) भरताला जो आनंद झाला जे सुख झाले त्याला दृष्टान्त तापसाच्या सुखाचा दिला. भरत तपस्वीच आहेत. आज कडकतपश्चर्येचा दहावा दिवस आहे, तपोवनांत आलेच आहेत. तपाचे फळ अर्थ, धर्म, काम व मोक्ष यांपैकी काही तरी अपेक्षित असते. ते मिळाले म्हणजे तपस्वी आपले तपाचे नेम बंद करतो. त्यामुळे त्याचे कष्ट, क्लेश थांबतात व तपाचे फळ मिळाल्याने तो सुखी होतो. कृतकृत्य झालो असे त्यास वाटते. तापसाला प्रदीर्घ तप केल्यानंतर जे सुख मिळते तसे भरतास या वनांत प्रवेश केल्याबरोबर मिळाले. **(क) हा रामशैल म्हणजे कामदगिरीचाच एक भाग चित्रकूट पर्वत होय.** कामदगिरी दुरून दिसला तेव्हा आत्मसुख प्राप्तीसारखे सुख झाले. (दो. २२५) चारी पुरुषार्थ प्राप्त झाल्याने तापसाला जसे सुख होईल तसे भरतास येथे झाले. आश्रमभूमीत प्रवेश करणे, रामसीतालक्ष्मण दुरून दिसणे व रामभेट असे तीन टप्पे आनंदप्रेम वृद्धीचे असून पुढे आहेत.

***श्री मानस गूढार्थ चंद्रिका अयोध्याकांड अध्याय २२ वा समाप्त.***



# अध्याय २३ वा

*हिं. । तब केवट उँचे चढि धाई । कहेउ भरत सन भुजा उठाई ॥१॥*
*। नाथ देखिअहिं बिटप बिसाला । पाकरि जंबु रसाल तमाला ॥२॥*
*। तिन्ह तरुवरन्ह मध्य बटु सोहा । मंजु बिसाल देखि मनु मोहा ॥३॥*
*। नील सघन पल्लव फल लाला । अविरल छाँह सुखद सब काला ॥४॥*
*। मानहुँ तिमिर अरुनमय रासी । बिरची बिधि सकेलि सुषमासी ॥५॥*

*म. । नाविक धावत उंच चढोनी । सांगे भरता भुज उचलोनी ॥१॥*
*। नाथ पहा विटपांस विशालां ॥ पाकरि जंबु रसाल तमाला ॥२॥*
*। त्या तरुवरांमधे वट शोभित । मंजु विशाल बघुनि मन मोहित ॥३॥*
*। नील सघन पल्लव फल लाल हि । सुखद दाट छाया त्रय कालहि ॥४॥*
*। जणुं कीं तिमिर - अरुणमय राशी । विधि रचि संकलुनी सुषमेसी ॥५॥*

**अर्थ** - (इतक्यांत) नावाडी (निषादराज) धावत धावत जाऊन उंच ठिकाणी चढला - (उभा राहिला) व हात वर करून भरतास सांगू लागला की - ॥१॥ नाथ ! त्याऽऽ विशाल वृक्षांना पहा ! तेऽ पहा पिंपरी, जांभूळ, आंबा व तमालवृक्ष. ॥२॥ त्या श्रेष्ठ तरूंच्या मधोमध वड शोभतो आहे तो पहा ! तो वड इतका सुंदर आहे की पाहिल्याबरोबर मन मोहित होते (त्याच्यावर). ॥३॥ त्याची पाने निळी (काळसर) असून खूप दाट आहेत. आणि लाललाल फळे आहेत. (दिसला का?) छाया अगदी गर्द (दाट) असून तिन्ही (सर्व) काळी सुखद आहे. ॥४॥ जणू ब्रह्मदेवाने परम शोभेला एकत्र गोळा करून (संकलुनी) तिमिर व अरुण यांनी भरलेली एक रासच रचली आहे. ॥५॥

**टीका. - चौ. १ - (१) नाविक धावत उंच चढोनी** - यांत निषाद, निषादनाथ, निषादपति, गुह हे शब्द न वापरता नाविक नावाडी (केवट) हा धंदादर्शक शब्द वापरला. त्या रामप्रेमी नावाड्याने जसे रामचंद्रांस गंगापार तारून नेले तसाच हा त्या **नावाड्यांचा राजा भरताला दुःखग्लानिसागराच्या पार तारून नेण्यासाठी उतावीळ झाला आहे हे 'धावत' या शब्दाने सांगितले. 'तं दृष्ट्वा भरतः श्रीमान् मुमोद सह बांधवः ॥ अत्र राम इति ज्ञात्वा गतः पारभिवाम्भसः'** (वा.रा. २।९८।१७) 'नेतुंपारमिवाम्भरतः' हा निषाद राजाचा हेतू नाविक (केवट) शब्दाने दाखविला. तो एका उंच टेकाडावर चढला. यावरून अगदी स्पष्ट झाले की **मानसांतील**

**निषादराज रामसखा स्वतः चित्रकूटास रामचंद्रांच्या पर्णकुटीजवळ येऊन गेला असला पाहिजे.** त्याशिवाय रामपर्णकुटी असलेल्या ठिकाणची झाडे एका विशिष्ट ठिकाणी चढून दिसतात हे कळणे व ती दाखविता येणे शक्य नाही.

**चौ. २-३ (१) नाथ पहा विटपांस विशाला** - समोर हात लांब करून बोटाने दाखवीत 'नाथ पहा' असे म्हणताच भरतशत्रुघ्न धावतच गेले असतील तेथे. त्यांना वाटले असेल की रघुनाथच दिसत असतील ! **सुंदर नाट्य आहे.** येथील तुटक वाक्यरचनासुद्धा प्रसंगानुकूल व दृष्टिप्रेरक आहे. **पहा काय**? विटपांस ! समोर तर सर्व अरण्य असल्याने जिकडेतिकडे वृक्षच वृक्ष दिसणार. म्हणून म्हटले **'विशाला'** त्याऽऽ विशाल वृक्षांकडे पहा ! **(ख)** विशाल वृक्षसुद्धा अनेक असणार, म्हणून पिंपरी वगैरे चार वृक्षांची नावे सांगितली. त्या दोघांचे डोळे या चार वृक्षांना सभोवार शोधीत आहेत असे दिसतांच, नक्की खुणेसाठी सांगितले, की ते नाहीत हो! तेऽऽ पहा, ज्यांच्यामधोमध असा असा सुंदर वटवृक्ष आहे ते. तेव्हा त्यांची दृष्टी योग्य जागी गेली आहे असे दिसले.

**चौ. ४-५ - (१) नील सघन पल्लव....'** पाने निळी काळी आहेत. तिमिरासारखी अंपारासारखी; व फळे लाल दिसतात ती अरुणासारखी दिसत आहेत. तिमिर व अरुण एकत्र राहू शकत नाहीत, पण येथे तशी कल्पना केली. **सुषमा** = परमा शोभा, (अमरे). **संकलुनी** = एकत्र गोळा करून. जगांतील सर्व शोभेला एकत्र जमविली व त्या शोभेची तिमिर व अरुणमय जी एक रास रचली तोच जणू तो विशाल सुंदर मोहक वटवृक्ष! **(क)** याप्रमाणे दाखविले व सांगितले, व त्यांना ते वृक्ष दिसले तरी मुखावर प्रसन्नता दिसली नाही. **ज्यांच्याशी रामाचा संबंध नाही ते सौंदर्य कितीही मोहक असले तरी अशा भक्तांच्या नयनांस व हृदयांस ते आनंद कसे देऊ शकणार**? हे जाणून आता भरतांस आनंद होईल अशी हकीगत सांगतो. ती ऐकल्यानंतरच भरताला आनंद होईल.

*हिं.* *। ए तरु सरित समीप गोसाँई । रघुवर परनकुटी जहँ छाई ॥६॥*
*। तुलसी तरुबर विविध सुहाए । कहुँ कहुँ सियँ कहुँ लखन लगाए ॥७॥*
*। बट छायाँ बेदिका बनाई । सियँ निज पानिसरोज सुहाई ॥८॥*

*हिं. दो.* *। जहाँ बैठि मुनिगन सहित नित सिय रामु सुजान ॥*
*॥ सुनहिं कथा इतिहास सब आगम निगम पुरान ॥२३७॥*

*म.* *। सरिते संन्निध तरु हे स्वामी । रघुवर पर्णकुटी तिथ नामी ॥६॥*

*। तुलसी तरुवर विविध सुलक्षण । रोपित सीते कुठे हि लक्ष्मण ॥७॥*

*। वटछाये वेदिका विरचिली । सुंदर सीतेने कर कमली ॥८॥*

म.दो. *। बसुनि समुनिगण नित्य तिथ सीता राम सुजाण ॥*

*॥ श्रवति कथा इतिहास सब आगम निगम पुराण ॥२३७॥*

**अर्थ** - स्वामी ! हे वृक्ष नदीच्याजवळ असून तेथे स्वामी रघुवरांची सुंदर पर्णकुटी आहे. ॥६॥ तिथे तुलसीचे सुंदर विविध तरु कुठे सीतेने लाविले आहेत व कुठे लक्ष्मणानी लाविले आहेत. ॥७॥ वडाच्या छायेत (वडाखाली) सीतेने आपल्या करकमलांनी सुंदर वेदिका बनविली आहे. ॥८॥ तिथे (त्या वेदिकेवर) मुनिगणांसह बसून सुजाण सीताराम (नित्य) (नेहमी) वेद शास्त्र पुराण इतिहास इत्यादी सर्व कथा श्रवण करीत असतात. ॥दो. २३७॥

**टीका. शंका** - निषादराज यमुनातीरापर्यंतच रामाबरोबर होता पुढे तो परत गेला. (दो.१११). असे असून येथील ही खडानूखडा माहिती त्याला कशी मिळाली ? गुह निदान एकदा तरी स्वतः येऊन अगदी जवळ जाऊन सर्व पाहून गेला असला पाहिजे हे वर नुकतेच (चौ. १ टीकेत) सप्रमाण दाखविले आहे; परंतु येथे केलेले वर्णन एकदा केव्हातरी पाहून जाण्यानेच करता येणार नाही. तुळशीची झाडे लाविली आहेत, (ओटा) वेदिका केलेली आहे व मुनिगणांसह तेथे बसून कथा चालते इतके फार तर एकदा पाहिल्याने सांगता येईल. पण तुळशी कोणी कुठे कुठे लावल्या, वेदिका कोणी बनविली इ. सर्व एकदा पाहण्याने कळण्यासारखे नाही. मुनिगण बसलेले पाहिले असले तर वेदिका आधी बनविलेली असणार; व वेदिका तयार करताना सीतेला पाहिली असली तर त्या वेळी मुनिगण बसलेले दिसणे शक्य नाही. नित्य कथा चालते हेही सांगता येणार नाही. यावरून निष्कर्ष हा निघतो की रामसखा वरच्यावर स्वतः येऊन दर्शन घेऊन जात असला पाहिजे व रोजच्या रोज आपल्या हेरांकडून रामाश्रमांतील सर्व बातमी मिळवीत असला पाहिजे. रामसखा निषादांचा राजा, व चित्रकूटचे निषाद रामभक्त, त्यामुळे हेरांना इत्थंभूत सर्व बातमी रोजच्या रोज मिळणे अगदीच सोपे होते. गीतावलीतील पद याला भरभक्कम पुरावा आहे. (**गीता.** अयो. कांड, पद ८९) **राग केदारा** - 'सुनी मैं सखि ! मंगल चांह सुहाई ॥ शुभपत्रिका निषादराजकी आजु भरत पहँ आई ॥१॥ कुवँर सो कुशलक्षेम अलि! तेहि पल, कुल गुरु कहँ पहुँचाई॥ गुर कृपाल संभ्रम पुर घर घर, सादर सबहि

सुनाई ।।२।। बधि बिराध सुर साधु सुखी करि, ऋषि सिख आशिष पाई ।। कुंभज सिस्य समेत संग सिय, मुदित चले दोउ भाई ।। बीच[२] बिंध्य[३] रेवा[४] सुपासथल बसे हैं परनगृह छाई ।। पंथ कथा रघुनाथ पथिक की तुलसिदास सुनि गाई ।।४।। १ शुभ समाचार, २ मध्ये, ३ विंध्याद्रि, ४ नर्मदा याने ठरते की सुतीक्ष्णाच्या आश्रमांतून राम निघून पुढे जाईपर्यंतचा तरी समाचार निषादराज भरताला पत्राने कळवीत असे. अशीच बातमी रामसखा निदान सीताहरणापर्यंत तरी मिळवीत राहिला असला पाहिजे.

**चौ. ७ - (१) तुलसी तरुवर - रोपित सीतें कुठें हि लक्ष्मण** - राम येऊन राहिल्यास आज ४७ वा दिवस आहे. याच्या आधीच तुळशीची झाडे सुलक्षण-सुशोभित झाल्याचे गुहास कळले. यावरून ठरते की गेल्याबरोबर वैशाखाचे दिवस असूनसुद्धा सीतेने तुळशी लावल्या. **वेदांना मानणाऱ्या हिंदूंना तुळशीचे किती महत्त्व वाटले पाहिजे हे दाखविले.** तुळशी मुख्य असल्याने त्यांचा उल्लेख करून सुचविले की फुलझाडे सुद्धा लावली. यांना पाणी घालण्याची सेवा सुद्धा सीताच करीत असणार; आणि नदीचे पाणी खालून वर चढून, आणून घालावयाचे ! वैशाखाचा उन्हाळा, सीतेसारखी सुंदर, परम कोमल स्त्री आणि ११ वे वर्ष लागलेले !

**चौ. ८ (१) वटछाये वेदिका - वेदिका =** मुनिगणांना वगैरे बसण्यासाठी चांगला लांब, रुंद व एक हातभर उंच ओटा सीतेने आपल्या कमलासारख्या कोमल हातांनी वैशाखाच्या उन्हाळ्यात बनविला, डोंगराच्या शिखरावर ! पाणी खालून वर डोंगर चढून आणावयाचे ! किती कष्ट पडले असतील व किती घाम गळला असेल ? याची कल्पनासुद्धा करता येत नाही. येथे दाखविले की अशी कष्टाची व हलकी कामेसुद्धा सीता करीत असे. हे सर्व ऐकल्यावर भरताच्या नेत्रांतून अश्रूंचे पूर वाहू लागले आहेत. त्यांतील मर्म येथे सुचविले आहे.

**दो. (१) नित्य =** रोज 'नियमाने' सुजाण शब्दाने सुचविले की ।।वेदपुराण कथा मुनि वर्णिति । ऐकति राम सकल जरि जाणती ।। ७।२६।२ पहा. तेथील 'वसिष्ठ' शब्दाचे जागी येथे मुनि शब्द घातला इतकेच. सत्संगति व सत्कथा श्रवण करण्यात बराच वेळ घालवीत असत हे येथे सुचविले. **उपदेश** - घर सोडून वनांत येऊन राहिलात तरी संतसंगति व संतमुखाने सत्संग, भक्तिकथा, शास्त्रादि श्रवण केले पाहिजे. विवाहापूर्वी व विवाहानंतर असेच इतिहास पुराणादि श्रवण

करीत असत हे बालकांडांत दाखविले आहे. (१।२०५।६ व ३५८ पासून ३५९।५ पर्यंत पहा.) राज्याभिषेकानंतरही हा क्रम चालूच होता - ७।२६।२) पहा.

हिं. *। सखा बचन सुनि बिटप निहारी । उमगे भरत बिलोचन बारि ॥१॥*
*। करत प्रनाम चले दोउ भाई । कहत प्रीति सारद सकुचाई ॥२॥*
*। हरषहिं निरखि राम पद अंका । मानहुँ पारसु पायउ रंका ॥३॥*
*। रज सिर धरि हियँ नयनन्हि लावहि । रघुबर मिलन सरिस सुख पावहिं ॥४॥*

म. *। श्रवुनि सखावच विटप विलोकत । भरत - विलोचनिं वारी वाहत ॥१॥*
*। प्रणति करित दो बंधु चालती । प्रीति वदन लाजते भारती ॥२॥*
*। हर्षति निरखत राम-पदांका । जणूं लाभला परीस रंका ॥३॥*
*। रज शिरिं हृदया नयनां लावति । रघुवर भेटीसम सुख पावति ॥४॥*

**अर्थ** - रामसख्याचे वचन ऐकून त्या वृक्षाकडे पाहताच भरताच्या विशाल लोचनांतून (विलोचन) अश्रूंचे पूर वाहू लागले.॥१॥ मग दोघे बंधू दंडवत घालीत जाऊ लागले. त्या प्रीतीचे वर्णन करण्यास सरस्वतीला (सारद - शारदा, भारती) सुद्धा लाज वाटू लागली.॥२॥ रामचंद्रांच्या पावलांची चिन्हे निरखून बघत (जात) असता, ती दिसतांच असा हर्ष होत आहे की जणू रंकाला परिसच सापडावा.॥३॥ (त्या चरणचिन्हांतील) धूळ मस्तकावर ठेऊन हृदयाला व डोळ्यांना लावीत आहेत आणि रघुवराच्या भेटीसारखे सुख पावत आहेत.॥४॥

**टीका. चौ. १ - (१) भरत विलोचनिं वारी वाहत** - गुहाचे भाषण ऐकून पुन्हा एकदा त्या मोहक वटवृक्षाकडे भावनापूर्ण नेत्रांनी पाहिले; हृदय उचंबळून आले व अश्रू वाहू लागले. **(क)** हे अश्रू प्रेम व खेद यांनी मिश्र असणारच. खेदाचे कारण पूर्वी (चौ. ८) टीकेत दाखविले आहे. रामनिवास स्थानाचे दर्शन तर झाले व दुःख शोकसागराचा पैलतीर दिसू लागला, रामभेट होणार, म्हणून आनंद झाला.

**चौ. २ - (१) प्रणति करित चालती - 'उचित मला जाणें कीं भरतकिं'** (२०३।७ टी.प.) ज्या रस्त्याने आता जाणार तो आश्रमाच्या जवळच असल्याने श्रीरामचरणांनी हा सर्व भाग परम पावन झालेला असणार व कुठे कुठे प्रभूंची पावले धुळीत उमटलेली असणार; असे असता ती भूमी, तो रस्ता, पायांखाली तुडवीत जाणे हा सेवक धर्म नव्हे. डोक्याने चालत जाणे शक्य नाही म्हणून दण्डवत घालीत चालले. त्या पावन पावन धुळीत लोळलेही असतील. हे वाचून

पुष्कळ आधुनिकांना कदाचित हसू येईल; पण तो त्यांचा दोष नसून विपरीत भावनांनी दूषित झालेल्या त्यांच्या अंतःकरणाचा तो दोष आहे. एखाद्या क्रिकेटवीराची बॅट लिलावात कोणी पाच हजार रुपयांस घेतात तेव्हा मात्र अशांना हसू येत नाही ? (२।१२३।५-६ पहा.) **(क)** जेथून इष्ट देवतेच्या मंदिराचे दर्शन होते तेथून दण्डवत घालीत जाणारे प्रेमी भक्त या नेत्रांना दिसले आहेत. वृंदावनांतील धुळीत, श्रीकृष्णचरणपूत म्हणून लोळणारे; पंढरपूरची नगर प्रदक्षिणा दण्डवत घालीत करणारे आजही आहेत. पण त्यांच्या ठिकाणी भरतासारखे अलौकिक प्रेम कसे असणार ! भरताच्या प्रीतीचे वर्णन करण्यास **'लाजते भारती'** तेथे कवि सुचवितात की मी कसे वर्णन करू शकेन ?

**चौ. ३ - (१) हर्षति निरखत रामपदांका** - रामाची पावले कुठेतरी धुळीत उमटलेली असणारच हे जाणून, दण्डवत घालून उभे राहिले की पुढल्या भागाकडे नीट निरखून पाहतात व मग दण्डवत घालतात. असे निरखून पहात असता रामपदचिन्हे दिसली ! **'वज्रांकुशध्वज सरोरुह-लाच्छनाढ्यं वंदे महापुरुष ते चरणारविन्दम्'** (भाग.) असे म्हणून त्या पाउलाला दण्डवत नमस्कार घातला. ध्वज, वज्र, ऊर्ध्व रेषा, कमल, अंकुश वगैरे चिन्हे प्रभूंच्या तळपायांवर आहेत. ती त्या पावलांत उमटलेली दिसली. **'ध्वज रेखांकुश कुलिश तळपती'** (१।१९९।३) ७।१३।छं. ४ पहा. **(क) हर्षति** - आनंदाने शरीरावर रोमांच, नेत्रांत अश्रू इ. भाव प्रगट झाले. आनंद व उत्साह वाढला. तो वर्णन करण्यास उपमा नाही म्हणून उत्प्रेक्षेने सांगतात की **'जणूं लाभला परीस रंका'** - निर्धनाला सहज, अचानक परीस सापडल्यावर जसा हर्ष होईल तसा हर्ष = उत्साह व आनंद भरतांस व शत्रुघ्नांस झाला. **'प्रेमें राम धरिति उरिं पुलकत । परम रंक जणुं परीस पावत'** (१११।१) असे तापस भेटीत घडले. प्रत्यक्ष भेट आहे म्हणून **परम रंक** म्हटले. येथे रघुवर भेटीसम आहे म्हणून 'परम' शब्द नाही. दुसऱ्या एका प्रसंगी प्रत्यक्ष भेटीचे, दर्शनाचे वर्णन आहे म्हणून **'जन्मरंकु जणुं परीस पावत'** (१।३५०।७) म्हटले **समन्वय साधण्याची किती सावधानता !**

**चौ. ४ - (१) 'रज शिरिं नयनां हृदया लावति** - हे करताना प्रेमाने अंगावर रोमांच उठले हे मागील चरणाच्या पुनरुक्तीने सुचविले आहे. '१११।१' या वरील अवतरणांतील 'पुलकत' शब्द पहा. २।१९९।२-३ पहा. **(क) रघुवर भेटीसम सुख पावति** - ती धूळ रघुवरासारखीच वाटली म्हणून राम भेटीसारखे सुख

झाले; रामभेटीचे सुख नाही झाले. उपमेय जेव्हा उपमानापेक्षा किंचित कमी प्रतीचे असते तेव्हाच उपमा अलंकार वापरतात; असा भेद अनिष्ट वाटत असेल तेव्हा रूपक करतात.

*हिं.* *। देखि भरत गति अकथ अतीवा । प्रेम मगन मृग खग जड़ जीवा ॥५॥*
*। सखहि सनेह बिबस मग भूला । कहि सुपंथ सुर बरषहिं फूला ॥६॥*
*। निरखि सिद्ध साधक अनुरागे । सहज सनेहु सराहन लागे ॥७॥*
*। होत न भूतल भाउ भरत को । अचर सचर चर अचर करत को ॥८॥*

*हिं.दो.* *। पेम अमिअ मंदरु बिरहु भरतु पयोधि गभीर ॥*
*॥ मथि प्रगटेउ सुर साधु हित कृपासिंधु रघुबीर ॥२३८॥*

*म.* *। बघुनि भरत - गति अकथ अतीव हि । प्रेममग्न मृग खग जड जीवहि ॥५॥*
*। प्रेमविवश मित्र हि पथ भूले । वदुनि सुपथ सुर वर्षति फूलें ॥६॥*
*। बघुनि सिद्ध साधक अनुरागति । स्नेह सहज तो प्रशंसु लागति ॥७॥*
*। भरत भाव भूतळिं नसता जर । कोण करत चर अचर, अचर चर ॥८॥*

*म.दो.* *। प्रेम अमृत मंदर विरह भरत पयोधि गभीर ॥*
*॥ काढि मधुनि सुर साधु हित कृपासिंधु रघुवीर ॥२३८॥*

**अर्थ** - अतिशयच अकथनीय - अनिर्वचनीय - अशी ही भरताची प्रेमदशा पाहून पशु पक्षी व जड जीव सुद्धा प्रेममग्न झाले.॥५॥ प्रेमाला विशेष वश झाल्यामुळे मित्र सुद्धा रस्ता भुलला (विसरला). तेव्हा देवांनी योग्य मार्ग सांगून पुष्पवृष्टि केली.॥६॥ हे पाहून सिद्ध व साधक अनुरागयुक्त झाले (त्यांच्यांत रामानुराग उत्पन्न झाला) व ते त्या सहज स्नेहाची प्रशंसा करू लागले.॥७॥ की या पृथ्वीतलावर भरताचा जन्म (= भाव) व भाव जर नसता तर चरांना अचर व अचरांना चर कोणी केले असते !॥८॥ कृपासागर रघुवीरांनी साधुरूपी सुरांच्या हितासाठी भरतरूपी अगाध पयोनिधीचे (क्षीरसागराचे) विरहरूपी मंदर पर्वताने मंथन करून, प्रेमरूपी अमृत काढले (प्रगट केले) ॥दो.२३८॥

**टीका. - चौ. ५ - (१) बघुनि भरत गति अकथ अतीव हिं** - गति = दशा, स्थिति, येथे अकथ **अतीव =** अत्यंत, अकथनीय म्हटले. **'भरत दशा त्या समयीं तैसी । जलअलि गति जल-ओघी जैसी'** (२३४।७) ही सांगता येण्यासारखी = कथनीय होती म्हणून दृष्टान्ताने सांगितली. पुन्हा उपमा दृष्टान्त देता येईना म्हणून उत्प्रेक्षेने सांगितली. **'होइ भरत गति तशी स्वभावें'** (२३५।३-४ पहा);

पण कल्पनातीत नव्हती. पुन्हा **'प्रणति करित दो बंधु चालती । प्रीति वदत लाजते भारती'** (२३८।२) येथे अकथनीय झाली व आता **अतीव च अकथनीय झाली. शब्दांचा उपयोग किती सावधानतेने केला आहे ! (क) जड जीव =** स्थावर व पाषाणादि हे कसे व किती प्रेममग्न झाले हे पुढे (चौ. ८) सांगितले आहे. २२०।७ पहा ।

**चौ. ६ (१) प्रेमविवश मित्रहि पथ भूले** - पशुपक्षी वृक्षपाषाणही प्रेममग्न झाले तेथे सहजस्नेही रामसखा, भरताचा वाटाड्या, जो काही क्षणांपूर्वी भरताला ग्लानिदुःख शोक सागरातून तारून नेण्यासाठी नाविक बनला होता, तोच आता प्रेमसागरात पक्का बुडला. सागरात बुडल्यावर जमिनीवरील मार्गाचे स्मरण कसे राहणार ? वेड्यासारखा इकडे तिकडे चोहिकडे पाहू लागला, की रस्ता कुठे आहे ? आलो कोठून ? जायचे कोठे ? इ. काहीच आठवत नाहीसे झाले. तेव्हा देवांना पडली काळजी की हा एकदा भलत्याच मार्गाला लागला म्हणजे भरतांस कुठे घेऊन जाईल व केव्हा रामभेट होईल काही सांगता येत नाही ! यांत **देवांचा स्वार्थ असला तरी सुद्धा येथे हे स्पष्ट दाखविले की ज्याला राम आपला मानतात व जो स्वतःस रामसेवक मानून रामहितासाठी (हित = प्रेम हा अर्थही आहेच) सर्वस्वावर पाणी सोडून, प्राणार्पण करण्यास, परमानंदाने तयार होतो तो क्वचित एखादे वेळी रस्ता चुकला तरी स्वार्थी देवसुद्धा त्यास साह्य करून योग्य मार्ग सांगतात. पण केवळ ज्ञानमार्गी साधकांशी देव याच्या अगदी उलट कसे वागतात' ते 'गोगोलकें झरोकें नाना'** (७।११८।११) पासून **'विषयभोग अति सदा आवडे'** पर्यंत पहावे.

**चौ. ७ - (१) सिद्ध साधक अनुरागति - सिद्ध** = सिद्धि प्राप्त केलेले योगी, ज्ञानी. साधक = ज्ञान प्राप्तीसाठी किंवा सिद्धि, गूढगति वगैरेंसाठी साधन करणारे. यांना भगवत्प्रेम मिळत नव्हते ते आज सहज भरताच्या या प्रेमदशेच्या दर्शनाने मिळाले. **'भरत बघत गत भवरुज भारी'** (२१७।२ टी.प.) हे भरताची प्रशंसा करू लागले.

**चौ. ८ - (१) भरत-भाव** (हिं. भाउ) भाव शब्दाचे दोन अर्थ घेणे योग्य आहे. **भाव =** अस्तित्व, **जन्म;** आणि विशिष्ट भावना (अभिप्राय). **'भावः** सत्ता-स्वभाव-**अभिप्राय** चेष्टाऽऽ आत्म**जन्मसु'** (अमरे). मामाकडे भरत होते तोपर्यंत त्यांचे रामप्रेम केवळ बंधु भावनेनेच होते; म्हणूनच शंकरांजवळ **'कुशल मातृपितृ**

**बंधुपरिजनां'** (१५७।८) अशी याचना केली. रामवनवासाची बातमी कैकयीच्या मुखांतून सर्व हकीगतीसह ऐकताच त्या भावनेत एकदम बदल झाला; राम स्वामी व आपण सेवक हा भाव उत्पन्न झाला. हा भाव जर उत्पन्न झाला नसता तर भरत राज्यावर बसले असते व जी त्यांची स्नेहदशा सहज होत आहे ती झाली नसती. याच अर्थाला अनुलक्षून पुढला दोहा आहे. सेव्यसेवक, भगवान भगवत्सेवक, या भावाने प्रेम भरत पयोधीत गुप्त होते. बंधुभावाने प्रेम प्रगट होते. **(क) कोण करत चर अचर, अचर चर** - भरताच्या त्या प्रेमदशेच्या प्रभावाने पशुपक्षी इत्यादी जंगम प्राणी (चर) अचरांसारखे - स्थावरांसारखे झाले. त्यांच्या शरीराचा कोणताही भाग हालचाल करीनासा झाला. ते काष्ठ पाषाणांसारखे अगदी तटस्थ झाले व जे वृक्षपाषाणादि अचर होते त्यांना पाझर फुटले. ते जणु प्रेमाश्रू ढाळू लागले; कंप, खेद इ. सात्विक भाव त्यांच्या ठिकाणी प्रगट झालेले त्या सिद्धानां व साधकांना दिसले. (२।२२०।७ पहा.)

**दो. (१) भरत पयोधि;** पयोधि = क्षीरसागर - इंद्राने भरतांस 'प्रेमपयोनिधि' म्हटले आहे. (२१७ पहा.) क्षीरसागराचे देव व असुर यांनी मंदर पर्वताने मंथन करून त्यांतून अमृत काढले; ते देवांच्या हितासाठीच काढले. असुरांना देण्याचे नुसते नाटकच केले होते. आपल्याला खरोखरच मिळेल अशा भरंवशाने असुरांनी मदत केली. देव व असुर हे दोघेही पक्के स्वार्थीच असल्याने मंथनाने प्राप्त झालेली प्रत्येक वस्तु सदोषच निघाली. **(क)** येथे मंथन करणारे एकटे भगवान रघुवीर ! त्यामुळे या क्षीरसागरांतून काढलेले प्रेमरूपी अमृत पूर्ण निर्दोष, परमानंदमय, परमकल्याणकारक व खरोखरच परमात्म स्वरूपच आहे. रामविरह हा मंदर पर्वत रघुवीराने भरतपयोनिधीत घातला. **या रूपकाने पुन्हा स्पष्टपणे दाखविले की भरताच्या गैरहजेरीत रामराज्याभिषेकाची तयारी व पुढील सर्व घटना प्रभूंनीच केल्या.** (मायेला प्रेरणा दिली.) **'तैं कृत काहिं रामरुचि बघुनी'** (२१८।३ टी.पहा). **(ख)** सेव्यसेवक भावाने जे भक्तिप्रेम आता दिसत आहे; ते भरतपयोनिधीत गुप्त होते; जसे दुधात लोणी. ते अमृत सुरांच्यासाठी काढले व स्वर्गात गेले; तसे हे अमृत साधुसंतरूपी देवांच्यासाठी काढले, प्रगट केले. **(ग) कृपासिंधु रघुवीर** - असे करण्यात रघुवीरांनी भरतावर व साधूंवर अनंत कृपा केली. येथे हे ही सुचविले की हे अमृत सुद्धा असुरांना मिळणार नाही. **आसुरी, राक्षसी संपत्तीच्या जीवांना हे मिळणार नाही. दैवी संपत्तिमान असतील**

**त्यांनीच याची अभिलाषा धरावी.** आसुरीसंपत्तिमान जीव या अमृताची अभिलाषा धरतील तर त्यांची स्थिति शेवटी राहूसारखी होईल. ते भक्तीचे दंभ करू लागतील. कालनेमि, रावण, राहु यांची उदाहरणे दिलीच आहेत. (१।७।६ पहा).

*हिं.* ***। सखा समेत मनोहर जोटा । लखेउ न लखन सघन बन ओटा ॥१॥***
***। भरत दीख प्रभु आश्रम पावन । सकल सुमंगल सदनु सुहावन ॥२॥***
***। करत प्रबेस मिटे दुख दावा । जनु जोगी परमारथु पावा ॥३॥***
***। देखे भरत लखन प्रभु आगे । पूँछे बचन कहत अनुरागे ॥४॥***
***। सीस जटा कटि मुनिपट बाँधे । तून कसें कर सर धनु काँधे ॥५॥***

*म.* ***। सखासमेत मनोहर युगला । झाडिंत लक्ष्मण बघू न शकला ॥१॥***
***। भरत बघे प्रभु-आश्रम पावन । सकल सुमंगल सदन सुशोभन ॥२॥***
***। प्रविशत दुःख न दाव न राहे । जणुं योगी परमार्था लाहे ॥३॥***
***। दिसे प्रभुपुढे लक्ष्मण भरता । पुसतां अनुरागाने वदता ॥४॥***
***। शिरीं जटा, कटिं मुनिपट बद्धहि । तूण, शर करी स्कंधीं चापहिं ॥५॥***

**अर्थ -** रामसख्यासह या मनोहर जोडीला, ते झाडीत असल्यामुळे, लक्ष्मण बघू शकला नाही.॥१॥ सकल सुमंगलांचे सदन, सुंदर व पावन असा प्रभूचा आश्रम भरतास दिसला.॥२॥ जणू योग्याला परमार्थाची प्राप्ती व्हावी त्याप्रमाणेच त्या आश्रम-भूमीत प्रवेश करताच सर्व दुःख व दावानल यांचा विनाश झाला.॥३॥ भरतास दिसले की प्रभूच्या पुढे लक्ष्मण बसलेले असून विचारलेल्या प्रश्नाचे उत्तर प्रेमाने देत आहेत.॥४॥ त्यांच्या मस्तकावर जटा बांधलेल्या असून कमरेला मुनिवस्त्रे व भाता बांधला आहे. हातात बाण व खांद्यावर धनुष्य आहे.॥५॥

**टीका. चौ. १-३ (१) मनोहर युगला -** भरतशत्रुघ्न सुद्धा मनोहर आहेत. सुचविले की या जोडीने लक्ष्मणाचे चित्त तेव्हाच चोरले असते पण काय करणार ! हे दोघे झाडीत असल्यामुळे लक्ष्मणाच्या दृष्टीस पडू शकले नाहीत. येथे हे दाखविले की भरत लक्ष्मणाच्या समोरच्या बाजूने व श्री रघुनाथाच्या पाठीकडल्या बाजूने येत आहेत. **(क) प्रविशत दुःख न दाव न राहे -** येथे आश्रम म्हणजे पर्णकुटीच्या सभोवतालची भूमी. हा उल्लेख येथे केला नसता तर काकभुशुंडीच्या आश्रमाच्या सभोवार एक योजनात शोकदुःखादिकांचा, मोहाचा वगैरे प्रवेश होत नाही. या वचनाने 'रामदास रामाहुनि मोठे' या वचनाची सत्यता आश्रमाच्या बाबतीत सुद्धा दाखविता आली नसती; कारण की भरतास ज्या अर्थी लक्ष्मण

दिसले त्या अर्थी भरत उभे असलेले स्थान एक योजनापेक्षा पुष्कळच जवळ आहे. **(क) दुःख दावानल नष्ट झाला** म्हणजेच ब्रह्मानंदासारखा आनंद प्राप्त झाला. **जणुं योगी परमार्था लाहे - परमार्थ** = ब्रह्म, **'ब्रह्म राम परमार्थरूपही'**. (९३।७) योग्याला निर्गुण निराकार ब्रह्माची प्राप्ती झाली म्हणजे दुःख व भयदावानल रहात नाही व ब्रह्मानंदाची प्राप्ती होते. तसेच जणू भरताने त्या आश्रम भूमीत प्रवेश करताच झाले. जो हृदयदाह होत होता तो होत नाहीसा झाला व दुःखही राहिले नाही. अष्टांग योग साधनांचे कष्ट वर्षानुवर्ष करून क्वचित एखाद्या योग्याला जो आनंद मिळतो तसा आनंद भरताला या आश्रमभूमीत नुसते पाऊल टाकल्यानेच झाला. उत्प्रेक्षेने सुचविले की भरतांस मोक्ष नको असल्याने या आनंदाने त्यांस पूर्ण समाधान होणार नाही.

**चौ. ४-५ (१) दिसे प्रभुपुढे लक्ष्मण भरता -** प्रथम लक्ष्मण दिसले व लक्ष्मणास भरत दिसले असते अशी परिस्थिति होती असे दाखवले. आणखी पुढे आले भरत तेव्हा प्रभूंच्या पुढे - समोर लक्ष्मण दिसले; म्हणजे प्रभूंची पाठ दिसली व लक्ष्मणाचे मुख दिसले. आणखी थोडे नमस्कार घालून पुढे जातात तो प्रभूंचा आवाज ऐकू आला; काय बोलले ते मात्र कळले नाही. आणखी १/२ दंडवत घालतात तो लक्ष्मणाचा आवाज कानी आला; यावरून अनुमानाने जाणले की प्रभूंनी काहीतरी विचारले व लक्ष्मण याचे उत्तर देत आहेत. जरा पुढे जातात तो लक्ष्मणाचे सर्व अवयव दिसू लागले. **(क) शिरीं जटा कटिं मुनिपट बद्ध हि -** जटा तयार केल्याचे नुसते ऐकले होते, पण आज प्रत्यक्ष दिसल्या व त्या बांधलेल्या दिसल्या; धनुष्य खांद्यावर आहे, म्हणजे सज्ज केलेले नाही. पण भाता कमरेला बांधलेला व हातात बाण आहेच. क्रोधावेश झाल्यावर **'बांधि जटा शिरिं कटिं कसि भाता । सज्ज शरासन सायक हातां ।'** (२३०।२) असे केले होते. यावरून ठरले की आकाशवाणी ऐकल्यावर धनुष्याची दोरी (ज्या) उतरून ते खांद्यावर ठेवले पण जटा सोडणे, बाण भात्यात घालून भाता (तूण) सोडून ठेवणे झाले नाही. यावरून ठरले की वनांत, **पर्णकुटीजवळ असले तरी दिवसासुद्धा धनुष्य खांद्यावर असे.** भाता बांधल्याचा उल्लेख २३०।२ मध्ये आहे; म्हणजे तो नेहमी बांधलेला नसे हेही ठरले. व हातात बाण चुकून राहिला आहे; कारण धनुष्याला दोरी चढविताना दोन्ही हातांचा उपयोग करावा लागतो; म्हणून २३०।२ मध्ये बाण हातात **घेतला**; असा स्पष्ट उल्लेख नसला तरी **'सज्ज शरासन सायक हातां'**

यांतील क्रम सांगतो की शरासन सज्ज केले. ते एक डाव्या हातात घेतले. धरले व मग उजव्या हातात बाण घेतला.

**हिं.** *। बेदी पर मुनि साधु समाजू । सीय सहित राजत रघुराजू ॥६॥*
*। बलकल बसन जटिल तनु स्यामा । जनु मुनिबेष कीन्ह रति कामा ॥७॥*
*। कर कमलनि धनु सायकु फेरत । जिय की जरनि हरत हँसि हेरत ॥८॥*

**हिं.दो.** *। लसत मंजु मुनि मंडली मध्य सीय रघुचंदु ॥*
*॥ ग्यान सभाँ जनु तनु धरें भगति सच्चिदानंदु ॥२३९॥*

**म.** *। वेदीवर मुनि साधुसमाज । सीते सह राजति रघुराज ॥६॥*
*। वल्कल वसन जटिल तनु शाम हि । जणुं मुनिवेष करुनि रति काम हि ॥७॥*
*। कर कमलीं धनु सायक फिरवित । हज्ज्वर हरती हसुनी निरखित ॥८॥*

**म.दो.** *। लसति मंजु मुनि मंडला-मधें सिता रघुचंद ॥*
*॥ ज्ञानसभें जणुं धृततनू भक्ति सच्चिदानंद ॥२३९॥*

**अर्थ** - वेदीवर मुनि साधूंचा समाज (बसलेला) असून सीतेसहित रघुराज विराजमान झालेले आहेत.॥६॥ ते वल्कले धारण केलेले, जटाधारी व श्याम वर्णाचे आहेत. (त्यामुळे) असे वाटते की जणू रति व काम (मदन) यांनीच मुनिवेष घेतला आहे.॥७॥ रघुराज आपल्या कमलांसारख्या हातात धनुष्य व बाण फिरवीत असून, हास्य करून (कोणाकडे) बघत हृदयांतील ज्वर (ताप) हरण करीत आहेत.॥८॥ (वेदीवर) मुनिमंडळामध्ये सीता आणि रघुवंशाला चंद्राप्रमाणे प्रसन्न करणारे राम असे सुंदर विराजत (लसत) आहेत की जणू ज्ञानसभेमध्ये भक्ति व सच्चिदानंद (ब्रह्म) च शरीर धारण करून बसली आहेत.॥दो.२३९॥

**टीका. - चौ. ६ (१) वेदीवर मुनि साधु समाज...** भरत जरा आणखी पुढे आल्यावर त्यास काय दिसले हे येथून पुढे सांगतात. या चौपाईत ज्या दृश्य वर्णनाचा उपक्रम केला आहे त्याचाच उपसंहार दोह्याच्या पूर्वार्धात केला आहे; म्हणून मुनि आणि साधु असे दोन वर्ग घेता येत नाहीत. मुनि = ज्ञानी व साधु = भक्त, **ज्ञानी असून भक्तिसंपन्न असलेले = मुनिसाधु.** केवळ ज्ञानी असते तर त्यांनी सगुण साकाराची किंमत बाळगली नसती व ते समाधी सुखात आपल्या पर्णकुटीतच राहिले असते. रघुनंदन चित्रकूटास गेल्यावर हे मुनिगण स्वतः होऊन रघुनन्दनाच्या दर्शनास आले आहेत. (१३४।५-८ टी.पहा) केवळ

ज्ञानी सम्राटाच्या पुत्राच्या दर्शनासाठी कधीच येणार नाहीत. **(क) रघुराज** - सुचविले की भरत रामचंद्रांस रघुराजच मानीत आहेत. रघुराजांस वेदीवर बसलेले पाहून चित्ताला व्यथा झाली की जे अयोध्येतील दरबारात सुवर्णसिंहासनावर बसून वसिष्ठांच्या मुखाने श्रवण करणारे, ते दगडमातीच्या, शेणाने सारवलेल्या वेदीवर, कुशासनावर, वडाच्या झाडाखाली बसलेले असावे ना ? याला कारण मीच ना ! या भावनांचा ध्वनि पुढे 'पाहि नाथ' या शब्दांत आहेच. या भावनेचे विस्तृत वर्णन वा. रा. स. ९९।३०-३५ मध्ये आहे. विविधा विलाप करीत आणि अयोध्येतील राम व येथे बसलेले राम यांच्या सुखांतील विरोध वर्णन करीत शेवटी म्हणतात - **'मन्निमित्तमिदं दुःखं प्राप्तो रामः सुखोचितः ॥ धिग् जीवितं नृशंसस्य मम लोकविगर्हितम्' (श्लो. ३६) त्या सर्व श्लोकांतील भाव येथे 'रघुराज' या एका शब्दाने ध्वनित केले आहेत.**

**चौ. ७ - (१) वल्कल वसन जटिल तनु शाम** - या चरणाचा संबंध पूर्वीच्या अगदी जवळ असलेल्या 'रघुराज' शब्दाशी आहे. रघुराज असून वल्कल नेसण्याचा प्रसंग यावा ना ? मस्तकावर अमूल्य दिव्य मुकुट असावयाचा तेथे माझ्या नशिबात जटा पाहण्याचे लिहिलेले असावे ना ! जे शरीर धष्टपुष्ट असावयाचे ते आज तनु = कृश झालेले या डोळ्यांनी पाहण्याची पाळी आली ! जो देह सूर्यासारखा लखलखीत, निर्मळ दिसावयाचा तो आज शाम = काळवंडलेला व मलीन झालेला पाहण्याचे माझे दुर्भाग्य ओढवले ! पण याला कारण केवळ मीच ! धिक्कार असो मला व माझ्या दुष्टपणाला ! **'मलेन तस्यांगमिदं कथमार्यस्य सेव्यते'** (वा.रा. २।९९।३५) **(क) जणुं मुनिवेष करुनि रति काम - सीतेने मुनिवेष केला असल्याचा हा भरभक्कम पुरावा आहे.** येथे 'मदन' म्हटले नाही याचे कारण मद न आहे, 'मार' म्हटले नाही. कारण येथे कोणास मारावयाचे नाही. **भरताच्या भेटीची कामना आहे.** तळमळ लागली आहे **म्हणून काम म्हटले.** सीता व रघुराज या दोघांनाही भरताच्या भेटीची सारखीच तळमळ आहे. **(ख)** रति व काम यांचे निवासस्थान ब्रह्मलोक. तेथील सुखोपभोगांची सवय असलेल्या या दांपत्याला मुनिवेषांत, अरण्यांत, उघड्यावरच, वडाच्या झाडाखाली पाहिल्यावर पाहणारांना ते दांपत्य जरी मनोहर दिसले तरी दुःखच होणार. उत्प्रेक्षा करण्याचे कारण इतकेच की रति व काम सीतारामांच्या सौंदर्याच्या पासंगाला पुरणारी नाहीत तरीसुद्धा मुनिवेष करून अशा कष्टमय परिस्थितीत राहतील हे शक्यच नाही.

**चौ. ८ (१) करकमलीं धनुसायक फिरवित** - भरत भेटणार या भावनेने हृदयांत वाटत असलेला उत्साह या मार्गाने प्रगट होत आहे. याने परम उत्साह व परम प्रसन्नता सुचविली आहे. **'भुजदंडिं शर कोदंड फिरविति'** (६।१०३ छं २) रावणवधानंतरचे हे वर्णन आहे. क्रोध व वीररस असल्याने शब्द उग्र वापरले आहेत. पण धनुष्य बाण फिरविणे हे उत्साहाचे चिन्ह आहे. येथे करकमल हे शब्द शृंगार व प्रेमसंबंधी आहेत. 'काम' असे नुकतेच म्हटले आहे. हा प्रेमजनित उत्साह आहे. प्रेमाचा संचारीभाव आहे व तेथे वीररसाचा आहे इतकाच फरक. **(क) हृज्ज्वर हरती हसुनी निरखित - रति काम** - शब्दांच्या साहचर्याने म्हणता येते की हसत हसत सीतेकडे बघत आहेत; **'विलोकयन्तं जनकात्मजां शुभाम्'** (अ. रा २।९।६) 'जनकात्मजेकडे बघत असलेले' असे या वेळचेच वर्णन आहे. येथे भाव आहे की अशा कृपादृष्टीने रामसीतेकडे बघतात व त्यामुळे तिला वनवास दुःख किंवा पूर्वीचे सुख यांपैकी कशाचीच आठवण होत नाही. जशि **सीतालक्ष्मण सुख लभती । तेंच करिति रघुनाथ बोलती'** (१४१।१). येथेही रघुराज शब्द आहेच. या वचनाच्या आधारे 'सीता व लक्ष्मण' यांच्याकडे बघत आहेत असा अर्थ होतो. 'तेंच करिति' शब्दांनी सुचवलेल्या क्रियांपैकी एक नमुना येथे सहज दाखविला. यावेळी तर पूर्व संदर्भानुसार व प्रकरणानुसार हसत हसत लक्ष्मणाकडे बघत आहेत हाच अर्थ अधिक संयुक्तिक ठरतो. लक्ष्मणाशीच बोलत आहेत; व लक्ष्मणाच्या हृदयांत पश्चात्ताप ज्वर नुकताच आला होता. 'ज्याच्याकडे हसत बघतील त्याच्या हृदयांतील सर्व पापतांपसंताप नष्ट होतात हा अर्थ आहेच आहे. **(ख)** प्रभूचे येथील हास्य म्हणजे **'इंदु अनुग्रह हृदीं प्रकाशे । सुचविती किरण मनोहर हासें'** (१।१९८।७).

**दो. (१) मुनिमंडळ = ज्ञानसभा;** ज्ञानानेच जणू काय अनेक रूपे घेतली आहेत म्हणून मुनिसाधुसभा न म्हणता ज्ञानसभा म्हटले. सीता = मूर्तिमंत भक्तिच; भक्तीनेच जणू सीतेचे रूप घेतले आहे व सच्चिदानंद = निर्गुणनिराकार निर्विकार ब्रह्मानेच जणू रघुचंदाचे रूप घेतले आहे. **उत्प्रेक्षेच्या निमित्ताने अवताररहस्य सुचविले. (क) रघुचंद म्हटले. चंद हा संस्कृत शब्द आहे.** यांत 'र'कार नाही; रकार अग्निबीज, दाहक, तापद आहे. विरहानलाने आधीच दग्ध व तप्त झालेले 'नाथवियोगज ताप तप्ततनु' (सीतास्वप्नांत) भरत व इतर रघुवंशी मंडळी व रघुराज प्रजा येत आहेत. त्यांना रकार असलेला चंद = चंद्र पूर्ण शीतलता देऊ शकणार

नाही. (ख) या उपमेने सुचविले की येणाऱ्या सर्व मंडळींचा विरहसंताप- पूर्णपणे नाहिसा होईल. येणारी सर्व मंडळी ज्येष्ठवद्य एकादशीला फक्त जलाहार केलेली, आज द्वादशीला पारणा करण्यास येतील, तेव्हा त्यांना ज्ञानभक्ति व सच्चिदानंद ब्रह्म यांचे सगुण साकार रूपाने दर्शन होईल. सगुणनिर्गुणांचा साक्षात्कार होऊन भक्तिलाभ होईल. यानेच उपास सोडतील, कोणी पाणी सुद्धा पिणार नाहीत.

हिं. *। सानुज सखा समेत मगन मन । बिसरे हरष शोक सुख दुख गन ॥१॥*
*। पाहि नाथ कहि पाहि गोसाईं । भूतल परे लकुट की नाईं ॥२॥*
*। बचन सपेम लखन पहिचाने । करत प्रनामु भरत जियँ जाने ॥३॥*
*। बंधु सनेह सरस एहि औरा । उत साहिब सेवा बस जोरा ॥४॥*
*। मिलि न जाइ नहिं गुदरत बनई । सुकवि लखन मन की गति भनई ॥५॥*
*। रहे राखि सेवा पर भारू । चढ़ी चंग जनु खैंच खेलारू ॥६॥*

म. *। सामुज सखासमेत मग्न मन । विस्मृत हर्षशोक सुखदुख गण ॥१॥*
*। पाहि नाथ ! प्रभु पाहि बोलले । छडी समान महीवर पडले ॥२॥*
*। प्रेमळ वचना ओळखि लक्ष्मण । जाणे करत भरत कीं प्रणमन ॥३॥*
*। बंधूस्नेह सरस अति इकडे । सेवा प्रबल फार परि तिकडे ॥४॥*
*। भेटुं न उपेक्षणा करूं शकती । लक्ष्मण-मन-गति सुकवि सांगती ॥५॥*
*। राहि भार घालुनि सेवेवरि । उंच पतंग किं ओढि खेळकरि ॥६॥*

**अर्थ** - धाकटा भाऊ व रामसखा यांसह भरताचे मन इतके मग्न झाले आहे की हर्षशोक, दुःख इत्यादी सर्व द्वंद्वांचा विसर पडला.॥१॥ नाथ - पाहि (रक्ष) प्रभु ! पाहि (रक्ष) असे म्हणाले व एखाद्या छडीसारखे जमिनीवर पडले. (दण्डवत - नमस्कार केला)॥२॥ ते प्रेमळ वचन लक्ष्मणाने ओळखले व भरतच प्रणाम करीत आहेत हे जाणले.॥३॥ इकडे बंधुस्नेहाचा जोर अधिक आहे तर सेवेची प्रबलता तिकडे अधिक आहे.॥४॥ भेटतांही येत नाही व उपेक्षाही करवत नाही; या लक्ष्मणाच्या मनाच्या दशेचे वर्णन सु कवि करतात ते असे -॥५॥ उंच चढलेल्या पतंगाला खेळाडू (खेळ करी) जसा खाली ओढतो तसे लक्ष्मण सेवेवर भार देऊन राहिले.॥६॥

**टीका. - चौ. १ विस्मृत हर्षशोक सुखदुख गण** - यांतील गण = समुदाय हा शब्द दिलेल्या दोन जोड्यांकडे लावता येईल किंवा इतर द्वंद्वांचा सूचक म्हणून घेता येईल. **शोकगण -** शोक, चिंता, दीनता, लज्जा, खेद इत्यादी दुःखांचा

समुदाय - हर्षगण - उत्साह, धैर्य, आनंद, स्मरण, सुख, निर्वेद इ. इतर = लाभहानि, यशअपयश, इत्यादी यांपैकी कोणताच विकार मनात राहिला नाही. मन केवळ शुद्ध प्रेमरूपच होऊन गेले. प्रेम समाधिमग्न झाले. तिघांची सारखीच दशा झाली.

**चौ. २ - (१) पाहि नाथ ! प्रभु पाहि** - पाहि = रक्ष. 'रक्ष मां परमेश्वर, रक्ष मां परमेश्वर' असे प्रार्थनेच्या - अपराधक्षमापनाच्या शेवटी म्हणतात तसेच म्हणाले. भाव हा की, मी अनंत अपराधी आहे. दोषी आहे; पण शरण आलो आहे; तरी सर्व दोषांची क्षमा करून पदरात घ्यावा. **(क) छडीसमान पडले** - लकुट = पातळ काठी, घडी पूर्वी दण्डवत प्रणाम केल्याचे उल्लेख आहेत. शृंगवेरपुरास रामशय्येला (१९८) भरद्वाजांत २०६।४; नंतर भरद्वाजाश्रमांतून निघताना (२१६।२) व शेवटी २२५।७ कामदगिरि दिसल्यावर; पण हा उल्लेख सर्वांच्या विषयी आहे; म्हणून भरताविषयी तो घेता येत नाही. भरद्वाजाश्रमांतून निघण्यापूर्वी फक्त एक दिवसच पायी प्रवास केला होता. त्यानेच पायांना फोड आले. त्या नंतरच्या प्रवासाचे कष्ट, शोक, दुःख, ग्लानि यांच्यामुळे भरतांचे शरीर कृश होऊन छडीसारखे किडकिडित दिसू लागले. सर्व शरीर एखाद्या दंडासारखे सपाट जमिनीवर पसरून, हात जोडून पुढे लांब पसरून जो नमस्कार करतात त्यास दण्डवत म्हणतात. महाराष्ट्रात याचा प्रचार फारसा नाही. उत्तर हिंदुस्थानात गुरु, देव इत्यादिकांना आस्थेवाईक पुरुष अद्याप असाच दण्डवत नमस्कार करतात.

**चौ. ४-६ (१) बंधूस्नेह सरस अति इकडे** - चटकन उठून धावत जाऊन भरतांस वंदन करावे असे लक्ष्मणास वाटत आहे; पण दुसरीकडे सेवाधर्म सांगत आहे की आज्ञा घेतल्याशिवाय जाणे व स्वामी भेटण्याच्या आधी जाणे व न विचारता परवानगी मागणे या गोष्टी सेवाधर्म विरोधी आहेत. **(क)** प्रभु काही विचारीत आहेत व लक्ष्मण याविषयी सांगत आहेत; ही सेवा सोडून जाणे अधर्म आहे. भरत आल्याचे जाणले असून व ते वडील बंधू असून जाऊन नमस्कार न करणे म्हणजे भरतांची उपेक्षा करण्यासारखे आहे. अशी परस्परविरोधी भावनांची ओढाताण, रस्सीखेच चालली आहे. **(ख)** शेवटी ठरविले की सेवा सोडणे योग्य नाही. लक्ष्मणाच्या मनातील ओढाताणीचे वर्णन करता येणे शक्य नाही; परंतु काही कल्पना करता यावी म्हणून उत्प्रेक्षेने सांगतात. पतंग एका-एकी वाऱ्याच्या

जोराने फार उंच जाऊ लागला की पतंग उडविणारा त्याला पूर्वस्थानी आणण्यासाठी जसा झपाझप दोरा ओढतो तसे लक्ष्मणाने आपले मन आवरले; व सेवेत स्थिर ठेवले. मन हा पतंग सेवेत स्थिर होता; पण बंधुस्नेहरूपी वाऱ्याची जोराची झुळूक लागताच तो पूर्वस्थानापासून - सेवेपासून भराभर दूर उंच उंच जाऊ लागला तेव्हा त्याला सेवाधर्मरूपी दोऱ्याने सरासर ओढून सेवेत स्थिर केला.

(२) भरत लक्ष्मणाला दिसण्यासारखा होता; पण झाडीमुळे दिसत नव्हता हे मागे सांगितले आहे. जेव्हा भरतांस रामचंद्रांचे हास्यमुख एका बाजूने दिसले तेव्हा पाहि नाथ ! प्रभु ! पाहि' म्हणाले व मग दण्डवत नमस्कार घातला. **(क)** भरताच्या मुखांतून 'पाहि !' हा शब्द बाहेर पडताच त्या आवाजावरून लक्ष्मणाने जाणले की भरत प्रणाम करीत आहेत; त्या बरोबर मागील तीन ओळींत वर्णिलेली ओढाताण सुरू झाली; पण मनाची गति किती असते हे सांगण्याची आवश्यकता नाही. फार तर 'नाथ' हा शब्द भरताने उच्चारला असेल नसेल तोच निश्चय झाला; पण स्वस्थ बसवेना म्हणून दोन्ही भावनांचे संरक्षण करण्यासाठी, पुढील चौपाईत वर्णिल्याप्रमाणे, नमस्कार करून घाईघाईने सांगितले की 'प्रणमत भरत करत रघुनाथा' - भरत **प्रणाम करीत** आहेत. तोच तिकडे भरतानी 'प्रभु' ! शब्द उच्चारला असेल; आणि शेवटचा शब्द उच्चारून भरत जमिनीवर छडीसारखे पडतात न पडतात तोच रघुनाथ धावत जाऊन पोचले तेथे व घेतले उचलून भरतांस हे पुढील शब्दांवरून स्पष्ट कळेल. मनाच्या वेगाने मनात घडणाऱ्या गोष्टी शब्दांनी सांगावयाच्या म्हणजे शतसहस्रपट वेळ लागणार ! एका सेकंदाच्या अत्यल्प अंशांत मन मुंबईला जाऊन निरनिराळी स्थाने पाहून परत सुद्धा येते; पण काय काय पाहिले हे क्रमाने सांगण्यास सहस्रपट वेळ सुद्धा पुरणार नाही. येथील 'पडले' हा शब्द व पुढील 'उचलून घेतले' या अर्थाचे शब्द यांत सहा ओळींचे अंतर असल्याने असे वाटते की भरतांस फार वेळ पडून रहावे लागले; व त्यामुळे अनेक कुतर्कांचे पीक येते; म्हणून हा विस्तार यथामति आधीच करावा लागला.

*हिं.* *। कहत सप्रेम नाइ महि माथा । भरत प्रनाम करत रघुनाथा ॥७॥*
*। उठे राम सुनि पेम अधीरा । कहुँ पट कहुँ निषंग धनु तीरा ॥८॥*

*हिं.दो.* *। बरबस लिए उठाइ उर लाए कृपानिधान ॥*
*॥ भरत राम की मिलनि लखि बिसरे सबहि अपान ॥२४०॥*

म. *। प्रेमें वदति नमुनि महिं माथा । प्रणमन भरत करत रघुनाथा ॥७॥*
*। उठति राम तैं प्रेमाधीर हि । तूण कुठें पट कार्मुक तीर हि ॥८॥*
म.दो. *। बळें धरिति उठवुनि हृदयिं भरता कृपानिधान ॥*
*॥ राम-भरत-भेटिस बघुनि सकल भुलति तनुभान ॥२४०॥*

**अर्थ** - जमिनीवर डोके टेकून नमन करून लक्ष्मण म्हणाले की - रघुनाथा ! भरत प्रणाम करत आहेत ॥७॥ (हे कानी पडते न पडते) तोच राम प्रेमाने इतके अधीर होऊन उठले की भाता कुठे पडला, अंगावरचे वस्त्र कुठे पडले, कुठे (उजव्या हातातला) बाण (तीर) गळून पडला व कुठे धनुष्य पडले. (पण याची दाद नाही).॥८॥ कृपानिधीने भरतास बळेच उचलून हृदयाशी कवटाळला (धरला). राम व भरत यांची ही भेट पाहून (पाहणारे देवमुनि इ.) सर्व देहभान विसरले.॥ दो.२४० ॥

**टीका. चौ. ७ (१) नमुनि महिं माथा** - वीरासनावर बसले होते व रघुनाथाने विचारलेल्या प्रश्नांविषयी सांगत होते. लक्ष्मण-भरताच्याच गोष्टी चाललेल्या असणार. भरत भेटणार या आनंदात उत्साह चढला आहे व राम हातांनी धनुष्य व बाण गरगर फिरवीत आहेत; अशा स्थितीत प्रभूंनी विचारले असेल की भरत आता किती दूर आहेत लक्ष्मणा ! बघ पाहू; तोच लक्ष्मण म्हणाले की, **'प्रणमन भरत करत रघुनाथा'** - प्रथम उल्लेख आहे की 'जाणे करत भरत कीं प्रणमन' (चौ.३) दोन्ही ठिकाणी **'प्रणमन करत अशी अपूर्ण क्रिया असल्याचे अगदी स्पष्ट आहे.** भाव हा की लक्ष्मणाने मस्तक नमवून सांगितले त्या वेळी भरत प्रणाम करीतच होते; प्रणाम पूर्ण केला नव्हता तोच लक्ष्मणाने सांगितले 'प्रणमन भरत' हे शब्द उच्चारले जाताच 'करत' शब्द ऐकण्यापूर्वीच रघुनाथ अत्यंत त्वरेने कसे उठले हे याचे सुंदर वर्णन पुढल्या चौपाईत आहे. गजेंद्राने 'नारायणाऽखिल गुरो' म्हणताच जशी गडबड उडाली व गरुडाची गति अपुरी पडेल म्हणून जसे 'भगवन् ! नमस्ते' यांतील 'नमस्ते' म्हणण्याच्या आधी येऊन पोचलेसुद्धा ! तसेच येथे झाले. 'प्रणमन भरत' इतके ऐकताच उठले व भरत प्रणाम करून 'भूतळिं पडले' असे होते न होते तोच राम तेथे पोचले सुद्धा.

**दो. - (१)** या दोह्याचा (हिंदी व मराठी) पूर्वार्ध व उत्तरार्ध शक्य तितक्या सारख्या घाईने वाचून पहा म्हणजे **एक मजा आढळते की** पूर्वार्धाचा उच्चार लवकर होतो; व उत्तरार्धाचा उच्चार करण्यास वेळ लागतो. मात्रा २३।२३ च

आहेत; पण पूर्वार्धात (हिंदी व मराठी) ६ शब्द पण उत्तरार्धात ८ शब्द आहेत.

*हिं.* *। मिलनि प्रीति किमि जाइ बखानी । कबिकुल अगम करम मन बानी ॥१॥*
*। परम पेम पूरन दोउ भाई । मन बुधि चित अहमिति बिसराई ॥२॥*
*। कहहु सुपेम प्रगट को करई । केहि छाया कबि मति अनुसरई ॥३॥*
*। कबिहि अरथ आखर बलु साँचा । अनुहरि ताल गतिहि नटु नाचा ॥४॥*
*। अगम सनेह भरत रघुबर को । जहँ न जाइ मनु बिधि हरि हर को ॥५॥*
*। सो मैं कुमति कहौं केहि भाँती । बाज सुराग कि गाँडर ताँती ॥६॥*

*म.* *। प्रीति भेटिची केविं वानणें । कविकुल-अगम कर्म-मन वचनें ॥१॥*
*। प्रेमें परम पूर्ण दो भाई । मन मति चित्त अहं ही जाई ॥२॥*
*। वदा प्रगट सुप्रेम कोण करि । कोण्या छाये कवि-मति अनुसरि ॥३॥*
*। कविस अर्थ अक्षर बलं साचें । नट अनुतालगतिहि कीं नाचे ॥४॥*
*। स्नेह अगम रघुवर - भरतांचा । स्पर्श न बिधिहरिहर - चित्तांचा ॥५॥*
*। तो मी कुमति कशापरिं वदणें । निघे सुराग किं हरळि-तंतुनें ॥६॥*

**अर्थ** - श्रीराम-भरत भेटीची प्रीति कशी वर्णन करून सांगणार ! ती तर कविवर्गाच्या कर्म मन व वाचा यांना अगम्य आहे.॥१॥ दोघे भाऊ मन बुद्धि चित्त व अहंकार यांना विसरून परम प्रेमाने परिपूर्ण झाले आहेत.॥२॥ या अत्यंत प्रेमाला (सुप्रेम) कोण प्रगट करू शकेल ते सांगा पाहू ! कवीच्या बुद्धीने तरी कोणत्या छायेचे अनुसरण करावे ?॥३॥ कवीला केवळ अर्थ व अक्षरे (शब्द) याचेच खरे बळ असते. नट नाचतो तो तालगतीला अनुसरून नाचतो.॥४॥ रघुवरभरताचा स्नेह (इतका) अगम्य आहे (की) विधि, हरि, हर यांच्या चित्तांचा सुद्धा त्याला स्पर्श होऊ शकत नाही (तेथे प्रवेश होत नाही)॥५॥ तो स्नेह मी कुमति कशा प्रकारे वर्णन करू शकेन ? हरळीच्या (गांठ्याळ दूर्वेच्या) तंतूने कधी सुंदर राग निघू (वाजू) शकेल काय ?॥६॥

**टीका. चौ. २-३ (१) मन मति चित्त अहं ही जाई** - या चौघांना मिळून अंतःकरण चतुष्ट्य म्हणतात. या भेटीत दोघेही अंतःकरण चतुष्ट्यातीत झाले. मन बुद्धि चित्त अहंकार यांचा प्रेमांत लय झाला. दोघे बंधू प्रेमसमाधि मग्न झाले आहेत. **(क) वदा प्रगट सुप्रेम कोण करि'** - मन बुद्धि चित्त अहंकार यांपैकी कोणीतरी कार्यक्षम, जागृत असेल तोपर्यंत कोणत्या ना कोणत्या रूपाने प्रेम प्रगट होऊ शकते. कंप, खेद, रोमांच, अश्रू इत्यादिकांपैकी काहीतरी अनुभाव

प्रगट होऊ शकतात - होतात. वाणीने प्रगट करता आले नाही तरी या अनुभावांनी किंवा संचारी भावांनी ते प्रगट होते किंवा करता येते. परंतु जेथे अंतःकरण चतुष्ट्याचाच लय झाला तेथे प्राणगतीही निरुद्ध होत असल्याने ते दोघेतरी प्रेम कसे प्रगट करू शकणार ! वर वर्णन केलेले अनुभावादिक प्रेम नसून प्रेमाच्या छायेप्रमाणे आहेत. प्राणी दिसला नाही पण त्याची छाया दिसली तर त्या छायेच्या अनुरोधाने एखादा कुशल कवि त्या प्राण्याचे काहीतरी वर्णन करू शकेल. पण येथे रामभरतांच्या प्रेमाची छायासुद्धा दिसली नाही; मग कोणीही कितीही, कुशल कवि असला तरी **'कोण्या छाये कविमति अनुसरि?'** त्याने कशाच्या आधारावर वर्णन करावे ?

**चौ. ४ (१) कविस अर्थ अक्षर - बल साचें -** कवि जे काही वर्णन करतात ते शब्दांच्या व अक्षरांच्या साह्याने; शिवाय पाहिजे तो अर्थ प्रगट करण्याचे सामर्थ्य शब्दात असावे लागते. 'कानडीने केला मराठी भ्रतार' अशी वेळ आली, बायकोला 'मराठी' हा शब्द सुद्धा माहीत नाही व नवऱ्याला कानडी भाषेचा गंध नाही असे झाले म्हणजे त्या दोघांजवळ शब्दांचा व अक्षरांचा पुष्कळ भरणा असला तरी ते शब्द अर्थ प्रगट करण्यास असमर्थ असतात. भाव हा की या प्रेमाची भाषा कोणालाच येत नाही. या प्रेमाचे वर्णन करण्याची शक्ति कोणत्याही प्रकारे शब्दांत नाही. अभिधा, लक्षणा वगैरे कोणत्याही शब्दशक्तीचा प्रवेश या प्रेमांत होत नाही. याला दृष्टान्त देतात - **(क) नट अनु-ताल गति हि नाचे - 'तुरग नाचविति कुमर वर मृदंगादि अनुकूल ॥ नागरनट निरखिति चकित ताल-समेत न भूल'** (१।३०२) वाद्यांच्या तालाप्रमाणे नट नाचतो. ताल नसेल तर नटाला नाचता येत नाही. जे वर्णन करण्यासारखे शब्दच जेथे नाहीत तेथे कोणीही कवि असला तरी कसे सांगणार ?

**चौ. ५-६ (१) स्पर्श न बिधिहरिहर-चित्तांचा - 'शेष गणेश गिरा - गति नाहीं'** यांत काही आश्चर्य नाही; पण ब्रह्मा, विष्णू, महेश या त्रिदेवांचे चित्त-मन सुद्धा त्या प्रेमापर्यंत जाऊ शकत नाही; तेथे इतरांचा पाड काय ? असे जिथे आहे तेथे. 'मानसकवि तुलसी' म्हणतात **(क) तो मी कुमति, कशापरिं वदणें ?** मी तर कुमति-दुर्बुद्धि आहे; मग मला तो स्नेह कोणत्या, कशा रीतीने वर्णन करता येईल ? मनाची देवता चंद्र, बुद्धीची ब्रह्मा, चित्ताची विष्णु आणि अहंकाराची देवता रुद्र - हर - महेश, आहे. हे अंतःकरण चतुष्टयच त्या

स्नेहांत लय पावल्यावर या देवताही त्यांतच लय पावणार मग वर्णन कोण करणार ? **(ख) निघे सुराग किं हरळि तंतुनें** - तंतु वाद्यांतून एखादा राग, सूर काढावयाचा असला तर ते तंतू धातूंच्या तारांचे असावे लागतात; पण हरळीचे म्हणजे अनेक गांठी असलेल्या दूर्वांचे तंतु लावल्यास त्यांतून कोणताच सूर-ध्वनि-आवाज निघू शकणार नाही. जलतरंगवादन असेल तर निदान मधे गांठ नसलेले कणखर बरूचे कांडे तरी लागते; त्याऐवजी हरळीचा तंतु वापरताच येणार नाही; मग सूर व राग त्यातून काढणे तर अगदीच अशक्य. येथे त्या अनिर्वचनीय प्रेमाच्या वर्णनाचा उपसंहार केला. पहिल्या चौपाईत उपक्रम केला. नंतर उपपत्ति, अपूर्वता, अभ्यास, हेतु, दृष्टान्त इत्यादी सांगून साहव्या चौपाईत उपसंहार केला. या दृष्टान्ताने तुलसीदास सुचवितात की माझी बुद्धि त्या दुर्वेच्या तंतूसारखी अगदी क्षूद्र आहे. परंतु हे लक्षात ठेवावे की अनंताच्या व ललितादेवीच्या पूजेत अशा गाठ्याळ दुर्वांचेच तंतू लागतात !

*हिं.* ***। मिलनि बिलोकि भरत रघुबर की । सुरगन सभय धकधकी धरकी ॥७॥***
***। समुझाए सुरगुरु जड़ जागे । बरषि प्रसून प्रसंसन लागे ॥८॥***

*हिं.दो.* ***। मिलि सपेम रिपुसूदनहि केवटु भेंटउ राम ॥***
***॥ भूरि भायँ भेंटे भरत लछिमन करत प्रनाम ॥२४१॥***

*म.* ***। बघुनी रघुवर - भरत - भेट कीं । सुरगण सभय, भरे उरिं धडकी ॥७॥***
***। सुरगुरु समजाविति जड जागति । सुमन वर्षुनी प्रशंसुं लागति ॥८॥***

*म.दो.* ***। राम रिपुघ्ना भेटती प्रेमें नावाड्यास ॥***
***॥ प्रणमत लक्ष्मण भेटती भावें भरत तयास ॥२४१॥***

**अर्थ** - श्री रघुवर-भरत भेट पाहून सुरगणांच्या छातीत भयाने धडकी भरली. (छाती धडधडू लागली.) ॥७॥ (मग) सुरुगुरु बृहस्पतींनी समजावले तेव्हा ते जड (मूर्ख, गूढ) जागे झाले. (शुद्धीवर आले); व पुष्पवर्षाव करून प्रशंसा करू लागले.॥६॥ (नंतर) राम प्रेमाने शत्रुघ्नास भेटले व नावाड्यास (गुहाला) ही भेटले. लक्ष्मणाने प्रणाम करताच भरत त्यास प्रेमभावाने भेटले.॥ दो. २४१ ॥

**टीका. चौ. ७-८ (१) सुरगण सभय भरे उरिं धडकी** - रघुवर भरत भेट पाहणारे सर्व देहभान विसरले होते. (दो. २४१) त्यात देव होतेच. ते देहभानावर आले तरी त्या दोघांची प्रेममिठी सुटलेली दिसली नाही. त्यामुळे स्वार्थी स्वभावानुसार घाबरले इंद्रादि सर्व देव, की या प्रेमसागरांच्या संमीलनांत देवकार्यरूपी जहाज

उलटून बुडणार ? आमच्या कपाळची साडेसाती संपत नाही. भरताच्या प्रेमाला वश होऊन रघुवर अयोध्येत परत जाणार ! हा विचार मनात येताच देवांची छाती धडधडू लागली व पूर्वी (दो.२१७ पहा) केली तशीच विनंती सुरुगुरुंना केली. **(क) सुरगुरु समजाविति** - देवगुरुंनी समजूत कशी घातली, याचे सविस्तर वर्णन २१८।२ पासून २२०।२ पर्यंत पूर्वी केले आहे ते पहावे. **(ख) जड जागति** - एकदा बृहस्पतींनी समजूत घातली तेव्हा या देवांना फार आनंद झाला व पुष्पवृष्टी करून यांनी भरताची प्रशंसा केली; (२२०।३-४) तरी पुन्हा 'येरे माझ्या मागल्या' असेच यांचे झाले म्हणून जड = मूढ मूर्ख म्हटले. मूर्खाला पुष्कळ समजाऊन सांगितले तरी त्याचा स्वभाव बदलत नाही. **स्वार्थांध झाले मोठे लोक कसे दगड बनतात, त्यांची विचारशक्ती कशी नष्ट होते व सरड्याच्या रंगासारखे क्षणोक्षणी कसे पालटतात** याचे चित्र देवांच्या निमित्ताने वारंवार दाखविले जात आहे. 'मोठे तितके खोटे' ही म्हण यथार्थ झालेली दिसली. **(ग)** देवांनी पृष्पवृष्टि केली व प्रशंसा करू लागले तेव्हा रघुवर व भरत हे दोघेही वृत्तीवर आले; व आता राहिलेल्यांच्या भेटी होतील.

**दो.** (१) भरत शत्रुघ्न व निषादराज या तिघांनीही दंडवत नमस्कार केला. पैकी भरतास भेटून झाले. नंतर क्रमाने शत्रुघ्नाला (रिपुघ्नाला) व निषादराजाला राम भेटले. त्यांना उठवून हृदयाशी धरले. **(क)** येथे पुन्हा **नावाडी** (केवट) शब्द वापरून रघुवरांच्या हृदयातील भावना व्यक्त केली की **'यानें मला भरतविरहसागरांतून तारला.'** भगवंताच्या विरहाने एकान्त भक्त जसा तळमळतो तसे भगवानसुद्धा अशा भक्तांच्या विरहाने तळमळतात हे येथे सुचविले. पूर्वी स्पष्टच सांगितले की भक्त भगवंताच्या नावाचा जप करतो तर भगवान अशा भक्तांच्या नावाचा जप करतात. **'मदन्यत्ते न जानन्ति नाहं तेभ्यो मनागपि'** (भाग.) **(ख)** पुढे दिसेल की भक्त भगवंताच्या इच्छेप्रमाणे वागण्याचा निश्चय करतो तर भगवान भक्ताची इच्छा पूर्ण करण्यासाठी आपली प्रतिज्ञा सुद्धा मोडण्यास तयार होतात. थोडक्यात सार हे की **भगवान अशा भक्ताचे भक्त बनतात.** यापेक्षा अधिक भक्तीचा महिमा कसा व कोण दाखविणार ! **(ग)** राम शत्रुघ्नास भेटत आहेत तो लक्ष्मणाने भरतांस दंडवत नमस्कार केला तेव्हा भरतांनी लक्ष्मणाला उठवून हृदयाजवळ घेऊन प्रेमाने मिठी मारली. आता लक्ष्मण शत्रुघ्नास व निषाद राजास भेटतील.

हिं. *। भेंटेउ लखन ललकि लघु भाई । बहुरि निषादु लीन्ह उर लाई ॥१॥*
*। पुनि मुनिगन दुहुँ भाइन्ह बंदे । अभिमत आसिष पाइ अनंदे ॥२॥*
*। सानुज भरत उमगि अनुरागा । धरि सिर सिय पद पदुम परागा ॥३॥*
*। पुनि पुनि करत प्रनाम उठाए । सिर कर कमल परसि बैठाए ॥४॥*
*। सीयँ असीस दीन्ही मन माहीं । मगन सनेहँ देह सुधि नाहीं ॥५॥*

म. *। लक्ष्मण हौसें अनुजा भेटति । निषादास मग हृदिं कवटाळति ॥१॥*
*। नमिति भरत शत्रुघ्न मुनिगणां । मुदित मिळुनि इष्टाशीर्वचनां ॥२॥*
*। सानुज भरत परम अनुरागां । शिरिं धरि सीता चरण-परागां ॥३॥*
*। कितिदां प्रणाम करतां उठवी । शिरिं करकमला ठेउनि बसवी ॥४॥*
*। सीता दे आशिस मनिं काहीं । स्नेह - मग्न तनु भान न राही ॥५॥*

**अर्थ** - लक्ष्मण हौसेनें (फार उत्कंठेने) आपल्या धाकट्या भावास भेटले; व मग निषादास (गुहास) आलिंगन दिले.॥१॥ मग भरत व शत्रुघ्न यांना सर्व मुनि समूहास नमस्कार केला व इष्ट (अभिवांछित) आशीर्वाद मिळाल्याने प्रसन्न (मुदित) झाले.॥२॥ मग अनुजसह भरताने परम अनुरागाने सीतेच्या चरणकमलांची धूळ आपल्या मस्तकी धारण केली.॥३॥ व कितीक वेळा (वारंवार) प्रणाम केला; तेव्हा सीतेने त्यांस उठवून आपला पद्महस्त त्यांच्या मस्तकावर ठेवला व त्यांना खाली बसविले.॥४॥ सीतेने मनात काही आशीर्वाद दिले व इतकी स्नेहमग्न झाली की देहभानच विसरली.॥५॥

**टीका. चौ. १-२** (१) शत्रुघ्नाने व निषादराजाने लक्ष्मणांस नमस्कार केल्याचा उल्लेख नसला तरी पूर्व संदर्भाने तो अध्याहृत घ्यावयाचा आहे. **हौस** = अति उत्कंठा, बंधुभावाने नसून भरतासारख्या रामभक्ताची सेवा करणारा उत्तम सेवक या भावनेने असे वाटत होते की केव्हा एकदा शत्रुघ्नास, भरतानुजास भेटेन ! **(क)** भावाभावांच्या भेटीत आशीर्वाद देणे, कुशल विचारणे वगैरे शिष्टाचाराच्या व्यावहारिक मर्यादा भेटीच्या परमानंदांत मग्न झाल्या. **(ख) इष्टाशीर्वचना** - इष्ट + आशीर्वचन = इष्टाशीर्वचन, **इष्ट** = अभिलषित, जो मिळावा असे वाटत होते तो आशीर्वाद मिळाला. सीतारामचरणरति, सहजस्नेह हेच पाहिजे असते अशा भक्तांस. (१९७।८ व २०४ पहा.)

**चौ. ३-५** (१) भरत शत्रुघ्न जितक्या प्रेमाने सीतेच्या पाया पडले, तितक्याच प्रेमाने सीतेने मातेप्रमाणे त्यांच्या मस्तकावरून आपला कमलहस्त फिरविला.

मूर्तिमती रामभक्तीने मूर्तिमान रामस्नेहाच्या मस्तकावरच हात ठेवला. राम आधीच प्रेमाधीर झाले होते. त्यामुळे भेटण्यापलीकडे कोणतेही शिष्टाचार होऊ शकले नाहीत. सीतेने मस्तकावर हात ठेवला; मात्र आणि तीही स्नेह व्याकुळ होऊ लागली. सीतेची देहभान विसरेपर्यंतची क्रमशः होणारी स्नेहव्याकुळ दशा ३/४ चित्रांत मिळून दाखविता येईल. **शेवटच्या चित्रांत भरताच्या मस्तकावर हात स्थिर व देह पाषाणवत अचल तटस्थ** ! आशीर्वाद देण्याची इच्छा असून शब्द उमटत नाहीसा झाल्याने मनातच काहीतरी आशीर्वाद दिला तो मनाचाही लय झाला.

*हिं. । सब बिधि सानुकूल लखि सीता । थे निसोच उर अपडर बीता ॥६॥*
*। कोउ किछु कहइ न कोउ किछु पूँछा । प्रेम भरा मन निज गति छूँछा ॥७॥*
*। तेहि अवसर केवटु धीरजु धरि । जोरि पानि बिनवत प्रनामु करि ॥८॥*
*हिं.दो. । नाथ साथ मुनिनाथ के मातु सकल पुर लोग ॥*
*॥ सेवक सेनप सचिव सब आए बिकल बियोग ॥२४२॥*
*म. । अनुकूला अति पाहुनि सीता । भीती स्वकल्पिता गत चिंता ॥६॥*
*। कुणि न कांहिं वदले कुणि पुसलें । प्रेमभरें मन गतिला मुकलें ॥७॥*
*। नावाडी त्या समयिं धीर धरि । कर जुळुनी प्रणमुनी बिनति करी ॥८॥*
*म.दो. । नाथ ! साथ मुनिनाथ कीं माता सब पुरलोक ॥*
*॥ सेवक सेनप सचिव, सब आले विकल वियोग ॥२४२॥*

**अर्थ** - सीता आपल्याला अत्यंत अनुकूल (प्रसन्न, कृपायुक्त) आहे असे पाहून (भरताच्या मनातील) स्वकल्पित भीती गेली व चिंता राहिली नाही.॥६॥ कोणी काही बोलत नाही की कोणी काही विचारपूस करीत नाही; प्रेमाच्या भरात मन आपल्या (संकल्प विकल्प करण्याच्या) गतीला मुकले आहे.॥७॥ अशा समयी नावाडी धीर धरून हात जोडून प्रणाम करून विनंती करतो की - ॥८॥ नाथ ! मुनिनाथांच्या (वसिष्ठांच्या) बरोबर (साथ) सर्व माता, सर्व पुरलोक, सेवक, सेनापति, सचिव वगैरे सर्व आपल्या वियोगाने ब्याकुळ होऊन आले आहेत.॥दो.२४२॥

**टीका. चौ. ६ (१) भीती स्वकल्पिता गत चिंता** - भीतीचे वास्तविक काही कारण नसता, मनुष्य स्वभावानुसार असे भय मनाने मानले होते की सीता आपल्यावर रुष्ट झाली असेल. आपल्या प्राणप्रिय पतीला वनवासाचे दारूण दुःख देणाऱ्या दिराचे तोंडसुद्धा पाहू नये असे सीतेला वाटत असेल. या स्वतःच्या

मनानेच कल्पिलेल्या भीतीमुळे चिंता लागली होती; पण प्रत्यक्ष अनुभवास आले अगदी उलट ! सीता पूर्ण प्रसन्न ! त्यामुळे भीती गेली व अगदी निश्चिंत झाले भरत.

**चौ. ७ (१) प्रेमभरें मन गतिला मुकलें** - भेटल्यानंतर आशीर्वाद देणे, कुशल विचारणे इ. चौकशी, विचारपूस व्हावयाची; पण प्रत्येकाचे मन अगदी विचारशून्य, देहभानरहित व प्रेमात मग्न असल्याने ते आपल्या शक्तीला मुकले आहे. ही गोष्ट भरतांस अत्यंत अनुकूल अशीच घडली. रघुनाथाने भरतांस कुशल विचारले असते तर दशरथमरणाची वार्ता सांगण्याचा दुर्धर प्रसंग त्यांच्यावरच आला असता, पण तो आता टळला.

**चौ. ८ - (१) नावाडी** - नावाडी हा शब्द येथे या प्रकरणात तिसऱ्या वेळी वापरला. भरत शोकवियोगसागरात बुडत असता त्यांस रामाश्रमाचे वृक्ष दाखवून त्यांतून तारून नेण्याचा प्रयत्न केला. (२३७।१) दुसऱ्या वेळी, दो. २४१ मध्ये व येथे तिसऱ्या वेळी वापरला. चौघे बंधू सीतेसह स्नेह सागरात बुडाले आहेत. या पाच जणांस प्रेम सागरातून बाहेर काढण्याचे काम या वेळी त्याने केले म्हणून तो नावाडी हे यथार्थ ठरले. शिवाय तिकडे मंदाकिनीजवळ वसिष्ठ, माता वगैरे सर्व लोक विरहसागरात बुडाले आहेत. त्यांना बाहेर काढण्याचा प्रयत्न याने सुरू केला; नाहीतर ती निःशब्द प्रेममग्न दशा किती वेळाने संपली असती सांगता येत नाही !

**दो. (१) नाथ ! साथ मुनिनाथ कीं** - यांतील 'कीं' हा शब्द मागल्या चौपाईशी संबंधित घ्यायचा आहे. विनंती केली की चित्रकूटास जाण्याविषयीचा ठराव भरताने मांडला खरा; पण त्यास वसिष्ठांनी संमति दिली असल्याने; म्हणजेच वसिष्ठ संमतीने सर्व लोक आले असल्याने मुनिनाथांबरोबर आले असे म्हणणे चूक नाही. शिवाय शृंगवेरपुरास गुहास प्रत्यक्ष दिसले की वसिष्ठच सर्व लोकांच्या पुढे आहेत व त्यांनीच भरताला त्याचा परिचय करून दिला. याप्रमाणे गुहाच्या अनुभवानुसार त्याने सांगितले. शिवाय गुह नावाडी असला तरी राजा आहे; व्यवहार व नीतिनिपुण आहे; आणि रघुनाथाची धर्मशीलता त्यास माहीत आहे, म्हणून मुनिनाथांचा, गुरुंचा उल्लेख प्रथम केला; हेतु हा की गुरु आले आहेत असे समजताच तत्काळ वृत्तीवर येतील व त्यांस भेटण्यास जातील; आणि त्यामुळे माता वगैरे सर्वांनाच समाधान होईल. **(क)** भरताने वसिष्ठादिकांस मागे ठेवले.

त्यातील एक हेतु या वेळी स्पष्ट दिसत आहे की वसिष्ठांनी स्वतः रघुनाथ भेटीस जाण्यापेक्षा रघुनाथाने स्वतः पुढे येऊन त्यांस भेटून घेऊन जाणे हे रघुकुलगुरुंचा व रघुनाथाचाही मोठेपणा वाढविण्यास कारण होईल. **(ख)** ज्या वेळी निषादराज हे सांगत आहे त्या वेळी आश्रमाच्या जवळच असलेल्या मंदाकिनीच्या काठी वसिष्ठादी सर्व मंडळी रामदर्शनाच्या लालसेने किती उत्कंठित झाली असतील याची कल्पना निषादराजास आहे. निषादराज सुमित्रेसारखा व्यवहारदक्ष आहे. रामचंद्रांचा सु-मित्रच तो ! पदवी अगदी सार्थ.

सारांश हा की या रामभक्ताची निषाद, निषादनाथ, नावाडी (नाविक - केवट) व रामसखा (राम-सु-मित्र) **ही सर्व नावे व रामसेवकत्व कवींनी ठिकठिकाणी सहज मोठ्या कौशल्याने यथार्थ करून दाखविली आहेत.**

**या प्रमाणे रामभरतभेट प्रकरण येथे समाप्त झाले.** आता राम गुरुदर्शनास जातील.

